# माझ्या आठवणी

डॉ. ग. य. चिटणीस

्या लेखासह ]

पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७

ह्या आठवणी १९४५ मध्ये तीन महिन्यात लिहिल्या गेल्या. त्या सुरुवातीला 'नवयुग' आणि नंतर 'चित्रा' ह्या साप्ताहिकातून क्रमशः प्रसिद्ध झाल्या.

पुस्तकात प्रकरणें वाचनाच्या सोयीच्या दृष्टीनें पाडण्यात आलीं आहेत. मुळात तीं तशीं होतींच असें नाहीं.

त्रिखंड हिंडुनि धुंडितसे
न परि हरपलें तें गवसे !

# आठवणी सांगण्यापूर्वी

माझ्या आठवणी प्रसिद्ध होत आहेत. यात लिहिलेल्या आठवणी मोठ्या माणसाच्या आठवणी नाहीत. परतु, त्या आठवणीत काहीतरी नावीन्य वाचकाना दिसून येईल, असा मला भरंवसा वाटतो. खरं पाहिलं तर २०–२५ वर्षापूर्वी घडून आलेले प्रसंग जसे घडले तसे आठवणं हे सोपं नाही त्या वेळच्या काळात ज्या व्यक्तीचा लेखकाशी सबंध आलेला असतो, त्या आज बहुतेक काळाच्या उदरात गडप झाल्यामुळे त्याच्याविषयी लेखकानं काहीं लिहिलं तरी त्याचा खरेखोटेपणा तपासून पाहण्याची संधि वाचकास मिळत नाही अशा परिस्थितीत जर लेखकाला आत्मप्रौढीचा रोग जडला तर त्यामुळे वाचकाचं कार्य अधिकच कठीण होऊन जातं. ही गोष्ट या आठवणी लिहिताना लेखकानं शक्य तितकी ध्यानात ठेवली आहे. या आठवणी म्हणजे आत्मचरित्र नव्हे, आणि आत्मचरित्र लिहिण्याइतकं मोठेपण मला लाभलेलं नाहीं. शिवाय मोठ्या माणसाच्या आत्मचरित्रामध्ये क्षुल्लक गोष्टीनामुद्धा महत्त्व असतं ; साधारण माणसाच्या आठवणीमध्ये त्या गोष्टीचा समावेश झाला तर वाचकाना कंटाळा आल्यावाचून राहणार नाहीं. ही गोष्ट लेखकानं लक्षात ठेवली आहे.

परंतु, लेखक साधारण असला तरी आठवणी मात्र साध्या नाहींत. माझ्या आयुष्यात ज्या अनेक घटना अनपेक्षित रीतीनं घडून आल्या आहेत, त्या बहुधा अनेक माणसाच्या आयुष्यात घडून येत नाहीत बहुतेक माणसाचं आयुष्य ठराविक चाकोरीतून जातं. माझं आयुष्य अशाच चाकोरीतून गेलं नाही, या एकाच कारणास्तव मी या आठवणी वाचकापुढे ठेवण्याचं धाडस करीत आहे. हे धाडस करायला मला आणखी एक कारण झाल. ते कारण हेच की माझे निकटचे स्नेही पु य देशपाडे, अनंत काणेकर, प्रभाकर पाध्ये, कुसुमाग्रज या सर्वांनी मी माझ्या आठवणी लिहून काढाव्या म्हणून बरेच दिवस आग्रह चालवला होता. त्याच्या आग्रहामुळेच या आठवणी लिहून झाल्या आहेत. तरीसुद्धा एकादे वेळेस माझ्या नैसर्गिक आळसानं

उचल खाल्ली असती, तर या आठवणी इतक्या लवकर लिहून झाल्या नसत्या. परतु माझी पत्नी माया हिनं रोज संध्याकाळीं माझ्याकडून त्या आठवणी काढून घेऊन लिहून काढल्या, म्हणूनच त्या इतक्या लवकर तयार होऊं शकल्या. या माझ्या मित्राचे किंवा पत्नीचे आभार मानण्याचं मला काहींच कारण दिसत नाही. उलट, त्याच्याच प्रोत्साहनानं या आठवणी प्रकाशात येत असल्यामुळे त्या गोड करून घेण्याची जबाबदारी त्याच्यावर आहे.

ज्या वेळच्या आठवणी लिहिल्या गेल्या, त्या वेळीं माझा जो दृष्टिकोन होता, तोच मा वाचकाना सादर करण्याचा प्रयत्न केला आहे. माझ्या आताच्या दृष्टिकोनातून तो दृष्टिकोन सुधारण्याचा किंवा अधिक सोज्ज्वल करण्याचा मी मुळींच प्रयत्न केला नाही. तरीमुद्धा एकादे वेळेम माझा आताचा दृष्टिकोन जर कुठं चुकून त्या आठवणीत घुसडला गेला असेल, तर त्याबद्दल वाचकानीं उदार अंतःकरणानं मला क्षमा करावी. माझा मानसिक आणि बौद्धिक विकास कमकसा होता गेला, ते मी या आठवणीच्या रूपानं सागण्याचा प्रयत्न केला आहे.

माझा असा समज आहे कीं कुणीही आत्मचरित्र लिहिण्याचा प्रयत्न करूं नये. आत्मचरित्र म्हटलं की, सबंध वंशवृक्षाचा इतिहास, ज्या गावांत तो जन्मला असेल त्या गावाची सविस्तर माहिती, त्या मनुष्याच्या लहानपणींसुद्धां त्याची बुद्धिमत्ता किती अलौकिक होती हें दाखवण्याचा प्रयत्न, या सर्व गोष्टी टाळण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. दुसऱ्याचं चरित्र ज्या वेळी आपण लिहायला घेतों, त्या वेळींसुद्धा आपल्या 'हीरो'चे दोप लपवून त्याचे गुण तेवढे वाचकाच्या समोर माडण्याचा आपण प्रयत्न करतों. अशा अद्भुतरम्य चरित्राचा खरोखर कादंबरींत समावेश व्हायला पाहिजे. आधुनिक काळात चरित्र व आत्मचरित्र यासंबंधानं एक नवा दृष्टिकोन निर्माण होऊं लागला आहे, आणि थोर लोकाच्या चरित्राकडे आपण वास्तवतेच्या प्रखर नजरेनं पाहूं लागलो आहोत एकादे वेळेस ही वास्तवता दुसऱ्या टोकास जाऊन पोचते हे तितकंच खरं आहे. थोर लोकांविषयींचा टॉमस कार्लाइलचा दृष्टिकोन आम्हाला अद्भुतरम्य वाटतो, यात काही चूक नाही. परंतु काही लोक अतिवास्तववादाचा कीस काढून थोर लोकामध्ये खरोखर मुळींच थोरवी नाहीं असं दाखविण्याचा जो अट्टाहास करतात, तो मात्र सर्वस्वी चूक आहे. लेनिनसारखा थोर पुरुप रशियात झाला नसता, तर ऑक्टोबर क्रांति झाली असती की नाही हा वादाचा प्रश्न आहे. परतु ती ज्या वेळी झाली, त्या वेळी ती लेनिनच्या अभावी झाली नसती हे इतिहासावरून सिद्ध करता येईल.

या दोन टोकातून जर सुवर्णमध्य काढायचा असेल, तर आत्मचरित्रापेक्षां आठवणींच्या द्वारें स्वतःचा बुद्धिविकास कसा झाला हें यथामति दाखवणं अधिक श्रेयस्कर, अस मला वाटतं.

## आठवणी सांगण्यापूर्वी

या आठवणीची हस्तलिखित प्रत वाचल्यानतर माझ्या एका मित्रानं मला प्रश्न केला, "काय हो, तुम्ही कलकत्त्याला गेल्यानंतर तुमच्या वडिलानी तुमची काहीच विचारपूस केली नाही हे कसं ?" माझे वडील विचारपूस करणार नाहीत, हे शक्य तरी होतं का ? परतु असल्या सर्व गोष्टी मी कटाक्षानं टाळल्या आहेत. कारण, या साधारण घडून येणाऱ्या गोष्टी आहेत. बापाचं मुलावर प्रेम असणं ही अत्यंत स्वाभाविक गोष्ट आहे. तें नसतं तर मात्र मुद्दाम त्याचा उल्लेख केला असता. ही गोष्ट या ठिकाणीं मुद्दाम नमूद केली आहे, त्याचं कारण, या आठवणी लिहिण्याचा मूळ उद्देश काय आहे तो वाचकाना कळावा

स्वामी विवेकानंदाच्या एका चरित्रकारान त्याच्या आयुष्यात लहानपणी बरेच चमत्कार घडून आल्याचं लिहिलं आहे. निसर्गाच्या नियमाविरुद्ध एकादी गोष्ट घडून येणं याला आपण चमत्कार म्हणतो; पण असले चमत्कार कुणाच्याच आयुष्यात, मग तो मोठा असो अगर लहान असो, घडून येत नाहीत हे आपल्याला माहीत आहे. येशू ख्रिस्ताचं किंवा गौतम बुद्धाचं चरित्र आपण वाचल, तर त्यामध्ये असले चमत्कार खच्चून भरलेले आढळतात; परंतु येशूचा किंवा बुद्धाचा मोठेपणा या चमत्कारावर अवलंबून नाही हे सुबुद्ध वाचकाच्या तेव्हाच ध्यानात येतं. खरोखर पाहिलं असता या दोघानी कुठलेच चमत्कार घडवून आणले नाहीत. परंतु, त्या दोघाच आयुष्य हाच एक मोठा चमत्कार होता. त्याची त्यागवृत्ति, ध्येयपूर्तीची त्याना लागलेली तळमळ, त्याची मानवता, याच गोष्टी इतक्या असाधारण आहेत की त्या चमत्कारासारख्या वाटतात. मग दुसऱ्या कृत्रिम चमत्काराची काय जरूरी आहे ? हे कृत्रिम चमत्कार म्हणजे भाविक लोकाचा कल्पनाविलास. येशूला जे देवाचा पुत्र मानतात किंवा बुद्धाला जे ईश्वराचा अवतार समजतात, त्या अंधश्रद्धा बाळगणाऱ्या लोकाना आपल्या दैवतामध्ये निसर्गाला धाब्यावर बसवून चमत्कार घडवून आणण्याची अलौकिक शक्ति होती असं वाटतं अंधविश्वासाच्या दृष्टिकोनातून ते त्याच्या जीविताकडे पाहातात.

आधुनिक कालातील लेनिनचं उदाहरण घेऊ. लेनिन स्वतः भौतिकवादी होता त्याचा चमत्कार वगैरे गोष्टीवर मुळीच विश्वास नव्हता, परंतु तो मेल्यानंतर त्याच्याच अनुयायानी निरनिराळी औषधी द्रव्यं भरून त्याच शरीर जतन करून ठेवलं. त्याची एक सुंदर समाधि क्रेमलीनच्या प्रागणात बाधली. लेनिनचा प्राण जरी निघून गेला असला, तरी त्याचं शरीर अजून जिवंत असल्यासारखं दिसतं लेनिनचे अनुयायी हे भौतिकवादी. त्याचा ईश्वरावर विश्वास नाही; आणि धर्मावरही नाही; पण त्याच्या अंतःकरणातील भाविकपणा नाहीसा झाला नाहीं. भाविकपणा एकच. तीच अंधश्रद्धा, तोच अंधविश्वास. लेनिनचं दर्शन घ्यायला जाणाऱ्या लोकात आणि देवळात मूर्तींचं दर्शन घ्यायला जाणाऱ्या लोकामध्ये काय फरक आहे ? तत्त्वज्ञान फक्त वेगळं. एक

तत्त्वज्ञान आधिभौतिक, तर दुसरं आध्यात्मिक. पण भाविकपणाच्या बाबतींत दोन्ही लोक सारखेच ज्ञानेश्वरानं म्हटलं आहे कीं, 'मनुष्यजात सकल, स्वभावतः भजनशील' हेच शेवटी खरं ठरतं

कुठल्याही समाजात विचारप्रधान माणसं थोडीं असतात. भावनाप्रधान माणसंच अधिक! वास्तविक पाहिलं तर, माणसाच्या मनाचा जसजसा विकास होतो, तसतसं त्याचं मन अधिक विचारक्षम झालं पाहिजे; परंतु तसं ते होत नाहीं. याचं कारण शिक्षणाचा अपुरेपणा हे एक असूं शकेल; परंतु दुसरं महत्त्वाचं कारण असं आहे, की माणसाला स्वभावतः कुठल्याही तऱ्हेची जबाबदारी अंगावर घ्यायला नको असते. रोमन कॅथॉलिक चर्चमध्ये बहुजनसमाजाला बायबल वाचण्याची कित्येक दिवस मुभा नव्हती त्यांचा धर्मगुरू जो पोप त्याच्या आज्ञेप्रमाणे वागणं हेच त्याचं मुख्य धार्मिक कार्य होतं. वास्तविक पाहिलं तर लोकशाहीच्या काळामध्ये अशी धार्मिक परिस्थिति का टिकून राहावी? लोकशाहीमध्ये विचारस्वातंत्र्याचाच प्रामुख्यानं समावेश होतो. परंतु हे स्वातंत्र्य बहुजनसमाजाला असूनसुद्धा तो त्याचा काहीच उपयोग करीत नाही. याचं कारण हेच की, स्वतंत्रपणे विचार करून तो कृतीमध्ये उतरविण्याची जबाबदारी माणसाला नको असते. आमच्याकडे वेदाला प्रमाण मानणारे अजूनही कितीतरी सापडतात; परंतु हे वेद वाचण्याचा किंवा समजून घेण्याचा कुणीच प्रयत्न करीत नाहीत. त्याचं कारणसुद्धा हेच असलं पाहिजे. जगात 'अन्याय' 'दुष्टपणा' 'पाप' माजलं कीं, त्याचा प्रतिकार स्वतः न करता लोक एखाद्या अवतारी पुरुषाची वाट पाहात बसतात 'परित्राणाय साधूनाम् विनाशायच दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' याचा सरळ अर्थ लोक असा करतात, की जगावर एखादी आपत्ति कोसळली म्हणजे ती दूर करण्यासाठी ईश्वर कुठल्यातरी अवताराच्या रूपानं प्रगट होतो. ही झाली आध्यात्मिक लोकांची गोष्ट परंतु जे भौतिकवादी आहेत, त्यांचा अर्थात् ईश्वरावर विश्वास नसतो आणि अवतारावरही नसतो परंतु आपण राजकीय क्षेत्राकडे नजर टाकली, तर आपल्याला आढळून येतं की, भौतिकवादी म्हणविणाऱ्या राजकीय पक्षामध्येही एखादा 'अवतार' आलेला असतो. मार्क्स, लेनिन किंवा स्टॅलिन यांच्या नावानं अहोरात्र टाहो फोडणाऱ्या कम्युनिस्टांना या तीन देवतांविरुद्ध कुणी ब्र काढलेला खपत नाही. मार्क्स किंवा लेनिन यांनी आपल्या आयुष्यात एखादी तरी चूक केलेली असेल, यावर त्यांचा स्वप्नातसुद्धा विश्वास बसत नाही. धार्मिक क्षेत्रातील बुवाबाजी आणि राजकीय क्षेत्रातील बुवाबाजी यांच्यामध्ये मुळीच फरक नाही. फरक असला तर तो हाच की, धार्मिक-क्षेत्रातील बुवाबाजीच्या आहारी गेलेले लोक धर्मभोळे असल्यामुळे त्यांची खरोखरच आपल्या गुरूवर–अंध का असेना–उत्कट श्रद्धा असते आणि राजकीय क्षेत्रात बुवाबाजी रूढ करणाऱ्या लोकांचा तीमध्ये काहींतरी स्वार्थ

असतो. राजकीय क्षेत्रातील सर्वच लोक आपमतलबी असतात असं म्हणण्याचा माझा मुळीच उद्देश नाहीं. ज्याना स्वतः विचार करण्याची संवय आहे, ते लोक असल्या बुवाबाजीला बळी पडणं शक्य नाही. परतु ज्याना स्वतःला विचार करण्याची सवयच नाही, परंतु राजकारण खेळण्याची मनस्वी हाव आहे, अशा लोकाना एखाद्या असाधारण पुढाऱ्याच्या मागे लागल्याशिवाय राजकारणात महत्त्व प्राप्त होत नाही त्याचा मी स्वार्थ म्हणतो तो हाच !

थिऑसॉफिस्टाचे एके काळी गुरु म्हणून गाजलेले जे कृष्णमूर्ति यानी आपणहून काही वर्षांपूर्वी असल्या वातावरणाचा त्याग केला. लहानपणापासून त्याना गुरु बनण्याचं शिक्षण देण्यात आलं होतं. आणि 'हे पुढे थिऑसॉफिस्टाचे गुरु होणार' म्हणून जाहीर करण्यात आलं होतं. अर्थात् लहानपणापासूनच त्याच्यावर एक प्रकारचा कृत्रिम मोठेपणा लादण्यात आला होता; पण त्याना हें सर्व समजून आल्यानतर त्यानी या ढोंगीपणाचा त्याग करण्यात प्रचंड मनोधैर्य दाखवलं. पायाशी आयतं चालून आलेलं मोठेपण लाथाडण्याचं मनोधैर्य त्यानी दाखवलं यातच त्याचा मोठेपणा आहे. पॉल शिरर नावाचे एक फ्रेंच गृहस्थ काही वर्षांपूर्वी मला नेहमी भेटत असत ते त्या वेळेस अरविंद घोष याच पट्टशिष्य होते 'आर्य' नावाचं तात्त्विक विचारानीं परिपूर्ण मासिक निघत असे, त्याचे ते त्या वेळी संपादक होते. माझी त्याची ओळख होण्यापूर्वी त्यानी जपानमध्ये काही व्याख्यानं दिलीं होती. त्या व्याख्यानात त्यानीं 'अरविंद घोष हे अवतारी पुरुष आहेत' असं जाहीर रीतीनं सांगितलं होतं ही व्याख्यानं पुस्तकरूपानं प्रसिद्ध झाली असल्यामुळें कुणालाही वाचायला मिळतील. त्यानंतर काही वर्षांनी मी असं ऐकलं की पॉल शिरर हे आपला भ्रमनिरास झाला असं सांगून पॉंदिचरी सोडून फ्रान्सला परत निघून गेले. त्याचा अवतारावरील विश्वास उडाला म्हणूनच की काय त्याचं नाव ऐकू येत नाही.

यावरून आपण इतकाच बोध घ्यायचा की, हिंदुस्थानची जर खरी राजकीय उन्नति व्हायची असेल, तर आपला सामाजिक आणि वैचारिक दृष्टिकोन आमूलाग्र बदलला पाहिजे. या शतकाच्या पहिल्या दोन दशकात सामाजिक सुधारणा आधी की राजकीय सुधरणा आधी, हा जो वाद माजला होता, त्याची विफलता कालानंच सिद्ध केली आहे. राजकीय उन्नति आणि सामाजिक प्रगति परस्परावलंबी आहेत. खरोखर पाहिलं तर प्रगति म्हटली म्हणजे एकाच स्वरूपाची असते. राजकीय चळवळ जर यशस्वी व्हायची असेल, तर त्या चळवळीला वैचारिक क्रांतीचं अधिष्ठान पाहिजे. उलटपक्षी, वैचारिक-क्रांति ही क्रांतिकारक राजकीय चळवळीपासून अलग करता येत नाही. फ्रान्समध्यें राजकीय क्रांति होण्याच्या अगोदर व्हॉल्तेअर, रूसो, व्हॉल्नी, दिदोरो

इत्यादि विचारवंतांनी क्रांतीचं जें बीज पेरलं होतं, त्या बीजाचा राजकीय क्रांतीच्या वेळी एक प्रचंड वृक्ष झाला. अशी इतिहासाची साक्ष आहे.

ब्राह्मसमाजामध्ये मी ज्या वेळी प्रथम प्रवेश केला, त्या वेळी विचारस्वातंत्र्य हे ब्राह्मधर्माचं मुख्य अधिष्ठान आहे, असा माझा समज होता परंतु पुढं मला आढळून आलं, की ब्राह्मसमाजामध्ये प्रथम जे वैचारिक आणि सामाजिक क्रांतीचं वारं खेळत होतं, ते नंतर समूळ नष्ट झालं. इतकंच नव्हे तर, आर्थिक आणि सामाजिकदृष्ट्या ज्याची परिस्थिति सर्वस्वी अनुकूल होती, त्याच्या हातातलं ब्राह्मसमाज हें खेळणं बनलं. ब्राह्मधर्मावरील माझा विश्वास उडायला हे एक बळकट कारण आहे, असं म्हणायला हरकत नाही. यासंबंधीचा इतिहास माझ्या आठवणींतून पुढे येणार असल्यामुळे तूर्त त्याविषयीं अधिक लिहिण्याची जरूरी आहे, असं मला वाटत नाही. धर्म, प्रेम, राजकारण, वृत्तपत्रव्यवसाय, कामगार-चळवळ, इत्यादि विविध-क्षेत्रामध्ये जे मला निरनिराळे अनुभव आले, तेच मुख्यतः मी या आठवणींतून सांगणार आहे व ते सांगताना कोणत्याही व्यक्तीला अन्याय होणार नाहीं व कुठलीही व्यक्ति दुखावली जाणार नाही, अशा तऱ्हेची शक्य तितकी काळजी मी घेईन.

माझे मित्र श्री. के. ना. काळे यानी लिहिलेली एक पुस्तिका माझ्या नुकतीच पाहाण्यात आली आहे. नाट्यमन्वन्तरसंबंधानं त्यांनी जीं विधानं केलेलीं आहेत, तीं विधानं माझ्या बाबतीत तरी कांहीं अंशीं खोटीं आहेत. काहीं अंशी खोटीं आहेत म्हणण्यापेक्षा माझ्यासंबंधीच्या बऱ्याच गोष्टी त्यांनीं वगळल्या आहे, असं म्हणणं बरं. परंतु याबद्दल श्री. काळेना दोष द्यायला मी तयार नाहीं. नाट्यमन्वन्तरशी ज्या व्यक्तींचा प्रामुख्यानं संबंध आला, त्या व्यक्तींपैकी प्रत्येकजण आपापली बाजू मांडण्याचा प्रयत्न करणार हें उघड आहे. माझ्या आठवणींत नाट्यमन्वन्तराचा इतिहास ओघाओघान येणारच. त्या वेळी मी माझी बाजू कोणत्याही वादात न पडता शक्य तितकी सौम्य शब्दात मांडण्याचा प्रयत्न करीन. खरोखर पाहिलं तर, नाट्यमन्वन्तर ही संस्था नामशेष झाली आहे. तेव्हा आता दहा वर्षांनीं या दुर्दैवी घटनेबद्दल खरोखर कोण जबाबदार आहे, हा वाद उपस्थित करणं मला अप्रस्तुत वाटत. मी स्वतः नाटककार नाही, नट नाहीं, किंवा रंगभूमीशीं व्यवसायाच्या दृष्टीनं माझा संबंध आला नव्हता माझी एवढीच इच्छा होती की, नाट्यमन्वन्तर संस्थेच्या द्वारे अस्सल पुरोगामी विचाराना नवीन वळण लावणारीं नाटकं रंगभूमीवर आणावीत. माझं असं स्पष्ट मत आहे कीं वैचारिक-क्रांतीचं रंगभूमी हे अत्यंत प्रभावी माध्यम होऊं शकेल. डॉ. केतकरप्रभृति विद्वानानीसुद्धा वैचारिक क्रांति घडवून आणण्यासाठी कादंबरीचा माध्यमासारखा उपयोग केला. त्याचप्रमाणे रंगभूमीचासुद्धा होऊं शकतो हें आमच्या नाटककारानी

थोड्याफार प्रमाणांत दाखवून दिलं आहे. नाट्यमन्वन्तराचा प्रयत्न फसला खरा ! परंतु तो प्रयत्न कसा केला याची निरपेक्षदृष्टीने लिहिलेली हकीगत जर वाचकांना कळली, तर पुढे जे कुणी असे प्रयत्न करतील, त्यांना त्यामुळे मदत होण्यासारखी आहे. आम्ही केलेल्या चुका ते करणार नाहीत, एवढा जरी या विशिष्ट आठवणीच्या द्वारें फायदा झाला तरी माझ्या श्रमाचं सार्थक झालं असं मला वाटेल.

**ग. य. चिटणीस**

१–१०–१९८३

# १

वयाची चाळीशी उलटून गेल्यानंतर अगदी लहानपणाच्या आठवणी मागणं किती कठीण आहे! अगदीं पहिली आठवण माझ्या मनात येते ती देवी टोचल्याची. देवी टोचल्यानंतर मला आंबा खायला दिला, पण ही आठवण कुठल्या वर्षातली हे मी कसं सांगूं? माझा असा समज आहे कीं, त्यावेळी माझं वय पाच वर्षांचं असावं. पूर्वीच्या सर्व आठवणी बुजून गेल्या आहेत. माणसाच्या मनावर पूर्वजन्माचे काही संस्कार असतात असं म्हणतात. या पूर्व-जन्माचा उत्क्रान्तीवादाच्या दृष्टीनं किंवा धार्मिक दृष्टीनं विचार करा. असल्या संस्कारावर विश्वास ठेवण्याइतका आधार माझ्यापाशी नाहीं. गर्भसंभव झाल्यापासून नऊ महिन्याच्या काळामध्ये माणसाचा जो विकास होतो, तो विकास म्हणजे अमीबापासून मानवदेहापर्यंत झालेल्या उत्क्रान्तीचं एक प्रतिबिंबच आहे. फरक इतकाच आहे की, अमीबापासून मनुष्यप्राण्यापर्यंतचा जो विकास झाला त्याला कोट्यावधि वर्षे लागली, आणि तोच विकास स्त्रीच्या उदरी नऊ महिन्यात होतो.

मनुष्यजातीची प्राथमिक अवस्था काय असावी याची कल्पना प्रत्येकाला बाल्यावस्थेत येऊं शकते. मला आठवतं की खाणं, पिणं, कपडे करण, शाळेमध्ये जाणं, खेळ खेळणं याखेरीज दुसऱ्या कोणत्याही गोष्टीना विचार माझ्या मनाला शिवत नसे. आपलं पुढं काय होणार याचा विचारही त्यावेळी माझ्या मनात येत नसे. त्याचं कारणही उघड आहे. आईबाप जिवंत असताना, त्याच्या प्रेमाची पाखर डोक्यावर असताना. लहान मुलाला भवितव्याची काळजी नसते. त्याला वाटत असतं की, आपले आईबाप सदैव असेच आपल्या जवळ राहाणार आणि असंच आपल्यावर प्रेम करणार. त्याच्या प्रेमानं आपलं आयुष्य इतकं भरून गेलेलं असतं की त्या प्रेमाची आपल्याला जाणीवच होत नाहीं. म्हणूनच आपल्या सुखसोयींत थोडा फरक पडला, तर आईबापांवर रागावण्याचा जणूं काय आपला हक्कच आहे असं आपण समजतो. आईजवळ किंवा बापाजवळ हट्ट घेऊन बसणं आणि त्यानी तो पुरवणं हा एक अगदी नैसर्गिक प्रकार आहे असं आपल्याला वाटत असतं.

## सिंहाचा छावा आणि मायावाद

जसं आईचं माझ्यावर प्रेम होतं, तसंच माझ्यावर वडिलांचंही होतं; पण वडिलांशीं माझा विशेष संबंध येत नसे. सरकारी कामामुळं त्यांना बाहेरगावी जावं लागत असे पण आई मात्र सदोदित माझ्याजवळ असे; आम्हीं इतकी बहीणभावंडं—काही माझ्यापेक्षा मोठीं आणि काही लहान—परंतु आईजवळ बसण्याचा मक्ता मात्र माझाच असे. स्वभावतःच माझी आई अत्यंत धार्मिक वृत्तीची होती. शंकराचा मायावाद तिनं आत्मसात केला होता. संन्यस्तवृत्तीनं राहून, जगाची सेवा करणं हेच मानवाचं श्रेष्ठ कर्तव्य आहे असं ती माझ्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न करी. मायावादामध्ये मनुष्याचा आत्मा गुरफटून गेल्यामुळं तो स्वतःचं स्वरूप ओळखूं शकत नाहीं—हे ती निरनिराळे दृष्टांत देऊन समजावून सांगत असे. त्यांपैकीं एक मला या घटकेला आठवतो. तो असा—एक सिंहाचा छावा होता. तो एका धनगराला चुकून सापडला. त्या छाव्याला धनगरानं आपल्या मेंढराच्या कळपातच वाढवला. तो छावा जसजसा वाढूं लागला, तसतशी त्याची बारीक कटी, सुंदर आयाळ, सिंहाच्या खऱ्या स्वरूपात दिसूं लागली, परंतु त्याला त्याची जाणीव नव्हती. इतर मेंढराप्रमाणे आपणही एक मेंढरूं आहोंत असंच त्याला वाटे. परंतु एके दिवशी जंगलातून एक सिंह त्या कळपात आला. या छोट्या सिंहाला पाहून त्याला बरंच आश्चर्य वाटलं. त्याला आपल्या खऱ्या स्वरूपाची जाणीव करून देण्याचा मोठ्या सिंहानं बराच प्रयत्न केला पण व्यर्थ शेवटी त्यानं त्या सिंहाला एका तळ्याच्या काठाशी नेलं, आणि त्याचं पाण्यात पडलेलं प्रतिबिंब त्याला दाखवलं आपल्या खऱ्या स्वरूपाची त्या छाव्याला ओळख पटली. मेंढराचा कळप टाकून तो जंगलात निघून गेला. हा दृष्टांत दिल्यानंतर ती म्हणायची की, जीवात्म्याला जोंपर्यंत स्वतःची ओळख पटली नाही, तोपर्यंत मायेनं पसरलेल्या संसाररूपी मेंढरांच्या कळपात जीवात्मा गढून गेलेला असतो; परंतु एकदा त्याला स्वतःची ओळख पटली की, संसाराचा त्याग करून संन्यस्त-वृत्तीने तो जगात वावरतो.

आईप्रमाणे माझीसुद्धा धार्मिक वृत्ति होती असं मला निश्चितपणे सांगता येणार नाही. ती कीर्तनं करीत असे. त्यावेळी तिच्यामागे उभा राहून तिनं तयार केलेली गाणी म्हणण्यात मला मोठी धन्यता वाटे; पण त्यांत धार्मिकतेचा लेशही नव्हता. असं मला आता वाटतं. आई देवपूजा करायला सांगायची त्यावेळीं भूक लागलेली असेल तर देवांना कसेतरी पाण्यात बुचकळायचं, त्याच्या डोक्यावर कशातरी गंधाक्षता आणि फुलं फेकायची, नैवेद्य त्यांना दाखवला न दाखवलासा करून स्वतःच गट्ट करायचा; पण हे सर्व आईचं लक्ष नसे तेव्हाच साधत असे ज्यावेळी ती माझ्याजवळ बसून भक्तीपर गाणीं म्हणे, त्यावेळीं मात्र मला देवाची सांगोपांग पूजा करावी लागे. मनातून मात्र मी देवावर खूप चडफडत असें, पण उपयोग काय!

माझी अशी कल्पना आहे की, वडील जरी सरकारी नोकरीत होते, तरी आईचा कल जहाल राजकारणाकडे होता. यासंबंधीची एक गोष्ट मला आठवते, ती सांगतो. ती अजूनही माझ्या स्मरणातून गेली नाही. लोकमान्य टिळकांना सहा वर्षांची शिक्षा होऊन त्यांची मंडालेच्या तुरुंगात रवानगी करण्यात आली. ही गोष्ट मला त्यावेळीं माहीत नव्हती परन्तु त्या दिवशीं संध्याकाळीं आमच्या माडीवर बऱ्याच बायका जमल्या होत्या. त्या तिथं काय करीत होत्या तेही मला आतां आठवत नाहीं; पण माझ्या आईनं एक गाणं मोठ्या आवाजात म्हणण्यास सुरुवात केली. तिनं गाणं म्हणायला सुरुवात करताच, माझा सर्वांत थोरला भाऊ अगदी घाबरला. त्यानं रस्त्यावरच्या बाजूची सर्व खिडक्यादारं सपासप बंद केलीं. इतकंच नव्हे तर, आपल्या दोनतीन मित्रांना घेऊन तो रस्त्यावर टेहळणी करूं लागला. त्याला आईचं गाणं इतकं का भयंकर वाटलं कोण जाणे! ते गाणं आता मला सबंध आठवत नाही, पण पहिल्या दोन ओळी आठवतात. त्या अशा — " एकल्या ग बाळ गंगाधराविणं कीं सर्वही जगत्र दिसते शून्य। जसा कुडीत नसता प्राण तशी तग झाली। " हे गाणं तिनं स्वतः रचलं होतं कीं, दुसऱ्या कुणाचं होतं हेही मला माहीत नाहीं. परंतु या प्रसंगावरून तिचा कल जहाल राजकारणाकडे होता असा मी अंदाज बांधतो. माझा वडील भाऊ चित्रकार होता. आईच्या धीटपणामुळे त्यालाही स्फुरण येऊन त्यानेही लाल, बाल आणि पाल यांची मोठ्या आकाराचीं चित्रं काढलीं होतीं.

माझी आई माझ्या वयाच्या दहाव्या वर्षी अर्धांगवायूनं वारली. तिला पहिला झटका आल्यानंतर तीन दिवसांनी तिचं प्राणोत्क्रमण झालं. त्यावेळीं मी रत्नागिरीस इंग्रजी शाळेत शिकत असल्यामुळे मरणसमयीं तिच्याजवळ नव्हतो. ती वारल्यानंतर पंधरा दिवसांनीं वडिलांनीं मला पत्रानं कळवलं. ते पत्र वाचताच मला एकदम आकाश फाटल्यासारखं झालं. मी माझ्या आईला विशेष प्रेमानं वागवलं असं नाही; पण ती गेल्यानंतर माझ्या आयुष्यात मला एक उणीव भासूं लागली. वडिलांचं माझ्यावर प्रेम होतं, अगदीं खूप प्रेम होतं! परन्तु त्यांचा माझा विशेष संबंध न आल्यामुळे मला अगदीं एकटं एकटं वाटूं लागलं. त्यानंतर मी अगदीं सगळा धार्मिक बनलो. हनुमान आणि सरस्वती या दोन देवतांची मी मनोभावें पूजा करीत असें. त्याचं कारण मला हनुमानासारखं ब्रह्मचारी राहायचं होतं आणि सरस्वतीची पूजा करीत असे त्याचं कारण, तिनं आपला वरदहस्त माझ्या माथी ठेवून मला खूप विद्या शिकवावी असं त्यावेळी माझ्या भाबड्या मनाला वाटत असे. हनुमानजयंतीच्या रात्रीं मारुतीच्या देवळासमोर बसून भजन करण्यात व टाळ कुटण्यात सबंध रात्र मी जागून काढीत असे. वर्गात जसजसा माझा नंबर वर येऊं लागला, तसतसं हनुमानजी मागं पडले व सरस्वती हें एकच आराध्यदैवत बनलं. शाळेंत जायला निघण्यापूर्वी मी सरस्वतीच्या फोटोपुढे

साष्टांग नमस्कार घालीत असे, आणि रात्री पांचदहा साष्टांग नमस्कार घातल्याशिवाय झोंपत नसे.

तात्त्विक-दृष्ट्या माझी आई जरी अद्वैतवादी होती, आणि तिचा शंकराचार्यांच्या मायावादावर जरी अढळ विश्वास होता, तरी तिनं संसाराकडे कधीच दुर्लक्ष केलं नाहीं. संसारात तिची वृत्ति नेहमी आनंदी असे. आणि या तिच्या आनंदी वृत्तीमुळेंच मला वाटतं, तिला नाटकं पाहायचा फार शोक होता. माधवराव पाटणकर, दत्तोपंत हल्ल्याळकर आणि राजापूरकर यांची बहुतेक सर्व नाटकं तिनं पाहिली होतीं. अर्थात् तिच्याबरोबर मलाही तीं पाहायला मिळालीं. 'वीरतनय' नाटकातील दत्तोपंत हल्ल्याळकराची, माधवराव पाटणकरांची 'सत्यविजया' तील, आणि राजापूरकरांची 'तुकाराम' मधील भूमिका या अजून माझ्या स्मरणातून गेल्या नाहीत. संगीत नाटकाप्रमाणे गद्य नाटकही तिला आवडत होती आणि म्हणून तिच्याबरोबर शाहूनगरवासी कंपनीची बहुतेक सर्व नाटकं मी पाहिलीं. गणपतराव जोशाच्या 'हॅम्लेट', 'मानाजीराव' ( मॅक्बेथ ), 'राणा भीमदेव' या नाटकातील कामाचा माझ्या मनावर विशेष परिणाम झाला. राणा भीमदेवाची आवेशयुक्त भाषणं मीं पाठ केली होती आणि लहानमोठ्या समारंभात मी ती शक्य तितक्या आवेशानं म्हणून दाखवीत असे. आईच्या या नाट्यप्रेमामुळे आमचं घरचं वातावरणसुद्धा नाट्यमय नव्हे, पण नाटकी झालं होतं. माझ्या वडील भावाच्या वर्गात मोडक नावाचा एक मुलगा होता त्यानं त्यावेळी आमच्यासाठी 'चंद्रसेन-रदनिका' नावाचं नाटक लिहिलं होतं. त्या नाटकाचा प्रयोग आमच्या घरातील दिवाणखान्यात करायचा आम्हीं ठरविलं. या नाटकांतील हिरोचं काम माझ्याकडे होतं, आणि मित्राचं काम होतं माझ्या भावाकडे. रदनिकेचं काम करायला कुणी स्त्री पार्टी मिळणार नाहीं याची जाणीव नाटककर्त्याला प्रथमपासून असल्यामुळे त्यानं मोठ्या कुशलतेनं नायिकेला सबंध नाटकात पलंगावर झोपवून ठेवलं. आमचे नाटकाचे प्रयोग सुरू झाले, तेव्हा मुलं आणि बायका यांची चिक्कार गर्दी होऊ लागली. ती गर्दी पाहून आमच्या शेजारीं एक डॉक्टर होते. त्यांच्या मुलानं सूचना केली की या नाटकाला तिकिटं ठेवावी. प्रत्येक तिकिटाची किंमत एक कवडी. अगदींच बिनओळखीचीं मुलं येतील त्यानाच फक्त तिकिटं घ्यायला लावायची, असं आमचं आपसात ठरलं. परंतु या सूचनेची अंमलबजावणी होताच माझं वडील भावाशी भांडण झालं. मी त्याला साफ सांगितलं की, ज्याअर्थी मी नाटकात हिरोचं काम करणार त्याअर्थी नाटकाचं सबंध उत्पन्न मलाच मिळालं पाहिजे. माझी मागणी न्याय्य होती असं मला त्यावेळी वाटलं; पण माझा भाऊ मात्र खूप चिडला. त्यानं धाकदपटशा दाखवायला सुरुवात केली. पण मी त्याला शांतपणे सांगितलं, माझी मागणी कबूल करीत नसलास तर मी नाटकांत काम करणार नाहीं. ते ऐकून तो मारायला धावला

आणि मी पळालो आमच्या गल्लीमध्ये मी पुढे आणि तो मागे असे आम्ही सारखे पळत होतों. शेवटीं नाइलाजानं माझ्या भावानं माझी मागणी कबूल केली आणि मी नाटकात काम करायचं ठरवलं. त्या दिवशीं नाटकाचं उत्पन्न २० कवड्या झालं आणि ते सर्व मला मिळाल.

जेव्हां मी हायस्कूलांत जाऊं लागलो, तेव्हा सरस्वतीवरून माझा विश्वास उडत चालला. त्यावेळी मी रत्नागिरीस बोर्डिंगात राहात असे. त्या बोर्डिंगात ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर असे दोन क्लब होते. जातिभेदाचा तीव्रपणा मला या ठिकाणी विशेष भासूं लागला. यापूर्वी असा भेद केलेला माझ्या तरी अनुभवात नव्हता. ब्राह्मणाची मुलं आपण श्रेष्ठ जातींतील आहोत अशी शेखी मिरवीत. मी ब्राह्मणेतर जातीतील असल्यामुळे त्यांच्या उर्मट वागणुकीमुळे माझा जातिभेदावरील विश्वास उडाला असावा असं वाटतं त्यावेळीं लाला नावाचे मुसलमान इन्स्पेक्टर तिथ होते. त्याच्या वडील मुलाचा आणि माझा दाट स्नेह जमला. अर्थात त्याच्या घरी मी जेव्हा जाई, तेव्हां तो मला पाव–आमलेट, सर्व काही देत असे आणि मी पण ते निःसंदिग्धत खात असे. इतकेच नव्हे, तर काही दिवसांनी माझा बालकवलीचा मित्र तात्या नाडकर्णी आणि मी, दोघांनी असा ठरवलं की, आपल्याला जे काही खायला मागवायचं ते मुसलमानाकडूनच मागवायचं. कित्येक वेळा तर आमच्या मुसलमान मित्रानी पाठवलेलं जेवण आम्ही सर्वादेखत अंगणात बसून खात असू. जातिभेद पाळायचा नाही असं ठरल्याबरोबर मूर्तिपूजेवरील माझा राहिला विश्वास उडाला आणि मी नास्तिक बनलो. अर्थात हे माझ्या मनामध्ये जे परिवर्तन होत गेलं, त्याचा परिणाम मात्र इतर मुलावर फार अनिष्ट झाला. मला नेहमी चांगले कपडे घालायची सवय होती. रोज परीट घडीचा शर्ट कॉलरसह घातल्याशिवाय मी शाळेत जात नसे. वर्गात मुलंच नव्हे, तर मास्तरसुद्धा मला ' डॅण्डी ' म्हणून चिडवीत असत. डबल ब्रेस्टचा शर्ट त्यावेळा कुणी पाहिलासुद्धा नव्हता : पण मी घालीत असे. मला नवीन बुटाची जरूर लागली किंवा रेनकोटची जरूर लागली तर मुंबईतील व्हाइटवे लेडलॉकडून मी ते मागवीत असे. एक दिवस मला माझे हेडमास्तर म्हणाले सुद्धा की, तुला व्हाइटवे लेडलॉशिवाय मुंबईतील दुसर दुकान माहीत नाही वाटतं. परंतु मी यापूर्वी म्हटल्या-प्रमाणे या माझ्या मतपरिवर्तनाचा परिणाम इतर विद्यार्थ्यांवर फार वाईट झाला. त्याना वाटूं लागलं, की ज्याचा जातिभेदावर विश्वास नाही, मूर्तिपूजेवर श्रद्धा नाही, मुसलमानाच्या हातचं खातो आणि अपटुडेट कपडे घालतो, तो नीतिदृष्ट्या अतिशय वाईट चालीचा मुलगा असला पाहिजे. परतु खरं पाहिलं तर, मी पैशाची उधळपट्टी करीत असे : मुसलमानाच्या हातचं खात असे : तरीसुद्धा ज्याला व्यसन म्हणतात, ते कुठलंच मला जडल नव्हतं. माझ्या विद्यार्थीमित्राचा जो गैरसमज झाला, त्यामुळें

प्रथम प्रथम मला फार दु:ख होत असे. परंतु माझ्या मनात असे विचार येऊं लागले कीं, आपली वागणूक खरोखर वाईट नसताना लोकांचा आपल्यासंबंधानं असा कां गैरसमज व्हावा ? माझ्या मनाला टोचेल अशी कोणतीच गोष्ट मी कधींही केली नाही. त्यावरून मी त्यावेळीं इतकाच निष्कर्ष काढला कीं साधारणपणे लोक रूढीचे अंधभक्त असतात त्यांना रुळलेला मार्ग सोडून जायला नको. मला जर त्या रुळलेल्या मार्गावरून जायचं नसेल, तर माझ्या वागण्याचे नियम मीच ठरवले पाहिजेत आणि त्या नियमाप्रमाणे मी वागलं पाहिजे. मग लोक स्तुति करोत वा निंदा करोत, त्यांची पर्वा न करण्याइतकं मनोधैर्य स्वतःला पाहिजे.

बोर्डिंगातील ब्राह्मण मुलांची एकदा कशी फजिती झाली ते सांगतो. सुट्टीच्या दिवसामध्यें बहुतेक सर्व विद्यार्थी आपआपल्या गावी जात असल्यामुळे फक्त ब्राह्मणांचाच क्लब चालू राही आणि त्या क्लबामध्ये ब्राह्मण मुलांची पहिली रांग आणि त्याच्यापासून किती तरी दूर अंतरावर ब्राह्मणेतर मुलांची रांग अशी जेवणाची व्यवस्था असे. ब्राह्मण मुलांनीं नेहमी जातीवरून ब्राह्मणेतर मुलांची कुचेष्टा करायची आणि ती कुचेष्टा ब्राह्मणेतर मुलांनीं नेहमीं ऐकून घ्यायची. एके दिवशी एज्युकेशनल इन्स्पेक्टर आमच्या शाळेची पाहणी करायला आले. त्यांचा हेडक्लार्क व असिस्टंट आमच्या बोर्डिंगातच राहायला आले जेवायची वेळ झाली, तेव्हा एका ब्राह्मण मुलानं—त्याचं नाव कृष्णा सरदेसाई—मोठ्या आदरानं त्या हेडक्लार्कला आपल्या पहिल्या पंक्तींत बसवून घेतलं आणि त्याचा असिस्टंट होता त्याला आमच्या पंक्तीत घाडलं. जेवताना माझं लक्ष त्या असिस्टंटकडे गेलं. तो नाराज झाल्यासारखा दिसला. माझ्या मनात चटकन संशय आला. मी त्या हेडक्लार्ककडे पाहिलं. तोसुद्धां मुकाट्यानं जेवीत होता जेवण आटोपल्या-नंतर आम्हीं सर्व एके ठिकाणी जमलो आणि बोलतां बोलतां, त्या हेडक्लार्कला मी सहज प्रश्न केला, 'काय हो हेडक्लार्क साहेब, तुमची जात कोणती ?' माझा प्रश्न ऐकून तो जरा ओशाळला, पण त्यांतील खोच त्याच्या ध्यानात आली. त्यानं उत्तरं दिलं कीं, 'मी गौडसारस्वत आहे आणि माझा असिस्टंट ब्राह्मण आहे.' त्याचं उत्तर ऐकतांच ब्राह्मण विद्यार्थ्यांचे चेहरे खाडकन् उतरले. त्यांचा म्होरक्या कृष्णा सरदेसाई माझ्याजवळ येऊन मला विचारूं लागला, 'आता काय करायचं ?' मी तावडतोब उत्तर दिलं कीं, 'तुम्हीं त्या असिस्टंटची क्षमा मागावी आणि नंतर तुम्ही ब्राह्मण विद्यार्थ्यांनी शेण खाऊन प्रायश्चित्त घ्यावं असं माझं स्पष्ट मत आहे.'

यानंतर कांही दिवसांनी आणखी एक गमतीची गोष्ट घडली रविवारचा दिवस होता. जेवल्यानंतर आम्ही सर्वजण माझ्या खोलींत बसलो होतो. माझ्याकडे लहानसा ग्रॅमोफोन होता, त्यावर आग्र्याच्या मलकाजानची 'नयी जोबनवालीका' ही रेकार्ड

मी लावली. कृष्णा सरदेसाई माझ्या कॉटवर पडला होता. आणि बाकीचे विद्यार्थी जागा मिळेल तिथं बसले होते मलकाजानचं गाणं चालू असतांना कुणीतरी दार ठोठावलं. तेव्हा पडल्या पडल्या कृष्णा सरदेसाई ओरडून म्हणाला, 'कोण दार ठोठावतंय रे ? गाणं ऐकायला पाहिजे काय ? चला चालते व्हा इथून आणि अभ्यास करा !' पुन्हा दारावर थाप ! तेव्हा एक विद्यार्थ्यानं दार उघडलं. दारात पाहतात तर हेडमास्तर नेने उभे. कृष्णा सरदेसाईनं ताडकन् उठून पलंगाखाली दडी मारली. मी गंभीर चेहरा करून खुर्चीवर बसलो. मलकाजानचं गाणं तावडतोब बंद झालं हे सांगायला नकोच ! हेडमास्तर हळूहळू माझ्याजवळ आले, 'हं काय ? हे नवीन खूळ काढलंयस तू ? तुला अभ्यास करायचा नाहींच, पण तू इतर विद्यार्थ्यांना वाईट संवय लावतोस. काय करायचा आहे तुला ग्रामोफोन ? तुझ्या वडिलानाच लिहितो.' थोड्या वेळाने हेडमास्तर निघून गेले त्यानंतरची मंगळवारची गोष्ट. मंगळवारी सकाळी माझा चहा पिऊन होतो न होतो तोंच हेडमास्तर माझ्या खोलीत आले. त्यांनी इकडे तिकडे बरीच विचारपूस केली. नंतर जायला निघाले, जाता जाता आठवल्यासारखं करून ते लगेच फिरले. ते म्हणाले, 'काय रे, तूं आमच्याकडे संध्याकाळी जेवायला येशील का ?' मी म्हटलं, 'हो येईन की, त्यात काय ?' 'माझ्या सुनेची मंगळागौर आहे. यायला विसरूं नको. आणि हे बघ, तो तुझा ग्रामोफोन पाठवून दे. इतर मुली येणार आहेत त्यांची करमणूक होईल.' मी म्हटलं, 'ठीक आहे, मी आता देतो पाठवून.' ते म्हणाले, 'नको नको, त्या ग्रामोफोनबरोबर तूंच ये. त्या मुलींना तो लावायचा कसा ते समजणार नाहीं' हेडमास्तरांची आज्ञा ! मी काहींच बोललो नाही त्या दिवशी मी पुन्हा त्या हेडमास्तरांच्या घरी 'हिरो' म्हणून वावरलो.

मूर्तिपूजेवरून माझा विश्वास उडाल्यानंतर, लोकांचं माझ्याविषयींच मत, आणि खरी वागणूक यामध्ये विलक्षण तफावत पडे. खरोखर पाहिलं तर गैरवर्तन असं मी कधींच केलं नव्हतं. यामुळे लोकमत चूक असूं शकतं याची मला तेव्हांपासून जाणीव होऊं लागली माझ्यावर मूळचे असे धार्मिक संस्कार नव्हते हे मीं पूर्वीच सांगितलं आहे. माझ्या वडिलांची वृत्ति खऱ्या अर्थानं मुळींच धार्मिक नव्हती. पूर्वजन्मींचे कांहीं संस्कार झाले होते असं म्हणायला मुळीच जागा नाहीं अर्थात् जे कांही धार्मिक संस्कार झाले ते माझ्या आईमुळे. तरीसुद्धा, धर्म ही काहींतरी एक बाह्य चीज आहे असं मला त्यावेळीं वाटे. म्हणजे एकाद्या मूर्तीची पूजा करणं, तिची मनोभावानं भक्ति करणं, यातच धर्म साठवला आहे असं मला वाटे. जीवात्म्याचं खरं स्वरूप समजून सांगण्याचा माझ्या आईनं प्रयत्न केला खरा ; परंतु त्यावेळेस माझ्या मनावर त्याचा विशेष परिणाम झाला होता असं मला वाटत नाही. पुढें मूर्तिपूजेवरील माझा विश्वास साफ उडाला आणि मी नास्तिक बनलों.

तरीसुद्धां माझी वागणूक स्वैर नव्हती. मी मनानं आणि शरीरानं शुद्ध होतो. अर्थात आपली वागणूक कशी असली पाहिजे हें लोकांनीं ठरवायचं नसून स्वतः आपण ठरविल पाहिजे अशी माझी त्यावेळी समजूत झाली. माझं अभ्यासाकडे लक्ष नव्हतं अस नाही. त्याचप्रमाणे इतर बाकीच्या कार्यांकडे मी पूर्ण लक्ष ठेवीत असें. म्हणजे माझा एकदर सर्व वेळ काहीना काही करण्यात गुंतलेला असे. परंतु रात्रीं झोपायच्या वेळीं मात्र मी या जगात एकटा आहे, मला कुणाचा आधार नाही, असा विचार मधून मधून माझ्या मनात डोकावूं लागे. अशा मनःस्थितींत असतांनाच एके दिवशीं रात्रीं मी माझ्या खोलींतील दिवा मालवला. आणि डोळे मिटून प्रार्थना करूं लागलो. मी प्रार्थना कुणाची करीत होतों आणि का करीत होतो ते मला मुळीच समजत नव्हते. तरीसुद्धा मधून मधून आईनं सांगितलेले दृष्टांत डोक्यात चहूंदिशीं येऊन जात. बाह्यजगाला आपलें जे रूप दिसतं ते खरं नव्हे, आपलं खरं स्वरूप काहीं निराळं आहे आणि ते स्वरूप काय आहे हें समजून घेण्याची मला उत्कट इच्छा झाली. त्यावेळी मी प्रार्थनासमाजाचं नावही ऐकलं नव्हतं ब्राह्मसमाज हा शब्दही माझ्या कानावरून गेला नव्हता, परंतु दिवा मालवून प्रार्थना करण्याची चटक लागली, मनाला एक प्रकारची शांति मिळूं लागली. इतकंच नव्हे तर, बाहेरच्या लोकांनी मला वाईट म्हटलं तरी, दुःख न होता हसूंच येई.

अशा रीतीनं प्रार्थना करण्यात किती दिवस गेले ते मला सांगता येत नाही मॅट्रिकच्या परीक्षेच्या गडबडीत कदाचित् मी प्रार्थना करायला विसरलो असेन. बाकीच्या सर्व विषयात जरी मला चांगले मार्क मिळत असत, तरी गणित विषय माझा कच्चा होता. भूमिति मला चांगली येत असे; परंतु बीजगणितात माझी चांगली प्रगति होईना. एके दिवशी आकस्मिकदृष्ट्या विल्किन्सनचं बीजगणित माझ्या हातीं पडलं. आणि त्या पुस्तकाचा मी मन लावून अभ्यास करायला सुरुवात केली. बीजगणीत तेव्हापासून मला अतिशय उत्तम येऊं लागलं, आणि परीक्षेत भूमिति आणि बीजगणीत या दोनच विषयावर सर्व लक्ष केंद्रित करायचं ठरवलं, इंग्रजी आणि संस्कृत, विशेषतः इंग्रजी माझ्या आवडीचे विषय होते पाचवीत असतांनाच मी इंग्रजी निबंध व्याकरणशुद्ध लिहायला शिकलो, आणि ते माझे निबंध हेडमास्तर मोठ्या अभिमानाने सातवींतील मुलांना वाचून दाखवीत. नेसफिल्डच्या व्याकरणाचे चारही विभाग पाचवींत असतानाच मी वाचून काढले होते. याचं एक गंमतीदार उदाहरण सांगतो त्यावेळी पाचवीला माजरेकर नांवाचे मास्तर इंग्रजी शिकवायला येत असत त्याचं इंग्रजी खरोखरच उत्तम होतं. आणि त्यांना त्याचा फार अभिमान वाटत असे. एके दिवशी नेसफिल्डच्या व्याकरणामधील 'There was none but was moved to tears' हे वाक्य ते समजावून सांगत होते. तेव्हा ते म्हणाले, 'या वाक्यातील but हें उभयान्वयी अव्यय

आहे.' मी लगेच उभं राहून मास्तरना सांगितलं कीं, 'इथं but हें उभयान्वयी अव्यय नाहीं. but चा या ठिकाणीं नामासारखा उपयोग केला आहे असं मला वाटतं' मास्तर एकदम भडकले आणि मला म्हणाले, 'गाढव आहेस तू? तुला काही समजत नाहीं!' त्यावेळी मी शांतपणे उत्तर दिलं की, 'चूक तुमची होतेय. तुम्ही कुणालाही विचारून पाहा, तुम्हाला पाहिज असेल तर मी हेडमास्तराना विचारून येतो.' मास्तरनीं मला परवानगी दिली. मी जायला निघालो इतक्यात नेमे हेडमास्तर आमच्या वर्गावरून चालले होते. मी त्याना थांबवून म्हटलं, 'सर, मला तुम्हाला डिफिकल्टी विचारायची आहे!' 'कोणती डिफिकल्टी?' असं म्हणून ते आत आले. मी त्यांना पुस्तकातील वाक्य दाखवलं आणि but हा शब्द कोणत्या अर्थानं वापरला आहे हें विचारलं थोडा वेळ त्यानी विचार केला आणि सांगितलं कीं, but हे या ठिकाणी उभयान्वयी अव्यय नाही. ते निगेटिव्ह रिलेटिव्ह प्रोनाऊन आहे. हेडमास्तराचे हे शब्द ऐकल्याबरोबर साजरेकर मास्तर थंड पडले; परंतु त्याचा मूळचा स्वभाव चागला असल्यामुळे ते ही गोष्ट लवकरच विसरून गेले.

पाचवीत असतानाच मी शेक्सपिअर वाचायला सुरवात केली. परंतु आता मला वाटतं कीं, त्यावेळी मला तो मुळीच समजत नसे. सहावीत गेल्यानंतर माझे मास्तर पटवर्धन यानी मिसेस हेन्री वूड हिच्या कादंबऱ्या चांगल्या आहेत असं सांगितलं. सुट्टीच्या दिवसामध्ये मी या कादंबरीकर्तीच्या सगळ्या कादंबऱ्या वाचून काढल्या. तिच्या कादंबऱ्यांपैकी Orville College, Mrs Hulliburton's Troubles, The Channings, आणि East Lynne यांपैकी 'East Lynne' ही कादंबरी मी कितीतरी वेळा वाचली. सातवीत गेल्यानंतर रेनॉल्डसच्या कादंबऱ्या मी गपचूप वाचीत असे.

संस्कृतचा अभ्यास करताना मला जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप मिळवण्याची महत्त्वाकांक्षा होती. ती स्कॉलरशिप मला शेवटीं मिळाली नाहींच.

माझ्या आईमुळं माझ्या मनांत नाटकाची आवड उत्पन्न झाली हें मी वर सांगितलंच आहे. अगदीं लहानपणींच नाटकात काम केल्यामुळं नाटकात काम करणाऱ्या निरनिराळ्या नटांविषयीं मला एक प्रकारची आपुलकी वाटे. नाटकात काम करणारे लोक वाईट असतात, व्यसनी असतात, म्हणून प्रतिष्ठित लोकांनी त्यांच्याशी संबंध ठेवूं नये, हा विचार माझ्या मनाला कधीच शिवला नाहीं. रत्नागिरीस आल्यावर माझा नाटकाचा शोक कायम होता. त्यावेळीं शिमग्याच्या दिवसात रोम्बट निघत असत. या रोम्बटामध्ये कुठल्यातरी नाटकातील प्रसंग रस्त्यावर करून दाखवीत असत. ही रोम्बटं बहुतेक रात्री म्हणजे माझ्या निजायच्या वेळी होत असत; परंतु बिछान्यावर पडल्यानंतरसुद्धा या रोम्बटाचा ताशा वाजूं लागला कीं

त्या गोम्बटाच्या पाठलाग करीत मी जात असे. त्या रात्रीं जितकीं गोम्बटं निघाली असतील तितकीं हुडकून काढून त्याचे नाट्यप्रयोग पाहिल्यानंतर दोनतीन वाजता घरीं परतायचा. या गोम्बटांत काम करणारीं बहुतेक हॉटेलातील पोर, न्हावी किंवा असेच धंदे करणारी माणसं असत. परंतु मला त्याचं काहीं वाटत नसे. या गोम्बटात काम करणारा माणूस दिवसा कधी भेटला तर त्याच्याजवळ जाऊन त्याची आदरपूर्वक चौकशी करावी असं मला वाटे, पण धीर होत नसे.

अहमदनगर इथं असताना मी आईबरोबर बरीचशी नाटकं पाहिली होतीं. परंतु यावेळीं मला रत्नागिरीला काहीच पाहायला मिळाली नाहीत. त्याला कारण बरीच होती. ती सांगण्याइतकी महत्त्वाची नाहींत परंतु दुधाची तहान ताकावर भागवावी म्हणून मी घरामध्ये कागद, लाकूड, आणि रूळ याच्या सहाय्यान नाटकगृह तयार करून स्टेजवर नटनटींच्या ऐवजी बाहुल्या उभ्या करीत असे त्याची भाषणं मात्र मी स्वतःच जशी आठवतील तशी म्हणत असे. काही दिवसानी दोरीने ओढायचे पडदे कसे करायचे, ते मी शिकलो त्यानंतर माझ्या उत्साहाला पारावारच राहिला नाही. निरनिराळ्या रंगाचे कागद, पडदे व विंग्ज याच्या सहाय्याने निरनिराळे देखावे करण्याची आवड मला उत्पन्न झाली शाळेतून आल्यानंतर जो रिकामा वेळ मला मिळे त्या वेळात फक्त हाच उद्योग मी करीत असे त्यावेळी मी कोणकोणती नाटकं बसविली हे मला आता नीट आठवत नाही. परंतु, शाहूनगरवासींचे मानाजीराव म्हणजे मॅकबेथ हें नाटक चांगलंच बसवल्याचं मला आठवतं त्या नाटकातील पहिल्या देखाव्यासाठी मी जंगल दाखवणारे विंग्ज आणि पडदे तयार केले, आणि तीन चेटक्या ( Three Witches ) ऐवजी काळ्या कापडाच्या तीन बाहुल्या मीं तयार केल्या अशा रीतीने सर्व देखाव्याची आणि पात्राची मी सोय केली ही माझी हौस फार दिवस टिकली असं सांगता येत नाहीं. इंग्रजी दुसरीत किंवा तिसरीत गेल्यानंतर हा नाद मी सोडून दिला असावा. माझी इंग्रजी चौथी इयत्ता अहमदनगरला झाली आणि त्यानंतर रत्नागिरी हायस्कुलात माझं शिक्षण व्हावं म्हणून माझी बोर्डिंगात राहाण्याची वडिलानी सोय केली यानंतर मात्र मी अगदी स्वतंत्र झालो असं मला वाटलं, आणि वडील भरपूर पैसे पाठवीत असल्यामुळं वाटेल तशी चैन करण्याचा मी मोका साधला. याच वेळीं नाट्यविनोद संगीत नाटक मंडळी रत्नागिरीस आली होती. या मंडळीनं आपल्या मोसमाला श्री. मामासाहेब वरेरकर याच्या ' कुंजविहारी ' नाटकानं सुरुवात केली. या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला मी गेलो होतो की नाहीं, ते मला आठवत नाहीं; पण ज्या दिवशीं मी गेलो, त्या दिवशी शंकर मोहिते यानं कृष्णाच आणि दिनकर ढेरे ( कामण्णा ) यानं राधेचं काम केलं होतं. त्या दोघाचा अभिनय पाहून व त्याच्या गोड गळ्यातून निघालेली सुरेख गाणी ऐकून मी तर त्या दोघावर बेहद्द खुष झालो. त्यानंतर

## नाटक्याची संगत

महसा कधीं मी कुंजविहारी नाटक पाहण्याचं चुकवीत नसे हे नाटक कमीत कमी पञ्चवीस वेळा तरी मी पाहिलं असेल. आणि प्रत्येक वेळी खुर्चीचं सव्वा रुपयाचं तिकीट मी काढीत असे. कधीं कधीं या नाटकात साठे या नांवाचा पाठीला पोंक असलेला माणूस राधेचं काम करी, पण त्याचं काम मला बिलकुल आवडत नसे. गुर्जर नावाचा एक नट या नाटकात नारदाचं काम करीत असे पायात खडावा, हातात चिपळ्या आणि गळ्यात वीणा, डोक्यावर व गळ्यात घातलेल्या फुलाच्या माळा, अशा थाटात पितांबर नेसून, एक कोर जानवं घालून, कपाळाला भस्म लावून या स्वारीनं स्टेजवर पदार्पण केलं आणि 'नटवर नाट्य करी भवरंगी' या पदाला सुरवात केली, की मी प्रथम टाळ्या द्यायचा. बऱ्याच वेळा माझी एकट्याचीच टाळी त्या पदाला पडे नंतर आकस्मिकरीत्या माझी आणि गुर्जरची ओळख झाली. कशी ओळख झाली ते मला आता आठवत नाही. मग काय विचारता! त्याला आम्हीं बोर्डिंगात चहाला, जेवायला बोलवायचा सपाटा चालविला; कधी कधी आम्ही त्याची भेट घेण्यासाठी नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी जात असूं. पण या स्वारीनं आम्हाला कधी चहा दिला नाही की फराळाला बोलावलं नाही. उलट, त्याचा ज्या दिवशी उपास असे त्या दिवशी आम्ही त्याला बाजारात जाऊन फळं वगैरे उपाहाराचे जिन्नस घेऊन, त्याच्या बिऱ्हाडी नेऊन देत असूं. माझ्याबरोबर माझे एक दोन मित्र असायचेच. ते एकादे वेळी शंकाकुशंका काढीत बसायचे. 'हा बोलूनचालून नट, याच्यामागं आपल्यासारख्यानीं धावण बरं नाही' असं ते म्हणत. परंतु मी त्याना म्हणत असें की, 'बाबानो, ही नटाची जात विलक्षण असते. त्याना देवानं जी एक देणगी दिली आहे, तिच्यामुळं ते जरा लहरीबाईक वागतात. पण त्याकडे आपण लक्ष देऊं नये. आपण आपलं कर्तव्य करीत राहावं.' नंतर आमची मैत्री वाढता वाढता, एके दिवशी मी, माझे काही मित्र आणि गुर्जर याचा एक ग्रुप फोटो काढला. त्या दिवशी मला किती धन्यता आणि समाधान वाटलं. त्यावेळी आमच्या वर्गाचे मास्तर थोड्या दिवसासाठीं बोर्डिंगात येऊन राहिले होते. फोटोच्या प्रती आल्याबरोबर त्यातली एक प्रत मोठ्या अभिमानानं मी मास्तराना दाखविली. त्या फोटोत मध्यभागी गुर्जर बसलेला, त्याच्या शेजारी माझे दोन मित्र आणि मी त्याच्या पाठीमागं उभा. त्या फोटोसाठीं मी पीक कॅप खरेदी केली होती. मला वाटलं, तो ग्रुप फोटो पाहून मास्तर खूष होतील, पण झालं भलतंच. मोजक्या शब्दानीं मास्तरानीं माझी खरडपट्टी काढली. आणि शेवटीं म्हणाले, 'नाटक्याच्या नादीं लागून तूं आपल्या वडिलाचे पैसे असे उधळतोस. तुला लाज नाही वाटत?' मास्तराच्या बोलण्याचं मला विशेष वाईट वाटलं नाही, पण त्याच्या अरसिकतेची कीव करावी असं मला वाटलं. प्रथम तो फोटो खोलीच्या मध्यभागी टांगून ठेवावा असं मला वाटत होतं, पण न जाणों हे मास्तर कदाचित् हेडमास्तरच्या जवळ

बोलले आणि हेडमास्तरानीं तो फोटो पाहिला तर प्रकरण अधिक गंभीर होईल, या भीतीने मी तो बिछान्याखाली दडवून ठेवला. शेवटीं आमच्या मैत्रीचा अगदी अनपेक्षित रीतीनें शेवट झाला मी कधी हेडमास्तराची परवानगी घेऊन आणि बऱ्याच वेळा त्यांची नजर चुकवून नाटकाला जात असें, ही गोष्ट माझ्या मित्राना माहीत होती. ते मला म्हणाले कीं 'तूं पैसे खर्च करून नेहमीं जातोस पण या बेट्यानं तुला एक दिवससुद्धा पास दिला नाही कीं फुकट नाटक दाखवलं नाही!' हे त्यांचे उद्गार ऐकून मीसुद्धा विचारात पडलो. त्याप्रमाणे नाटक मंडळीतील दुसऱ्या नटाची या गृहस्थानं कधी माझ्याशीं ओळख करून दिली नाहीं. म्हणूनच माझाही माझ्या आराध्य देवतावरील विश्वास डळमळूं लागला; परंतु तो खलास होण्यापूर्वीच नाटक मंडळी आमच्या गाव सोडून निघून गेली

त्या वर्षी आमच्या शाळेचा वार्षिक समारंभ मोठ्या थाटानं साजरा व्हायचा होता त्या समारंभासाठी त्या वेळचे असिस्टंट कलेक्टर जे. ए. मदन (आता सर) हे अध्यक्ष म्हणून येणार होते. म्हणून आम्हाला किती अभिमान वाटला. त्या समारंभासाठी शेक्सपियरच्या 'मर्चंट ऑफ व्हेनिस' या नाटकातील काही प्रसंग करून दाखविण्यात येणार होते. त्या नाटकात पोर्शियाचं काम करण्यासाठी हेडमास्तरानीं माझी निवड केली आणि मला ते काम आवडत असल्यामुळे मी अगदी मनःपूर्वक तें काम केलं. विशेषतः कोर्ट सीनमध्ये पोर्शियाचं The quality of mercy is not strained हे भाषण करताना मला खरोखरच ॲन्टोनिओच्या प्राणाची शायलॉकजवळ मी भीक मागत आहे असं वाटलं. मदनसाहेबांनी त्या कामाची तोंडभरून स्तुति केली. ती औपचारिक होती की खरी होती हे कळण्याला मार्ग नाहीं. हेडमास्तर तेंव्हा मात्र अगदी बेहद्द खूष झाले

मी जेव्हा मुंबईत प्रथम आलो, त्यावेळी माझा चुलत भाऊ भाऊच्या धक्क्यावर मला उतरून घ्यायला आला होता. तो आपल्या मामाकडे त्यावेळीं राहात असे. म्हणून माझी त्याच्याकडे राहण्याची व्यवस्था त्यानं केली. प्रथम प्रथम परीक्षेच्या गडबडीत मला विशेष कुठं जाता आलं नाही परंतु परीक्षा संपल्यानंतर मात्र मी इतस्ततः भटकायला सुरुवात केली त्यावेळीं गंधर्व नाटक मंडळी मुंबईत आली होती. त्याच्या 'स्वयंवर' नाटकाला मला मामानीं पाठविलं गंधर्वांचा अभिनय आणि गायन याचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला, हे जरी खरं असलं तरी त्याच्या अभिनयात मला थोडीशी कृत्रिमता दिसली. गंधर्व स्त्रीचा अभिनय हुबेहुब करतो अशी त्यावेळी त्याची ख्याती होती. परंतु त्याच्याप्रमाणे हावभाव करणारी एकही स्त्री माझ्या पाहण्यात आली नव्हती. म्हणूनच मला त्याचा अभिनय बराचसा कृत्रिम वाटला. शांतारामचे—माझा चुलत भाऊ—मामा त्यावेळीं युनिव्हर्सल फिल्म

कंपनीचे मॅनेजर होते. इपीरिअल सिनेमागृह ब घल्यानंतर तेथेही ते मॅनेजरचं काम करू लागले; अर्थात त्यावेळी फिल्म सबधानं बऱ्याच गप्पा चालत. त्यावेळीं सीरियल चित्रपट फार लोकप्रिय होते एडी पोलो, फ्रान्सिस फोर्ड, आयलिन सिजविक, पर्ल व्हाईट, या त्यावेळी अतिशय लोकप्रिय होत्या. प्रत्येक आठवड्याला असल्या चित्रपटाचे फक्त दोनच हप्ते दाखविले जात असत. म्हणून प्रत्येक शनिवारीं नवीन हप्ते लागल्याबरोबर मीं तो पाहायला जाई. त्यावेळीं टारझन फिल्मचाही सुळसुळाट झाला होता. मी टारझनचे सर्व चित्रपट पाहिले.

याचा अर्थ मात्र असा नव्हे कीं मुंबईतील माझा सर्व वेळ मी नाटकं आणि सिनेमा पाहाण्यात घाळवला. हळूहळू माझ्या मनामध्ये वैचारिक क्रांति होत होती. परंतु मला तिची मुळींच जाणीव नव्हती 'संस्कारात् द्विज उच्यते' या म्हणीप्रमाणे त्यावेळीं माझी मुज झाली त्याच वेळीं खरोखर माझा दुसरा जन्म व्हायला पाहिजे होता. परंतु माझा यावेळीं वैचारिक पुनर्जन्म होत होता. रूढ धार्मिक, सामाजिक विचाराना आणि आचाराना मी केव्हांच तिलाजली दिली होती. माझ्या जन्माबरोबर ज्याप्रमाणे मी पूर्वसंस्कार घेऊन आलो नव्हतो, त्याचप्रमाणे जन्मास आल्यानंतर जे काही संस्कार माझ्या मनावर झाले होते ते सुद्धा मी पार धुपाळून दिले होते. जगामध्ये धर्म किंवा नीति या दोहोंनाही स्थान नाही असं मला त्यावेळी वाटे. कधी कधी अमूर्त अशा ईश्वराचे विचार माझ्या मनात डोकावून जात. परंतु ते फार वेळ टिकत नसत. अशा मनःस्थितीमध्ये एक दिवस मी चौपाटीवर जात असताना प्रार्थनासमाजामध्ये सुधीरचंद्र बानर्जी नावाच्या गृहस्थाचं व्याख्यान चाललं होत, तेव्हा हा बंगाली बाबू काय सांगतो हे ऐकण्यासाठी सहज कुतूहलाने मी प्रार्थनासमाजात जाऊन बसलो. त्याचं व्याख्यान संपल्यानंतर मी त्याची गाठ घेतली. त्याना त्याच्या व्याख्यानाबाबत काही प्रश्न विचारले बाबूजींनीं आपले मुद्दे आणखी स्पष्टपणे सांगण्याचा प्रयत्न केला. बोलता बोलता बाबूजींनी ब्राह्मसमाजाची तत्त्व मला सांगितली. ती तत्त्व ऐकल्याबरोबर मला एक नवीन प्रकाश मिळाला अस वाटून अत्यद आनंद झाला. त्याच क्षणी ब्राह्मसमाजात सामील व्हायचं मीं ठरवलं. या पहिल्या भेटीनतर बाबूजींकडे मी रोज जात असे, व त्यानी मला ब्राह्मसमाजाची इत्थंभूत माहिती सांगितली. इतकंच नव्हे तर ब्राह्मसमाजावरील काही ग्रंथ त्यानी मला वाचायला दिले; ते सर्व ग्रथ मी वाचून काढले. आणि ब्राह्मधर्माविषयी मी सदोदित चिंतन करू लागलो. जगाकडे पाहाण्याची माझी जुनी दृष्टि नाहीशी झाली आणि सबंध जग मला निराळं भासू लागल.

त्यावेळीं मी सेंट झेवियर कॉलेजात शिकत होतो. त्याच कॉलेजात माझा रत्नागिरीचा मित्र श्रीकात सरदेसाई यान स्वतःचं नाव दाखल केलं होत. आम्ही कधी भेटलो म्हणजे

फक्त धर्मावर मी बोलत असे. कारण कुठल्या दुसऱ्या विषयांत मला गोडी वाटत नसे. मी त्याला ब्राह्मसमाजाचीं तत्त्वं मागण्याचा प्रयत्न करी आणि तो मला नेहमी वेड्यात काढी इतकंच नव्हे तर त्यानं मला उलट सांगितलं कीं, 'माझा एका स्वामीशी निकट संबंध आहे त्याना साक्षात्कार झाला आहे. तेच तुझे मार्गदर्शक व्हायला लायक आहेत. तुझी इच्छा असेल तर त्याची आणि तुझी मी भेट करून देतो.' मी होय म्हटलं आणि त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी संध्याकाळी श्रीकांताच्या घरी जाऊन त्या स्वामींची भेट घेतली. हे स्वामी नेहमीं सुटाबुटात राहात असत. सुटबूट घालणारा हा कसला स्वामी असा माझ्या मनात विचार येऊन गेला. परंतु बाह्यांगावरून एकाद्या माणसाची परीक्षा करणं किती अन्यायकारक असतं याचा मला स्वतःला अगदीं कटु अनुभव आला असल्यामुळं मी तो विचार पार धुडकावून लावला. श्रीकांत आणि मी स्वामीच्या खोलींत गेलो, त्यावेळी स्वामी एका खुर्चीवर बसले होते आम्ही दोघेही त्याच्या पायाशीं जाऊन बसलो. श्रीकांतनें प्रथम माझी ओळख करून दिली. नंतर स्वामींनी मला काही प्रश्न विचारले. त्या प्रश्नांचं उत्तर देताना माझ्या मनात कसं परिवर्तन घडून येत होतं आणि जगाकडे पाहाण्याची माझी दृष्टि एकदम कशी बदलली हें मी त्याना सविस्तर सांगितलं ते सर्व शांतपणे त्यांनीं ऐकून घेतलं आणि नंतर ते म्हणाले, 'तूं आता मला जे अनुभव सांगितलेस आणि ईश्वराविषयी तुझ्या अंतःकरणात एक प्रकारची जी तळमळ उत्पन्न झाली आहे तीमध्ये तीनचतुर्थांश aspiration आहे आणि फक्त एक चतुर्थांश inspiration आहे' मला अर्थातच या दोन्ही शब्दाचा अर्थ त्यावेळीं कळला नाहीं मी गप्प बसून राहिलो. स्वामीजी पुढं बोलूं लागले; 'ईश्वराचा साक्षात्कार होण्याविषयीं तुला तळमळ लागली आहे खरी, परंतु साक्षात्कार होणं ही कांही सोपी गोष्ट नाही गुरूच्या कृपेमुळंच तुला साक्षात्कार होऊं शकेल' हे शब्द ऐकल्याबरोबर मी ताडकन् उठलो आणि स्वामीना म्हणालो, 'तुम्ही म्हणता तें कदाचित् खर असेल मला त्याचा मुळीच अनुभव नाही. परंतु आईला जर आपल्या मुलाची भेट घ्यायची असेल तर तिला मध्यस्थाची जरूर लागत नाही. ईश्वराला जगत्जननी म्हणतात, मग तिला जर आपल्या मुलाला भेटायचं असेल तर तिला मध्यस्थाची जरूरी का वाटावी ? मला कुणालाही गुरु करण्याची इच्छा नाही. जे काहीं व्हायचं असेल ते होईल' एवढ बोलून मी तिथून निघालो. त्यानंतर त्या स्वामींची भेट घेण्याची मला मुळींच इच्छा झाली नाही.

# २



सुधीरचंद्र बॅनर्जी कलकत्त्याला निघून गेले होते. परंतु त्याचा माझा पत्र-व्यवहार मात्र नियमित चाले. माझी मन स्थिति अधिकाधिक बिकट होऊं लागली. मला काय करावं तेच सुचेना. ब्राह्मसमाजात दाखल होण्याचा मी निर्धार केला होता. परंतु वडिलाना सागायचा धीर होईना. माझे वडील नुकतेच पेन्शन घेऊन मुंबईला येऊन राहिले होते. मी माझी मनःस्थिति सुधीरबाबूंना पत्रानं कळवली त्यावेळी त्याचं तावडतोब उत्तर आलं, ' तूं आता मुंबईसारख्या बकाली शहरात राहू नकोस. तावडतोब कलकत्त्याला निघून ये. आमच्या साधनाश्रमात तुझी सर्व व्यवस्था करू ' मी कलकत्त्याला जायचा निश्चय केला; पण वडिलाना सागायचं कसं ? शेवटी धीर केला. शिक्षणासाठी मी कलकत्त्याला जात आहे असं सांगितलं. माझ्या शिक्षणाचा बोजा आता तुमच्यावर राहाणार नाहीं. वडील फक्त इतकंच म्हणाले की, " तूं इथून जाऊं नयेस असं मला वाटतं. पण तुझ्या इच्छेच्या आड मी येणार नाही तूं आपल्या प्रकृतीची काळजी घे आणि वरचेवर पत्र पाठवीत जा. " इतकं बोलून ते निघून गेले मला एखादे वेळी वाटे की, वडिलाना सोडून जाणं बरं नव्हे ; पण लागलीच माझ्या मनात असा विचार येई, की कौटुंबिक पाशात सापडून कर्तव्यच्युत होणं चागल नाहीं माझ्या मनाचा शेवटी निर्धार झाला आणि कलकत्त्याला जाण्या-साठी मी नागपूर मेलमध्यें बसलों त्यावेळीं नागपूर मेलइतकी वेगानं धावणारी आगगाडी कुठलीच नव्हती कल्याण स्टेशन तिनं एकुणपन्नास मिनिटात गाठलं ती इतक्या वेगान धावे की रूळाजवळचे दगड ताडताड उडत असत याची जाणीव होताच इतक्या वेगाने आपण परकी प्रांतांत आणि परकीय शहरात जात आहों त्याची मला क्षणभर भीति वाटली. घर सोडल्यामुळे होणारं दुःख माझ्या मनाला सारखं डांचत होत. तरीसुद्धा आपल ध्येय साध्य होऊन मनाला शाति मिळणार असा विचार मनात येऊन एक प्रकारचा नवीन उत्साह वाटूं लागला गाडीत विशेष गर्दी नसल्यामुळं रात्री झोप चागली मिळाली. आणि सकाळी उठल्याबरोबर पूर्वीचा सगळा क्षीण नाहींसा झाला. गाडी नागपूरच्या जवळ येत होती. आणि मी खिडकींतून

निसर्गाची शोभा पहात होतो. इतक्यांत माझ्या मनाला काय वाटलं कोण जाणे! मी माझ्या गळ्यातलं जानवं काढलं आणि खिडकीबाहेर फेकून दिलं. ईश्वर हा सर्वांचा सारखा पिता असल्यामुळं सर्व मानवजात एका कुटुंबाप्रमाणे आहे, तर उच्च-नीच हा भेद दर्शविणारं हें जातीय प्रतीक माझ्या अंगावर कशाला, असाही विचार माझ्या मनांत आला असावा.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हावरा स्टेशनवर येऊन पोचलो. मला न्यायला अर्थात् स्टेशनवर कुणी आलं नव्हतं कारण मी निघण्यापूर्वी कुणालाच कळवलं नव्हतं. मला साधनाश्रमाचा पत्ता सुधीरबाबूंनी दिला होता म्हणून मी काहींही विचार न करता एक गाडी ठरवली आणि त्याला कॉर्नवालीस स्ट्रीटवरील २१०।६ या नंबरच्या घराचा पत्ता सांगितला साधारण ब्राह्मसमाजाचा पत्ता २११ होता. त्या समाजाच्या मंदिरासमोर त्यानं गाडी उभी केली. मी आत जाऊन चौकशी केली. तेव्हा साधनाश्रम त्या मंदिराच्या पाठीमागेंच सापडला. आश्रमात गेल्यावर आश्रमाचे सुपरिंटेंडंट बाबू गुरुनाथ चक्रवर्ति यांनी पुढं येऊन मला आलिंगन दिल, आणि त्यानी मला माझी खोली दाखवली. खोलींत जाऊन मी सामान टाकलं. इतक्यांत एक वृद्ध गृहस्थ माझ्या खोलीत आले या गृहस्थाना सर्वजण दादामहाशय म्हणून ओळखीत. ते आजन्म ब्रह्मचारी होते. त्यानी आपल्याजवळ होतं नव्हतं ते सर्व ब्राह्मसमाजाला अर्पण करून आपलं सर्व आयुष्य ब्राह्मसमाजाला वाहिलं होत. त्याच्याविषयीं ब्राह्मसमाजातील सर्वांना अत्यंत आदर वाटत असे. ते माझ्या खोलींत आले आणि खोलीतल्या सर्व वस्तू जागच्याजागीं आहेत की नाहींत ते पाहिलं. त्यानंतर ते माझ्याजवळ आले माझ्या तोंडावरून आणि पाठीवरून त्यांनी हात फिरवला. नंतर ते हिंदींत म्हणाले, 'तू वयानं इतका लहान असशील याची मला कल्पना नव्हती तुला घर सोडून आल्याबद्दल वाईट नाही ना वाटत? पण तूं घाबरूं नकोस मी तुझ्या बापाच्या नव्हे पण आजोबाच्या जागी आहे काय लागलसवरलं तर मला लगेच साग '

मी दादामहाशय यांच्या चेहेऱ्याकडे पाहिलं त्याचे डोक्यावरील आणि दाढी-मिशाचे केस बर्फासारखे शुभ्र होते त्याच्या दोन्ही डोळ्यात हास्य नुसतं नाचत होतं मी थोडासा विचार केला आणि त्याना सांगितलं की, 'मला चहा पाहिजे-' ते ऐकून ते खो खो हंसत सुटले ते म्हणाले, 'वा रे वा शहाण्या! तूं आश्रमात रहायला आलास आणि चहा कसला मागतोस? तुला आश्रमातले नियम माहीत नाहीत वाटतं? अगोदर ते नियम वाचून पाहा' असं हंसत हंसत म्हणून ते निघून गेले मी जरा हिरमुसला झालो आणि त्या म्हाताऱ्याचा मला थोडा रागही आला मी सामान व्यवस्थित ठेवीत असता थोड्याच वेळात एक गडी आला आणि त्यानं माझ्यापुढं चहाचा कप ठेवला त्या दिवसापासून दादामहाशय आणि मी एकमेकाचे दोस्त

बनलो. त्याना एकादे वेळी मी खूप बोलत असे. परंतु त्याची आंघोळीची वेळ झाली कीं मी त्याच्या अंगाला स्वतः तेल चोळीत असे. दादामहाशयसुद्धां सकाळी येऊन मी चहा घेतला की नाही याची चौकशी करीत. मी चहा घेतलेला नसला कीं माझ्या हातावर एक आणा ठेवीत आणि मला म्हणत, 'तूं जा, आणि प्रार्थना सुरू होण्यापूर्वी चहा घेऊन चटकन् ये.'

आनन्या आश्रमात रोज सकाळी उपासना होत असे. त्या उपासनेला प्रत्येक आश्रमवासियानं हजर राहिलंच पाहिजे असा नियम होता. उपासना बंगालीत होत असल्यामुळे प्रथम मला ती समजत नसे. परंतु उपासनेच्या वेळी जी बंगाली गाणीं म्हणत असत, तीं मात्र मला फार आवडत. त्या गाण्यांच्या स्वरात मला काही तरी नावीन्य भासे. त्यामुळे तीं गाणीं पाठ करण्याचा मी प्रयत्न करी. उपासनेतील उपदेशाचा भाग संपला की प्रार्थना होत असे. ती प्रार्थना होत असताना सर्वजण डोळे मिटीत. मी मात्र कधी डोळे मिटले नाहीत. कारण ती प्रार्थना मला समजत नसे. एक दिवशी ती गोष्ट दादामहाशयाच्या नजरेत आली आणि त्यांनी मला रागाचा आव आणून विचारलं, 'उपासनेच्या वेळी बाकी सर्वजण डोळे मिटून घेतात आणि तूं का डोळे मिटून घेत नाहीस?' मी त्याना स्वच्छ सांगितलं, 'तुम्ही सर्वजण उपासना बंगालीत करता ती मला समजत नाही. तिचा माझ्या मनावर काही परिणाम होत नाही. मग मी डोळे मिटण्याचा दांभिकपणा कशाला करूं?' हे माझं उत्तर ऐकून दादामहाशय विचारात पडले. नंतर थोड्या वेळान ते म्हणाले की, 'हे बघ, उद्यापासून उपासना संपली की तं माझ्या खोलीवर ये. मी तुला बंगाली शिकवीन. माझं स्वतःचं धर्मोपदेशावरील एक पुस्तक आहे अगदी साध्या भाषेत; ते तुझ्याकडून वाचून घेईन. आणि हे बघ, तूं ते वाचल्यावर आणखीन एक चहाचा कप देईन.'

दुसऱ्या दिवसापासून मी दादामहाशयाकडे बंगाली शिकूं लागलो. मला बंगाली पदांची आवड अगोदरच लागली होती. ब्राह्मसमाजातील बहुतेक पदं रविबाबूंची असल्यामुळे तीं पदं आपल्याला समजून म्हणता आलीं पाहिजेत हामुद्धा विचार माझ्या मनात त्यावेळी आला असेल. काही का असेना, दादामहाशयाच्या सहाय्यानं अवघ्या दोन महिन्यात मी बंगाली खाड खाड वाचायला शिकलो. बंगाली बोललेलं मला चांगलं समजत असे; परंतु बोलण्याचा किंवा लिहिण्याचा मी कधी प्रयत्न केला नाही. याबद्दलची एक गंमतीदार हकीगत सांगतो. बंगालमध्ये स्वदेशीची लाट उसळल्यानंतर बंगाली भाषेचं प्राबल्य फारच वाढलं आणि बंगाली लोक इंग्रजी भाषेकडे दुर्लक्ष करू लागले. एके दिवशी कलकत्ता युनिव्हर्सिटीचा केमिस्ट्रीचा प्रोफेसर माझ्याकडे आला होता. तो मला म्हणाला, 'मला इंग्रजीत बोलता येत नाही. मला फक्त बंगालींतच बोलता येईल, पण तुम्ही इंग्रजीमध्ये बोललात तर ते मला

समजेल.' तेव्हां मी त्याला म्हटलं, 'तुम्ही बंगालीत बोला, मी इंग्रजींत बोलेन. तुम्हाला जर इंग्रजीत बोलता येत नाहीं तर मला बंगालीत बोलता येत नाही. परंतु तुम्हाला जितकं इंग्रजी समजतं तितकंच मला बंगाली समजतं. म्हणून तुम्ही बंगालीत बोला, मी इंग्रजींत बोलेन.' अशा रीतीनं आमचा वादविवाद तासन् तास चालला होता. दादामहाशयानी मला बंगाली शिकवलं त्याच हें दृश्यफल असं म्हणायला हरकत नाहीं.

साधनाश्रमांत असतांना मी सिटी कॉलेजमध्ये नाव दाखल केलं. त्यावेळी त्या कॉलेजमध्ये थिऑलॉजिकल फॅकल्टी नुकतीच सुरू झाली होती. हेरंबचंद्र मित्र हे त्या कॉलेजचे प्रिन्सिपॉल आणि इंग्रजीचे प्रोफेसर होते. ते इंग्रजी काव्य शिकवूं लागले की त्यांच्या व्याख्यानांत विद्यार्थ्यांची मन अगदी रंगून जात पंडित सीतानाथ तत्त्वज्ञान शिकवीत असत. तत्त्वज्ञानाचे पहिले धडे मी त्यांच्याजवळ शिकलो असं म्हणावयाला हरकत नाही. पंडितजी हे मूलतः हेगलवादी होते आणि हेगलच्या तत्त्वज्ञानाला अनुसरूनच त्यानी ब्राह्मसमाजाचं तत्त्वज्ञान तयार केलं राजा राम-मोहन रॉयच्या वेळी ब्राह्मसमाजाला तत्त्वज्ञान नव्हतं, असं म्हटलं तरी चालेल. स्वतः राममोहन रॉय अद्वैतवादी होते असा माझा समज आहे. परंतु त्यानीं जीं काहीं भक्तिपर काव्यं केलीं त्यावरून ते विशिष्ट–अद्वैतवादी असावेत असा माझा समज आहे महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर यांची उपनिषदावर विशेष निष्ठा होती त्यानी जें ब्रह्मोपनिषद तयार केलं, त्यातील बहुतेक श्लोक उपनिषदांमधून घेतले होते. ते सुद्धा विशिष्ट–अद्वैत-वादी असावेत असं वाटतं. महर्षींच्यानंतर ब्रह्मानंद केशव सेन हे ब्राह्मसमाजाचे पुढारी झाले आणि त्यांच्या नेतृत्वाखाली ब्राह्मधर्माला आणि तत्त्वज्ञानाला निराळंच वळण लागलं

केशवचंद्र सेन यानी हिंदुधर्मग्रंथांचा विशेष अभ्यास केला नव्हता. त्यांच्या मनावर पाश्चात्य शिक्षणाचा आणि ख्रिस्ती धर्माचा दृढ परिणाम झाला होता. ख्रिस्तावरील त्यांची व्याख्यानं वाचली कीं, ख्रिस्ताची शिकवण त्यांनीं किती आत्मसात केली होती, ते कळून येतं ख्रिस्ताच्या शिकवणीमुळे ब्राह्मसमाजात एक विशिष्ट प्रकारची भावि-वृत्ति पसरूं लागली केशवचंद्र सेन आणि प्रतापचंद्र मुजुमदार यांच्या प्रार्थनेत व उपदेशामध्ये मनुष्यप्राणी हा मूलतः पापी आहे, त्याचं स्वतःच्या प्रयत्नानं तारण होणार नाहीं, तें ईश्वरी कृपेनंच होईल. हे विचार प्रामुख्यानं आढळतात रीड, हॅमिल्टन वगैरे स्कॉटिश तत्त्ववेत्त्यांचा केशवचंद्रानीं विशेष अभ्यास केला असल्यामुळे intuition किंवा सहजप्रेरणा हाच ब्राह्मतत्त्वज्ञानाचा गाभा आहे, असं त्यानी निश्चित केलं. त्यानंतर पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यानी 'फिलॉसफी ऑफ ब्राह्मोइझम' हा ग्रंथ लिहून ब्राह्मसमाजाच तत्त्वज्ञान कायमचं ठरवून टाकलं. परंतु, मला पंडितजींचा हेगलवाद

मुळीच पसंत नव्हता. त्यावेळीं कलकत्ता युनिव्हर्सिटींत शिकवीत असलेले डॉ हलदर याचा नवीन हेगलवादसुद्धा मला मान्य झाला नाहीं. पंडितजींजवळ इमॅन्युअल कान्तचा अभ्यास केल्यानंतर मी हेगल वाचायला सुरुवात केली. परंतु त्याचे स्वत:चे ग्रंथ वाचण्यापूर्वी एडवर्ड केअर्ड, जॉन केअर्ड, टी. एच ग्रीन यांचे ग्रंथ मी वाचून काढले हेगल वाचताना मी पदोपदी अडखळायला लागलो. त्याचं कारण त्याचं क्लिष्ट लिखाण हे तर होतंच; पण त्याच मुख्य कारण असं होतं की त्याचे विचार मला मुळींच पटेनात माझी या विषयावर पंडितजीबरोबर बरेच वेळा चर्चा झाली. एक दिवशी तर पंडितजींना मी साफ सांगितलं की हेगलचं तत्वज्ञान सबंध चूक आहे आणि पंडितजींनी ठरविलेलं ब्राह्मतत्त्वज्ञान हे सुद्धा चूक आहे. ब्राह्मसमाजाचं यापेक्षा निराळं असं काही तरी तत्त्वज्ञान असलं पाहिजे. ते शोधून काढण्याचा प्रयत्न झाला पाहिजे पंडितजी डोळे मिटून थोडा वेळ स्वस्थ बसले. नंतर ते म्हणाले, ' तू बच्चा आहेस तुला यातलं काहीच समजत नाही मी गेली चाळीस वर्षे नवीन सत्य शोधण्याचा प्रयत्न करीत आहे मला त्यात यश आलं नाही आता यांच्या निराळं असं काही सापडेल असं मला वाटत नाहीं ' ' हे पंडितजींचे उद्गार ऐकून मला त्यावेळी जरी आश्चर्य वाटलं तरी मी बोलला नाहीं एके काळीं पुरोगामी आणि ज्वलज्जहाल ठरलेली माणसं उतारवयात प्रतिगामी व मवाळ कशी बनतात. याचं पंडितजी हे ठळक उदाहरण होतं

आमच्या साधनाश्रमाचे जुने सुपरिंटेंडंट जाऊन नवीन सुपरिंटेंडंट आले. डॉ. हेमचंद्र सरकार हे वयानं आमच्या पूर्वीच्या सुपरिंटेंडंटपेक्षा बरेच लहान होते त्यांचं वय त्यावेळी ४६–४७ असावं. आणि बंगालमध्ये पन्नास वर्षांच्या माणसालासुद्धा वृद्ध माणसं लहान समजत हेमबाबू दिसायला मात्र शानदार होते त्याना पाहिल्याबरोबर त्यांच्याबद्दल आदर आणि थोडीशी भीति वाटे. त्यांचे काळेभोर डोळे, बाकदार नाक, त्यांची निमुळती दाढी आणि त्यांचा लालबुंद चेहरा एखाद्या इटालियन चित्रकारानं काढलेल्या येशू ख्रिस्ताच्या चित्रासारखा दिसे हेमबाबू विलायतेहून शिकून आलेले. अर्थात् त्यांची विचारसरणी पाश्चात्यधर्तीची होती त्यांनी मला प्रथमच बायबलचा अभ्यास करायला सांगितलं त्यांनी शिफारस केलेलं कुठलही पुस्तक मी वाचल्याशिवाय रहात नसे अर्थात बायबल मी मनापासून वाचायला लागलो याच सुमारास टॉलस्टॉयचे सर्व धर्मपर ग्रंथ, डीन फॅरर यानी लिहिलेलं येशू ख्रिस्ताचं चरित्र, त्याचप्रमाणे स्टॉकर, रेनन. स्ट्राऊस, रूसो यानीं लिहिलेलीं येशू ख्रिस्ताची चरित्रं मी वाचून काढलीं. किती तरी येशू ख्रिस्ताची चरित्र मी वाचलीं असतील: पण त्याची नावं मला आता आठवत नाहीत हेमबाबूंचीं येशू ख्रिस्तावरील व्याख्यानं मला फार परिणामकारक वाटलीं. 'Man shall not live by bread alone' या ख्रिस्ताच्या उद्गाराचं त्याचं

विवेचन अजूनही माझ्या स्मरणातून गेलं नाहीं. केशवचंद्र सेन यांचीं व्याख्यानं मी अगोदरच वाचलीं होतीं या अभ्यासाचा परिणाम म्हणूनच कीं काय, ख्रिस्तीधर्माकडे माझा कल झुकूं लागला

एके दिवशीं सध्याकाळी हेमबाबू माझ्या खोलीत आले, अन म्हणाले, 'हे पाहा, उद्या सकाळची उपासना तुला करावी लागेल. म्हणून प्रार्थना आणि आराधना आटोपल्यानंतर तुला जो उपदेश करायचा असेल तो तूं अगोदर लिहून काढलास तर बरं होईल' यावर मी म्हणालो 'लिहून काढण्याची काहीं जरुरी नाही. माझा ईश्वरावर पूर्ण विश्वास आहे. तो मला स्फूर्ति देईल, त्याप्रमाणे मी बोलेन!' यावर हेमचंद्रबाबू हसले आणि काही न बोलता निघून गेले दुसरे दिवशी मी उपासनेला सुरवात करताना दरदरून घाम सुटला मी डोळे घट्ट मिटून घेतले होते. माझ्या तोंडातून शब्द न येईनात. ज्या ईश्वरप्रेरणेची मी वाट पाहात होतो, ती आलीच नाही काही वेळानं 'सत्यं ज्ञानं अनन्तम!' हा मंत्र म्हणण्यास सुरवात केली. माझ्याबरोबर तोच मंत्र सर्वांनी म्हणण्यास सुरवात केली तो सामुदायिक आवाज ऐकल्याबरोबर मला थोडासा धीर आला आणि मग 'सुप्रीम रिॲलिटी दाऊ आर्ट' या शब्दांनी मी आराधना संपविल्यानंतर 'असतो मा सद्गमय' हा मंत्र मी म्हटला आणि नतर उपदेशाला सुरवात केली Know thyself हे सॉक्रेटीसाचं वचन घेऊन मी पधरा मिनिटं बोललो उपासना कशीबशी आटपली आणि नतर हेमबाबूंनी येऊन मला धीराचे शब्द सांगितले. तो उपदेश मी नंतर लिहून काढला. त्यापूर्वी टॉलस्टॉयवर मी एक लेख लिहिला होता. हे दोन्ही लेख ब्राह्मसमाजाच मुखपत्र 'इंडियन मेसेजर' या साप्ताहिकाच्या संपादकाकडे पाठवले या सपादकमहाशयाचं नाव होतं प्रतुलचंद्र सोम मला खूप आशा वाटत होती की माझे लेख 'इंडियन मेसेजर'मध्ये छापून येतील परंतु २।३ दिवसांनी प्रतुलबाबू माझ्याकडे आले आणि खुर्ची ओढून घेऊन माझ्याजवळ बसले. आपल्या सदऱ्याच्या खिशातून त्यांनी माझे लेख बाहेर काढले आणि त्यांनी त्या लेखातील दोष दाखविण्यास सुरवात केली त्यानंतर इंग्रजी लेख कसे लिहावेत यावर एक व्याख्यान झोडून स्वारी निघून गेली. मला त्यावेळी वाईट वाटलं परंतु नंतर ते सर्व विसरून पुन्हा मी माझ्या अभ्यासाला लागलो त्यानंतर बरोबर दोन वर्षांनं 'सुबोधपत्रिके'च्या इंग्रजी विभागाचा संपादक झाल्यानंतर माझे काही लेख या साप्ताहिकात पुनर्मुद्रित झाले होते हे मी जाता जाता सांगतो आहे सुबोधपत्रिकेचा उल्लेख योग्य ठिकाणी पुढे येईलच.

मार्च महिन्यानंतर कलकत्त्याला उन्हाळ्यास सुरवात होते एखादे वेळीं तो इतका कडक असतो की घरातून बाहेर पडण्याचीसुद्धा सोय नसते हेमबाबूंची पत्नी लावण्यप्रभा सरकार ही सर जगदीशचंद्र बोस यांची बहीण तिचा हिमालयावर

## कर्सियाँग आणि काव्य

कर्सियांग इथं एक बंगला होता त्या ठिकाणी आम्ही राहायला गेलो. लावण्यप्रभा सरकार यांची बहीण हेमप्रभा बोस ही कलकत्त्याच्या बेथून कॉलेजमध्ये प्रोफेसर होती. तीसुद्धा आमच्याबरोबर आली होती. या दोन बहिणींनीं आमची उत्तम बडदास्त ठेवली. दार्जिलिंग हे कर्सियांगच्या नंतरचं व शेवटचं रेल्वे स्टेशन. दार्जिलिंगची उंची कर्सियांगपेक्षा अधिक आहे. दार्जिलिंग हें अतिशय सुंदर शहर आहे असं समजण्यात येतं. परंतु माझ्या मतानं कर्सियांग हे त्याहीपेक्षा अधिक सुंदर आहे.

आमचा बंगला एका टेकडीवर बांधला असल्यामुळे त्या बंगल्याच्या पुढे थोड्या अंतरावर एक मोठी रुंद दरी होती. या दरीतील झाडंझुडपं आणि गवत नेहमीच हिरवगार राही. परंतु उन्हाळ्यात या दरीला एक नवीनच शोभा येत असे. पर्वतावरील बर्फ हळूहळू वितळूं लागून त्याच्या पांढऱ्या शुभ्र अशा नद्या बनत आणि या दरीचा पृष्ठभाग जमिनीवर काढलेल्या रांगोळीप्रमाणे व्यापलेला दिसे. सकाळचीं सूर्याची कोवळी किरणं या वाहत्या नद्यावर पडली की त्या नद्यांचं पाणी वितळलेल्या सोन्याप्रमाणे चमके. त्याच पाण्यावर रात्री चंद्राचीं किरणं पडली की तेच पाणी रुप्याप्रमाणे लकाकत असे. ती शोभा काही अपूर्व होती आणि तिचा ठसा माझ्या अंतःकरणावर अजूनही स्पष्ट उमटलेला दिसतो.

कर्सियांगसारख्या थंड हवेच्या ठिकाणी गेल्यानंतर प्रत्येकजण आपला बहुतेक वेळ बाहेर हिंडण्या-फिरण्यात घालवीत असे. मी मात्र पुस्तकात डोकं खुपसून बसलेला असे. सकाळी थोडा फेरफटका केल्यानंतर बहुतेक वेळ मी वाचनात घालवी. याच वेळी मला इंग्रजी काव्याचा अतिशय नाद लागला. शेक्सपिअरच्या हॅम्लेट, मॅकबेथ इत्यादि नाटकातील स्वभावचित्राचं चिकित्सकदृष्ट्या पृथक्करण केल्यानंतर शेले, कीटस्, कोलरीज, ब्राउनिंग, टेनिसन् इत्यादि कवींचं काव्य मी भराभर वाचून काढलं. मला त्या काव्यापैकी आता थोडासाच भाग आठवतो. परंतु शेलेचं Prometheous Unbound, कीट्सची मिल्टनवरील कविता—(There is an eyesight in blindness keen, There is a budding morrow in midnight), वर्डस्वर्थची Lines written On Tintern Abbey ही कविता ('I have felt a presence that disturbs me with the joy of elevated thought .. The sounding cataract haunted me like a passion), कोलरीजची Christabel (या कवितेतील ओळी मला मुळींच आठवत नाहीत), ब्राऊनिंगची Pippa Passes ही कविता (' God's in heaven, all's right with the world ), टेनिसनचं In Memorium, (It is better to have loved and lost than never to have loved at all) या ओळी मला अजून आठवतात. पुढे काहीं वर्षांनी माझ्या दृष्टिकोनात आमूलाग्र बदल पडल्यानंतर सॅम्युअल

बटलर यानीं या शेवटच्या दोन ओळींवर जे विडंबन केलं ते मला अधिक आवडूं लागलं. ते विडंबन असं –' It is better to have loved and lost than never to have lost at all.'

या सर्व कविता मी अत्यंत आवडीनें वाचीत असे. शेक्सपिअरवर जे अनेक टीकात्मक ग्रंथ लिहिले गेले आहेत, त्यामध्ये जर्व्हायनस या जर्मन गृहस्थानं लिहिलेल्या Commentaries मला फार आवडतात. इंग्रज लोकाना शेक्सपिअरच्या प्रतिभेचं खरं आकलन झालं नाहीं व सुप्रसिद्ध जर्मन कवि गोएते यानं Wilhelm Meister या पुस्तकात शेक्स्पिअरची खरी थोरवी जगाच्या पुढं माडली. असं या जर्मन टीकाकारानं स्पष्टपणे नमूद केलं आहे. टॉलस्टॉयचे ग्रंथ मी याच वेळीं आवडीनं वाचत असे. परंतु त्याच्या ललित वाङ्मयाकडे माझं फारसं लक्ष नव्हतं. त्याच्या धार्मिक पुस्तकाकडे माझा अधिक कल होता. बायबल व इतर ग्रंथामध्ये जे अलौकिक चमत्कार दृष्टीस पडतात, त्याना ऐतिहासिक महत्त्व नाही, शिवाय तो भाग बुद्धीला पटत नाहीं, हें दाखवून देऊन टॉलस्टॉयनं येशूख्रिस्ताचं शुद्ध मानवी स्वरूप पटवून देण्याचा जो प्रयत्न केला आहे, त्याचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. टॉलस्टॉयनं दिलेल्या नव्या दृष्टीनं मी पुनः पुन्हा नवा करार वाचूं लागलो. येशू ख्रिस्ताविषयीं माझ्या मनामध्ये एक प्रकारचा आपलेपणा, नवीन जिव्हाळा उत्पन्न झाला. येशू ख्रिस्ताची Sermon on the Mount ही शिकवण तर मी तोंडपाठ करून ठेवली होती. येशू ख्रिस्ताच्या जीवनाचा व शिकवणीचा ख्रिस्तीधर्मीयानीं फारच विपर्यास केला म्हणून त्याच्याबद्दल मला कींव वाटे त्या लोकाना कसं सुधारायचं याबद्दलचे विचार माझ्या मनांत घोळूं लागले; या जबरदस्त कार्यासाठीं आपलं जीवन शक्य तितकं येशू ख्रिस्ताच्या जीवनासारखं करावं अशी एक नवीन महत्त्वाकांक्षा माझ्या मनात जागृत झाली यानतर येशू ख्रिस्ताच्या जीवनाचं व शिकवणीचं मनन करणं हा एक माझा नित्य व्यवसाय होऊन बसला

ती वयानं माझ्या बरोबरीची असावी किंवा १।२ वर्षांनी मोठी असावी त्यावेळी ती बेथून कॉलेजमध्ये सीनिअर बी ए. च्या वर्गात होती . मनात्रू ज्यावेळीं उपासना चालवीत त्यावेळीं ती ब्राह्मसंगीतातील पद अत्यंत भाविकपणानं म्हणे. ती मूळची मद्रासची, परंतु हेमवाबूंच्या घरी लहानपणापासून वाढल्यामुळे बंगाली रीतरिवाज तिनं आत्मसात केले होते माझ्या नकळत माझं मन या मुलीकडे खेचलं जाऊं लागल. परतु येशू ख्रिस्ताचे विचार माझ्या मनात येताच मी माझ्या मनाला आवरण्याचा प्रयत्न करी. चहा पिताना किंवा खाण्याचे वेळी सुद्धा ती माझ्याकडं विशेष लक्ष देई. परंतु याची मला बरेच दिवस जाणीव नव्हती जाणीव झाल्याबरोबर

मनाला कसंसंच वाटू लागलं. कर्सियॉग सोडून ताबडतोब कलकत्त्याला निघून जावं असाही विचार माझ्या मनात आला. पण तो विचार हेमबाबूंच्या भीतीनं दाबून टाकला. मी माझ नव्या करारांचं वाचन अधिक जोरानं सुरू केलं अशा रीतीनं काही दिवस गेल्यानंतर एके दिवशी ती मुलगी सरळ माझ्या खोलीत आली आणि माझ्या हातांत एक पत्र देऊन निघून गेली. पत्र वाचल्यावर मी आश्चर्यानं थक्क झालों. ते पत्र माझ्याबरोबर अभ्यास करणाऱ्या एका साधनार्थ्यानं लिहिलं होतं. आश्चर्याचा पहिला धक्का ओसरल्यानंतर मला त्या माणसाची अतिशय चीड आली. हिमालयावर साधन करण्यासाठी आलेला माणूस आपल्या गुरुभगिनीला प्रेमपत्र लिहितो याचा अर्थ काय ! हेमबाबूंना ते पत्र दाखवावं अशी प्रथम मला इच्छा झाली. नंतर त्याचीच कानउघाडणी करावी असं वाटू लागलं, पण या फंदात आपण न पडणं बरं असं वाटून मी काहीच न करता स्वस्थ बसायचं ठरवलं.

माझ्या वृत्तींत पडलेला हा फरक त्या बिचाऱ्याच्या ध्यानी आला आणि त्याची स्वतःची वृत्ति अगदीं चोरटी बनली. जेवतानासुद्धा तो अगदी खाली मान घालून जेवत असे या गोष्टीचा विचार करताना आता मला त्याची कीव येते, परंतु त्याच्याबद्दल मला वाटणारी चीड सात्त्विक स्वरूपाची होती असा मी त्यावेळीं समज करून घेतला होता. वस्तुस्थिति मात्र अशी होती की मला त्याचा मत्सर वाटत होता ; पण त्यावेळीं मला काही हे उमगलं नाही. दुसऱ्या दिवशी सकाळीच उठून मी घराच्या पुढं येरझाऱ्या करीत असताना ती मुलगी बाहेर आली आणि माझ्याबरोबर चालू लागली. आतापर्यंत कारणाशिवाय मी तिच्याशी बोलत नसे, परन्तु तिनं एकदम त्या पत्रासंबंधी बोलायला सुरवात केली. बरीच चर्चा झाल्यानंतर मी तिला स्वस्थ बसायला सांगितलं. तिनं ते कबूल केलं. यानंतर दररोज सकाळी-दुपारी वडील माणसं उठण्यापूर्वी आम्ही त्या पुढच्या रस्त्यावर येरझारा करूं लागलो. अनेक विषयावर आम्ही चर्चा केली. माझ्याप्रमाणे तिनं ब्राह्मसमाजाची आजन्म प्रचारक होण्याचं ठरविलं होतं. एके दिवशी सकाळीं माझा मित्र अचानक लवकर उठला आणि त्यानं आम्हा दोघांना बोलताना पाहिलं. त्याचे डोळे लाल झाले पण त्यानंतर तो घरात मोकळेपणानं वावरूं लागला. आपल्या आईची आणि वडिलांची नजर चुकवून एरवी माझी भेट घेणं तिला मुष्किल होतं म्हणून कलकत्त्याला जायच्या वेळीं आपण एकमेकांना पत्र पाठवायचं असं आम्ही एकमेकांना आश्वासन दिलं.

कलकत्त्यास आल्यानंतर माझा अभ्यास व साधन हीं पुन्हा सुरू झालीं बंगालमध्ये 'साधन' हा शब्द विशिष्ट अर्थानं वापरतात. ईश्वराचं चिंतन, मनन व भजन, धार्मिक ग्रंथांचं वाचन, धार्मिक विषयावर चर्चा ही 'साधन' या शब्दात सामावलेली आहेत. कलकत्त्यास आल्यावर हेमबाबूंविषयीं माझी वृत्ति थोडीथोडी

बदलू लागली मला त्याच्याविषयीं पूर्वी आदर व भीति वाटत असे. भीति आतां नाहींशी झाली आणि आदरही कमी कमी होऊं लागला. येशू खिस्ताच्या जीवनाशीं हेमबाबूंच्या वागणुकीची मी नेहमी तुलना करी अर्थात खिस्ताच्या उज्ज्वल जीवनाच्या मानानं हेमबाबूंचं जीवन कुणालाही कधी उज्ज्वल दिसलं नाही तर त्यात काही आश्चर्य नव्हतं परंतु हा सुविचार मला त्यावेळी कुठला सुचायला! दिवसेंदिवस हेमबाबू माझ्या मनातून उतरूं लागले प्रथम माझी त्याच्यावर उत्कट श्रद्धा असल्यामुळे माझा अभ्यास व साधन याकडे पूर्ण लक्ष होतं. परंतु ही श्रद्धा जसजशी ढळू लागली, तसतसं मला वाटू लागलं की हा आश्रम म्हणजे सारं ढोंग आहे. आपण जीवाची आटापीट करून ज्या हेतूनं इथं आलों, तो हेतु साध्य होणार नाही असं मला वाटू लागलं. मी अगदी बेचैन होऊन गेलों. काय करावं ते मला सुचेना। परंतु एक दिवशी एक चमत्कार घडला आणि त्यामुळे मी आश्रम सोडण्याचा बेत रहित केला.

ब्राह्मसमाजाचा वार्षिकोत्सव चालू असताना एक गृहस्थ आमच्या आश्रमांत आला या गृहस्थाचं वय त्यावेळी ३०।३२ च्या दरम्यान असाव दिसायला मूर्ति ठेंगू आणि किडकिडीत अशी होती आगावरचे कपडे साधारण मळलेलेच होते हेमबाबू नेहमी परीटघडीचे सफेत कपडे वापरीत या गृहस्थाची दाढीसुद्धा हेमबाबू-सारखी रेखीव आणि निमूळती नव्हती त्याची दाढी आणि डोक्यावरील केस अस्ता-व्यस्त वाढलेले होते हेमबाबूंचे डोळे पाणीदार होते आणि गालावर एक प्रकारचा लालसरपणा आलेला होता तर या गृहस्थाचे गाल बसलेले होते आणि डोळे थिजलेले दिसत. मी आपल्या मनाशीं विचार करूं लागलों. येशू खिस्तानं अरण्यात चाळीस दिवस उपास केला त्यावेळीं तो कसा दिसत असेल याचं चित्र मी मनात चितारूं लागलों ते चित्र मला हेमबाबूसारखं न दिसता या गृहस्थासारखं दिसू लागलं. हेमबाबू विलायतेहून शिकून आलेले, हा गृहस्थ विशेष शिकलेला असावा असं माझं मन मला सांगेना; पण त्यानं आपली छाप मात्र माझ्या मनावर तत्काल बसवली आधुनिक काळातील येशू खिस्त हाच असावा अशी माझी ठाम समजूत झाली. अनिमिष नेत्रांनी मी त्याच्याकडे पाहूं लागलों त्या गृहस्थाचं नाव मन्मथनाथ दास. मन्मथबाबू माझ्या खोलीत आले. मी काही विचार न करता माझ्या मनातली खळबळ त्यांना उघड करून सांगितली. ते म्हणाले, 'तूं असं करूं नकोस तुला मी माझ्या आश्रमात घेऊन जाईन उत्सव संपला की तू शिलॉंगला ये पण तुला एक सांगून ठेवतो, माझ्या आश्रमात तुला फार कष्ट पडतील वेळेवर तुला जेवायलाही मिळणार नाहीं आणि कित्येक वेळा तर तुला दिवसच्या दिवस उपास काढावे लागतील पटत का तुला हें?' मन्मथबाबूंचे हे उद्गार ऐकून मी तर आनंदानं बेहोष होऊन गेलों. येशू खिस्ताचा आश्रम असाच असला पाहिजे अशी मी मनाशी खूणगाठ बांधली

आणि त्या आश्रमांत जाऊन राहाण्यासाठीं मी उत्सुक झालो. थोड्या वेळानं मन्मथबाबू निघून गेले.

कांही दिवसानी मन्मथबाबूंचं हेमबाबूंना पत्र आलं त्यांनी मला ते वाचून दाखवलं आणि ' तू शिलॉगला जातोस का ? ' असं विचारलं. मी तावडतोब ' होय ' असं उत्तर दिलं. ते माझ्याकडे बराच वेळ पाहात राहिले. आणि नंतर ' तुझी इच्छा असेल त्याप्रमाणे तूं कर ' असं म्हणून ते निघून गेले. त्याना त्यावेळीं कसल्या तरी गोष्टीच वाईट वाटत असावं असं दिसल, परंतु मी त्याची मुळींच पर्वा केली नाही. त्याच्यासंबंधीची माझी बेफिकीर वृत्ति त्याना दररोज दिसून येत होती, म्हणूनच ते यावेळीं काही अधिक बोलले नसावेत.

# ३



कलकत्त्यापासून सिल्हेटपर्यंत मी आगगाडीनं प्रवास केला. प्रवासाचा शीण घालविण्यासाठी मी सिल्हेटला एका ब्राह्मकुटुंबाकडे मुक्काम केला. सिल्हेटहून मी गोहत्तीला गेलो. गोहत्तीहून चेरापुंजीला येऊन पोचलो. चेरापुंजीला बाबू नीलमणी चक्रवर्ती हे खासी लोकामध्ये ब्राह्मधर्माचा प्रचार करण्यासाठी येऊन राहिले होते. ते आजन्म ब्रह्मचारी होते आणि ब्राह्मधर्म प्रचारात त्यांनी एकंदर तीस वर्षं घालवलीं होतीं. नीलमणी बाबूंनी माझं योग्य ते आदरातिथ्य केलं आणि 'तू चेरापुंजीला राहून माझं कार्य पुढं चालू ठेवतोस काय?' असं मला त्यांनी विचारलं. लगेच मन्मथदाची मूर्ति माझ्या नजरेपुढं उभी राहिली. मी त्यांना चक्क 'नाही' म्हणून सांगितलं. नीलमणी बाबूंची एकंदर सुव्यवस्तु राहणी पाहूनच ते माझ्या मनातून उतरलं असावं. मी शिलाँगला कधी जाऊन पोचतो असं झालं. म्हणून त्याच दिवशीं मी शिलाँगला जाण्यासाठी निघालो. शिलाँगला जाऊन पोचलो, तेव्हा मला उतरून घ्यायला मन्मथदा आले होते. मी खाली उतरल्याबरोबर त्यांनी मला कडकडून घट्ट मिठी मारली. त्यांच्याबरोबर दुसरे काही ब्राह्म गृहस्थ आले होते. त्यांच्याशीं माझा परिचय करून दिल्यानंतर लबान (शिलाँगचा एक भाग) वर बांधलेल्या आपल्या आश्रमात मन्मथदा मला घेऊन गेले.

त्या आश्रमाला 'सेवाश्रम' असं नाव दिलं होतं; आणि आश्रम तरी किती बहारीचा आणि रम्य होता! तीन चार झोपडीवजा साधी सुटसुटीत घरं आणि त्यांच्यामागं एक बाग होता. त्या बागेत बटाट्यांची लागवड केला होती. मला मन्मथदांनीं घरात नेलं. दारातच भगव्या रंगाची शाल घेतलेली काळी सावळी पण ऊंच आणि किडकिडीत अशी एक हसतमुख बंगाली स्त्री उभी होती. मन्मथदांनी 'ही तुझी दिदी' अशी ओळख करून दिली. मी दिदीला नमस्कार केला. दिदींनीं उलट मला हसत हसत नमस्कार केला. तिचे डोळे शांत आणि गंभीर असे होते, पण त्यांत खेळकरपणाही होता. स्त्रीचं चांचल्य मला तिच्या ठिकाणीं दिसलं नाही. तिच्या

नजरेत प्रसाद काठोकाठ भरला होता. दिदीच्या पाठीमागेच एक सोळासतरा वर्षांची गोरटेली अशी मुलगी उभी होती. मला पाहिल्यावर ती सारखी हसतच सुटली. दिदीनं तिला गप्प करण्याचा प्रयत्न केला. शेवटी तिनं तोंडात पदर कोंबून पोबारा केला. गंभीर आणि शांत अशा आश्रमात ही खिदळणारी मुलगी आढळेल अशी मला कल्पनाही नव्हती. मी सचिंत मुद्रेनं दिदीकडे पाहिलं. माझ्या चेहेऱ्याकडे दिदीनं एकवेळ पाहिलं आणि खो खो हसायला सुरवात केली. प्रश्नार्थक मुद्रेनं मी मन्मथदाकडे पाहूं लागलो. पण त्यांनीं जेव्हा मोठमोठ्यानं हसायला सुरवात केली तेव्हा मी तर अगदींच भांबावून गेलो. मी कांहीच बोलत नाहीं असं पाहून त्यांनी हंसू आवरलं आणि आम्ही सर्वजण घरात गेलो. माजघरात गेल्याबरोबर तिथं ठेवलेल्या एका पाटावर बसायला मला दिदीनं सांगितलं. मी मुकाट्यानं पाटावर बसलो. तितक्यात त्या पळून गेलेल्या पोरीनं माझ्या पुढ्यात चहाचा कप ठेवला. लागोपाठ सहासात दिवस उपास करण्याच्या तयारीनं आलेला मी, माझ्यापुढं चहाचा पेला पाहून आश्चर्यानं थक्क झालो. ती तिथंही माझ्याकडे पाहून हसत होती. मला चहा म्हणजे जीव की प्राण. शिवाय इतका लांबचा प्रवास करून आलेला मी: गरम चहाचा मोह मला कसा आवरणार? तरी मी तो कष्टानं आवरला. मी चहाच्या पेल्याकडे तसाच पाहात राहिलो. मी चहा पीत नाही असं पाहून ती किंचित गंभीर झाली. इतक्यात दिदीनं मला चहा घ्यायला सांगितलं. मग मात्र माझा राग मला आवरेना. मन्मथदाकडे बघून मी म्हणालो, 'मला तुम्ही समजता तरी कोण? मी काय तुमच्या आश्रमात चैन करायला आलोय? ज्या तुमच्या आश्रमांत अनाथ मुलांना भाकरीसुद्धा वेळेवर मिळत नाही त्याच आश्रमात बसून मी चहा पिऊं? मी चहा पिणार नाही!' माझा हा आवेश पाहून ती बिचारी गांगरून गेली. तिचं तोंड अगदी उतरून आलं. मलासुद्धा बोलल्याबद्दल खूप वाईट वाटलं. तरीसुद्धा चहा न घेता मी बाहेर आलो व आजूबाजूला काय आहे त्याचं निरीक्षण करण्याचं ढोंग केलं. थोड्या वेळानं दिदी चहाचा कप हातात घेऊन बाहेर आली. ती म्हणाली, 'तुझा काही तरी गैरसमज झालेला दिसतो. तू अगोदर चहा घे. मग सर्व काही मी सांगते.' मी काही न बोलता तिच्या हातातून चहाचा कप घेतला आणि दोन-तीन घोटातच मी पिऊन टाकला. चहा घेतल्यावर मला थोडं बरं वाटूं लागलं आणि मनात आलेला राग नाहींसा झाला.

दिदीनं सांगायला सुरवात केली, 'हे पाहा, तुमच्या मन्मथदांनी हेमबाबूंना पत्र लिहिलं तेव्हा उलट टपालीं दादामहाशयांचं एक पत्र त्यांना आलं. त्यात त्यांनी लिहिलं होतं की तुमच्या आश्रमात माझ्या नातवाला पाठवीत आहे. तुमच्या आश्रमाची परिस्थिति मला माहीत आहे. त्याला तुम्ही एक वेळ जेवायला नाही दिलं तरी चालेल. पण दिवसातून निदान दोन-तीन वेळा तरी चहा द्यायला विसरू

नका दादामहाशयाचं असं पत्र आल्यानंतर आम्ही तुला प्रथम चहा दिला यात काय चूक आली ?'' इतकं बोलून दिदी रडूं लागली. मला तिचं रडणं असह्य झालं आणि दादामहाशयांनी हा लांडा कारभार केल्याबद्दल मी त्यांच्यावर खूप चरफडलो परंतु ते तेंव्हा कलकत्त्याला आणि मी होतो शिलाँगला. नुसतं चरफडण्यावाचून मी दुसरं काय करूं शकणार ? परंतु दिदीनं हा खुलासा केल्यानंतर सभोवतालचं वातावरण बरंच निवळलं आणि आम्ही खुल्या दिलानं एकमेकांशी बोलूं लागलो

शिलाँगच्या खुल्या बाजूच्या भागात उंच ठिकाणी हा सेवाश्रम बांधला होता हा सेवाश्रम म्हणजे एक अनाथाश्रम होता. आसाममधल्या 'खासी' नावाची जी एक मागासलेली जात आहे, त्या जातीतील मुलं आणि एक मुलगी या आश्रमात होती मी आश्रमात गेलो त्यावेळेस इंग्रजी सातवींत एक मुलगा होता. सहावींत दोन-तीन मुलं होती आणि बाकीच्या वर्गांत मात्र मुलांची संख्या बरीच मोठी होती याशिवाय त्यांना सुतारकाम, विणकाम, वगैरे धंद्यांचं शिक्षण देण्याची सोय केली होती. या आश्रमाला कोणत्याच धनिकाचा पाठिंबा नव्हता. आणि मन्मथबाबूंचं असं तत्त्व होतं की आश्रमासाठी कुणाकडेच देणगी मागायची नाही जे कुणी स्वेच्छेनं आश्रमाला देणगी देतील त्याच्यावरच सर्व गुजारा करायचा. मन्मथबाबूंच्या या विशिष्ट तत्त्वामुळे आश्रमातील लोकांना कधी भरपूर जेवायला मिळे तर कधी दोन-चार दिवससुद्धा उपास काढावा लागे. मी सहावी आणि सातवी या वर्गांतील मुलांना शिकवीत असे. त्या तीन चार मुलांना सर्व विषय शिकविण्यातच माझा बहुतेक वेळ निघून जाई. फावल्या वेळात मी माझं वाचन करीत असे या काळात काऊंट टॉलस्टॉय यांचे धार्मिक ग्रंथ आणि बायबल यांच्यावर मी मुख्य भर देत असे सुतारकाम शिकणाऱ्या एका मुलाकडून मी एक लाकडाचा क्रूस तयार करून घेतला होता आणि त्याला काळा रंग देऊन तो माझ्या टेबलाच्यावर भिंतीला खिळ्यांनी ठोकून टाकला होता

शिलाँग इथे ख्रिस्ती लोकांचं एक देऊळ होतं त्या देवळाच्या शेजारीच ख्रिस्ती धर्मोपदेशक रेव्हरंड मिस्टर स्टीव्हन आणि त्यांची पत्नी राहात असत. स्टीव्हन साहेबांचं वय सत्तर वर्षांचं होतं आणि त्यांची पत्नीही तितक्याच वयाची होती. त्यांना मुलंबाळं काही नव्हतं त्यांनी आपल्या वयाची चाळीस वर्षं शिलाँगमध्ये घालविली होती. खासी लोकांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्यासाठी ती दोघं आला होतो पूर्वी खासी लोकांची भाषा ही नुसती बोली होती वाङ्मय नव्हतं, त्यांची स्वतःची अशी लिपी नव्हती. ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी रोमन लिपीत सुलभ खासी वाङ्मय लिहिण्यास सुरवात केली. त्यांचंच अनुकरण करून ब्राह्मधर्म प्रचारकांनी त्या वाङ्मयात आणखी भर घातली. ख्रिस्ती किंवा ब्राह्मधर्माचा खासी लोकांसारख्या प्राथमिक अवस्थेत असणाऱ्या लोकांवर विशेष परिणाम झाला होता असं वाटत नाही. परंतु या दोन्ही

# रे. स्टीव्हन

धर्मानी खासी लोकात एक मोठी सामाजिक क्रांति घडवून आणली असं म्हटलं पाहिजे त्याच्या काही चालीरीति आणि धार्मिक समजुती अगदी रानटी स्वरूपाच्या होत्या. त्याचप्रमाणे त्याच्यामध्ये शिक्षणाचा प्रचारही मुळीच झाला नव्हता. हें शिक्षणप्रसाराचं कार्य ख्रिस्ती आणि ब्राह्म धर्मोपदेशकानी उत्तम तऱ्हेनं पार पाडलं. असं कार्य करणाऱ्यामध्ये रे. स्टीव्हन यांची प्रामुख्यानं गणना करावी लागेल.

ख्रिस्ती धर्मावर त्यांची–माझी रोज चर्चा होई. ते मला नेहमी म्हणत की 'ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्याशिवाय तुला खरा प्रकाश मळीच दिसणार नाही!' इतर धर्मासंबधान त्यांची दृष्टि विशेष कडवी नव्हती तरी फारशी सहानुभूतीचीही नव्हती. इतर धर्मग्रंथांचा त्यांनी अभ्यास केला होता असं मला वाटत नाही. वयानं जरी ते माझे आजोबा शोभण्यासारखे होते. तरी त्यांची वाद घालण्याची पद्धति मला त्यावेळी सुद्धा पोरकट वाटे. राजा राममोहन रॉय यांचे बायबलवरील अनेक लेख, त्याचप्रमाणे केशवचंद्र सेन व प्रतापचंद्र मुजुमदार यांची ख्रिस्तीधर्मावरील व्याख्यानं मी अगदी मन लावून वाचली होती. तसंच इंग्लंडमध्ये जो एकेश्वरी ख्रिस्तीपंथ उदयास आला होता, त्या पंथाचं वाङ्मयही मी वाचून काढलं होतं. विशेषतः आर्मस्ट्रॉंगचं 'God and the soul' आणि डॉ. जेम्स मार्टिनो यांचे 'Types of Ethical theory', 'The study of Religions', 'The seat of Authority in Religion' आणि त्यांची धर्मपर व्याख्यानं यांचा मी उत्तम अभ्यास केल्यामुळे स्टीव्हनसाहेबांचं माझ्यापुढे काही चालेना. येशू ख्रिस्त हा देवाचा पुत्र असं म्हणून त्यांनी आपला त्रिमूर्तीचा लाडका सिद्धांत मांडायला सुरवात केली की मी तावडतोब त्यांना अलेक्झांड्रियाच्या फायलोची आठवण करून देत असे. हा फायलो प्लेटोचा शिष्य होता. त्याच्या सिद्धांताच्या चौकटीत येशू ख्रिस्ताला बसवून त्रिमूर्तीचा सिद्धांत पूर्वीच्या ख्रिस्ती धर्माचार्यांनी तयार केला. त्याचप्रमाणे येशू ख्रिस्त हा देवाचा पुत्र नसून तो आमच्या तुमच्यासारखाच साधासुधा माणूस होता; आणि त्याची योग्यता व मोठेपणा असा वेगळं आणि कल्पनारम्य सिद्धांतावर अवलंबून नसून त्यानं दिलेल्या शिकवणीवर अवलंबून आहे, असं मी ठासून प्रतिपादन करीत असे. यावर स्टीव्हनसाहेबांना काही उत्तर सुचत नसे मग ते डोळे मिटून मला उद्देशून येशू ख्रिस्ताची प्रार्थना करूं लागत. एकदा तर त्यांनी आपल्या प्रार्थनेत मला उद्देशून 'चुकलेलं कोकरूं' हे शब्द वापरले. परंतु मला त्यांचा चीड न येता त्या म्हाताऱ्याच्या अंध विश्वासाबद्दल कीव वाटली. त्यांचं श्रद्धाळू अंतःकरण एखाद्या लहान मुलाप्रमाणे निर्मळ होतं आणि त्याचा मला पदोपदी अनुभव येई. मी जर ख्रिस्ती झालो तर या म्हाताऱ्याला किती आनंद होईल याचा विचार जेव्हा माझ्या मनात येई तेव्हा ख्रिस्ती धर्माच्या खुळ्या सिद्धांतावर माझा विश्वास बसत नाही याचं माझं मलाच वाईट वाटत असे

मी आल्यानंतर दोनचार दिवस आश्रमांत अन्नसामुग्री भरपूर होती. रोजचं जेवण अगदीं साधंच असे. डाळभाताबरोबर बटाट्याची किंवा दुसरी कसली भाजी असली कीं मेजवानी समजायची. जेवण इतकं साधं होतं, तरी काय असेल ते असो दिदीनं केलेली डाळ फार रुचकर लागायची. मी शिलॉंगला पोचलों संध्याकाळच्या वेळीं. त्या दिवशीं रात्रीं दिदी आणि मन्मथबाबू यांच्याबरोबर जेवतांना विशेष कांहीं घडलं नाहीं. परंतु दुसऱ्या दिवशीं मी जेवायला पाटावर बसलो आणि भात कालवायला सुरुवात करतांच त्या भातांत दडवून ठेवलेलीं दोन उकडलेलीं अंडीं मला सांपडलीं. मी दिदीकडे पाहिलं. दिदी हसत खालीं मान घालून जेवत होती. मन्मथबाबूंकडे मी पाहण्यापूर्वीच त्यांनी एका गंभीर विषयावरील चर्चेला सुरवात केली. माझ्या अंगाचा अगदी भडका उडाला. मन्मथबाबूंचं बोलणं चाललं होतं तोंपर्यंत मी हात आंखडून बसलों. शेवटी मी जेवत कां नाहीं हें दिदीनं भीत भीत विचारलं. मी तिला पहिल्यानं 'माझ्या पानांत अंडी कां वाढलीं?' म्हणून विचारलं. ती म्हणाली, 'हं, त्यांत काय आहे? आम्ही बहुतेक रोज अंडीं खातों.' 'मग तुझ्या आणि मन्मथदांच्या पानांवर का नाहीत?' म्हणून मी तिला दरडावून विचारलं. माझा प्रश्न ऐकून बिचारीच्या डोळ्याला पाणी आलं. मन्मथबाबू गप्प बसले होते. मी अधिक कांहीं न बोलतां तीं अंडीं न खातां जेवण संपवून तसाच उठलों. हात धुऊन बाहेरच्या खोलींत आलो. या दोन माणसांशीं आतां याउप्पर मुळींच बोलायचं नाहीं असं मी ठरवलं. पुस्तक काढून मी वाचण्याचा प्रयत्न केला. परंतु लक्ष लागेना म्हणून मुलं जेवत होतीं तिकडे त्यांच्यांत जाऊन बसलो. प्रत्येकाच्या पानावर डाळ, भात आणि बटाट्याची भाजी. कुणाच्याच पानावर अंडीं मला दिसलीं नाहींत. मुलांना जे कांहीं खायला द्यायचं तेंच आपण खायचं हाच त्या दोघांनीं निर्धार केला होता. मग त्यांनीं माझ्याविषयीं एवढा परकेपणा कां दाखवावा? जे मिळेल त्यात समाधान मानून राहायचं अशाच तयारीनं मी शिलँगला आलों. या अनाथ मुलांची सेवा करायची असा निश्चय मी केलेला. या आश्रमाविषयी जो आपलेपणा मी दाखविला, त्याचं हेंच बक्षीस का? दिदी आणि मन्मथदांवर मी खूप चिडलों. परंतु थोड्या वेळानं दिदी आली आणि तिनं माझी क्षमा मागितली. ती म्हणाली, 'या उप्पर मुलांना जे मी खायला देईन तेच मी तुला वाढीन. मी असा भेदभाव करणार नाही.' हे शब्द ऐकून मला बरं वाटलं आणि मी बराच शांत झालों. माझी दिदी खरोखर किती चागली होती! माझ्या खाण्यापिण्याचे हाल होऊं नयेत म्हणून आपल्यापरीनं ती पराकाष्ठा करी, परंतु त्याचा माझ्या मनावर उलट परिणाम झालेला पाहून तिनं हा पंक्तिभेद करायचं सोडून दिलं. माझा दोन वेळचा चहा नेहमींप्रमाणें चालू राहिला, कारण सर्वच मुलांना चहा देण्याची दिदीनं व्यवस्था केली होती.

## पहिला उपवास

दोन तीन दिवसांनतर घरांतील अन्नसामुग्री संपुष्टांत आली आणि माझ्यावर पहिला उपास करण्याची पाळी आली. मला त्याचं काहींच वाटलं नाहीं. बारा वाजल्यानंतर जेव्हां भूक लागूं लागली, तेव्हा मी, दिदी आणि बाकीचीं सर्व मुलं शेजारच्या जंगलात गेलों आणि झाडावर असलेलीं कसलींशीं लहान लहान फळं आम्हीं तोडून खाल्लीं. त्या फळाचं नांव मला आतां आठवत नाहीं. घरीं परत आल्यावर मी मुलाना शिकवीत बसलो. एकंदर वातावरण फारच आनंदी होतं आणि पहिल्या दिवशीं विशेष कांही घडल आहे असं मला तरी निदान वाटल नाहीं. दुसऱ्या दिवशीं पुन्हा उपास. आम्हीं पुन्हा जगलांत गेलो. पुन्हां तींच फळं तोडून खाल्लीं. तोही दिवस फार आनंदात गेला. तिसऱ्या दिवशीं मात्र मला भूकेनं फार व्याकुळ केल. जंगलांत जाण्याची किंवा मुलांना शिकवण्याची शक्ति माझ्या अंगांत राहिली नव्हती. रजई अंगावर घेऊन मी स्वस्थ पडून राहिलो होतों. दिदी मधून मधून मला पाहून जात असे. शेवटीं ती माझ्याजवळ येऊन बसली आणि मला म्हणाली, 'भाई, तूं कलकत्त्याला जा पाहूं. तुला हे असे हालांत दिवस काढायची संवय नाहीं हें मला दिसतंय. खासी मुलं वृत्तीनं फार कणखर असतात. त्यांना या उपासाचं कांहीं वाटत नाहीं आणि त्यांच्या सहवासात आम्हां दोघाना आतां ही संवय झाली आहे. पण तुला विनाकरण कष्ट कशाला? तुझी प्रकृति बिघडली तर दादामहाशय मला काय म्हणतील? तूं इथं राहावं असं मला किती तरी वाटत. तूं आल्यानंतर या आश्रमात नवीन उत्साह निर्माण झालाय. माझे आणि मुलाचे दिवस कसे आनंदांत जातात. पण तुला असे कष्ट देण्याचा आम्हांला मुळींच अधिकार नाहीं. म्हणून म्हणत्यें, तूं कलकत्त्याला परत जा!' बोलतां बोलता दिदीचा गळा दाटून आला आणि पदरानं डोळे पुसून ती निघून गेली. मला मात्र त्रास होतो हें पाहून मन्मथबाबूंनासुद्धां मनांतून खंत वाटे; परंतु ते माझ्या बाजूला फिरकलेसुद्धां नाहींत. त्या दिवशी संध्याकाळी मुलांनी बागेतले बटाटे खणून काढले. दिदीनं ते उकडले आणि सर्व मुलांना अगोदर दिले. नंतर माझ्यापुढें सोललेल्या बटाट्यांची बशी ठेवली. पण लगेच आठवल्यासारखं करून तिनं आपल्यासाठीं आणि मन्मथबाबूं-साठी बटाट्यानी भरलेल्या दोन बशा आणल्या. आम्ही तिघानीं एकत्र बसून ते बटाटे खाल्ले. ते किती गोड लागले! नुसत्या बटाट्यामध्यें इतका गोडपणा असेल अशी मला कल्पना नव्हती. बटाटे खाल्ल्यानंतर मला बरीच हुशारी वाटूं लागली आणि नेहमीं-प्रमाणे मी दिदीशीं खूप गप्पागोष्टी केल्या. दुसऱ्या दिवशी मी बराच उशीरा उठलो. उठल्याबरोबर पाहातो तर दिदी हातांत चहाचा कप घेऊन उभी! कदाचित् तिनंच मला उठवलं असावं, पण मला नक्की सांगतां येत नाहीं. तिच्या हातात चहाचा पेला! मी आश्चर्यानं थक्क झालो आणि तिच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनं पाहूं लागलो. दिदीनं हंसत हंसत खुलासा केला. त्या दिवशीं सकाळींच एका गृहस्थानं आश्रमाला देणगी दिली

होती. ताबडतोब मन्मथबाबूंनीं बाजारांत जाऊन चहा, साखर आणि इतर अन्नसामुग्री खरेदी केली. तो दिवस आमचा किती आनंदांत गेला म्हणून सांगूं! सर्व मुलांना चहा मिळाला इतकंच नव्हे, तर भरपूर अन्नही मिळालं.

* * *

एके दिवशीं मन्मथदांचं आणि दिदीचं कडाक्याचं भांडण झालं. त्यांचं बोलणं फक्त मला ऐकूं येत होतं, पण कारण समजलं नाहीं. थोड्या वेळानं तणतणत मन्मथबाबू बाहेर आले आणि माझ्याकडे न पाहातां निघून गेले. माझ्या मनाला एक मोटा धक्का बसला. मन्मथदा आणि दिदी एकमेकांवर रागावूं शकतात, ही गोष्ट मला कुणी सांगितली असती तरी खरी वाटली नसती. परंतु मी स्वतः त्या दोघांचे रागाचे शब्द ऐकले. म्हणूनच एकदम मला धक्का बसला. खासी लोकां-सारख्या रानटी लोकाकरिता जिवाचं रान करणारीं ही दोघं, याना एकमेकांवर रागावण्याचं काय कारण? खचित कुठं कांहींतरी चुकतं आहे, असं मला वाटूं लागलं. येशू खिस्त कधीं कुणावर रागवला नव्हता. इतकच नव्हे तर त्यानं स्पष्टपणे सांगितलं होतं, कीं ईश्वराची खरोखर जर मनापासून पूजा करायची असेल तर आपण आपला राग घालवला पाहिजे. कोणत्याही माणसाविषयीं द्वेष वाटत असेल तर ईश्वराची पूजा सार्थकीं लागणार नाहीं, असं त्यानं बजावलं होतं. असं असतांना मन्मथबाबू खुद्द आपल्या धर्मपत्नीवर रागावूं शकतात याचं मला वाईट वाटलं. मन्मथबाबूंची चीडसुद्धां मला आली. दिदीचाही मला राग आला. थोड्या वेळानं दिदी रडत माझ्या-कडे आली. परतु मी तिच्या रडण्याकडे लक्ष दिलं नाहीं. मी माझं मन अगदीं घट्ट केलं होतं. थोड्या वेळानं मी तिला म्हणालो, 'दिदी, आज पहिल्या प्रथम मला तुझ्याबद्दल लाज वाटते. मन्थदाबद्दलसुद्धा मला लाज वाटते. तुम्हां दोघांना मी माझे आदर्श समजतों आणि तुम्ही अशा रीतीनं एकमेकांशीं भांडायला लागलांत तर आश्रमांतल्या मुलावर त्याचा काय परिणाम होईल याची तुम्हाला कल्पना आहे का? भुकेनं माझे प्राण कासावीस झाले, त्यावेळीं कलकत्त्याला जाण्याविषयींची मला कल्पनाही सुचली नाहीं. पण तुमचं आजचं वर्तन पाहून मला असं वाटूं लागलं आहे कीं आजच्या आज कलकत्त्याला निघून जावं. मी कितीतरी आशा बाळगून इथं आलो. परंतु तुम्ही दोघानीं आज माझी निराशा केलीत!' माझे हे उद्गार ऐकून दिदी ढसढसां रडली. मी आणखी काही न बोलतां स्वस्थ बसून राहिलो. थोड्या वेळानं शांत झाल्यावर दिदी म्हणाली, 'तुमच्या मन्मथदांचा स्वभाव फार तापट आहे, त्याला मी काय करूं? क्षुल्लक कारणावरूनसुद्धां ते रागावतात. आणि मी उत्तर दिल तर भांडण वाढतं.' 'मग तूं कशाला उत्तर देतेस?' मी म्हणालो, 'तुमचं

हें भांडण जर मुलांच्या कानांवर गेलं तर त्याचा भलताच परिणाम व्हायचा.' दिदी कांहीं न बोलतां निघून गेली.

दुसरे दिवशीं सकाळीं मन्मथदा मला उठवायला आले. मला म्हणाले, 'दिदी अजून उठली नाहीं. तिला काय होतंय का पाहा बरं.' मी तसाच दिदीच्या खोलींत गेलों. तिला थोडासा ताप आला होता म्हणून ती तशीच पडून राहिली होती. त्या खासी मुलीनं चहा तयार करून ठेवला होता. तिनं दोन कप भरून आणले. दिदी उठून बसली आणि चहा पिऊं लागली. चहा पितांना मी तिला हळूच विचारलं, 'मन्मथदांचं आणि तुझं पुन्हां भांडण झालं वाटतं रात्रीं?' ती म्हणाली, 'छी, छी, एकसारखं भांडायला मी भांडकुदळ आहे वाटतं! कांहीं झालं नाहीं.' त्या दिवशीं सारा वेळ ती माझ्या खोलींतच बसून होती. त्या दिवशींचं जेवण खासी मुलीनंच केलं. जेवायची वेळ झाली. दिदीला जेवायचं नसल्यामुळें आमचीं दोघांचींच पानं मांडलीं होतीं. मी पानावर जाऊन बसलों. दिदी माझ्या शेजारीं बसून वारा घालूं लागली. मन्मथदांचा चेहेरा किंचित् खिन्न, किंचित् रागीट दिसत होता. एकंदर प्रकारावरून त्या दोघांनीं अबोला धरला होता असं मला दिसून आलं. मी एकदम दिदीकडे वळलों आणि म्हणालों, 'दिदी, तूं हा काय चावटपणा आरंभला आहेस? ठेव तो पंखा खालीं आणि तुला जेवायचं नसेल तर बाहेर जाऊन कांहीं तरी वाचीत बैस. तूं अगदीं अलीकडे अस्सल सनातनी स्त्रीप्रमाणें वागूं लागली आहेस. इतकी शिकली सवरलेली तूं, ब्राह्मसमाजांत तुझा जन्म गेलेला. तरी पण तुझ्यांतला जुनाटपणा अजून गेलेला नाही!' माझे शब्द ऐकून मन्मथबाबू 'हा हा' करून मोठ्यानं हसले. त्याना कसलं हसूं आलं तें मला कांहीं कळलं नाही. कारण मी विनोदानं बोलत नव्हतों. रागानं बोलत होतों. माझ्या बोलण्याचा परिणाम इतकाच झाला कीं तीं दोघं एकमेकाशी बोलूं लागलीं.

या अनाथाश्रमाला सर्वस्वीं वाहून घेतल्यामुळें मन्मथदांची आध्यात्मिक उन्नति काय झाली असेल ती असो; परंतु चेहेऱ्यावरून मला ते संत्रस्त दिसत. ब्राह्मधर्मावर त्याची निष्ठा होती. इतकंच नव्हे तर आपण स्वीकारलेला सेवामार्ग हाच उत्तम मार्ग आहे असं त्याना मनापासून वाटे. ते कांहीं फार मोठे विद्वान् होते असं नाही. त्याची ईश्वरोपासनासुद्धां एका तासांत आटपे. कलकत्त्याला साधारण ब्राह्मसमाजांत होणाऱ्या साप्ताहिक उपासनाना जे कुणी उभे राहिले असतील त्यांनाच या माझ्या वाक्याचं खरं मर्म कळून चुकेल. ईश्वरोपासना किती व कशी लांबवायची याबाबतच ब्राह्मसमाजांतील पुढाऱ्यांमध्ये एक प्रकारची अहमहमिका चालत असे. डॉ. पी. के. आचारजी यांची उपासना तर तीन तासांपेक्षां अधिक लांबे. त्यांचा वैद्यकीय धंदा चांगला चालत असल्यामुळें त्यांना खूप पैसे मिळाले होते, आणि त्यांनीं

कलकत्त्याला मोठमोठीं घरंही बांधलीं होतीं. आध्यात्मिक मार्गांत त्यांची बरीच प्रगति झाली आहे म्हणून त्यांची उपासना लांबते, असं मला त्यावेळीं सांगण्यांत येई; पण मला तें खरं वाटत नसे. एका श्रीमंत मनुष्याला येशू खिस्ताचा अनुयायी होण्याची इच्छा झाली, तेव्हां येशूनं त्याला स्पष्ट सांगितलं, 'Sell all thou hast and follow me.' त्या माणसाला आपल्या संपत्तीचा लोभ सुटला नाहीं आणि तो तसाच परत गेला. तेव्हां आपल्या शिष्यांकडे वळून येशू म्हणाला, 'It is easier for a camel to enter the eye of a needle than for a rich man to enter the kingdom of heaven.

डॉ. आचारजी श्रीमंत होते. आणि त्यांची श्रीमंती त्यांच्या आध्यात्मिकतेच्या आड आली नसेल याची मला खात्री पटेना. म्हणूनच त्यांनीं डोळे मिटून आपली लांबलचक आराधना सुरू केली कीं मी मंदिराच्या बाहेर येऊन बागेमध्यें एका बांकावर स्वस्थ बसत असें. डॉ. आचारजींपेक्षां मन्मथदांचं जीवन अधिक आकर्षक वाटलं त्याचं कारण हेंच. मन्मथदा खरोखर सुखवस्तु घराण्यांत वाढलेले. परंतु आपलं घरदार सोडून या अनाथ खासी मुलांचं संरक्षण करण्यासाठी त्यांनीं दारिद्र्यात दिवस कंठण्याचा निश्चय केला. इतकंच नव्हे तर आपल्या आश्रमासाठीं दुसऱ्याकडे कधीं तोंड वेंगाडायचं नाहीं, ईश्वरी प्रेरणेनं जो कुणी आपणहून आश्रमाला देणगी देईल ती स्वीकारायची, अशी त्यांनी डॉ. बर्नार्डप्रमाणें प्रतिज्ञा कली होती. असला हा स्वार्थत्याग, ही उदात्त लोकसेवा, हेंच ब्राह्मधर्माचं खरं उज्ज्वल स्वरूप आहे आणि त्या उज्ज्वल स्वरूपाची डॉ. आचारजींना कल्पना नव्हती, म्हणून त्यांची कींव करावीशी मला वाटे. दादामहाशयांच्या उपासनासुद्धां फार लांबत नसत म्हणून दादामहाशय आणि मन्मथदा हीं एकाच खाणींतून निघालेलीं दोन रत्नं आहेत आणि त्यांच्याच आशीर्वादानं व कृपेनं आध्यात्मिक मार्गांत मला प्रगति करून घेतां येईल, अशी खुणगांठ मी मनाशीं बांधली.

मग मन्मथदा असे संत्रस्त आणि कावलेले कां? ते एकादे वेळीं आनंदी दिसले तरी त्यांच्या आनंदी चेहेऱ्यावर कसली तरी दुःखाची झाक मारी. आध्यात्मिक मार्ग हा अत्यंत सुखाचा आणि आनंदाचा मार्ग, मग असं कुठलं दुःख मन्मथदांना होत होतं? माझं मन जरा साशंक होऊं लागलं. खूप विचार केला पण मला या प्रश्नाचं उत्तर मिळेना. शेवटीं मन्मथदांना विचारायचं ठरवलं. एके दिवशीं मन्मथदा बरेच आनंदांत दिसले. ते माझ्या खोलींत आले आणि आम्ही दोघांनीं बऱ्याच गप्पा मारल्या. बोलतांबोलतां मी सहज त्यांना म्हटलं, 'मला इतके दिवस झाले इथं येऊन मन्मथदा, परंतु तुम्ही आतांपर्यंत स्वतःविषयीं कांहींसुद्धां सांगितलं नाहीं. विशेषतः तुमचं आणि दिदीचं लग्न कसं झालं तें ऐकण्याची मला फार

उत्सुकता आहे.' 'पुढं सागेन केव्हां तरी.' असं म्हणून मन्मथदांनीं तो विषय उडवून लावण्याचा प्रयत्न केला, पण मी त्यांचा पिच्छाच पुरवला तेव्हां त्यांनीं मला आपल्या विवाहाची त्रोटक हकीगत सांगितली.

ते म्हणाले, 'माझ्या अंतःकरणांत धार्मिक भावना केव्हा आणि कशी उत्पन्न झाली तें मला सागता येत नाहीं; परंतु सर्वसंगपरित्याग करून संन्यस्त वृत्तीनं राहायचं मीं ठरवलं. ब्राह्मसमाजाचीं तत्त्वं मला पटलीं आणि ब्राह्मधर्माची मी दीक्षा घेतली. आमच्या घरीं सनातनी वातावरण असल्यामुळे माझं करणं कुणालाच आवडलं नाहीं. मी घर सोडून निघालो आणि कलकत्त्याला साधनाश्रमांत जाऊन राहिलो. तिथं राहिल्यानंतर मला तिथलं जीवन रुक्ष आणि कंटाळवाण वाटूं लागलं. अभ्यास, मनन आणि चिंतन करायचं हें ठीक आहे, परंतु धर्मसाधन प्रत्यक्ष कृतींत उतरलं पाहिजे. चेरापुंजीला बाबू नीलमणी चक्रवर्ती हे खासी लोकात काम करीत होते. त्यांच्याकडे गेलों, पण मला त्यांची कार्यपद्धति मुळींच आवडली नाहीं, म्हणून मी इथं आलो आणि अनाथ खासी मुलांसाठीं हा अनाथाश्रम स्थापन केला. आतां तुला माझ्या लग्नाची गंमत सांगतो. तुझी आणि अमरचंद्र भट्टाचार्यजी यांची ओळख झाली आहे. अमरबाबू सरकारी नोकरीत असले तरी त्यांची किती साधुवृत्ति आहे हें तुला माहीतच आहे. त्यांची बायको आणि तुझी दिदी या बहिणी बहिणी. एकदा तुझी दिदी आपल्या बहिणीला भेटायला शिलॉंगला आली. ती परत घरीं जायला निघाली तेव्हां अमरबाबूंनीं मला तिला पोचवायला सागितलं. प्रवास रात्रीच्या गाडीनं करायचा होता. आमच्या डब्यांत आम्हा दोघांशिवाय दुसरं कुणीच नव्हतं. मी तिला एका बाकावर अंथरून दिलं आणि मी समोरच्या बाकावर झोपलो. मला इतकी गाढ झोप लागली कीं सूर्य उगवल्यावर मी जागा झालों. तुझ्या दिदीला सुखरूप घरीं पोचवलं आणि शिलॉंगला परत आलो. काहीं दिवसांनीं तिनं माझ्याशीं लग्न करण्याचा निश्चय आपल्या बहिणीला कळविला. माझी सर्व परिस्थिति तिला ठावूक होती. झालं, आमचं लग्न झालं; परंतु तुला एक गोष्ट माहीत नाहीं की आम्ही लोकांच्या दृष्टीनं जरी पतीपत्नी असलों तरी खरोखर एकमेकांशी तसा कांहींच संबंध नाहीं!' इतकं बोलून मन्मथदा निघून गेले. मला कांहीतरी चुकत आहे असं वाटत होतं. परंतु काय चुकतंय तें मला सांगता येत नव्हतं. ही हकीगत ऐकल्यानंतर मला सर्व गोष्टींचा उलगडा झाला असं वाटलं. मन्मथदा आणि दिदी यांचीं भांडणं कां होतात याची अंधुकशी कल्पना आली, पण स्पष्टपणें कांहींच कळेना.

अमरबाबू कचेरींतून घरीं आले कीं तडक माझ्याकडे येत असत हें मी सागायला विसरलों. माझ्याकडे आले कीं ते तासन् तास बोलत बसत. मी त्यांच्यापेक्षा वयानं कितीतरी लहान पण माझ्याशीं बोलतांना ते माझ्याबद्दल एक

प्रकारचा आदर दाखवीत. त्यावेळीं मी अगदी गोंधळून जात असें. त्यांच्या बोलण्यावरून त्यांचं सांसारिक जीवन फारसं सुखी नसावं असं मला वाटे. त्याच प्रमाणें या संसारांतून मुक्त होऊन आणि नोकरीचा राजीनामा देऊन आजन्म ब्राह्मधर्माची सेवा करण्याचं माझ्या मनांत येतं, असं ते मला बोलून दाखवीत. त्यांचा स्वभाव अगदीं साधासुधा; खरोखरच त्यांचं लक्ष संसाराकडे नव्हतं ही गोष्ट त्यांनीं बऱ्याच वर्षांनी सिद्ध केली. दहा वर्षांनंतर मी जेव्हां जपानला जायला निघालों त्यावेळीं अमरबाबू मला साधनाश्रमांत भेटले. शेवटीं त्यांनी आपलं म्हणणं खरं केलं.

सेवाश्रमांत तीस चाळीस खासी मुलं होतीं. इंग्रजींतून जेवढे विषय शिकवितां येतील, तेवढे सर्व विषय मी वरच्या वर्गांतील मुलांना शिकवीत असें. एक दोन विद्यार्थी बरेच हुषार होते, पण बाकीचे सर्व विद्यार्थी सामान्य बुद्धीचे होते. त्यांना अभ्यास करण्याची मात्र दांडगी इच्छा होती. रानटी परिस्थितींत वाढल्यामुळें त्यांच्या बुद्धीचा जसा विकास व्हायला पाहिजे होता, तसा तो मुळींच झाला नाहीं. त्या जातीची आर्थिक परिस्थितीसुद्धा असमाधानकारक. जंगलांत लाकडं गोळा करून किंवा असेच बारीकसारीक धंदे करून खासी लोक उदरनिर्वाह करीत. अर्थात् कोणत्याही प्रकारचं शिक्षण त्यांना मिळणं जवळ जवळ अशक्य होतं. खिस्ती लोकांनीं आणि ब्राह्म समाजानं आपलीं प्रचारकेंद्रं आसामच्या त्या भागांत उघडलीं, तेव्हांच उच्च संस्कृतीशीं त्यांचा संबंध आला. हे खासी लोक मूळचे हिंदुस्थानांतील नसावे असा माझा समज आहे. चपटं नाक, बारीक डोळे, जरा जाड ओठ यामुळें ते मंगोलियन वंशांतून आले असावेत असं दिसतं. अत्यंत रानटी स्थितींत असल्यामुळें उच्चतर संस्कृतीच्या लोकांनीं त्यांचं नेहमींप्रमाणें निर्मूलन करण्याचा प्रयत्न केला असावा. सध्यां जे लोक आसामांत आहेत त्यांची संख्या मोठी नाहीं. मी आसामांत होतों त्यावेळीं एक खासी मुलगा सेवाश्रमांतूनच प्रवेश परीक्षेला बसला आणि चांगल्या रीतीनं पास झाला. तो धर्मानं खिस्ती होता, तरीसुद्धां मन्मथदांनीं त्याला आपल्या आश्रमांत ठेवून घेतलं होतं. या बाबतींत मन्मथदांची दृष्टि ब्राह्मसमाजापेक्षां अधिक व्यापक होती.

शिक्षण घेतलेल्या कांही खासी लोकांना खिस्ती प्रचारकांनीं चांगल्या नोकऱ्या मिळवून दिल्या, परंतु एकंदर खासी समाज मात्र अज्ञान अवस्थेतच राहिला. त्यांच्या धार्मिक चालीरीती वेडगळ होत्याच, पण कांहीं भयंकर होत्या. एका विशिष्ट दिवशीं ते नरहत्या करीत असत. मला तो दिवस कोणता हें आतां आठवत नाहीं. परंतु त्याची जाणीव मला सातव्या वर्गांतल्या एका खासी मुलानें करून दिली. तो म्हणाला, 'बाबूजी, पुढील दोन तीन महिने रात्रीं कुठं फिरायला जाऊं नका. यदाकदाचित् गेलांत आणि आमच्या लोकांनीं तुम्हांला पकडलं तर तुम्हीं

बेलाशक बंगालीमध्यें बोला. आमचे लोक बंगाली वगैरे परकी जातींना हात लावीत नाहींत!' हे त्याचे उद्गार ऐकून माझ्या अंगावर शहारे आले. मला स्वतःविषयीं भीति वाटली असा त्याचा अर्थ नव्हे, परंतु माणूस इतक्या रानटी अवस्थेत राहूं शकतो आणि हिंस्र श्वापदाप्रमाणें वागूं शकतो याचीच मला भीति वाटली. कुठें येशू ख्रिस्ताची उदात्त शिकवण आणि कुठें हें रानटी लोकांचं नरमांस भक्षण! साधारण लोकांच्या दृष्टीनं येशू ख्रिस्त देव ठरला यांत मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. तसा विचार केला तर येशू ख्रिस्ताच्या वेळचे त्याच्याच जातीचे यहुदी लोक हे सुद्धां रानटीच नव्हते का? येशू ख्रिस्तानें त्यांचं असं काय घोडं मारलं होतं कीं त्यांनीं त्याला सुळावर देण्यासाठीं रोमन गव्हर्नर पॉंटिअस पायलेटच्या हवालीं करावा? यहुदी लोकांच्या देशावर त्यावेळीं रोमन लोक राज्य करीत होते. यहुदी लोक इतके धर्मनिष्ठ, इतके पापभीरू, प्रत्येक धार्मिक वृत्तीचं पालन करणारे, ईश्वराचे आवडते म्हणून समजले जाणारे, परंतु त्यांना कांहीं रोमन सत्तेला उलथून पाडतां आलं नाहीं. इजिप्शियन राजाच्या दास्यांतून त्यांना मोझेसनं मुक्त केलं असा इतिहास आहे, परंतु ते आपलं स्वातंत्र्य टिकवूं शकले नाहींत. कांहीं कालानं ते पुन्हां रोमन बादशहाच्या दास्यांत अडकून पडले. रोमन सत्तेविरुद्ध उघड बंड करण्याचं त्यांच्यांत सामर्थ्य नव्हतं. गुप्त असे दहशतवादी गट ठिकठिकाणीं स्थापन झाले होते, परंतु त्यांची चळवळ निष्फळ ठरली. राजकीय पारतंत्र्यातून आपली मुक्तता होत नाहीं, असं पाहून बरेच यहुदी अंतर्मुख बनले. त्यांचा आध्यात्मिक मार्गाकडे अधिकाधिक कल झुकूं लागला आणि त्यांनीं आपल्या मनाची अशी समजूत करून घेतली कीं आपलं राजकीय पारतंत्र्य नष्ट करण्यासाठी रोमन सत्तेचा विध्वंस करून ईश्वराचं राज्य जगावर प्रस्थापित करण्यासाठी 'जेहुवा' आपला एक खास प्रेषित पाठविल्याशिवाय राहाणार नाहीं. या प्रेषिताची वाट पाहाण्यांत त्यांना एक प्रकारचं आध्यात्मिक सुख लाभूं लागलं. शेवटीं त्यांच्यांत एक प्रेषित निर्माण झाला, पण तो एका सुताराच्या मुलाच्या रूपानं; त्याचंच नांव येशू ख्रिस्त.

आपल्या वयाला तीस वर्षे होईपर्यंत बापाच्या दुकानावर त्यानं सुताराचंच काम केलं. त्यानंतर त्यानं सुताराचं काम सोडलं आणि एका नव्या संदेशाचा प्रचार करण्याचं कार्य हातांत घेतलं. त्याचा उपदेश ऐकून लोक त्याला हसूं लागले. 'अरे, हा तर जोसेफ सुताराचा मुलगा. हा आम्हांला काय उपदेश करणार?' यहुदी लोकांचे अधिकृत धर्मप्रचारक तर त्याची उघड उघड टिंगल करूं लागले. परंतु त्याच्या प्रचारांत एक प्रकारची कळकळ, एक प्रकारची नवी दृष्टि स्पष्ट दिसून येत होती. त्यानं निराश झालेल्या लोकांना आशेचा मार्ग दाखविला, निरुत्साही लोकांचीं अंतःकरणं त्यानं एका नवीन उत्साहानं भरून टाकलीं, अंधारांत चाचपड-

णाऱ्या लोकांना त्यानं नवीन प्रकाश दिला. यहुदी समाजांतील सुखवस्तु, स्वसंतुष्ट, स्वयंमन्य आणि स्वतःच्या धार्मिकतेचा टेंभा मिरवणाऱ्या लोकांवर जरी त्याच्या प्रचाराचा मुळींच परिणाम झाला नाहीं, तरी त्या वर्गातील मागासलेले लोक त्याच्या प्रचारानं आकर्षिले गेले. मासे मारणारे कोळी, कर वसूल करणारे सामान्य अधिकारी, दारूच्या दुकानावरील कलाल आणि आपल्या देहाचा विक्रय करणाऱ्या स्त्रिया, हे आणि दारिद्र्यांत गांजलेले, अनेक रोगानं पीडलेले, हे सर्व त्याच्या भोवतीं गोळा होऊं लागले. त्याच्या बारा पट्टशिष्यांपैकीं एक कोळी होता, एक कर वसूल करणारा होता, एक कलाल होता आणि शिष्यिणींपैकीं कांहीं वेश्याव्यवसाय करणाऱ्या स्त्रिया होत्या. त्याच्या सभोंवतालच्या हा जमाव पाहून यहुदी धर्माधिकारी त्याला अधिक हिणवूं लागले. ' हा दारुड्या आहे, खादाड आहे, हा पापी लोकांच्या संगतींत नेहमीं राहाणारा. ' असा त्याच्या विरुद्ध ते प्रचार करूं लागले. ते प्रेषिताची वाट पाहात होते खरे, पण ते वाट पाहात असलेल्या प्रेषिताचं एकही चिन्ह त्यांना येशूमध्यें दिसलं नाहीं. त्यांना वाटे कीं ईश्वराकडून येणारा प्रेषित प्रचंड मोठं सैन्य घेऊन येणार, रोमन सैन्याचा रणांगणावर पराभव करून त्यांना घालवून देणार आणि आपल्या देशांत ईश्वराच्या नांवानं सुखाचं आणि समाधानाचं राज्य प्रस्थापित करणार. परंतु हा येशू ख्रिस्त दारिद्र्यांत वाढलेला, याच्या जवळ एकही शस्त्र नाही, मग सैन्य कुठलं ? आणि त्याचा उपदेश तर किती विलक्षण ! म्हणे, ' ईश्वराचं राज्य हे गरिबांचं राज्य, शुद्ध अंतःकरणाच्या लोकांचं राज्य आहे, विनयवृत्तीच्या लोकांचं राज्य आहे. आणखीही वर आम्हांला सागतो की ईश्वराचं राज्य हें तुम्ही आपल्या अंतःकरणांत शोधा. असलं राज्य काय चाटायचं आहे ? आम्हांला खरखुरं राज्य पाहिजे. रोमन लोकांनी आमची जी पिळवणूक चालवली आहे ती एकदम बंद झाली पाहिजे. '

आणि तसं पाहिलं तर त्यावेळचे रोमन शिपाई यहुदी लोकांना अतिशय निर्दयतेनं वागवीत कर वसूल करतांना तर त्यांचा यहुदी लोकाना फार जाच होत असे. पण इतर वेळी सुद्धां कुणीही यहुदी रस्त्यांत भेटला कीं त्याला फुकट हमाली करायला लावीत. आपल्या खांद्यावरील ओझं त्यांच्या डोक्यावर देऊन त्यांना एकेक मैल आपल्याबरोबर चालायला लावीत. मानी यहुदी लोकांना या अपमानाची चीड येत असे आणि ते मनांतून खूप जळफळत. परंतु आकाशांतून उतरणाऱ्या प्रेषिताची वाट पाहाण्याखेरीज त्यांच्या हातून कांहींच झालं नाहीं. अशा मनस्थितींत हे असतांना येशू ख्रिस्त लोकाना उपदेश करूं लागला, ' If any man compels thee to go one mile go with him twain; If any man wants to have thy coat let him have thy cloak also. ' हे येशूचे उद्गार ऐकून अवमानीत झालेल्या यहुदी लोकांचा जळफळाट झाला तर नवल काय ? फुकट

हमाली करण्याकरितां रोमन शिपायाबरोबर उन्हातान्हांत मैलभर जावं लागतं आणि हा येशू सांगतो, 'तूं स्वखुषीनं त्याच्याबरोबर दोन मैल जा.–' ही कसली शिकवण आणि हा कसला प्रेषित ! वाईटाचा प्रतिकार करायचा नाहीं, कुणी उजवा गाल रंगवला तर त्याच्यापुढं डावा गाल करायचा. आपल्या कट्टर शत्रूंनासुद्धां हा प्रेमानं वागवा असं सांगतो. मग जिवंत राहून तरी काय करायचं ?' अशी यहुदी लोकांची विचारसरणी होती. उलटपक्षीं येशू त्यांच्या प्रत्येक धार्मिक विधीचंसुद्धां उल्लंघन करीत असे. सॅबाथ हा त्यांच्या उपासाचा दिवस, तो दिवस प्रार्थना करण्यांत घालवायचा. परंतु त्या दिवशीं येशूचे सर्व शिष्य भूक लागली कीं खुशाल शेतांतील कणसं तोडून खात. येशूला एकानं या बाबतीत जाब विचारला; त्यानं स्पष्ट सांगितलं, 'सॅबाथ हा माणसासाठीं आहे, माणूस सॅबाथसाठीं नाहीं.' त्याचप्रमाणें तो यहुदी धर्माधिकाऱ्यांचा दांभिकपणा चव्हाट्यावर मांडूं लागला. त्याच्या दृष्टीनं दांभिकपणा हेंच मोठं पाप. दुसऱ्या पापाचं परिमार्जन होईल परंतु या पापाचं परिमार्जन केव्हांही होणार नाहीं असं त्याला वाटे. यहुदी धर्माधिकारी, आपण उपास केला आहे हें लोकांना दिसावं म्हणून सुतक्यासारखा लांब चेहरा करून व भर रस्त्यावर लोकांना दिसेल अशा ठिकाणी उभं राहून मोठ्यानं गळा काढून लंब्या चवड्या प्रार्थना करीत. याच्या उलट येशूनं आपल्या शिष्याना सागितलं कीं, तुम्ही उपास केलात की तुमचा चेहरा हंसतमुख आणि टवटवीत ठेवा. देवाची प्रार्थना कराल त्यावेळीं तुम्ही कुणाला दिसणार नाही अशी करा. तसंच तुम्ही लाबलचक प्रार्थना करूं नका. येशूनं आपल्या शिष्याना दिलेली प्रार्थनासुद्धा अगदी साधी सुटसुटीत, चार पाच वाक्यांत संपणारी अशी आहे. थोडक्यांत सागायचं म्हणजे प्रचलित धर्माची कृत्रिमता, त्याचा निर्जीवपणा, तो धर्म पाळणाऱ्याच्या अंतःकरणाची अशुद्धता, धर्माच्या बाह्यांगाचं ढोंगी प्रदर्शन करण्याची त्याची क्षुद्रवृत्ति, या सर्वांवर येशूनं केलेले वाक्प्रहार नव्या करारांत सापडतात. शेवटीं यहुदी धर्माधिकारी येशूवर इतके खवळले कीं त्यानीं त्याची चौकशी करण्यासाठीं त्याला रोमन गव्हर्नर पायलेट याच्या स्वाधीन केलं. पायलेटनं त्याला दोषी ठरविलं आणि त्याला क्रूसावर चढवून, त्याच्या हातापायाला खिळे ठोकून त्याचा जीव घेतला.

येशू ख्रिस्ताच हे त्रोटक चरित्र मी त्या खासी मुलाला सांगितलं. त्याच्या कोवळ्या मनावर फार परिणाम झाला. त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले आणि तो म्हणाला कीं 'आमच्या जातींतील सर्व दुष्ट चालीरीती बंद केल्याशिवाय मी राहाणार नाहीं. या महात्म्याचं उदात्त चरित्र मी ऐकलं आणि माझी मलाच आमच्या रानटीपणाची लाज वाटूं लागली. माझा शिक्षणक्रम संपल्यानंतर मी नोकरी करण्याच्या

भरीस पडणार नाहीं. मी माझं सर्व आयुष्य आमचा समाज सुधारण्याकरितां खर्ची घालणार आहे.'

येशूच्या जीवनाचा त्या मुलाच्या मनावर इतका विलक्षण परिणाम झाल्याचं पाहून माझं मलाच आश्चर्य वाटलं. परंतु आश्चर्य वाटण्यासारखं त्यांत काय होतं? येशूचीं जीं चार चरित्रं नव्या करारांत आढळतात त्यामध्यें अंधश्रद्धा, चमत्कार आणि जादूटोणा यांचंच प्रमाण अधिक असल्यामुळे येशूचं खरं मानवी चरित्र लोकांच्या सहसा डोळयांत भरत नाहीं. त्याचं मानवी चरित्र खरोखर उदात्त आहे. त्या चरित्राला या अवांतर गोष्टींची जोड देण्याचं खरोखरच कारण नव्हतं. येशू हा देवाचा पुत्र आहे आणि तो वाटेल ते चमत्कार करूं शकतो, आंधळयाला डोळस करतो, मेलेल्या माणसाला जिवंत करतो, तो पाण्याच्या पृष्ठभागावरून खुशाल चालत जातो, साध्या पाण्याची तो उत्कृष्ट दारू बनवूं शकतो; या गोष्टी अंधश्रद्धायुक्त भाविक अंतःकरणाला जरी प्रिय वाटल्या तरी त्यामुळें येशूच्या जीवनांतलं खरं रहस्य मुळींच ध्यानांत येत नाही हीच गोष्ट खरी. खिस्ती प्रचारकाचा प्रचार सुशिक्षित आणि सुसंस्कृत हिंदी मनावर मुळींच होत नाहीं यांतील रहस्यसुद्धां हेंच.

एके दिवशीं मन्मथदा आणि दिदी खूप भांडलीं. इतकं कडाक्याचं भांडण पूर्वी कधीं झालं नसेल असं मला वाटतं. दिदी माहेरीं जायला निघाली, कीं मन्मथदा घर सोडून निघाले हें मला आतां नक्की आठवत नाही. परंतु दोघांपैकीं कुणीतरी एक घर सोडून निघाले होते खास. शेवटीं रागारागानें मन्मथदा बाहेर निघून गेले आणि दिदी एकटीच धुमसत बसली होती. तिचा राग पूर्ण ओसरला नसल्यामुळें मी तिला काहींच विचारलं नाहीं. माझ्या खोलींत मी स्वस्थ वाचीत बसलों. थोड्या वेळानं दिदी शांत झाली आणि मला म्हणाली, 'भाई, तुला आमच्या भांडणाचा कंटाळा आला असेल नाहीं? पण मी तरी काय करूं! ते कांहीतरी बोलतात किंवा करतात आणि मला त्याची चीड येते.' मी तिला म्हणालों, 'हें पाहा दिदी, मला तुमचा दोघांचाही कंटाळा आलाय्. तुमच्या या भांडणाच्या वातावरणांत यापुढं राहणं मला अशक्य होऊन बसलंय्. अति दारिद्र्यामुळें किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें तुम्हीं भांडतां याचा मला पत्ता लागत नाहीं. मला तुमचं गूढ कांहीं उकलतच नाहीं, तरी मी परत कलकत्त्याला जावं हें बरं.' यानंतर थोड्या दिवसांनीं मी हेमबाबूंना एक पत्र पाठवलं. अर्थातच या गोष्टीचा मी कांहीं त्यांत उल्लेख केला नाहीं; फक्त मला कलकत्त्याला यायचं आहे एवढंच त्यांत लिहिलं होतं. उलट टपालीं हेमबाबूंचं पत्र आलं आणि मी निघण्याची तयारी केली. निघण्याच्या वेळीं मात्र मला बरंच वाईट वाटलं. दिदीचा, मन्मथदांचा आणि त्या मुलांचा मला इतका लळा लागला होता, कीं त्यांना सोडून

जाणं माझ्या जिवावर आलं. त्या दिवशी मी जाण्याचा बेत रहीतच केला. परंतु दुसरा दिवस उलटल्यानंतर मला असं वाटूं लागलं कीं इथं राहून माझा हेतु कांही सिद्धीस जावयाचा नाही. मग इथं राहण्यांत काय अर्थ ? असा विचार करून मी मन घट्ट केलं आणि त्या दिवशीं संध्याकाळीं निघालो. दिदीचा मी निरोप घेतला आणि मन्मथदा व तीं सर्व मुलं मला मोटरबसपर्यंत पोचवायला आलीं. बस दृष्टिआड होईपर्यंत बिचारीं मुलं सारखीं माझ्याकडे पाहात होतीं. माझ्याही डोळ्यातून अश्रु वाहूं लागले. या निष्पाप मुलांच्या सहवासाला आपण आजपासून मुकणार असा विचार मनात येऊन फार वाईट वाटलं.

# ४



कलकत्त्याला आल्यावर नेहमींप्रमाणें माझा अभ्यासक्रम सुरू झाला. मध्यंतरीच्या काळांत माझ्या अभ्यासाचे धागेदोरे अजिबात तुटले होते, ते मीं पुन्हां साधण्याचा प्रयत्न केला. सीतानाथबाबूंजवळ मी पुन्हां तत्त्वज्ञानाचा अभ्यास सुरू केला. सिटी कॉलेजमध्येंसुद्धां मी नियमानें जाऊं लागलो एके दिवशीं सकाळीं हेमबाबू माझ्या खोलींत आले आणि 'तूं अमेरिकेला जातोस का' असा त्यांनीं मला प्रश्न केला मी भांबावून जाऊन त्याच्या तोंडाकडे पाहूं लागलो. थोडा वेळ थांबून त्यांनीं पुन्हां तोच प्रश्न केला. मी त्यांना 'मला अमेरिकेला जायचं नाहीं' असं सांगितलं. ब्राह्मसमाजांतील साधनार्थ्यांना एक ब्रिटिश आणि एक अमेरिकन अशा दोन शिष्यवृत्त्या मिळत असत. या शिष्यवृत्त्यांसाठीं कोणते विद्यार्थी निवडायचे ते ठरवण्यासाठीं ब्राह्मसमाजांत एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीचे हेमबाबू सेक्रेटरी होते. मी नाहीं म्हटल्यावर ते म्हणाले, 'अच्छा! आम्ही लक्ष्मणला या खेपेला अमेरिकेला पाठवूं आणि तुला ऑक्सफर्डला पाठवूं.' ऑक्सफर्डला जाण्याचा प्रश्न त्यावेळीं उपस्थित झाला नव्हता. म्हणून मी कांहीं न बोलतां स्वस्थ बसलो.

एक दिवस हेमबाबू आम्हांला सर जगदीशचंद्र बोसकडे घेऊन गेले. सर जगदीश हे जरी विख्यात वनस्पतिशास्त्रज्ञ होते तरी ते हेमबाबूंचे मेहुणे असल्यामुळे मला त्याना पाहण्याची अधिक उत्सुकता लागली. लेडी बोसनं आम्हांला चहाचं निमंत्रण केलं होतं. म्हणून आम्हीं तिथं चार वाजतां जाऊन पोचलों. लेडी बोसनं आमचं स्वागत करून आम्हांला जेवणाच्या टेबलाजवळ बसवलं. त्या टेबलावर चहाचं सामान आणि इतर खाण्याचे जिन्नस ठेवले होते. लेडी बोसची आणि माझी दार्जीलिंगला भेट झाली होती, म्हणून तिनं माझ्याशिवाय इतरांची औपचारिकरीत्या विचारपूस केली. मला सर जगदीशना पाहण्याची उत्कंठा लागली होती आणि ते तर तिथं कुठं दिसत नव्हते. इतक्यांत रसायन-शाळेंतील आपलं काम संपवून घाईघाईनं सर जगदीश दार उघडून आले आणि टेबलाच्या माथ्याजवळ असलेल्या खुर्चीत बसून त्यांनीं बोलायला सुरवात केली. ते इतक्या घाईत येऊन खुर्चीत बसले कीं

आम्हांला उठून अभिवादन करायला सवडच मिळाली नाहीं. हेमबाबूंनीं आमची सर्वांची ओळख करून दिली. आम्ही निरनिराळ्या प्रांतांतून आलों असल्याकारणानं जो विद्यार्थी ज्या प्रांतांतून आला असेल त्याच्याशीं त्या प्रांताविषयीं बोलण्यास त्यांनीं सुरुवात केली. अर्थात माझ्याशीं ते महाराष्ट्राविषयींच बोलले. त्यांच्या बोलण्याचा ओघ इतका जबरदस्त होता कीं त्यात खळ म्हणून पडली नाहीं. त्यांच्या जलद बोलण्यामुळेंच कीं काय, त्यांच्या ओठाच्या दोन्हीं बाजूला सफेत फेसासारखी लाळ येई. एकंदर दिसण्यांत ते फार रुबाबदार होते. काळ्यासांवळ्या तोंडावर त्यांच्या बुद्धीची चमक दिसून येई. त्यांच्या डोक्यावर भरपूर केस होते, पण ते सर्व रुपेरी झालेले. त्यांनीं केसाचा एका बाजूला भाग पाडला होता. बरेच दिवस केस न कापल्यामुळें त्यांच्या डोक्याच्या मागच्या बाजूचे केस सिंहाच्या आयाळीप्रमाणें दिसत. ते शरीरानं स्थूल आणि ठेंगू होते. त्यांच्या मानानं लेडी बोस कितीतरी उंच दिसत. सर जगदीश यांचे कपडेसुद्धां साधे होते; पायांत बूट आणि पाश्चात्य पद्धतीची विजार आणि अंगावर गळ्याशीं बंद असलेला करड्या रंगाचा शॉर्ट कोट. सर जगदीश चहा पीत असतांना एकसारखे बोलतच होते. आम्ही वाकून त्याचा प्रत्येक शब्द झेलण्याचा प्रयत्न केला. त्यानी त्यावेळीं आम्हाला इतक्या गोष्टी सांगितल्या कीं त्या सर्व आतां माझ्या स्मरणातून गेल्या आहेत. परंतु मार्कोनीच्या शोधाबद्दल बोलताना ते म्हणाले कीं, 'मार्कोनीनं बिनतारेचा शोध लावण्यापूर्वी आपण तो शोध लावला होता, परंतु वनस्पतिशास्त्राकडे माझं लक्ष अधिक वेधल्यामुळें या संशोधनाकडे लक्ष देण्यास मला फुरसद मिळाली नाही. मी केलेल्या संशोधनाची सर्व माहिती मी मार्कोनीकडे पाठवून दिली.' ही आठवण मी सांगतो आहें खरी, परंतु यात माझी चूक होण्याचा संभव आहे. ही आठवण खरी असावी असा अजूनही माझा समज आहे; पण ती खरी नाही असं घटकाभर मानलं तरी सर जगदीशनीं वनस्पतिशास्त्राबद्दल जे अपूर्व शोध लावले आहेत, ते माझ्या मते मार्कोनीच्या शोधापेक्षा अधिक महत्त्वाचे आहेत. चहा पिणं झाल्यानंतर आमच्याशीं हस्तांदोलन करून जितक्या तातडीनं सर जगदीश आले तितक्याच तातडीनं निघून गेले. आणखी थोडा वेळी आम्हीं लेडी बोसशीं बोलत बसलो आणि नंतर आश्रमात परत आलो.

सर जगदीशविषयीं दुसरी एक गोष्ट मला आठवली, ती इथंच सांगून टाकतो. एके दिवशीं सर जगदीशनीं एक बडी मेजवानी दिली. त्या मेजवानीला बरीच बडी मंडळी आली होती. हेमबाबूंबरोबर सर जगदीशनीं आम्हांलाही आमंत्रण दिलं होतं. सर जगदीशच्या घरच्या त्या मेजवानीचा थाट पाहिल्यानंतर मी तर अगदीं गांगरून गेलो. मी वयान सर्वांत लहान. अर्थात माझ्याकडे कुणी लक्षच दिलं नाहीं. दिवाणखान्यांत बरीच बडी बडी मंडळी जमली होती म्हणून मी एका कोपऱ्यांत बसून राहिलों.

मध्यभागीं असलेल्या टेबलाजवळ सर जगदीश पाहुण्यांशीं मोठमोठ्यानं बोलत होते. त्यांनीं लावलेले मोठमोठाले शोध जगाला माहितच आहेत. परंतु हे जाडे शोध लावतांना त्यांनीं बरेचसे बारीकबारीकही शोध लावले होते. मला वाटतं याच शोधांविषयीं ते मंडळींना कांहींतरी सांगून हंसवीत होते. बोलतां बोलतां ते मध्येंच थांबले. आणि म्हणाले, 'तुम्हांला मी एक गंमत दाखवतों. मीं एक वडाचं ( कीं पिंपळाचं ? ) मोठं झाड उखडून काढून तें दुसऱ्या ठिकाणीं नेऊन लावलं; आणि तें अजूनही जिवंत आहे. चला मी दाखवतों तुम्हांला तें झाड !' मंडळी भराभर दरवाज्यांतून बाहेर जाऊं लागलीं. सर जगदीश पाहुण्यांच्या मागं, शिष्टाचाराला अनुसरून, दारांत उभे राहिले. दिवाणखान्यांत कुणी पाहुणा शिल्लक राहिला आहे का, हें पाहण्यासाठीं त्यांनीं दृष्टि फिरवली. मी दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यांत तसाच बसून राहिलो होतों. मला पाहतांच त्यांना आश्चर्य वाटलं, तसाच रागही आला. रागानंच ते ओरडले, ' 'The sense of curiosity is absent in that boy. ' त्यांचे शब्द ऐकल्यावर मला त्यांच्या पाठोपाठ जाण्याची इच्छा झाली. पण मी ती दाबली. या माझ्या अतिशहाणपणाचा परिणाम इतकाच झाला कीं, सर जगदीश त्या प्रसंगानंतर माझ्याशीं एकदांही बोलले नाहींत. याची भरपाई करण्याकरितांच कीं काय लेडी बोस मात्र माझ्याशीं खूप मोकळेपणानं वागत.

डॉ. रवींद्रनाथ ठाकूर यांनाही पाहण्याची माझ्या मनांत तितकीच उत्कंठा लागून राहिली होती. ' आपण रविबाबूंकडे जाऊं या ' असं मी हेमबाबूंना म्हटलं. हेमबाबूंनीं गंभीर चेहरा करून नकार दिला. मला फार आश्चर्य वाटलं. ब्राह्म संगीतामध्यें रविबाबूंनीं केलेल्या पदांची संख्याच इतर पदांपेक्षां अधिक आहे. आणि साधारण ब्राह्मसमाजांत रविवारीं हीं पदं ब्राह्म तरुण आणि तरुणी मोठ्या भक्तिभावानं म्हणत. अर्थात् ब्राह्म पुढाऱ्यांना रविबाबूंविषयीं बराच आदर असेल अशी माझी कल्पना होती. परंतु त्यांच्या बोलण्याचालण्यावरून मला कांहीं तसं दिसलं नाहीं. नकार देतांना हेमबाबूंच्या चेहऱ्यावर एक प्रकारची तिरस्काराची झांक होती हें माझ्या त्यावेळीं लक्षांत आल्यावांचून राहिलं नाहीं. हे काय गूढ आहे याची अधिक चौकशी करण्याचं मी ठरवलं.

ती चौकशी करण्याचा मला आपोआपच योग आला. त्यावेळीं ' प्रेसिडेन्सी कॉलेज ' मध्यें सायन्सचे प्रोफेसर असलेले प्रशांतचंद्र महाल्नविस आमच्या आश्रमाच्या शेजारीं राहत असत. आमच्या आश्रमाशेजारच्या पटांगणांत रोज रात्रीं येरझारा घालण्याचा त्यांचा क्रम असे. प्रशांतबाबूंचं वय त्यावेळीं २५।२६ पेक्षां अधिक नसेल. ते फार तल्लख बुद्धीचे असे समजले जात असत. ब्राह्म तरुण आणि तरुणी त्यांना आपले पुढारी समजत. एक दिवस संध्याकाळीं आमचीं जेवणं झाल्यावर मी

आश्रमाच्या बाहेर आलों. पाहतों तर प्रशांतबाबू तिथं येरझारा घालीत होते. मला काय वाटलं कुणास ठावूक, मी एकदम त्यांच्याजवळ जाऊन बोलायला सुरवात केली. मी माझी ओळख त्यांना करून देऊं लागलों. तेव्हां मला थांबवून ते म्हणाले, ‘ मला तुझी सर्व माहिती आहे. एकदां तुला घरीं बोलवावं असंही मला वाटलं. पण म्हटलं नको. वडील मंडळींना उगीच विनाकारण माझ्याविषयीं संशय यायचा.’ हे त्यांचे शब्द ऐकून मी अधिकच बुचकळ्यांत पडलों. मी त्याना म्हटलं, ‘ तुमचा संशय कोण व कशाबद्दल घेणार ?’ तेव्हां ते मोठ्यानें हंसले. ते म्हणाले, ‘ तुझी इच्छाच असेल, तर मी सर्व हकीकत थोडक्यांत सांगतों. प्रथम तुझ्या एक गोष्ट लक्षांत आली असेल कीं ब्राह्म समाजांतील आपली सर्व वडील मंडळी ६०,७० आणि ७५ वर्षांचीं म्हातारीं माणसं आहेत. त्यांची वृत्ति धार्मिक आहे. त्यांची ब्राह्मधर्मावर अढळ निष्ठा आहे. ब्राह्मधर्मासाठीं त्यांनीं अतुल स्वार्थत्याग केला आहे. या गोष्टी खऱ्या आहेत, आणि मला त्यांच्याबद्दल फार आदर वाटतो. परंतु ब्राह्मधर्म हा प्रगतिपर धर्म आहे हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. राजा राममोहन रॉय, महर्षी देवेन्द्रनाथ ठाकूर आणि पंडित शिवनाथशास्त्री यांनीं जी धर्मपरंपरा घालून दिली ती आतां निर्जीव झाली हें त्यांना कळत नाहीं. त्या परंपरेला ते अंधश्रद्धेनें तसेच चिकटून बसतात. आपली साप्ताहिक उपासनाच घे. ती उपासना करतांना ‘ सत्यं ज्ञानं अनंतम् ’ हा मंत्र म्हटलाच पाहिजे हा यांचा अट्टाहास कां ? अशी काय त्या मंत्रांत जादू आहे कीं तो मंत्र म्हटल्याशिवाय ईश्वराची उपासना पुरी होणार नाहीं ? आणि इतक्या लांबलांब उपासना हे का करतात ? उपासना एक तासांत आटपली तर ईश्वर त्यांच्यावर थोडाच रागावणार आहे !’ बोलतां बोलतां प्रशातबाबूंचा आवाज चढूं लागला. शेवटीं ते आवेशानं म्हणाले, ‘ बस्स, ही सामुदायिक उपासनाच बंद केली पाहिजे. तिच्यामुळें समाजात दांभिकपणा वाढतो. ’ नंतर कांहींतरी आठवल्यासारखं करून ते म्हणाले, ‘ तुझी आणि रविबाबूंची भेट झाली ? तूं त्यांना अवश्य भेटलं पाहिजेस. रविबाबूंचा ही वडील मंडळी द्वेष करतात. कारण त्याना वाटतं कीं रविबाबू भलतीच शिकवण देऊन आम्हां तरुणाना बिघडवतात !’ प्रशांतबाबूंचे हे शब्द ऐकल्यावर माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला आणि रविबाबूंना शक्य तितक्या लवकर भेटण्याचं मीं ठरवलं. रविबाबूंच्या नीतिमत्तेविषयीं या पुढाऱ्यांनीं ज्या खोट्यानाट्या कंड्या पिकवल्या होत्या, तिकडे तर मी मुळींच लक्ष दिलं नाहीं. मनुष्य एकदा पाखंडी बनला कीं तो नीतिभ्रष्ट झालाच पाहिजे अशी सनातन्यांची वृत्ति असते. मग ते हिंदु असोत, ब्राह्म असोत किंवा ख्रिस्ती असोत. सनातनी हिंदूंच्या दृष्टीनं ब्राह्मधर्म म्हणजे एक पाखंड, परंतु या पाखंडांतसुद्धां आणखी पाखंडीपणाला वाव असतो, हे जुनाट आणि बुरसटलेल्या ब्राह्मधर्मीयांना कळलं नाहीं.

ब्राह्मसमाजांतील वयानं आणि मनानं वृद्ध झालेल्या पिढीला वाटे कीं, आपण प्रगतीचा उच्चांक गाठला आहे आणि त्याच्यापुढे ब्राह्मधर्माची प्रगति होणे शक्य नाहीं. प्रशांतबाबूंच्या बोलण्यावरून असं दिसलं कीं रविबाबूंना-ब्राह्मधर्माचीं तत्त्वं मान्य होतीं. परंतु तीं तत्त्वं आचरणांत आणणारा आणि हिंदूसमाजाशीं फटकून वागणारा असा एक निराळा सामाजिक गट त्यांना नको होता. त्यांची अशी उत्कट इच्छा होती कीं ब्राह्मधर्माचीं तत्त्वं सबंध हिंदू समाजांत पसरलीं पाहिजेत. ब्राह्मसमाजांतील तरुण पिढीला रविबाबूंचं म्हणणं पूर्णपणे पटे, आणि याच गोष्टीचं ब्राह्मसमाजांतील वृद्ध पुढाऱ्यांना वैषम्य वाटूं लागलं.

या पुढाऱ्यांविषयीं दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, इंग्लंडमधील प्युरिटन्सप्रमाणे वृद्ध ब्राह्म पुढारी शुद्ध आचरणावर भर देत. परंतु प्युरिटन्सप्रमाणें त्यांनीं शुद्ध आचरणाचा एक विशिष्ट अर्थ केला. दर रविवारीं चर्चमध्यें जाणारा, कोणत्याही व्यसनाच्या आधीन न होणारा, आपल्या पत्नीशीं निष्ठेनें वागणारा, नेहमीं खरं बोलणारा असा एक जो वर्ग इंग्लंडमध्यें निर्माण झाला, त्या वर्गाची वृत्ति ब्राह्म पुढाऱ्यामध्येंही होती. हीं नीतितत्त्वें वाईट आहेत असं मला म्हणावयाचं नाहीं. परंतु तीं नीतितत्त्वं धर्माच्या बाह्यांगांतून निघाल्यामुळें दांभिकपणाला वाव देणारीं होतीं. येशू ख्रिस्ताच्या वेळच्या यहुदी समाजाच्या उदाहरणावरून तर ही गोष्ट मला स्पष्टपणें दिसत होती. आपण सच्छील वृत्तीचे आहोत अशी एकदां माणसाची समजूत झाली कीं त्याचा अहंपणा वाढतो आणि तो दुसऱ्या माणसाकडे तुच्छतेनें पाहातो. इतकंच नव्हे, तर दिवसेंदिवस त्याचं अंतःकरण दगडासारखं घट्ट बनत जातं. त्याच्या अंतःकरणांत दयेला वाव नसतो. प्रेमाला वाव नसतो. मनमोकळेपणा ही काय चीज आहे तें त्याच्या स्वप्नांतही येत नाहीं. ब्राह्मसमाजांतील तरुणांना याची अधिकाधिक जाणीव होऊं लागली म्हणूनच मला वाटतं ते रविबाबूंकडे अधिक ओढले गेले. ब्राह्मसमाजामध्ये जे एक कडक शिस्तीचं आणि अति गंभीरपणाच वातावरण निर्माण झालं होतं, त्या वातावरणांत ब्राह्मसमाजांतील तरुण पिढी गुदमरून जाऊं लागली तर त्यांत नवल काय!

एक दिवशीं मी अचानकपणें रविबाबूंकडे गेलो. जोरासांको इथं त्यांचा एक भव्य वाडा—वाडा कसला राजवाडाच तो—होता. दोन तीन मोठमोठाले बंगले एकमेकाला लागून बांधले होते. मी तिथं गेल्यावर तिथल्या शिपायानं मला एका भव्य दिवाणखान्यांत नेलं. त्या दिवाणखान्याची लांबीच मुंबईतील एका लहान चाळीइतकी होती. मला आतां बरोबर आठवत नाहीं, पण तो दिवाणखाना जुन्या पद्धतीनं शृंगारलेला होता. छताला झुंबरं टांगली होतीं. त्यांत विजेचे दिवे होते कीं नाहीं मला माहीत नाही, बहुतेक असावेत. मी ज्या ठिकाणीं बसलों होतो

तिथं लांब, रुंद असं भव्य टेबल ठेवलं होतं आणि त्या टेबलाभोवतीं खुर्च्या मांडल्या होत्या. लहानशा सभेला शोभतील इतकीं माणसं त्या ठिकाणीं सहजच बसलीं असतीं. आजूबाजूला कुणीं चिटपाखरूंसुद्धां फिरकत नव्हतं. ते भव्योदात्त वातावरण पाहून मी तर अगदीं गांगरून गेलो. वाटलं, आल्या वाटेनं एकदम निघून जावं. परंतु मी आंत चिठी पाठवली होती. म्हणून कसाबसा धीर करून बसलो. मला निदान पंधरा मिनिटं तरी वाट पाहावी लागली असेल. इतक्यांत दिवाणखान्याच्या अगदीं दुसऱ्या टोकाला असलेलं दार उघडलं गेलं, आणि रविबाबू बाहेर आले. रविबाबू ज्या बाजूनं येत होते त्या बाजूला अंधार असल्यामुळे मला फक्त त्यांची रुप्याप्रमाणें चकाकणारी दाढीच दिसली. त्याना पाहिल्याबरोबर मी उठून उभा राहिलों. रविबाबूंना माझ्या नजीक यायला जवळ जवळ दोन मिनिटं तरी लागलीं असावींत इतके ते सावकाश चालत येत होते. ते आले आणि माझ्याजवळ येऊन उभे राहिले. बंगालमध्यें वृद्ध माणसाच्या पायाला हात लावून त्याना वंदन करायची पद्धति आहे. परंतु मी रवि-बाबूंच्या पायावर डोकंच ठेवलं. इतकं माझं अंतःकरण त्यांच्याविषयींच्या आदरानं भरून आलं होतं. रविबाबू माझ्या शेजारच्या खुर्चीवर बसले आणि मी त्यांना न्याहाळूं लागलो. त्यांनीं मोगल पद्धतीचा एक लांबलचक निळ्या मखमलीचा पायघोळ अंगरखा घातला होता, पायामध्यें जरतारी चढाव होते आणि अंगरख्याच्या आंत पांढऱ्या मलमलीचा सदरा होता. डोक्यावरचे केस मानेवर रुळेपर्यंत वाढले होते. उजव्या हाताचं कोपर खुर्चीच्या हातावर टेकलं असल्यामुळे त्याचा सबंध हात उघडा पडला होता. त्यांच्या मनगटापासून कोपरापर्यंतचा हाताचा भाग एकाद्या लहान मुलीच्या हाताप्रमाणें नाजूक, लुसलुशीत दिसत होता. मला आश्चर्य वाटलं. त्यावेळीं रविबाबूंचं वय पासष्ट-सत्तर तरी असावं, पण त्यांच्या हातावर एकही सुरकुती नव्हती. सबंध हात दुधासारखा सफेत आणि तुळतुळीत दिसत होता. माझं निरीक्षण चाललं असतांना रविबाबू स्वस्थ बसून होते. लोक आपलं दर्शन घ्यायला येतात याची त्यांना चांगलीच जाणीव असावी. शेवटीं कांहीं तरी बोलायचं म्हणून मीच सुरवात केली. मला त्यांच्याशीं खूपखूप बोलायचं होतं, परंतु ते एकाद्या देव्हाऱ्यांतील मूर्तीप्रमाणे स्वस्थ बसून राहिले होते. मी त्याना औपचारिकरीत्या 'मुंबईला कधीं जाणार ?' असा प्रश्न केला. त्यावेळीं त्यांनीं अगदीं मोजक्या शब्दात सांगितलं कीं 'मुंबईला जायचं माझं ठरत होतं पण यावेळीं वेळ मिळेल असं वाटत नाहीं.' दुसरा प्रश्न मला सुचेना. कारण ते अगदीं स्तब्ध बसून होते. मी कोण, कशासाठीं आलों याची चौकशीसुद्धां त्यांनीं केली नाहीं. बरोबरच आहे तें. ईश्वराच्या चिंतनामध्ये मग्न असणाऱ्या व नेहमीं आकाशाकडे डोळे लावून बसणाऱ्या रविबाबूंसारख्या महर्षीला माझी चौकशी करून काय करायचंय् ! इतक्यांत त्यांचा नोकर आला आणि त्याच्या कानांत कांहींतरी

कुजबुजला. ते तावडतोब उठले आणि म्हणाले, 'Excuse me I must go now.' भेटायला आलेल्या माणसाला पांच मिनिटांपेक्षां जास्त वेळ द्यायचा नाहीं असं त्यांनीं ठरवलं होतं. माझी अगदीं दारुण निराशा झाली; पण मी ती बाहेर दाखविली नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं मी प्रशांतबाबूंना भेटलो आणि सांगितलं कीं 'मी रविबाबूंना भेटून आलों, परंतु त्यांना फार काम असल्यामुळें तें कांहीं फार बोलूं शकले नाहींत.' थोडा वेळ प्रशांतबाबूंशीं गप्पा मारल्यानंतर मी परत खोलींत आलों आणि माझ्या मनाची उदासीनता घालवण्यासाठीं रविबाबूंची गीतांजली वाचूं लागलों. ती गीतांजली वाचून माझं मन थोडंथोडं प्रसन्न होऊं लागलं. देव्हाऱ्याचीं दारं बंद करून डोळे मिटून देवाचं चिंतन करणाऱ्या पुजाऱ्याला उद्देशून रविबाबू म्हणतात, 'अरे, तूं डोळे मिटून ध्यानस्थ काय बसला आहेस? डोळे उघडून पाहा, तुझा देव तुझ्या पुढ्यांत नाहीं. रस्त्यावर मातींत. काम करणाऱ्या, उन्हांत काम केल्यामुळं ज्याच्या अंगांतून घामाच्या धारा निथळत आहेत अशा, त्या गरीब मजुराजवळ उभा आहे, तो पाहा' दुसऱ्या एका ठिकाणी 'I am He that sitteth among the poorest, the loneliest and the lost' असं देवाचं वर्णन त्यांनीं केलं आहे. येशूनं केलेल्या वर्णनासारखचं नाही का हें? किती आनंद वाटला हें वाचून मला! पण येशू ख्रिस्त आणि रविबाबू दोघांच्या राहाणींत किती जमीनअस्मानाचा फरक हा! मला कसंसंच वाटूं लागलं. दुसऱ्या दिवशीं उठल्याबरोबर रविबाबूंना मी एक लांबलचक पत्र लिहिलं. त्या पत्रांत काय मजकूर लिहिला होता तें मला आतां आठवत नाहीं. पण त्या पत्राची मात्र मी अशी सुरवात केली होती, 'May I, please, call you a divine poet as we call Plato a divine philosopher.' बरेच दिवस वाट पाहिली, पण त्या पत्राचं उत्तर आलं नाहीं. माझं मन पुन्हां अधिकाधिक उदास होऊं लागलं. खरं सांगायचं म्हणजे रविबाबू माझ्या मनांतून उतरूं लागले. त्यानंतर मला शांतिनिकेतनमध्ये राहाण्याचा दोनतीनदा प्रसंग आला. मी त्यांना त्या ठिकाणीं पाहिलं एवढंच म्हणतो. कारण मी त्यांना भेटायचा प्रयत्न केला नाहीं. त्यांनीं काढलेल्या त्या संस्थेकडेच माझं सारं लक्ष होतं. याच वेळीं, मला आठवतं, माझ्या मनाला एक मिस्किल विचार चाटून गेला. तो असा कीं, रविबाबूंनीं जर दाढी नि मिशा काढल्या आणि इतर बंगाल्यांप्रमाणें त्यांनीं कपडे केले–तर–तर–मला वाटतं त्यांचा हा अलिप्तपणा, त्यांचं गांभीर्य आणि त्यांची Olympian god सारखी एकंदर वृत्ति तेव्हांच नष्ट झाली असती. दुसरा एक असाच विचार चाटून गेला कीं, धुळीमध्ये भर उन्हांत काम करणाऱ्या मजुरांनीं जर यांच्या रुबाबदार अंगरख्यावर चिखल फेकला तर हे काय करतील? वास्तविक पाहिलं तर हा विचार माझ्या मनांत येण्याचं कारण नव्हतं. रस्त्यांतून पायीं चालत जाण्याइतकी सामान्य कृति रविबाबूंच्या हातून घडेल हें संभवनीय तरी होतं का?

उलपटक्षीं रविबाबूंनीं केलेली बंगाली वाङ्मयाची सेवा इतकी अमोल आहे की, तिचा वंग साहित्यिकाना विसर पडणं शक्य नाहीं. सहज बोलण्यांत येणाऱ्या साध्या आणि सुटसुटीत शब्दांचा प्रयोग बंगाली वाङ्मयांत प्रथम रविबाबूंनीं सुरू केला. त्याचप्रमाणें पाश्चात्य आणि पौर्वात्य संगीताचा समन्वय प्रथम त्यांनीं घडवून आणला. त्यांनीं रचलेल्या गीताच्या चाली सुंदर आहेतच, पण त्यांनीं योजलेल्या शब्दांची माधुरी विलक्षण आहे. शिवाय तीं गीतं सामुदायिक पद्धतीनं म्हणण्याला सुटसुटीत अशीं आहेत. परंतु खरं सांगायचं म्हणजे या गोष्टीला मी त्यावेळीं मुळींच महत्त्व दिलं नाहीं. म्हणूनच येशू खिस्ताशीं रविबाबूंची तुलना करतांना ते माझ्या मनांतून उतरले. दुसऱ्या एका गोष्टीचं मला त्यावेळीं नवल वाटे. याच सुमारास रविबाबूंनीं 'विश्वभारती' या नांवाचं विद्यालय काढलं होतं. या विद्यालयांत व्याख्यान देण्यासाठीं मोटमोठाले विद्वान् पंडित त्यानीं पाश्चात्य देशांतून बोलावले होते. बुद्ध धर्मावर व्याख्यानं देण्यासाठीं सिल्व्हन लेव्ही हे सुविख्यात फ्रेंच प्रोफेसर येणार होते. उपनिषदांवर व्याख्यान देण्यासाटीं प्रो. विंटरनिझ्झ् नांवाचे एक प्रख्यात ऑस्ट्रियन जर्मन प्रोफेसर येणार होते. आणखी दुसरे कोण कोण येणार होते त्यांची यादी मला आठवत नाहीं. परंतु माझ्या मनांत एक शंका आली. बुद्धधर्म किंवा उपनिषद् या विषयावर व्याख्यानं देणारे मिळविण्यासाठीं रविबाबूना पाश्चात्य विद्वानाकडे का धांव घ्यावी लागली? या विषयावर बोलण्याची आमच्या देशातील एकाही गृहस्थाची लायकी नाहीं असं का त्यांना वाटत होतं? परंतु पाश्चात्य संस्कृति आणि पौर्वात्य संस्कृति यांचा संगम घडवून आणण्याचा प्रयत्न रविबाबू करीत होते म्हणूनच त्याना कदाचित् न्यू कॅसलला कोळसे वाहून नेण्याची बुद्धि झाली असावी, अशी मी माझ्या मनाची समजूत करून घेतली.

एके दिवशीं आमच्या आश्रमांत एक सत्तावीस अठ्ठावीस वर्षांचा गृहस्थ आला. अंगानं सडपातळ असून तो बराच उंच होता. त्याचं चाफेकळीसारखं नाक, त्याचे पाणीदार डोळे त्याची तीक्ष्ण बुद्धिमत्ता दर्शवीत होते. तो जातीनं मल्याळी होता तरी तो बराच गोरटेला होता. अमेरिकेला जाण्यासाटीं लक्ष्मणाऐवजीं त्याची निवड केली होती असं मला नंतर कळलं. तो गृहस्थ कालीकत येथील झामोरीन कॉलेजमध्यें इंग्रजीचा प्रोफेसर होता; परंतु नोकरीचा राजीनामा देऊन ब्राह्मसमाजाचं प्रचारकार्य करण्याचं त्यानं ठरवलं होतं. त्याचं नाव होतं राम मेनन. अमेरिकेला जाण्यापूर्वी थोडे दिवस आश्रमात राहण्यासाठीं तो आला होता माझी त्याची चांगलीच गट्टी जमली. सकाळसंध्याकाळ निरनिराळ्या विषयावर आम्ही वादविवाद करीत बसत असूं. रोजची सकाळची उपासना आटपल्यानंतर आम्हांला याशिवाय त्यावेळेस दुसरा उद्योगच नव्हता. समाजांतील वृद्ध पुढाऱ्यांविषयीं जो काहीं मला असंतोष वाटत होता. तो मी नेहमी व्यक्त करून दाखवीत असें. राम मेननचं मनही थोडं थोडं

सांशक होऊं लागलं. शेवटीं तो स्वतःच सर्व गोष्टींना इतका कंटाळला कीं अमेरिकेला न जातां तो परत कालीकतला निघून गेला.

कलकत्त्याजवळच रामकृष्ण मिशनचा बेलूर इथं एक मठ होता. त्या ठिकाणीं मी वरचेवर जाऊं लागलो. ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यांनीं रामकृष्ण परमहंसांना जी एकदम प्रसिद्धि दिली, आणि त्यांना जवळजवळ आपले गुरू केलं. त्यामुळें मला त्या मठाविषयीं अत्यंत आदर वाटूं लागला. त्या मठाचे आद्यसंस्थापक स्वामी विवेकानंद यांचं नांव ब्राह्मसमाजाच्या पटावर अजूनही आहे, हें ऐकल्यानंतर मला त्या मठाविषयीं अधिक कुतूहल वाटलं. स्वामी विवेकानंद हे प्रथम ब्राह्मसमाजिस्ट होते. एके दिवशीं केशवचंद्र, नरेंद्रनाथ दत्त (स्वामी विवेकानंद) यांना घेऊन रामकृष्ण परमहंसांना भेटावयाला गेले. त्यावेळीं परमहंसांच्या व्यक्तिमत्वाचा विलक्षण प्रभाव तरुण नरेंद्रावर पडला आणि त्यानं परमहंसांचं शिष्यत्त्व पत्करलं. नरेंद्रबाबूंचं त्यावेळी १८-१९ वर्षांचं वय होतं, असा माझा समज आहे. तरुण नरेंद्रानं संन्यास-दीक्षा घेतली आणि नंतर ते स्वामी विवेकानंद या नांवानं जगप्रसिद्ध झाले. स्वामीनीं स्थापलेला हा मठ पाहिल्याबरोबर मला हा मागील इतिहास आठवला. तो मठ पाहिल्याबरोबर माझं अंतःकरण भरून आलं.

ब्राह्मसमाजापेक्षा या आश्रमाचं वातावरण मला अगदींच निराळं वाटलं. मला एकादे वेळेस वाटे, कीं साधनाश्रमांत राहण्यापेक्षां या मठात राहिलेलं काय वाईट? परंतु लगेच माझ्या मनांत असा विचार येई कीं ब्राह्मधर्म हा नवीन क्रांतिधर्म आहे आणि स्वामी विवेकानंदांनीं फक्त हिंदुधर्माचं पुनरुज्जीवन केलं. ब्राह्मधर्मामध्यें ख्रिस्ती धर्म, यहुदी धर्म, मुसलमान धर्म, हिंदु धर्म, या चारी धर्मांचा उत्तम संगम झाला होता. पूर्वी कबीर आणि नानक यांनीं मुसलमान व हिंदु धर्मांतील उदात्त भाग एकत्र करण्याचे प्रयत्न केले. राजा राममोहन रॉयनीं त्याच्या पुढें जाऊन खिस्ती धर्मांतील उच्च तत्त्वांचा शोध करून तीं ब्राह्मधर्मात सामील करून घेण्याचा प्रयत्न केला. राममोहन जरी धर्मतत्त्वांचे संशोधक होते, तरी त्यांनीं ब्राह्मधर्माची स्थापना करताना त्या धर्माला वेदाचं अधिष्ठान घेतलं. तथापि राममोहन नंतर जे ब्राह्म पुढारी होऊन गेले त्यानीं निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास करून त्या धर्मांतील उत्तम भाग एकत्र केला. ब्राह्मधर्माचं सामाजिक तत्त्वज्ञानसुद्धां तसंच प्रागतिक स्वरूपाचं होतं. ब्राह्म-समाजामध्ये जातीला वाव नव्हता. स्त्री-पुरुषांना समान हक्क दिले जात. अस्पृश्यतेला ब्राह्मसमाजांत मुळींच थारा नव्हता. या व इतर गोष्टींमुळें मला ब्राह्म-समाजाचं विशेष आकर्षण वाटे. अर्थात अशा मनस्थितीमध्यें रामकृष्ण मिशनच्या आश्रमांत येऊन राहाणं मला शक्य झालं नाहीं.

# सुखवस्तु लोकांचें वर्चस्व

कलकत्त्याला ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यांचं लिली कॉटेज नांवाचं मोठं सुंदर घर आहे. ब्रह्मानंदाच्या ज्येष्ठ मुलीशीं कुचबिहारच्या महाराजांचं जेव्हां लग्न ठरलं, तेव्हां त्यांनीं हा बंगला विकत घेतला. बंगल्याच्या पुढील अंगणांत एका बाजूला ब्रह्मानंदांची एक सुंदर समाधि बांधलेली आहे. या समाधीचं दर्शन घेण्यासाठीं मी नियमानं जात असें. त्याचप्रमाणें कधीं कधीं नवविधान ब्राह्मसमाजाच्या मंदिरांत होणाऱ्या उपासनेला हजर राहत असे. या ब्राह्मसमाजासंबंधानं मला एक गोष्ट प्रामुख्यानं दिसून आली आणि ती ही कीं केशवचंद्राच्या दोन मुलींचीं लग्नं राजघराण्यांत झालीं असल्यामुळे या दोन राजांचं प्रस्थ समाजात फार होतं. तसं पाहिलं तर साधारण ब्राह्मसमाज या दोषापासून मुक्त होता असं नाहीं. साधारण ब्राह्मसमाज हा साधारण म्हणजे सामान्य लोकांचा समाज, परंतु त्या समाजामध्येंही श्रीमंत आणि सुखवस्तु लोकांचं प्रस्थ अधिक होतं. ब्राह्मधर्माची आजीव सेवा करण्याचं ज्यांनीं हातांत कंकण बांधलं व त्यासाठीं दारिद्र्याचा स्वखुषीनं स्वीकार केला, त्यांचा दर्जा वस्तुतः समाजांत अत्यंत उच्च असायला हवा होता; पण त्या समाजांत ब्राह्मधर्मप्रचारकांची प्रत्येक जण हेटाळणीच करीत असे. ब्राह्मसमाजातील तरुण तर उघड म्हणत कीं ज्याला कुणाला दुसरा कोणताही व्यवसाय करण्याची पात्रता नाही त्यानं ब्राह्मधर्म प्रचारकाचा पेशा स्वीकारावा. असं का व्हावं याचा मी विचार करूं लागलों. ब्रह्मानंद केशवचंद्र सेन, प्रतापचंद्र मुजुमदार, शिवनाथ शास्त्री हे सुद्धा ब्राह्मधर्माचे प्रचारकच नव्हते का ? पण त्याच्या वेळी त्यांची कुणी हेटाळणी करीत नव्हतं, इतकंच नव्हे तर ब्राह्मसमाजाचे पुढारी म्हणून त्याना अग्रपूजेचा मान देत. त्यांच्यानंतर झालेले प्रचारक एक-दोन अपवाद सोडले तर बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता या दृष्टीनं कमीच पडत.

मी ज्यावेळीं तिथं होतों, त्यावेळीं प्रिन्सिपल हेरंबचंद्र मैत्र, डॉ. पी. के. आचारजी, बाबू कृष्णकुमार मित्र आणि पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यांची बुद्धिमत्तेत आणि विद्वत्तेत बरोबरी करणारा एकही प्रचारक त्यावेळीं नव्हता. ब्राह्मप्रचारकाविषयीं अनादर वाटण्याचं मुख्य कारण मला वाटतं हेंच असावं. दुसरं आणखी एक कारण असं असावं कीं या प्रचारकाची दृष्टि भविष्यकाळाकडे नसून ती भूतकाळाकडेच होती. तसंच हिंदुधर्माच्या जुन्या परंपरेला जसे सनातनी लोक चिकटून बसत, तसे हे प्रचारक जुन्या पुढाऱ्यांनीं घालून दिलेल्या परंपरेला चिकटून बसत. त्यामुळें त्याची प्रार्थना किंवा उपासना ऐकणाऱ्याला निर्जीव वाटे. या प्रचारकांना धार्मिक आणि इतर शिक्षण देण्याकरितां सुसंघटित अशी व्यवस्था नव्हती. शिवाय या प्रचारकांना विवाह करण्याची बंदी केली नव्हती. आणि सर्वसाधारण अनुभव असा आहे कीं कुठल्याही धर्माच्या प्रचारकाला विपुल संतति होते. या वाढत्या

संसाराचा खर्च चालवणं मग त्या प्रचारकांना कठीण होऊन जातं. अशा प्रचारकांनीं धर्मसाधन किंवा अभ्यास तो कसा करायचा? या गोष्टींचा विचार जेव्हां माझ्या मनांत आला, तेव्हां ब्रह्मचारी राहूनच ब्राह्मधर्माचा प्रचार करायचा असा मी माझ्या मनाशीं निश्चय केला.

# ५



हा निश्चय केल्यानतर दोन दिवसांनीं मी अचानकपणें प्रेमांत पडलों. ती एका विख्यात पत्रपंडिताची मुलगी होती. ती स्वतः खूप शिकलेली असून इंग्रजीत आणि बंगालींत उत्कृष्ट दर्जाचं साहित्य तिनं निर्माण केलं होतं. ती आपल्या घराच्या गॅलरींत उभी असतांना माझ्या दृष्टीस पडली. वयानं ती माझ्यापेक्षां ५।६ वर्षांनीं मोठी असावी. तिचा वर्ण निमगोरा होता. भव्य कपाळ आणि फारशी उंच नसल्यामुळे तिच्यांत थोडी लठ्ठपणाची झांक मारत होती. माझी तिची प्रत्यक्ष ओळख होण्याचा केव्हांही प्रसंग आला नाही. तिच्या भावाची आणि माझी मात्र ओळख होती. प्रशांतबाबूंच्या घरींच त्याची ओळख झाली. तो वयानं माझ्यापेक्षां थोडा मोठा होता. तेव्हां माझी चेष्टा करण्याचा आपल्याला हक्कच आहे असं त्याला वाटे. माझ्या धार्मिक आध्यात्मिक वृत्तीला तो नेहमीं हंसत असे. तो मला म्हणायचा, 'किती खुळा आहेस तूं? देवधर्म सब झूट आहे. पहिल्या प्रथम पैसा हा खिशांत खुळखुळला पाहिजे, समजलास. बस्स, खूप पैसा मिळवायचा आणि मजा करायची. तुझ्यासारखीं डोकं फिरलेली ध्येयवादी माणसं जगाचं कांही कल्याण करीत नाहींत; नुकसान मात्र करतात. तुला सांगितल्या आहेत कुणी या उठाठेवी? स्वतःचं कल्याण करायची तुझ्यांत ताकद नाहीं आणि उठला जगाचं कल्याण करायला!' अशा अर्थाची त्याची नेहमीं बडबड सुरू असे. त्याचा भडिमार ऐकून मी नुसता हंसत असें. पण पुढें पुढे मला त्याची भीति वाटूं लागली. कारण त्याला जर कळल कीं मी त्याच्या बहिणीवर प्रेम करतों, तर त्याला तें मुळींच आवडलं नसतं याची मला पूर्वींच खात्री होती. तो मात्र माझ्याशीं नेहमीं मोकळेपणानं बोले.

खोलीमध्ये पुस्तक वाचतांना येरझाऱ्या करायची मला संवय होती. माझ्या खिडकींतून त्यांच्या घराची गॅलरी मला स्पष्ट दिसत असे. ती गॅलरींत आली कीं मी खिडकीजवळ पुस्तक मिटून उभा राहीं आणि तिच्याकडे पाहत बसें. माझं हें करणं खरोखर असभ्यपणाचं होतं. शिवाय धर्मसाधन करण्यासाठीं आश्रमांत येऊन राहिलेला मी, मला असले चाळे करणं मुळींच शोभत नव्हतं. पण मी तरी काय

करूं ! माझा अगदीं नाइलाज झाला. पहिल्या प्रथमच एका स्त्रीविषयीं माझ्या मनांत प्रेमाची भावना उद्भवली आणि तिच्यामुळें माझा तारतम्यभाव अगदीं सुटला. पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यांच्याजवळ जाऊन माझ्या मनांतले हे भाव प्रकट करावे असं मला वाटलं. त्याना स्वतःला ६।७ मुली होत्या. त्यांपैकीं दोन मुलींची लग्नं त्यावेळीं झालीं नव्हतीं. मनाचा हिय्या करून मी पंडितजींकडे गेलो. पंडितजींनीं रसगुल्ला खायला दिला. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यानंतर मी पंडितजींना हळूच म्हणालो, ' बाबूजी मला आपल्याला काहीं सांगायचं आहे. ' ' काय सांगायचंय तुला ? सांगून टाक. ' परंतु माझ्या तोडातून शब्दच फुटेना. माझं गुपित त्यांना कळल्यावर ते माझा तिरस्कार करूं लागतील अशी मला तेव्हां भीति वाटली. इकडे पंडितजी ' काय तुला सांगायचं आहे ते सांगून टाक असं म्हणून मला आग्रह करूं लागले. पण मी पंडितजींच्या तोंडाकडे पाहत राहिलों. माझ्याकडे पाहून पंडितजी इतक्या मोठ्यानं हसूं लागले कीं मी अधिकच गांगरून गेलो. शेवटीं त्यांना कांहीं शंका येऊन ते मला म्हणाले, ' माझ्या मुलींपैकीं कुणावर तुझं प्रेम बसलंय वाटतं ? पण कांहीं उपयोग नाहीं. They are both engaged.' असं म्हणून ते पुन्हां हसूं लागले.

पंडितजी थट्टेनं बोलत होते हें मला कळलं, तरीसुद्धां मला त्यांचा राग आला. या असल्या माणसाला आपण विश्वासांत घ्यायचं नाहीं असं ठरवून मी निघून गेलों. पंडितजींना जेव्हां हेमबाबू भेटले तेव्हां ते हेमबाबूंना म्हणाले, ' काय चमत्कारिक मुलगा आहे हा ! मला कांहीं तरी सांगायला आला आणि न सांगतांच निघून गेला. ' माझं मन दिवसेंदिवस अधिकाधिक अस्वस्थ होऊं लागलं. खरं पाहिलं असतां त्या मुलीनं आपल्या बाजूनें काहींच दर्शविलं नाहीं. तिची ओळख होण्याचाही कांहीं संभव नव्हता. एकदां वाटलं, तिच्या भावाला भेटण्याचं निमित्त करून तिच्या घरीं जावं आणि त्याप्रमाणें मी निघालोंही ; पण माडीवर चढत असतां तिचा भाऊच खालीं येत होता. अर्थात् मला त्याच्याबरोबर खालीं यावं लागलं. कांहीं दिवसांनीं दिदी कलकत्त्याला आली. ती आश्रमांत आल्याबरोबर एकदम माझ्या खोलींत शिरली. तिला पाहिल्याबरोबर मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ! माझ्या मनाचा जो कोडमारा होत होता तो नाहींसा होऊन अगदीं मोकळं वाटूं लागलं. बोलतां बोलता मी दिदीला सर्व हकीगत सांगून टाकली. तिला आश्चर्य वाटलं असेल कदाचित्, पण तिनं ते बाहेर दाखवलं नाहीं. माझ्या बोलण्यावरून कदाचित् दिदीची कल्पना झाली असावी, कीं माझी आणि त्या मुलीची चांगली जानपछान असावी. दिदी दोनतीन दिवस तिथं राहिली. त्या दोनतीन दिवसांत माझ्याकडे त्या मुलीची स्तुति करण्यापलीकडे तिनं दुसरं काहीं केलं नाहीं. त्यायोगें मला मात्र खूप बरं वाटत होतं. त्याचं कारण, मला या संबंधानं कुणाजवळ तरी उघड बोलायला मिळालं. २-३ दिवसांतच दिदी निघून गेली आणि माझ्या

मनाचा कोंडमारा पुन्हां सुरू झाला. एक दिवस प्रशांतबाबूंनीं मला जेवायला बोलावलें. तिचा भाऊही आला होता. त्यावेळीं माझ्या मनांत एक विचार आला. त्यालाच एकीकडे गांठून सर्व हकीगत सांगून टाकावी. त्याचा खरा अभिप्राय तरी मला कळला असता. परंतु त्याच्या चेहेऱ्याकडे पाहिल्यावर त्याला सांगण्याचं मला धैर्य झालं नाहीं.

राम मेनन निघून गेल्यानंतर लक्ष्मणला अमेरिकेला पाठवायचं असं हेमबाबूंनीं ठरवलं. लक्ष्मण माझ्याच खोलींत राहात असे. तो पूर्वी मुंबईंत टेलिफोन कंपनींत नोकरीला होता. पण त्यानं ती नोकरी सोडली आणि साधनाश्रमांत येऊन राहिला होता. मी आश्रमात आल्यानंतर माझी आणि त्याची चांगलीच मैत्री जमली. आम्ही एकमेकांची खूप चेष्टा करीत असूं. माझ्यापेक्षां अर्थात् लक्ष्मण अधिक गंभीर वृत्तीचा होता. मी काहीं थोडा विनोद केला कीं केव्हां केव्हां तो भडकत असे ; पण स्वभावानं तो फारच चांगला होता. माझ्या प्रेमप्रकरणाची त्याला थोडी अंधुक कल्पना आली त्यामुळे तोही माझी खूप थट्टा करूं लागला. कांहीं दिवसानीं लक्ष्मण मंगळूर इथं जाण्यासाठीं निघाला. तिथून तो परस्पर अमेरिकेला जायला निघणार होता. यानंतर त्याची माझी कांहीं वर्षं तरी भेट होणं शक्य नव्हतं. तो अमेरिकेहून आल्यानंतर मात्र त्याची वृत्ति साफ बदलून गेली. त्याच्यामध्यें धार्मिक भाव असा मुळींच शिल्लक राहिला नाहीं. ब्राह्मसमाजाचं प्रचारकार्य करण्याचं त्यानं साफ नाकारलं. कारण तो आता पूर्ण नास्तिक बनला होता. कुठल्या तरी अमेरिकन कंपनीचा एजंट म्हणून त्यानं स्वतंत्र धंदा सुरू केला. ब्राह्मसमाजाचा चुकूनसुद्धां तो कधीं विचार करीत नाहीं.

जानेवारीमध्यें जेव्हां ब्राह्मसमाजाचा उत्सव सुरू झाला, तेव्हां मुंबईची कांहीं मंडळी कलकत्त्याला उत्सवासाठीं आली होती. या मंडळींत डॉ. द्वा. गो. वैद्य, डॉ. काशीबाई नवरंगे, श्री जयरामनाना वैद्य आणि त्यांचीं मुलंही आलीं होतीं. श्री. वैद्य, आणि डॉ. नवरंगे, हेरंबचंद्र मैत्र यांच्याकडे उतरले होते. जयरामनाना त्यावेळीं विधूर असल्यामुळें आणि ते आंतर्जातीय विवाहाचे कट्टे पुरस्कर्ते असल्यामुळें एकाद्या बंगाली विधवेशीं किंवा प्रौढ कुमारिकेशीं लग्न करण्याची त्यांची तयारी होती. मला जयरामनानांबद्दल अधिक आपलेपणा वाटे. कारण सामाजिक बाबतींत ते अत्यंत जहाल धोरण स्वीकारीत. त्यांची थोरली मुलगी माणक ही त्यावेळीं राममोहन इंग्लिश स्कूलमध्ये शिकवीत होती आणि त्यांचा मुलगा दौलतराम हाही त्याच शाळेंत शिकत होता. साधनाश्रमाबद्दल माझ्या मनांत एकप्रकारचा जो असंतोष धुमसत होता, तो मी वेळीं अवेळीं प्रकट करीत असे. भाऊसाहेब—म्हणजे द्वा. गो. वैद्य—हे मला चार समजुतीच्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न करीत, पण त्याचा कांहीं उपयोग होत नसे. भाऊसाहेबांना हेरंबचंद्र मैत्र, कृष्णकुमार मैत्र वगैरे पुढाऱ्यांविषयीं आदर वाटे. तरीसुद्धां

त्यांच्या त्या लांबलचक उपासना, त्यांच्या त्या भक्तीच्या भावनेचा अतिरेक, मध्येंच 'हरिः ओम्, हरिः ओम्' म्हणून रडण्याच्या सुरांत ओरडण्याची त्यांची पद्धति, हें त्यांनाही पसंत नव्हतें.

महाराष्ट्रांतील लोक सहसा इतके भावनाविवश होत नाहींत. महाराष्ट्रांत नामदेव, तुकाराम वगैरे संत होऊन गेले. त्यांच्या परंपरा जरी वारकरी संप्रदायानं चालू ठेवल्या आहेत, तरी सुद्धां महाराष्ट्रांत भावनोद्रेक कमीच. उलटपक्षीं बंगाली लोक आम्हाला रुक्ष म्हणतात. भक्तीचा ओलावा तुमच्या अंतःकरणांत नाहीं, भावनेपेक्षां बुद्धीवर तुम्ही अधिक भर देतां, म्हणूनच तुमच्या प्रार्थनासमाजाची महाराष्ट्रांत प्रगति होत नाहीं, असं ते म्हणत. जयरामनाना त्यांना नेहमीं म्हणत कीं 'तुम्ही हा भक्तीचा देखावा करतां, भावनाविवश होऊन तुम्ही रस्त्यांतून नाचत ओरडत जातां, हें सनातनी वैष्णवांना शोभण्यासारखं आहे; परंतु पुरोगामी वृत्तीच्या बुद्धिवादी ब्राह्मांना हें मुळींच शोभत नाहीं.' उत्सवांतील उपासनांना जयरामनाना नेहमीं हजर राहात, परंतु बाहेर आल्यानंतर उपासकासंबंधीं ते जे उद्गार काढीत ते या ठिकाणीं छापण्यासारखे नाहींत.

एकदां जयरामनानांची गंमत झाली. उत्सवांतला सहभोजनाचा कार्यक्रम होता तो. जेवण्यासाठीं आम्हीं एकमेकांच्या शेजारीं बसलो. आमच्या समोर केळीचीं पानं मांडलीं होतीं. पाणी पिण्यासाठीं मातीचे पेले ठेवले होते. त्या पेल्यांकडे पाहून जयरामनाना मिस्किलपणें हसले. ते मला म्हणाले, 'काय हो, या मातीच्या पेल्यांतूनच आपण पाणी प्यायचं वाटतं? काय लेकाचे भिकारडे लोक आहेत! जेवायला केळीचीं पानं–एक तर असो; परंतु निदान प्यायला स्वच्छ तांब्याचीं किंवा पितळेचीं भांडीं ठेवायला पाहिजे होतीं!' मी नुसतं हसलों. ते माझ्याशीं मराठींत बोलत असल्यामुळें बाकीच्या मंडळींना ते कळणं शक्य नव्हतं. प्रथम एक वाढपी आला आणि मोहरीच्या तेलांत तळलेला वांग्याचा एकेक तुकडा प्रत्येकाच्या पानांत टाकून चालता झाला. मी जयरामनानांना म्हटलं, "करा सुरवात'. ते म्हणाले, 'हें काय? नुसतं वांगच खायचं? आणि त्याला वास तरी किती घाणेरडा येतो! या बंगाल्यांना कुठं गोडं तेल मिळत नाहीं वाटतं?' मीं मुकाट्यानं वांगं खायला सुरवात केली. इतरांनींही सुरवात केली. जयरामनानांनीं वाईट तोंड करून जेवायला सुरवात केली. त्यानंतर एका बादलीमध्यें पातळ खिचडी घेऊन एक वाढपी आला आणि मातीच्या प्याल्यानं प्रत्येकाच्या पानांत ती वाढून पुन्हां चालता झाला. मी जयरामनानांकडे पाहिलं आणि खिचडी खायला सुरवात केली. जयरामनाना म्हणाले, 'अहो ही खिचडी खायची कशी? त्यानं तर आपल्याला ही मातीच्या भांड्यांतून वाढली. मग ही खाणार कशी?' पण त्यांनीं खायला सुरवात

केली. खातां खातां मग ते म्हणाले, ' वाः खिचडी मात्र first class झालीय. मला आणखी पाहिजे ! ' मी त्या वाढप्याला खूण करून त्यांना आणखी खिचडी वाढायला सांगितलं. त्यानंतर पुऱ्या व आणखी कसल्या तरी एक दोन भाज्या आल्या. मी हात आखडून जेवत होतो. पण जयरामनानांनीं त्याच्यावर सपाटून ताव मारला. ' पोट भरलं बुवा आपलं ! ' शेवटीं जयरामनाना म्हणाले. इतक्यांत वाढपी रबडी, रसगुल्ला, संदेश वगैरे अनेक गोड पदार्थ घेऊन आला. ते म्हणाले, ' हें काय ! हे सर्व पदार्थ येणार आहेत याची मला कल्पना नव्हती. काय लेकाचे हरामखोर लोक आहेत ! आम्हाला पहिल्यानं कल्पनाही दिली नाहीं. उगाच मी खिचडीवर हात मारला. आता हे जिन्नस खाणार कसे ? हे स्वतःला ब्रह्मोपासक म्हणवतात आणि बाहेरगांवच्या पाहुण्याची ही अशी फजिती करतात !' मी शांतपणें त्यांना म्हटलं, ' हे पाहा जयरामनाना, रसगुल्ला आणि संदेश हे बंगालसारखे इतर कुठंही खायला सापडणार नाहीत.' नाइलाजास्तव जयरामनानांनीं एक दोन संदेश आणि रसगुल्ले खाल्ले. शेवटीं वाढण्यांत आलेल्या गोड दह्याला तर त्यांनी हातच लावला नाहीं. एकंदरींत बंगालमध्यें जयरामनानांचे खाण्याचे हालच झाले. त्यांना गोड खाण्याची विशेष आवड नव्हती. पण मांस आणि मासे यावर त्यांची गाढ भक्ति. बंगाली मांस तयार करीत पण साधारणतः त्यांचा मासे खाण्यावरच कटाक्ष असे. हे मासे शिजवण्याची त्यांची तऱ्हा किती विलक्षण होती ! मोहरीच्या तेलांत शिजवले असले तरी माशाचा मूळचा वास लपत नसे. त्यामुळे मुंबईच्या माणसांना ते जिन्नस खाणं अशक्य होऊन बसलं होतं. जयरामनाना कलकत्त्याला होते तोपर्यंत ते कट्टर शाकाहारी बनले.

त्याच सुमारास कसल्या तरी कामासाठीं सर नारायण चंदावरकर कलकत्त्याला आले होते. ते त्यांचे धाकटे चिरंजीव प्रभाकरपंत त्यांच्याकडे बालीगंज इथं उतरले होते. एक दिवस सकाळीं मी त्यांना भेटायला गेलो. तीच त्यांची माझी पहिली भेट. सर नारायण घरींच होते आणि त्यांचे घरचे कपडे अगदीं साधेच होते. अंगामध्यें गंजिफ्रॉक आणि त्याच्यावरून बांधलेला पट्टयाचा पायजमा. त्यानीं पायांत गरम मोजे घातले होते. त्यांच्या पायांत जोडा होता असं मला आठवतं. त्यांच्या खांद्यावर हात पुसण्याचा टॉवेल होता. त्यांच्या झुपकेदार मिशा आणि डोक्यावरील केंस सफेद झाले होते, त्यामुळें त्यांचा चेहरा बराच भव्य दिसत असे. आल्याबरोबर मला त्यानीं एक खुर्ची दिली आणि आपण आरामखुर्चीत बसले.' काय काम आहे तें सांगा पाहूं ! 'असं त्यांनीं थोडं दरडावूनच मला विचारलं. त्यांचा आवाज थोडा खणखणीत आणि कणखर असल्यामुळें ऐकणाऱ्याला ते दटावीत आहेत कीं काय असा भास होई. मी पहिल्यानं थोडा घाबरलोंच. पण थोड्या वेळानं मी इंग्रजींत बोलायला सुरवात केली. मला त्यांनीं एकदम थांबवलं आणि म्हटलं, ' हें

पाहा, तुम्हीं मराठींत बोला. मला मराठी चांगलं समजतं. मी नुकतीच ज्ञानेश्वरी वाचून संपवलीय.' मी मराठींत बोलूं लागलो. आश्रमासबंधी माझ्या मनांत जे काहीं विचार येत होते ते मी प्रांजलपणें त्यांना सांगितले. माझी सर्व हकीकत त्यांनीं शांतपणे ऐकून घेतली. नंतर ते हंसले आणि मला म्हणाले, 'तुमचीच चूक होतेय यांत. ती कुठं होते तें मी सागतों. तुम्हीं ज्यावेळीं मुंबईहून आलांत, त्यावेळीं साधनाश्रमाचं एक आदर्श चित्र आपल्या मनाशीं रंगवलंत, प्रत्यक्ष साधनाश्रमांत आल्यानंतर त्या तुमच्या चित्राशीं साधनाश्रमाचं साम्य तुम्हांला दिसलं नाहीं. तुम्हीच आतां म्हणालांत, कीं हेमबाबू तुम्हाला पहिल्यानं भेटले, त्यावेळीं तुम्ही त्यांची येशू खिस्ताशीं तुलना केलीत. अप्रत्यक्ष रीतीनं हेमबाबूंना हा अन्याय झाला नाहीं का ? आपल्या उराशीं आपण कुठलं तरी ध्येय बाळगलं--आणि ते बाळगणं हें चांगलं—तरीसुद्धां तें व्यवहारांत तंतोतंत उतरेल अशी अपेक्षा करणं व्यर्थ आहे. हेमचंद्र सरकारना मी चांगला ओळखतों. त्यानीं ब्राह्मधर्मासाठीं किती तरी स्वार्थत्याग केला आहे. त्याना पैशाची हाव नाहीं. त्यांना दुसरी कुठली ऐहिक महत्त्वाकांक्षा नाहीं. तुम्हीं त्याच्या निकट सहवासांत आहांत म्हणून तुम्हांला त्यांचे बारीक सारीक दोष दिसतात. मानवप्राणी केव्हांही पूर्णावस्थेला पोचत नाहीं. फार कशाला, आपण तुकाराम किंवा ज्ञानेश्वराचे समकालीन असतों तर त्यांच्याही स्वभावातील बारीक सारीक दोष आपल्याला दिसून आले असते आणि आपली निराशा झाली असती. तसं पाहिलं तर मला वाटतं येशू खिस्तामध्येही मोठे दोष होते. येशू खिस्त आपल्या शिष्यासह जेवीत असतांना एक भुकेलेली ग्रीक बाई आपल्या मुलासह तिथं गेली आणि तिनं भाकरी मागितली. तेव्हां येशू खिस्तानं काय उद्गार काढले आठवतं ना?' 'मी सांगतों,--' मी एकदम त्यांना थांबवलं आणि म्हटलं कीं, 'आपण ज्या येशूच्या उद्गारांचा उल्लेख करतां ते फक्त सेंट जॉनच्या Gospel मध्यें आहेत. सेंट जॉनचं Gospel माझ्या मतें ऐतिहासिक नाहीं.' सर नारायण फक्त हंसले. नंतर थोड्या वेळानं ते म्हणाले, 'तुमचं म्हणणं कदाचित् खर असेल, कदाचित् खोटं असेल; परंतु येशू खिस्ताचं जें चित्र तुम्ही स्वतः रंगवता तें ऐतिहासिक आहे याला पुरावा काय? तुम्ही भक्तियुक्त अंतःकरणानं आणि श्रद्धेनं येशू खिस्ताची मूर्ति निर्माण केलीत. परंतु खरा येशू खिस्त तसा होता हे खरं कशावरून? येशू देवाचा पुत्र होता हें तुम्ही मानीत नाहीं. त्याचा जन्म इतर माणसाप्रमाणे झाला हें जर खर, तर त्याच्यामध्ये सुद्धां इतर माणसांप्रमाणे स्वभावदोष नसतील असं मानण्याला आपल्याला आधार नाहीं.' यानंतर सर नारायणांचं खरं वक्तृत्व सुरू झालं आणि तेवढ्या वेळात त्यानीं इतके विषय हाताळले कीं मला आतां त्यांची आठवणच नाही. त्यांची विशाल बुद्धिमत्ता आणि गाढ अभ्यास पाहून मी तर थक्क झालो.

त्यांच्या बोलण्याचाही माझ्या मनावर बराच परिणाम झाला. थोड्या वेळानं सर नारायण आंघोळीसाठीं उठले. एका बुककेसमधून एक पुस्तक काढून त्यांनीं तें माझ्या हातांत दिलं. ते म्हणाले, 'तुम्ही आता इथंच जेवून जा. जेवण तयार होईपर्यंत तुम्ही हें पुस्तक वाचीत बसा.' इतकं बोलून ते आत निघून गेले. मी माझ्या हातांतील पुस्तकाकडे पाहिलं. किती सुंदर होती बाधणी त्याची! पण तशाच प्रकारचीं सर्व पुस्तकं लहान लहान काचेच्या कपाटांत व्यवस्थितपणे मांडून ठेवलीं होतीं. मी पुस्तक उघडून पाहिलं. रस्किनचं Sesame and Lilies होतं ते. मी तें पुस्तक चाळूं लागलों. तें मी पूर्वीच वाचलं असल्यामुळें पुन्हां वाचण्याची इच्छा नव्हती आणि जेवणापूर्वीचा वेळ कसा काढावा याची मला चिंता लागून राहिली होती. मी उठलो आणि कांचेच्या कपाटांतील पुस्तकांचं निरीक्षण करूं लागलो. त्या पुस्तकात शेक्सपिअरची नाटकं होतीं; कार्लाईल, इमर्सन, ब्राऊनिग, टेनिसन, वर्डस्वर्थ, कोलरीज इत्यादिकांचे ग्रंथ त्यांत होते. इतक्यांत प्रभाकरपंत बाहेर आले. मी माझ्या जाग्यावर जाऊन बसलो. वडिलांच्या मानानं प्रभाकरपंत बरेच शांत आणि सौम्य दिसले. ते मितभाषणी असावेत असा माझा तर्क आहे. त्यांनीं माझी बरीच विचारपूस केली. आम्ही इकडल्या तिकडल्या गप्पा मारल्यानंतर जेवणाची तयारी झाली नि आम्ही जेवणाच्या खोलीत गेलो. तिथ जेवणासाठी टेबल मांडलेलं नसून रगीत पाट मांडले होते. मध्यभागीं सर नारायण यांचा पाट असून त्याच्या उजव्या बाजूला मी बसलों. डाव्या बाजूला त्यांची सून आणि प्रभाकरपंत समोर बसले. एकदर जेवणाचा थाट हिंदुपद्धतीचाच होता. जेवायला सुरवात करण्यापूर्वी सर नारायणानी मला विचारलं, 'तुम्हाला माशाची आमटी पाहिजे की साधी आमटी पाहिजे?' मी म्हटलं, 'कांहीं चालेल.' 'कांहींविही काहीं नाहीं,' पुनः दरडावण्याचा तोच आवाज, 'तुम्हाला काय पाहिजे तें मागा. लाजण्याचं कांही कारण नाहीं.' सारस्वतांच्या घरची माशाची आमटी खाण्याची संधि मी थोडीच दवडणार! मी माशाचींच आमटी मागविली आणि ती इतकी रुचकर झाली होती कीं मी ती ताकासारखी प्यालो. जेवताना सर नारायणाची बडबड चाललेली होती. त्यांची बडबडसुद्धां इतकी विद्वत्तापूर्ण होती कीं कुणीही त्यांच्या निकट सहवासांत १।२ वर्षे राहिला असता तर तो अगदीं सहज विद्वान होऊन गेला असता असं मला वाटलं. जेवण संपल्यानंतर वामकुक्षी घेण्यास सर नारायण निघून गेले. मी थोडा वेळ प्रभाकरपंतांशी बोलत बसलो आणि साधनाश्रमाकडे परतलों.

एकदोन दिवसानीं साधारण ब्राह्मसमाजामध्यें सर नारायणांचं जाहीर व्याख्यान झालं. व्याख्यानाचा विषय 'आधुनिक धर्म' असा कांहींतरी होता. व्याख्यानाला प्रचंड गर्दी जमली होती. मी तर अगदीं पहिल्या बाकावर मध्य भागीं जाऊन बसलों. बरोबर साडे सहाला सर नारायण मंदिरांत आले. त्यांनीं

डोक्याला जरीचा सफेद रुमाल बांधला होता. तरी इतर पोषाख पाश्चात्य पद्धतीचा होता. त्यांची ती बटरफ्लाय कॉलर, त्यांच्या जाकीटाच्या मध्यभागीं रुळणारा घड्याळाचा छेडा, बदामी रंगाचा रेशमी सूट, अशा थाटांत स्वारी आंत शिरली तेव्हां ते मला अगदीं निराळेच दिसले. त्याच्याबरोबर हेरंबचंद्र मैत्र वगैरे ब्राह्म पुढारी होते. प्रथम लहानशी प्रार्थना झाल्यानंतर सर नारायण बोलायला उठले. आपल्या विषयाला आस्ते आस्ते सुरवात करून नंतर त्यांचं ते अमोघ वक्तृत्व सुरू झालं. सभेंत ते बोलत असतांना इतकी शांतता होती, कीं खालीं टांचणी पडती तर तिचा आवाज झाला असता. मला वाटतं, त्यावेळीं वक्तृत्व ही एक निराळी कला मानली जात असे. श्रोत्यांच्या मनावर परिणाम करणारे शब्द कसे व कुठं वापरायचे, आवाज कुठं उंच करायचा आणि कुठं खालीं आणायचा, भाषणाचा शेवटचा भाग कसा संपवायचा, या व इतर अनेक गोष्टींचा त्या वेळचे वक्ते कसून अभ्यास करीत होते असं मला वाटतं. सर नारायणानीं वक्तृत्वाची कला पूर्ण आत्मसात् केली होती. त्यांना नैसर्गिक अशी सुरेल आणि गंभीर आवाजाची देणगी होती. त्याचप्रमाणें त्याचं इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व असामान्य होतं. आपल्या एका भाषणानं सर नारायणानीं सर्वांना मोहून टाकलं यात आश्चर्य नाहीं.

या नंतर कांहीं दिवसांनीं मला डॉ. अनी बेझंट यांचं जाहीर व्याख्यान ऐकण्याचा प्रसंग आला. व्याख्यानाचा विषय ' होमरूल ' होता. बाईंचं इतकं वय झालं होतं तरी त्यांचा आवाज चांदीच्या नाण्यासारखा खणखणीत होता. डॉ. बेझंटचं वक्तृत्व सर नारायणाच्या वक्तृत्वापेक्षां थोडं वेगळं होतं. त्यांची बोलण्याची sing-song पद्धति होती; आणि बोलतांना वाक्यांच्या ठेक्याप्रमाणं त्यांचं सबंध शरीर हालत असे. प्लॅटफार्म गाजवला, असं म्हणण्याचा जो प्रघात आहे तो बेझंट बाईंच्यावरून पडला असावा. त्या बाईंचं भाषण ऐकण्याचा पुन्हा मला योग आलाच नाही.

एके दिवशीं संध्याकाळीं मी बाहेर फिरायला निघालों. अंगणाच्या दाराजवळच बाबू कृष्णकुमार मित्र, सीतानाथ तत्त्वभूषण आणि एक दोघे एका गृहस्थाजवळ बोलत उभे होते. बाबू कृष्णकुमारांचं तोंड माझ्याकडे होतं. म्हणून मी त्यांना नमस्कार करून पुढं चालायला लागलों. पण बाबूजींनीं मला हांक मारली, मी लगेच मागं परतलों, आणि त्यांच्याजवळ जाऊन त्यांच्या नि पंडितजीच्या पायाला हात लावून उभा राहिलों. ' हे कोण गृहस्थ, माहीत आहेत का ? ' बाबूजींनीं मला विचारलं. मी ' नाहीं ' म्हणून त्या गृहस्थांकडे पाहात राहिलों. साठीच्या जवळ जवळ त्यांचं वय गेलं असावं. त्यांनीं दाढी किंवा मिशा मुळींच ठेवल्या नव्हत्या. त्यामुळं त्यांच्या चेहऱ्यावरील एक दोन सुरकुत्या ठळकपणें दिसत. त्यांचे डोक्यावरील केस पिकले होते आणि त्यांचे

समोरचे दोन दांत प्रमाणाबाहेर मोठे होते. त्यांनीं बंगाली पद्धतीचा लांब सदरा घातला होता. धोतराचा सोगा जमिनीवर जवळ जवळ लोळत होता. अंगावर पांढरं स्वच्छ उपरणं होतं. हातांत एक जाडजूड काठी होती आणि पायांत स्लीपर्स. हें सर्व निरीक्षण करायला मला फार वेळ लागला नाहीं. माझं निरीक्षण संपतं न संपतं तोंच बाबूजी म्हणाले, ‘ काय बिपिन बाबूजींची आणि तुझी ओळख नाहीं ! ’ मी नकारार्थी मान हालवली. कृष्णबाबूंना आश्चर्य वाटलं. ते म्हणाले, ‘ बिपिनचंद्र पाल याचं नांव तूं ऐकलं नाहींस ? ’ ‘ वा, असं कसं होईल ’ मी म्हटलं , ‘ त्यांचं नांव तर सर्व जणांनीं ऐकलं आहे. हिंदुस्थानांत बाल–पाल–लाल या तिघाचीं नावं न ऐकलेला असा माणूसच सांपडणार नाहीं. ’ मी बिपिनबाबूंच्या पायाला हात लावून त्यांना वंदन केलं. बिपिनबाबू माझ्याकडे वळून म्हणाले, ‘ हें बघ, मला आतां बोलायला वेळ नाहीं. पण उद्यां तूं आमच्या घरीं जेवायला ये. त्यावेळीं आपण स्वस्थपणें बोलूं. ’

बिपिनबाबू त्यावेळीं, मला वाटतं, आपल्या वडील मुलाच्या घरीं होते. त्यांची परिस्थिति एकाद्या मध्यम स्थितींतल्या माणसासारखी होती. अगदीं गरिबी नाहीं. पण श्रीमंतीचा दिमाख तिथं नव्हता. बिपिनबाबूंनाही खूप बोलण्याची संवय होती. पण माझ्याशीं बोलतांना त्यांनीं राजकारण आपल्या संभाषणांतून अजिबात गाळलें, माझाही राजकारणाकडे त्यावेळीं मुळीच ओढा नव्हता. बिपिनबाबू १९०० च्या सुमारास ऑक्सफर्डला शिकण्यासाठीं गेले होते. त्यावेळीं त्यांनीं इंग्लंडमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं मद्यपान निषेधावर बरींच व्याख्यानं दिलीं होतीं. स्वदेशीं परत आल्यानंतर ते ब्राह्म प्रचारकाचं काम करूं लागले. लवकरच वंगभंगाच्या चळवळींत ते पडले. आणि त्यावेळेपासून ब्राह्मसमाजाची आणि त्यांची फारकत झाली असं म्हटलं तरी चालेल. कृष्णकुमार मित्राप्रमाणं त्यानींही कारावास भोगला होता आणि एके काळीं बंगालचे अत्यंत आवडते पुढारी म्हणूनही ते गाजले होते. आपल्या अमोघ वक्तृत्वानं त्यांनीं जणु काय सबंध बंगाल भारून टाकला होता. माझी आणि त्यांची ज्या वेळीं भेट झाली, त्या वेळीं ते राजकारणांतून जवळ जवळ निवृत्त झाल्यासारखे दिसले. धर्मा-विषयीं बोलतांना ब्राह्मसमाजाचीं काहीं मतं आपल्याला पटतात, कांही पटत नाहींत असं ते म्हणाले. मला त्याचा ओढा सनातनी हिंदुधर्माकडे अधिक दिसला. विशेषतः ब्राह्मसमाजानं हिंदुसमाजाशीं फटकून अलग राहावं हें तर त्यांना मुळींच आवडत नव्हतं. आणखी बऱ्याच गोष्टी मला त्यानीं सागितल्या. शेवटीं ते म्हणाले, ‘ नवीन धर्माचा प्रचार करणं हें कांही सोपं काम नाहीं. हा प्रचार करणाऱ्याचं शील शुद्ध असल पाहिजे. त्यानं सर्व प्रकारचा स्वार्थत्याग करण्याला तयार झालं पाहिजे ईश्वरावर त्याची अढळ निष्ठा असेल तरच त्याला या गोष्टी करतां येतील. आमच्या जुन्या धर्मांतली ही मुख्य शिकवण आहे, कीं ज्याना धर्मकार्य करायचं आहे त्यांनीं संन्यस्त

वृत्तीनं राहिलं पाहिजे. ब्राह्मसमाजाच्या प्रचारकांची जी कल्पना आहे, ती मुळांतच चूक आहे. बायका मुलं असणाऱ्या माणसाला आपला संसार सांभाळणं आणि धर्म प्रचार करणं या दोन्ही गोष्टी एकदम शक्य होत नाहींत. निदान त्याचा धर्मप्रचार प्रभावी होणार नाहीं. आतां तुझीच गोष्ट घे. उच्च शिक्षणासाठीं तूं विलायतेला जाशील, तिथं गेलास म्हणजे तुझा दृष्टिकोन व्यापक होईल हें खरं, पण तुझं स्वतःच राहणीचं प्रमाण वाढेल, तुझ्या भौतिक गरजा अधिकाधिक वाढूं लागतील, त्या गरजा भागवण्यासाठीं तुला एकादा व्यवसाय करावा लागेल, मग फावल्या वेळांत तूं धर्मप्रचार करणार. असंच ना ?' 'असं मुळीच नाहीं बाबूजी,' मी त्यांना एकदम उत्तर दिलं, 'तुम्ही म्हणता त्याप्रमाणें मलाही ब्राह्मधर्माचा प्रचार करायला हवा आहे. मी विलायतेला मुळींच जाणार नाहीं हे तुम्हाला निक्षून सांगतों. आणि मला जायची कधीं इच्छाच होणार नाहीं. ब्राह्मधर्मात संसार करणं निषिद्ध मानलं नाहीं हें खरं. परतु ब्राह्म प्रचारकांनीं मात्र संन्यस्त वृत्तीने राहावं हें तुमचं मत मला पटत. तुम्हाला वाटतं तशा प्रकारची ऐहिक महत्त्वाकांक्षा मला मुळींच नाहीं. पण,' इतकं बोलून मी थांबलो. 'पण काय ?' बिपिनबाबूंनी विचारलं. पण मला त्याचं उत्तर देतां येईना. मी अगदीं गोंधळून गेलो.

त्या गोंधळलेल्या मनस्थितींत बिपिनबाबूंचा निरोप घेऊन आश्रमांत परत आलों. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं मॉटेग्यू-चेम्सफर्डचा कायदा किंवा अशाच विषयावर बिपिनबाबूंचं कॉलेज स्क्वेअरवर जाहीर व्याख्यान झालं. त्यांचं व्याख्यान ऐकण्यासाठीं अलोट गर्दी जमली होती. त्याचा मर्दानी आवाज ऐकूं येत होता. इंग्लंडमध्यें असतांना त्यानीं किती प्रभावी वक्तृत्व केलं असेल, याची हे व्याख्यान म्हणजे मूर्तिमंत साक्ष होती.

मी आश्रमात आल्यानंतर माझ्या मनांत तुंबळ युद्ध सुरू झालं. संन्यासाची महति गाणारे बिपिनबाबू मॉटेग्यू-चेम्सफर्डसारख्या मामुली विषयावर इतक्या आवेशानं जीव तोडून बोलूं शकतात याचं मला आश्चर्य वाटलं. तो कायदा वाईट असेल, परंतु त्या कायद्याशीं यांना काय करायचं आहे ? चिरंतन व अविनाशी तत्त्वांचा प्रचार करण्याचं जर आपलं खरं कार्य आहे, तर या कार्यापासून ओढून नेणाऱ्या राजकारणाच्या धकाधकींत बिपिनबाबूंनीं कां पडावं ?

पण लवकरच बिपिनबाबूंना मी विसरलों आणि स्वतःविषयीं विचार करूं लागलों. ब्राह्मसमाजाचं प्रचारकार्य जर आपल्याला करायचं आहे तर आपल्याला संन्यस्त वृत्तीनं राहिलं पाहिजे हें नक्की. परतु मग त्या मुलीसंबंधानें जे मला आकर्षण वाटतं, त्याचं काय ! त्या आकर्षणाचा अर्थ तरी काय ? माझ्या डोळ्यापुढं इतकं उदात्त ध्येय असतांना माझं मन सारखं तिच्याकडे ओढलं जावं ही एक विचित्र

घटना नाहीं का ? माझं त्या मुलीवर प्रेम बसलं होतं हें खरं. परंतु त्या प्रेमाचं खरं स्वरूप काय तें माझं मलाच कळलं नाहीं. मला तिची मैत्री हवी होती, कीं सहवास हवा होता, कीं ती स्त्री म्हणून मला पाहिजे होती, याचा मी कांहींच विचार केला नाहीं, कीं तो विचार सुस्पष्ट झाला होता असं म्हणतां येणार नाहीं. स्वतःचं देहभान विसरण्याइतका मी तिच्याकडे आकर्षिला गेलो याची माझी मलाच लाज वाटूं लागली. मी खूप प्रयत्न केला. तासान्तास प्रार्थना किंवा भजन करण्यात घालवले. समाधि लावण्याचा प्रयत्न केला. या माझ्या प्रयत्नांत मला थोडंफार यश आलं, नाहीं असं नाहीं, परंतु या प्रयत्नामुळं जी पारमार्थिक वृत्ति निर्माण होत असे ती फार वेळ टिकत नसे याचं मला वाईट वाटे. पुन्हां त्या मुलीविषयीचे विचार माझ्या डोक्यांत भणभण करूं लागले.

माझी समाधि लावण्याची पद्धत कांहीं आर होती. ती मी सागतो—मनामध्यें कोणत्याही भावना किवा विचार उचंबळूं न देतां तें प्रशांत महासागरासारखं शांत किंवा स्थिर ठेवणं यालाच मी समाधि समजत असें. ही समाधि फार वेळ टिकत नसे हे खरें, परंतु ती उतरल्यानंतर सुद्धां मला एक विलक्षण अनुभव येई. तो अनुभव हाच—त्या मुलीच्या विचाराने माझ्या डोक्यामध्यें जरी खळबळ उडवून दिली, तरी त्या वेळींसुद्धां माझ्या अंतःकरणांत अत्यंत गंभीर स्वरूपाची शांतता वसत असे. म्हणून मी माझ्या मनाशीं कयास बांधला, कीं जर आपल्या अतःकरणाप्रमाणं आपलं डोकं शांत राहिलं, तरच खरी समाधि लावल्याचं श्रेय आपल्याला मिळेल. परतु जो जों या दिशेनं मी प्रयत्न करू लागे, तों तों ते प्रयत्न अधिक निष्फळ होऊं लागत. भलत्याच विचारांची खळबळ डोक्यामध्यें अधिकाधिक थैमान घालूं लागे.

शेवटीं एक दिवस दहा वाजता रात्रीं मी उठलो आणि बाहेरील गच्चीवर आलों. त्या दिवशी पूर्णिमा असल्यामुळं चंद्राचा प्रकाश दिवसासारखा भासूं लागला. मी ती रात्र आहे हें जवळ जवळ विसरलो. आश्रमांत कुणाची कांहीं चाहूल लागत नव्हती. आश्रमातील सर्व दिवे मालवलेले होते. सर्वत्र इतकं निःशब्द वातावरण पसरलं होतं, कीं झाडांची पानंसुद्धा हालत नव्हतीं. थोडा वेळ मी त्या चंद्राच्या पूर्ण झालेल्या वर्तुळाकडे पाहात बसलों. नंतर मी मनांत एक निश्चय केला आणि खोलींत जाऊन कागद-पेन्सिल घेऊन आलो आणि त्या चंद्रप्रकाशांतच मी तिला पत्र लिहायला सुरवात केली. त्या पत्रांत मी काय लिहिलं होतं तें मला आतां आठवत नाहीं. पण त्या पत्रांतील पहिलं वाक्य चांगलं आठवतं. तें वाक्य असं, 'Do not for a moment suppose that I am moon-struck, merely because I am writing by the moonlight —' त्या पत्रांत मी प्रेमाची भाषा मुळींच वापरली नव्हती. माझ्या विचाराच्या खळबळींचं प्रतिबिंब मात्र त्या पत्रांत स्पष्ट पडलं होतं. तें पत्र पुरं केल्यावर

मी तें पाकिटांत घातलं नि पाकिटावर त्या मुलीचा पत्ता लिहून तें पोस्टाच्या पेटींत टाकलं. परत आल्यानंतर मला शांत झोंप लागली.

दोन तीन दिवस झाले, पत्राचं उत्तर आलं नाहीं. मला चिंता वाटूं लागली. तिचा भाऊही कुठं इकडे तिकडे दिसला नाहीं. तो मला मुद्दाम टाळण्याचा प्रयत्न करीत होता कीं काय तें मला समजलं नाहीं. आणखी चार पांच दिवस निघून गेले. मला काय करावं तेच सुचेना. शेवटीं मी एक दुसरं पत्र पाठवण्याचा निश्चय केला. हें पत्र अर्थातच दिवसाच्या प्रकाशांत मी लिहिलं. या पत्रांत काय लिहिलं होतं तें मला आतां आठवत नाहीं. परंतु शेले, कीटस्, कोलरीज् या कवींच्या कल्पनांचा आधार घेऊन मी बरंचसं भरकटलं होतं. या पत्राचं उत्तर मात्र दोन तीन दिवसांनीं आलं, पण तें तिच्याकडून नव्हे, तिच्या भावाकडून. त्या पत्रांत त्यानं खूपखूप लिहिलं होतं. सौम्य शब्दांत त्यानं माझी कानउघाडणी करण्याचा प्रयत्न केला होता. त्याच्या पत्रांतलं एक वाक्य मात्र मला बरंच लागलं. त्यानं लिहिलं होतं, 'You have mastered the passionate side of English Literature, but you have forgetten its chivalrous side'. मला या वाक्याचा मुळींच बोध होईना. कारण माझ्या पत्रांत मी भलतंसलतं असं कांहींच लिहिलं नव्हतं. मला त्याचा राग आला. पण त्याची भीति अधिक वाटली. त्यानं जर हे पत्र ब्राह्म पुढाऱ्यांना दाखवलं, तर विनाकारण त्यांचा माझ्याविषयीं गैरसमज होईल अशी भीति वाटूं लागली. पण भीतिसुद्धां थोड्या वेळानं नष्ट झाली. मला या गृहस्थानं विनाकारण अन्याय केला असं वाटून त्याची चीड आली. त्याला मीं एक लांबलचक पत्र पाठवलं, त्यामध्यें मी त्याच्या पैशाविषयींच्या दृष्टिकोनाबद्दल बरंच कडक लिहिलं होतं. आणि शेवटीं त्यांत मीं असं म्हटलं होतं कीं, 'ज्या जगांत तुझ्यासारखीं माणस वावरतात, त्या जगाशीं कोणतेच ऐहिक संबंध मी ठेवणार नाहीं. भौतिक जीवन हे विषाप्रमाणे आहे. मला भौतिक जीवनाची जी ओढ लागली होती ती तुझ्या पत्रामुळं समूळ नाहींशी झाली. व्यक्तिशः मी संसाराचा त्याग करणार आणि संसाराचा त्याग करूनच जगाची सेवा करण्याचा प्रयत्न करणार. येशू ख्रिस्तानं म्हटल्याप्रमाणें 'God and Mammon' या दोघांची सेवा माणसाला एकाच वेळीं करतां येत नाहीं. या दोघांपैकीं त्यानं एकाचीच निवड केली पाहिजे. तू Mammon ची निवड केलीस. मी God ची निवड केली. शेवटीं तुला सर्व प्रकारचें ऐहिक ऐश्वर्य लाभो एवढीच माझी इच्छा आहे.' हे पत्र मी पोष्टांत टाकलं आणि तडक हेमबाबूंच्या घरीं गेलों.

मी असा अवेळीं आलेला पाहून त्यांना थोडं आश्चर्य वाटलं. ते कांहीं बोलले नाहींत. मीच आपणहून बोलायला सुरवात केली. मीं त्यांना सांगितलं, कीं 'इतःपर कलकत्त्याला राहण्याची माझी इच्छा नाहीं. मला ताबडतोब कलकत्ता सोडून जाण्याची

परवानगी द्या. मला तुमच्या आश्रमांत आतां पळभरसुद्धां राहायचं नाहीं.' हेमबाबू बिछान्यावर पडले होते ते एकदम उठून बसले. ते म्हणाले, 'तुला झालं तरी काय? असं वेड्यासारखं काय करतोस? तुझ्या कांहीं अडचणी असल्या तर मला सांग, मी त्या दूर करण्याचा प्रयत्न करीन. माझ्यापासून तूं कांहींही लपवून ठेवण्याचा प्रयत्न करूं नकोस.' हेमबाबूंचे हे प्रेमळ उद्गार ऐकून मला भडभडून आलं. अश्रू आवरण्याचा मी किती आटोकाट प्रयत्न केला, पण ते डोळ्यांतून बाहेर पडलेच. हेमबाबूंना फार वाईट वाटलं. ते उभे राहिले आणि त्यांनीं मला एकदम पोटाशीं धरलं. नंतर ते बोलायला लागले, 'अरे तूं असं काय करतोस? तुला काय झालंय तें मला सरळ कां नाहीं सांगत? तुझ्याबद्दल मला किती आशा वाटत होती! पण तूं आतां ती निष्फळ करणार असं दिसतं. तुला अलीकडे अलीकडे माझ्याबद्दल आदर वाटत नाहीं हें मला माहीत आहे.' 'खोटं आहे तें बाबू,' मी उसळून म्हणालों, 'तुमचा त्यांत कांहीं अपराध नाहीं. माझीच चूक होती. त्या दिवशीं सर नारायणांनीं माझ्या डोळ्यांत अंजन घातलं नसतं तर तीच चूक मी करीत राहिलो असतों.' 'मग तूं जातोस कां इथून? तुला कांहीं कमी आहे का इथं?' पण मी काहीं त्यांच्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीं. मी त्यांना एवढं मात्र म्हणालों कीं, 'मी इथून कां जातो ते आपल्याला मला सागतां येत नाहीं. पुढं मागं मी पत्रानं कळवीन. पण मी आतां इथं राहाणार नाहीं.' हेमबाबूंच्या मनांत एक शंका आली 'तूं ब्राह्मसमाज सोडून देणार आहेस का?' मी त्यांना ताबडतोब उत्तर दिलं, कीं 'नाहीं बाबूजी, ब्राह्मसमाज मी केव्हांही सोडणार नाहीं. ब्राह्मसमाजाची आमरण सेवा करावी असा मी निश्चय केला आहे. तो मी कधीं मोडणार नाहीं.' हे माझे उद्गार ऐकून त्यांना अंमळ बरं वाटलं. ते म्हणाले, 'अच्छा, तुझी इच्छाच असेल तर तूं जा. मी तुला आडकाठी करणार नाहीं.' असं म्हणून त्यांनी शकुंतलेला हाक मारली आणि तिला पैशाचं पाकीट आणायला सागितलं. तिनं पाकीट आणल्यावर त्यानीं त्यांतले पन्नास रुपये काढले आणि माझ्या हातावर ठेवले. मी त्यांना नको म्हणणार होतो, पण त्यांच्या चेहेऱ्याकडे पाहातांच मी बेत बदलला.

'बरं तूं कुठं जाणार आतां?'

'मी कुठं जाणार हें माझं मलाच माहीत नाहीं. पण कुठंही असलों तरी ब्राह्मसमाजाची सेवा करीत मी राहीन हें मी नक्की सागतो'

यावर ते कांहींच बोलले नाहींत. मी त्यांचा निरोप घेतला आणि आश्रमांत परत आलों.

परत येतांना मी दुकानांतून गेरूचे तुकडे विकत आणले. त्यानंतर सलूनमध्यें जाऊन मी न्हाव्याकडून माझे डोक्यावरचे सर्व केस काढून टाकले आणि लोकाना

दिसूं नये म्हणून मागच्या दरवाजांतून आंत आलों. आणि बराच वेळ स्वस्थ पडून राहिलों. रात्र पडल्यावर मी एक बादलीभर पाणी खोलींत आणलं, त्यांत गेरूचे तुकडे टाकले, दोन सफेद शर्ट आणि लेंगे त्यांत बुडवले, त्यांना चांगला रंग लागला आहे हें पाहून बाहेर काढले आणि चांगले पिळल्यानंतर मी ते गच्चीवर वाळत टाकले. बाकीचं माझं पुस्तकं वगैरे सामान तिथंच होतं. त्यापैकीं कांहींच बरोबर न्यायचं नाहीं हें मी ठरवलं. नेहमींप्रमाणें जेवण केल्यानंतर मी रोजच्यापेक्षां लवकर झोपलों. माझं अंतःकरण अगदीं शांत आणि प्रसन्न होतं. डोक्यातली खळबळ मात्र अजून तशीच चालू होती. माझ्या पद्धतीप्रमाणें मी समाधि लावण्याचा प्रयत्न केला आणि समाधि लावीत असतांनाच मला गाढ झोप लागली.

सकाळीं मी लवकरच उठलो. माझे कपडे चांगले वाळले होते. मी तीं भगवीं वस्त्रं परिधान केलीं आणि दुसरा शर्ट नि लेंगा एका पिशवींत भरून त्याबरोबर फक्त मी माझा ' नवा करार ' घेतला. बाकी सर्व वस्तु मी तिथं आश्रमांतच टाकल्या. सर्व तयारी झाल्यानंतर कुणी उठण्यापूर्वीच आश्रमाच्या मागील दरवाजानं मी बाहेर पडलों आणि हौरा स्टेशनच्या वाटेनं चालूं लागलो. मी हळुहळू पावलं टाकीत चाललो होतों. आपल्या मागचे सर्व पाश अगदीं तुटले, आपण आतां आपल्या नवीन जीवनाला आरंभ करणार, हा विचार मनात येऊन अंतःकरण फुलून निघालं. मी तिला, तिच्या भावाला, सर्व जगाला विसरून गेलो होतो, या विचारांत मी पुढं पुढ चाललो. मी स्वामी आहें असं समजून एका बंगाल्यानं मला रस्त्यांत हटकलं. मला त्याची दाद नव्हती. माझ्या पायाला हात लावून त्यानं अभिवादन केलं आणि माझं नांव विचारल. ' माझं नांव आनंद ' हे शब्द माझ्या तोंडांतून सहज निघून गेले आणि मी पुढं चालूं लागलों.

हौरा स्टेशनवर आल्यानंतर प्रथम कुठं जावं हा प्रश्न माझ्या मनांत आला. वाटलं मुंबईचं तिकीट काढावं, मग बघूं कुठं उतरायच तें. मुंबईची गाडी सुटायला बराच अवधि होता. तेव्हा मी प्रथम चहा घेतला आणि एका बांकावर बसून नवा करार वाचण्यात सर्व वेळ घालवला. मुंबईची गाडी प्लॅटफॉर्मवर आली आणि मी तिसऱ्या वर्गाच्या एका डब्यात जाऊन बसलो. आपल्याला गाडींत कुणी ओळखीचं भेटेल कीं काय याची मला धास्ती होतीच. धास्ती अशासाठीं वाटत होती कीं हा माझा नवा अवतार पाहून त्यानं माझी टरच उडवली असती. सुदैवानं तसं कुणीच भेटलं नाहीं. गाडी सुटली तेव्हा हात जोडून मी साधनाश्रमाला नमस्कार केला.

# ६

दुसऱ्या दिवशीं गाडी मनमाड इथं पोचली. त्यावेळीं साधारण सायंकाळची वेळ असावी असं वाटतं. अहमदनगरला जाणारी गाडी दुसऱ्या प्लॅटफॉर्मवर उभी होती. त्या गाडींत जाऊन मी बसलों. नगरला, मला वाटतं, मी दुसरे दिवशीं सकाळीं पोचलों. स्टेशनवर उतरल्यानंतर मी ताबडतोब प्रार्थनामंदिराकडे निघालों. मंदिराला कुलुप होतं. म्हणून मी सेक्रेटरी कुठं आहे त्याची चौकशी केली. एका मराठी शाळेचे हेडमास्तर मंदिराचे सेक्रेटरी होते. त्यांच्याकडे मला एका गृहस्थानं नेलं. तो गृहस्थ वयानं बराच वृद्ध होता. माझ्याकडे पाहिल्यावर त्यांना बरंच आश्चर्य वाटलं असावं पण त्यानीं ते चेहेऱ्यावर मुळींच दाखवलं नाहीं. मी त्यांना माझी सर्व हकीगत सांगितली. नगरला राहून ब्राह्मधर्माची मी सेवा करणार हे जेव्हां त्याना कळलं तेव्हां ते फारच आनंदून गेले. तिथल्या प्रार्थनासमाजाचा श्रीमंत बागडे या घराण्याशीं फार निकटचा संबंध होता. मास्तर मला त्यांच्याकडे घेऊन गेले. त्यांनीं ताबडतोब माझ्या जेवणाची व्यवस्था करण्याचं कबूल केलं. मी प्रार्थनामंदिरांतच राहाणार असल्यामुळें राहाण्याची निराळी व्यवस्था करण्याचं कारण नव्हतं.

हें सर्व झाल्यानंतर मी माझ्या कार्याची दिशा ठरवली. रविवारीं संध्याकाळीं मी उपासना करणार असं मास्तरांनी अगोदर जाहीर केल्यामुळें मला त्या दिवशीं उपासना करणं भाग पडलं. उपासनेच्या वेळीं प्रार्थनामंदीर चिक्कार भरून गेलं. मंदिरासमोरील पटांगणांतसुद्धां लोकाची बरीच गर्दी जमली होती. ती गर्दी पाहिल्यावर तर माझ्या छातींत धडकी भरली. कारण आतांपर्यंत एवढ्या मोठ्या सभेपुढें व्याख्यान देण्याचा मला कधीं प्रसंगच आला नव्हता. तरीसुद्धा थोडा धीर चेपल्यावर रविबाबूंचं एक बंगाली गीत म्हणून मी उपासनेला सुरवात केली, ' हृदय वेदना वहीया प्रभू एशेछी तव द्वारे ' हेच ते गीत होतं. त्यानंतर मी प्रार्थना केली आणि प्रार्थना संपल्यावर हलक्या आवाजांत माझ्या व्याख्यानाला सुरवात केली. नव्या करारातील The prodigal son या गोष्टीच्या आधारनं मी उपदेश केला. उपदेश करताना ख्रिस्ती धर्मामध्यें देवाला पिता मानतात आणि हिंदुधर्मांत देव ही माता आहे अशी कल्पना आहे.

या दोन्ही कल्पना ब्राह्मसमाजानं आत्मसात् केल्या आहेत असं मी सांगितलं. जमलेल्या लोकांपैकीं बहुतेक ख्रिस्ती होते याची मला जाणीव नव्हती. पण माझी उपासना आटपल्यानंतर तेथील थिऑलॉजिकल कॉलेजमधले एक प्रोफेसर रेव्हरंड बावा या नांवाचे वृद्ध गृहस्थ हजर होते, ते माझ्याकडे आले आणि त्यांनीं माझी तोंड भरून स्तुति केली. ते माझ्याशीं काय बोलले हें मी या ठिकाणीं सांगत बसत नाहीं. परंतु दुसऱ्या दिवशीं ते पुन्हां माझ्याकडे आले आणि मला म्हणाले कीं, 'आमच्या कॉलेजमध्ये रेव्हरंड नारायण वामन टिळक या नांवाचे तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर होते, ते नुकतेच वारल्यामुळें त्यांची जागा खालीं झाली आहे. ती जागा तुम्ही पत्करावी अशी माझी उत्कट इच्छा आहे.' त्यांचे उद्गार ऐकून मला आश्चर्याचा धक्काच बसला. कारण रेव्ह. टिळकांची विद्वत्ता, त्यांचा जाडा व्यासंग आणि त्यांचा विविध अनुभव याविषयीं मी नगरला आल्यानंतर बऱ्याच गोष्टी ऐकल्या होत्या. विचार करून सांगतों असं मी त्यांना सांगितलं.

दुसऱ्या रविवारीं माझ्या व्याख्यानाच्या वेळीं विशेष गर्दी जमली नाहीं. कारण जे ख्रिस्ती लोक माझ्या पहिल्या व्याख्यानाला आले होते, त्यांना त्यांच्या धर्मोपदेशकांनीं 'यांच्या व्याख्यानाला जाऊं नका' असं निक्षून सांगितलं होतं. मला ही हकीगत ऐकून वाईट वाटलं. मी थोडासा निराशही झालों. ख्रिस्ती लोकांत आणि माझ्यात अशा तऱ्हेचे भेदभाव निर्माण होतील, अशी मला मुळींच कल्पना नव्हती. तरीसुद्धा ख्रिस्ताच्या प्रवचनाच्या आधारानं माझीं प्रवचनं तयार करण्याचा क्रम मी तसाच कायम ठेवला याचं प्रार्थनासमाजांतील लोकांना वाईट वाटूं लागलं. त्यांना वाटे, हा संन्यासी हिंदुधर्माचा आधार घेऊन प्रवचन तयार करण्याऐवजीं ख्रिस्ती धर्माचा असा प्रचार का करतो? खरोखर पाहिलं तर ख्रिस्ती धर्माचा मी प्रचार करीत नव्हतो. ख्रिस्ताच्या शिकवणीचाच फक्त प्रचार करीत होतो, पण त्यावेळीं हे कांहीं मला त्यांना समजून सांगतां आलं नाहीं. आमच्यातील गैरसमज मात्र विनाकारण वाढत गेले. माझ्या उपासनेला ख्रिस्ती मंडळी हजर राहाण्याची बंद झाली. हिंदु लोकांपैकीं म्हातारे कोतारे फक्त हजर राहात. या म्हाताऱ्या मंडळींनीं मला बराच त्रास दिला. रोज संध्याकाळीं माझ्याकडे यांचा अड्डा असायचा आणि शिळोप्याच्या गप्पा मारायच्या ऐवजी ते मोक्षाच्या गप्पा मारीत. माझा जीव अगदीं वैतागून जाई, पण मला हे सर्व निमूटपणे सहन करावं लागत असे. प्रत्यक्ष अनुभवानं मला नंतर कळून आलं कीं धर्माच्या बाबतींत रेव्ह. बावा किंवा रेव्ह. रामकृष्णपत मोडक हेच अधिक समंजसपणा दाखवीत. मी त्यांच्याशीं तासन्तास धर्मावर गप्पा मारीत असें, पण त्या म्हाताऱ्यांचीं धर्माविषयींचीं बोलणीं ऐकून मला अगदीं वीट येई. याचा साहजिक परिणाम असा झाला कीं संध्याकाळ झाली कीं मी मोडक किंवा बावा यांच्याकडे असायचा.

## खिस्ती झालों तर ?

रेव्ह. बावांनीं केलेल्या सूचनेचा मी २।३ दिवस विचार केला. त्यांच्या कॉलेज-मध्यें काम करण्याचं मी पत्करलं. कॉलेजमध्यें व्याख्यान द्यायला मी सुरवात केली, त्यावेळी बावांनीं माझ्याबरोबर कसलं तरी खिस्ती धर्मावरील पुस्तक वाचण्याचा उपक्रम सुरू केला. ते मला नेहमीं म्हणत असत कीं, ' तूं येशू खिस्त हा देवाचा पुत्र आहे असं जेव्हां मानायला लागशील, त्याच वेळीं तुला पूर्ण स्वरूपाचा धार्मिक अनुभव प्राप्त होईल. ' इतर धर्मांविषयीं ते विशेष कडव्या रीतीन बोलत नसत, तरी पण खिस्ती धर्म हा सर्व धर्मांत श्रेष्ठ आहे असं त्यांना वाटे. माझं धर्मशिक्षण ब्राह्मधर्मासारख्या बुद्धिप्रधान धर्मसंस्थेच्या तालमींत झालं असल्याकारणानं मला जरी येशू खिस्ताविषयीं आदर वाटत होता, तरी त्याच्या डोक्याभोवतीं खिस्ती धर्मीयांनी जीं वलयं निर्माण केलीं होतीं, ती ऐतिहासिक दृष्ट्या असह्य आहेत असं मला वाटे. तरीसुद्धां माझं मन चलबिचल होऊं लागलं. ब्राह्मसमाजांतील कांहीं कार्यकर्त्यांनीं खिस्ती धर्माचा स्वीकार केला होता, इतकंच नव्हे तर केशवचंद्र सेन आणि प्रतापचंद्र मुजुमदार हे दोघे एके काळीं जवळजवळ खिस्तीच बनले होते. या गोष्टीची जाणीव होताच मला कधीं कधीं वाटे, कीं आपण जर खिस्ती झालों तर काय हरकत आहे ? येशू खिस्त हा ईश्वराचा पुत्र होता किंवा नाहीं या वादांत न पडतां माझ्या धार्मिक जीवनाचं नेतृत्व मी येशू खिस्ताला द्यायला तयार होतो, तर एवढ्याच गोष्टीवरुन तो देवाचा पुत्र आहे हे सिद्ध होत नाही का ? हे विचार माझ्या मनांत दृढ व्हायला आणखी एक कारण झालं. माझ्या उपासनेसाठीं खिस्ती लोक येईनासे झाले आणि हिंदूंपैकीं काही थोडेच वृद्ध गृहस्थ तिथं हजर राहात असत. अशावेळीं माझ्या मनांत पुन्हां एकदा खिस्ताचा विचार आला. खिस्ताचे पहिले शिष्य यहुदी समाजात जवळ जवळ अस्पृश्यासारखे समजले जात होते. मग आपणही हिंदूसमाजातील अस्पृश्याना जवळ कां करूं नये ' हा विचार मनात आल्या-बरोबर तो मी अंमलात आणला. मी अस्पृश्यांच्या वस्तींत नियमानं जाऊं लागलों. त्याच्यात मिसळूं लागलो. त्याच्या भजनी मेळ्यांत आणि कीर्तनांत भाग घेऊं लागलों. याचा परिणाम साहजिकच असा झाला कीं, मला ते आणि त्यांना मी अगदी जवळचे वाटूं लागलो. त्याचं दारिद्य, त्याची निरक्षरता, त्यांची एकंदर मागासलेली वृत्ति याचा विचार माझ्या मनांत आला कीं हिदुधर्म आणि हिंदु लोक, यांच्याविषयीं मला अतिशय चीड येत असे. अशा धर्मांत राहाण्यापेक्षां या अस्पृश्यांना घेऊन आपण खिस्ती धर्मांत कां जाऊं नये ?

एके दिवशीं रात्री मी मनाशीं खूप विचार केला आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी बावांकडे जाऊन खिस्ती धर्म स्वीकारण्याचं मी निश्चित केलं आहे असं त्यांना सांगितलं. ही बातमी ऐकून बावांना फार आनंद झाला आणि ती बातमी तावडतोब गावांत पसरली.

त्या रविवारीं एका धर्मोपदेशकानं आपल्या ख्रिस्ती मंदिरामध्ये मी धर्मांतर करणार असं जाहीर करून टाकलं. ही बातमी ऐकून माझे अस्पृश्य मित्र बरेच साशंक झाले. त्यांचा माझ्याविषयींचा आदर आणि प्रेम पूर्वीइतकंच कायम होतं, परंतु मी ख्रिस्ती कां होणार आहें याचीं कारणं ते कसोशीनं शोधूं लागले. त्यांपैकीं एका मित्रानं माझ्याकडे येऊन आपली शंका व्यक्त केली. तो म्हणाला, ‘तुम्ही ख्रिस्ती होणार त्याबद्दल आम्हांला मुळींच वाईट वाटत नाहीं. कारण तुम्ही ख्रिस्ती कां होणार त्याचं कारण आम्हांला समजलं आहे. तुम्ही एका ख्रिस्ती मुलीशीं लग्न करणार आहांत ही बातमी मी नुकतीच ऐकली आहे. पण कांहीं हरकत नाहीं. तुम्ही खुशाल लग्न करा. तुमच्यावरचा आमचा विश्वास कमी होणार नाहीं.’ त्याचे हे उद्गार ऐकून मी भांबावून गेलों. त्याला मी म्हटलं, ‘काय रे, ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वं पटून एकादा मनुष्य धर्मांतर करीत नाहीं का ?’ तो लगेच म्हणाला, ‘असेल, करीत असतील. पण माझा कांहीं त्याच्यावर विश्वास नाही!’ या एका अशिक्षित माणसानं मला पुन्हां बुचकळ्यांत पाडलं. माझी वृत्ति पुन्हा द्विधा झाली. आणि इकडे मला दीक्षा देण्याची तयारी तर मोठ्या जारीनं चालू होती. मला काय करावं तें सुचेना. नगर सोडून निघून जावं असं मला वाटूं लागलं. मला दीक्षा देण्यासाठीं माझेच एक अमेरिकन मित्र रेव्ह. मोल्टन् हे येणार होते. माझ्या मनस्थितींत होणारा बदल मी त्यांना मुळींच कळवला नाहीं. माझ्या कॉलेजांतील जागेचा मीं राजीनामा दिला आणि तडक मुंबईला निघून आलो.

मी मुंबईला आलों हें पाहून माझ्या वडिलाना खूप आनंद झाला. माझा असा अवतार पाहून त्यांना बरंच आश्चर्य वाटलं असावं. परंतु ते कांहीं बोलले नाहींत. घरीं आल्यानंतर प्रार्थनासमाजाच्या पुढाऱ्याची मी भेट घेतली. या पुढाऱ्यांपैकीं श्री. द्वा. गो. वैद्य, यज्ञेश्वर भांडारकर प्रभृति मंडळींशीं, जरी ते वयानं माझ्यापेक्षां मोठे होते तरी, दाट स्नेह जमला. त्याना अगोदरच हेमबाबूंनीं माझ्याविषयीं पत्र लिहिलेलं असावं. भाऊसाहेब वैद्य तर मला आपल्या मुलाप्रमाणें वागवूं लागले. आम्हीं रोज सकाळीं नऊ वाजतां प्रार्थनासमाजाच्या कचेरींत गप्पा छाटण्यासाठीं जमत असूं. अशा एका बैठकींतच आम्ही बोलत असतांना नगर समाजाच्या सेक्रेटरीचं भाऊ-साहेबांना पत्र आलं. त्यांत त्यानं लिहिलं होतं कीं, मी धर्मांतर करण्यासाठीं मुंबईला निघून आलों आहें. भाऊसाहेबांनीं तें पत्र मला दाखवलं आणि याचा अर्थ काय म्हणून मला विचारलं. त्याच्या प्रश्नाचं सरळ उत्तर न देतां त्या गृहस्थाचाच कांहींतरी गैरसमज झालेला दिसतो असं त्यांना मी सांगितलं. असं सांगण्याचं खरं कारण म्हणजे हेंच कीं, मुंबई शहरांतलं वातावरणच असं होतं कीं असल्या गोष्टीविषयीं आम्हीं उघड चर्चा करूं शकलों नसतों. त्यानंतर बरोबर दहा किंवा पंधरा दिवसांनीं समाजाचे त्या वेळचे सेक्रेटरी श्री. गिरजाशंकर त्रिवेदी यांनीं मला, येत्या रविवारीं तुम्ही उपासना चालवतां

का, असं विचारलं. उपासना चालवणं हा शब्दप्रयोग मला कसासाच वाटतो. इंग्रजीमध्यें Conducting divine service म्हणतात त्याचंच हें भाषांतर असावं असा मी कयास बांधला. मी त्रिवेदींना होय म्हणून सांगितलं. मुंबईत उपासना करण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता, तरीही मी उपासना करतांना मुळींच डगमगलो नाहीं. माझी उपासना संपल्यानंतर भाऊसाहेबांनीं येऊन माझी पाठ थोपटली, आणि मला म्हटलं कीं 'तूं तुझं व्याख्यान लिहून काढ. मी तें सुबोधपत्रिकेंत छापीन.' आणि खरोखरच दुसऱ्या आठवड्याच्या सुबोधपत्रिकेच्या अंकांत अग्रलेखाऐवजीं त्यांनीं माझं व्याख्यानच संबंध छापून टाकलं. मला खरोखरच याचं नवल वाटायला नको होतं. माझं इतकं लहान वय असतानासुद्धा त्यांनीं मला समाजाच्या व्यासपीठावरून उपासना करण्याची विनंती केली, इतकंच नव्हे तर सुबोधपत्रिकेत माझं व्याख्यानही छापून काढलं या गोष्टीचा तात्पुरता का होईना पण मला फार मोठा अभिमान वाटला. त्याचं कारण अगदीं उघड आहे. आतांपर्यंत प्रार्थनासमाजाच्या व्यासपीठावरून डॉ. भांडारकर, जस्टिस रानडे आणि सर नारायण चंदावरकर या वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध गृहस्थांनीं व्याख्यानं दिलीं होतीं, त्याच व्यासपीठावरून मी ज्ञानवृद्ध नसतांना आणि वयोवृद्ध तर मुळींच नसतांना व्याख्यान देण्याची संधि मिळावी आणि ज्या वर्तमानपत्रांशीं या प्रसिद्ध व्यक्तींचीं नांवं लेखक किंवा संपादक या नात्यानं निगडित झालीं होतीं, त्याच वर्तमानपत्रांत माझं समग्र व्याख्यान छापून यावं, या गोष्टीचा अभिमान न वाटण्या-इतका मी स्थितप्रज्ञ झालों नव्हतों. पुढे लवकरच मी सुबोधपत्रिकेंत मराठींत अग्रलेख लिहूं लागलो. त्यापैकीं कांहीं लेख भाऊसाहेबांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत सामील केले गेले आहेत. परंतु त्यांत माझ्या नांवाचा उल्लेख नाहीं. हे या ठिकाणीं सांगण्याचं कारण इतकंच, कीं भाऊसाहेबांच्या नजरचुकीनं ही गोष्ट घडली आहे.

रामकृष्ण आश्रमाचे स्वामी गोविंदानंद यांचा आणि माझा संबंध आकस्मिक रीतीनं याच वेळीं घडून आला. त्यांची आणि माझी प्रथम भेट कशी आणि कुठं घडून आली हें मला आतां आठवत नाहीं. पण माझी अशी कल्पना आहे कीं रामकृष्ण मिशनचे चाहाते आणि उत्साही कार्यकर्ते श्री. मुर्डेश्वर वकील यांनीं मला प्रथम स्वामीजींकडे नेलं असावं. स्वामीजींची आणि माझी प्रथम भेट झाली त्यावेळीं स्वामीजीनी कुठल्या तरी योगावर बोलायला सुरवात केली. स्वामीजींना मी माझी समाधीची साधी कल्पना सांगितली. ती त्यांना पटली असं कांहीं दिसलं नाहीं. स्वामीजी संन्यासाला का प्रवृत्त झाले हे मी त्यांना विचारलं नाहीं आणि त्यांनीं मला तो प्रश्न विचारला नाहीं. आम्ही दोघे संन्यासी होतों ही एकच गोष्ट आमची मैत्री अधिकाधिक दृढ करण्यास पुरेशी होती. आम्ही एकमेकांशीं बोलतांना वैयक्तिक बाबींचा कधींही उल्लेख केला नाहीं. तरीसुद्धां बोलतां बोलतां ते सहज म्हणाले, कीं 'माझं

पूर्वाश्रमीचं नांव मन्सुखानि असं असून मी संन्यास घेण्यापूर्वी फर्ग्युसन कॉलेजमध्यें इतिहासाचा प्रोफेसर होतों.' आमची मैत्री किती दाट होती हें मी पुढें दिलेल्या कांहीं प्रसंगांवरून सहज समजण्यासारखं आहे.

विवेकानंदाची पुण्यतिथि साजरी करण्याच्या अगोदर दोन तीन दिवस गोविंदानंद मला म्हणाले, 'या पुण्यतिथीच्या निमित्तानं आम्ही एक जाहीर सभा भरवणार आहोंत. त्यावेळीं तूं स्वामीजींच्या जीवनकार्यावर बोलशील का? परंतु तुला मराठींत बोलावं लागेल, कारण मी स्वतः इंग्रजींत बोलणार आहें!' मी त्यांची विनंती मान्य केल्यावर त्यानीं मला पुन्हां विचारलं कीं, 'या सभेसाठीं आपण अध्यक्ष कुणाला करायचं?' मी म्हणालों, 'त्यांत काय कठीण आहे? तुम्ही अध्यक्ष व्हा आणि मी मुख्य वक्ता म्हणून बोलेन. नाहींतर मी अध्यक्ष होतों, तुम्ही मुख्य वक्ते म्हणून बोला!' गोविदानंदांनीं मान हालवली. ते म्हणाले, 'तें नाहीं चालायचं. आपल्या या सभेसाठीं मुंबईंतला कुणी एकादा मोठा माणूस शोधून काढूं!' मी म्हटलं, 'ठीक आहे. काढा शोधून. पण मला त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं!' माझं म्हणणं गोविंदानदजींना विशेषसं आवडलं नाहीं. परंतु त्यांनीं कांहीं न बोलतां बाहेर जाण्याची तयारी केली. मी त्यांचा निरोप घेऊन घरीं येण्यास निघालो. मी या ठिकाणी घराचा उल्लेख करतों आहे खरा, परंतु यावेळीं मी माझ्या वडिलांजवळ राहात नसून प्रार्थनामंदिराशेजारीं असलेल्या राममोहन आश्रमाच्या चौथ्या मजल्यावर राहात होतो.

दुसरे दिवशीं सकाळींच गोविदानंदजी माझ्याकडे आले आणि येऊन खुर्चीवर बसले. पण बराच वेळ ते बोलेनात. मीही कांही बोललों नाहीं. नंतर त्यांनींच आदल्या दिवशींचा विषय काढला. ते म्हणाले, 'मुर्डेश्वर आणि मी सर चुनिलाल मेहतांकडे गेलो होतों. पण त्यांना कामाची गर्दी असल्यामुळें त्यांनीं आपल्या सभेचं अध्यक्षपद नाकारलं. तेव्हां मुर्डेश्वर म्हणाले, कीं तुम्ही सर नारायणना विचारा. ते आपलं आमंत्रण स्वीकारतीलसं वाटतं. पण माझी त्यांची कांहीं ओळख नाहीं. तेव्हां तुम्ही माझ्याबरोबर चला. मी कांहीं न बोलता त्यांच्याबरोबर निघालों. पेडर रोडवरील त्यांच्या बंगल्यात आम्ही गेलो. सुदैवाने ते घरीं होते. आणि त्यानीं आमची भेटही घेतली. मी औपचारिकरीत्या गोविंदानंदजींची ओळख करून दिली. त्यानंतर गोविंदानंदजींनीं त्याना आमच्या सभेचं अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली. त्यानीं लगेच आपली Engagements ची डायरी मागवली आणि आपण त्या तारखेला नि त्यावेळीं रिकामे आहोत किंवा नाहीं हें त्यांनीं पाहून घेतलं. आपण रिकामे आहोत याची खात्री करून घेतल्यानंतर स्वामीजींना त्यांनीं सभेची तारीख व वेळ विचारून घेतली. ती डायरींत टिपून ठेवल्यानंतर डायरी तशीच उघडी ठेवून, 'तुम्ही माझ्याकडे येण्यापूर्वी दुसऱ्या कुणाकडे गेलां होतां कीं काय?' असं त्यांनीं आम्हांला विचारलं. मी तात्काल नाहीं असं

सांगितलं. पण स्वामीजींचा प्रामाणिकपणा त्यांना नडला. ते म्हणाले, ' मी प्रथम सर चुनिलालकडे गेलों होतों.' त्याचं वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच सर नारायणनीं फटदिशीं डायरी मिटली आणि ' मला तुमच्या सभेला हजर राहाता येणार नाहीं ' असं चक्क सांगितलं. हे त्यांचे शब्द ऐकल्याबरोबर स्वामीजी गागरून गेले. मी त्यांना गप्प बसण्यास खुणावलं आणि मी सर नारायणांना म्हटलं, ' स्वामीजी आमच्या शहरांत नवे आहेत. त्यांना इथली कसलीच माहिती नाहीं. वास्तविक पाहिलं तर विवेकानंदांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आपल्यासारख्यालाच बोलावलं पाहिजे. पण त्यांना आपल्या इथली कल्पना नसल्यामुळें भलत्याच माणसाच्या सल्ल्यामुळें ते सर चुनिलालकडे गेले.' हे माझे उद्गार ऐकल्यावर ते म्हणाले, ' तसं कांहीं नाहीं. मी रागावलों नाहीं. मी तुमच्या सभेला अवश्य हजर राहीन.' त्यांची संमति घेतल्यानंतर आम्ही परत घरी आलों. मी जें कांहीं सर नारायणना बोललों त्यांत व्याजस्तुतीचा बराच भाग होता, असं वाचकांना वाटेल. पण तसं काहीं नव्हतं. गोविदानंदजींनीं मला अगोदर सांगितलं असतं, कीं ' मी सर चुनिलालकडे जाणार आहे ' तर मी त्याना स्पष्ट बजावलं असत, या सभेच्या अध्यक्षपदासाटी तुम्हाला जर एकादी प्रसिद्ध व्यक्ति हवी असेल तर तुम्ही प्रथम सर नारायणांकडे जा आणि त्यांनीं नकार दिला तर दुसरा कुणी अध्यक्ष पाहा. परंतु स्वामींनीं तसं काहीं केलं नाहीं आणि विनाकारण हा प्रसंग आपल्यावर ओढवून घेतला. या भेटीच्या वेळीं सर नारायणनीं मला ओळखणं शक्य नव्हतं; परंतु वक्त्यांच्या यादींत जेव्हा त्यानीं माझं नाव वाचलं तेव्हा त्यांना माझी तावडतोब ओळख पटली.

# ७

याच सुमारास मुंबईतील गिरणी कामगारांचा प्रचंड संप घडून आला. इतक्या मोठ्या प्रमाणावर घडून आलेला संप कामगार वर्गाच्या इतिहासांत पहिला होता. या संपाचं पुढारीपण लोकमान्य टिळकांचे अनुयायी बॅ. बॅपटिस्टा यांनीं स्वीकारलं होतं. बॅ. बॅपटिस्टांबरोबर बॅ. व्ही. एम्. पवार हे सुद्धा सहकार्य करीत होते. मुंबईतील सर्व गिरण्या बंद पडलेल्या. कामगार कामावर जात नव्हते. गिरणी मालकांनीं तडजोड करण्याचं नाकारलं. अर्थातच कामगारांची आणि त्यांच्या बायकामुलांची उपासमार होत होती. कारण त्यावेळीं संपफंड काढण्याची कल्पना कुणालाच नव्हती. या संपाविषयीं मी आणि स्वामीजींनीं एके ठिकाणीं बसून बराच विचार केला. शेवटीं आम्हीं ठरवलं कीं उपासमार होत असणाऱ्या कामगारांना आणि त्यांच्या बायकामुलांना मदत करणं हे आमचं आद्य कर्तव्य आहे. या एकाच हेतूनं प्रेरित होऊन आम्ही संपवाल्यांना सामील झालो. संपाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं आम्ही कामगारांची लहानशी सभा दादरला बोलावली. कामगारांचं या बाबतींत काय म्हणणं आहे हें समजून घेण्यासाठीं आम्ही त्यांच्याच एका पुढाऱ्याला बोलायची विनंती केली. तो पुढारी उठला आणि म्हणाला, ‘ बंधूंनो, आपण सर्वजण संपावर गेलों असतांना आमच्याबद्दल प्रेम आणि सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं हे दोन संन्यासी इथं आले आहेत. तेव्हां त्यांच्यावरील आपली भक्ति व्यक्त करण्यासाठीं आपण सर्वांनीं मिळून वर्गणी गोळा करूं या. या दोघांसाठीं एक देऊळ बांधून देऊं या. ’ गोविंदानंदजींना त्याचं भाषण कांहींच समजलं नाहीं. कारण तो मराठींत बोलत होता. परंतु मी त्या महान् वक्त्याला तात्काल थांबवलं आणि उठून बोलायला सुरवात केली. मी त्यांना म्हणालों कीं ‘ बाबांनो, तुमच्याकडून पैसे उकळण्यासाठीं आम्ही इथं आलो नाहीं. आमच्या संन्यासाची जात निराळी आहे. तुमचा लढा कशासाठीं चालला आहे हें सुद्धां आम्हांला माहीत नाहीं. तुम्ही प्रचंड संप कशासाठीं घडवून आणला आहे याची आम्हांला जाणीव नाहीं. आमची एवढीच इच्छा आहे कीं तुम्ही जर हा संप तुमच्या हक्कांसाठीं लढवीत असाल तर ते हक्क तुम्हांला मिळण्यापूर्वी तुमची उपासमार

होऊन तुम्ही मालकांना शरण जाऊं नये. त्यासाठींच तुम्हांला जी कांहीं मदत लागेल—मग ती पैशाची असो किंवा धान्याची असो—ती तुम्हांला मिळवून देण्याचा आमच्याकडून आम्ही होईल तितका प्रयत्न करणार ! ' हें माझं उत्तर ऐकल्याबरोबर सभेमध्यें टाळ्यांचा कडकडाट झाला आणि अवघ्या एका तासाच्या अवधींत आम्ही दोघे मजूर-पुढारी बनलों.

दुसऱ्या दिवशीं आम्ही आपल्या कामाला सुरवात केली. मुंबईतील निरनिराळ्या व्यापाऱ्यांच्या आम्ही गांठीं घेऊं लागलो. प्रथम लक्ष्मीदास तेरसीना भेटलों. आमची सर्व हकीगत त्याना निवेदन केली. त्यांनीं प्रथम बरंच औदासिन्य आणण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांना तें जमलं नाहीं. शेवटीं त्यांनीं आपल्या कॅशिअरला हाक मारून सांगितलं कीं 'यांना एक हजाराचा चेक दे!' तो कॅशिअर आमच्याकडे पाहून भांबावून गेला. त्यानं भीतभीतच विचारलं, 'कुठल्या खात्यांत हे पैसे जमा करूं?' लक्ष्मीदासजी लगेच उसळून म्हणाले कीं 'लिही, मीं हे पैसे एका प्रॉस्टिट्यूटला दिले!' तो कॅशिअर न बोलतां निघून गेला. लक्ष्मीदासजींचा इतका खंबीर पाठिंबा मिळाल्यानंतर बाकीच्या व्यापाऱ्यांची मदत आम्हाला मिळत गेली. कांहीं व्यापाऱ्यांनीं तर तादुळाचीं पोती आमच्या स्वाधीन केली. अर्थात् कामगारांमध्ये आमचा बराच बोलबाला झाला. त्या कामगारांना आमचीं नांवंही माहीत नव्हतीं. आमच्या कामाच्या निमित्तानं बॅपटिस्टा आणि पवार या दोघाच्या घरीं आम्हाला जावं लागे. पवार तर आमच्या कामावर बेहद्द खुश होते. त्यांनीं आम्हाला आमच्या कामांत निरनिराळ्या प्रकारानं मदत केली. या सर्व गोष्टींचा इतकाच परिणाम झाला कीं बॅपटिस्टाही आम्हाला मजुरांचे पुढारी म्हणून ओळखूं लागले. अर्थात् संपाच्या संबंधानं कोणतीही महत्त्वाची सभा असली कीं आम्ही तिथं असायच्रेच. कामगाराचा संप जसजसा वाढत चालला, तसतशी कामगारांची संघटना कायम कशी राहील याचा विचार आम्ही करूं लागलों. बॅपटिस्टा म्हणाले कीं 'आपण कामगारांची ट्रेड युनिअन स्थापन करूं या.' आम्हा तिघांनाही तो विचार पटला. ट्रेड युनिअन स्थापन करण्यासाठीं कामगारांची जाहीर सभा बोलाविण्याचं आम्ही ठरविलं.

ती सभा मी जन्मांतही विसरणार नाहीं. त्या सभेला पन्नास हजार माणसं हजर होतीं. ज्या वाडींत आम्ही ती सभा घेतली होती त्या वाडीचं नांव मला आठवत नाहीं, परंतु त्या वाडींत माणसांची इतकी गर्दी जमली होती, कीं बरीचशीं माणसं घराच्या छपरावर आणि झाडावर बसून राहिलीं होतीं. जोसेफ बॅपटिस्टा अध्यक्षस्थानीं होते. इतक्या मोठ्या सभेंत भाषण करणं खरोखर मुष्कील होतं. बॅपटिस्टा ठेंगू असल्यामुळें व त्यांचा आवाजही पहाडी नसल्यामुळें त्यांनीं मराठींत भाषण करूनही न केल्यासारखं झालं. शेवटीं ते व्यासपीठासमोर आले आणि आपले आंखूड हात उंच करून म्हणाले,

' कामगार बंधूंनो, आज आपल्याला गिरणी कामगार संघ स्थापन करायचा आहे. तुमची जर या संघाला संमति असेल, तर मी ज्या वेळीं नामदेव-तुकाराम म्हणून ओरडेन, त्यावेळीं तुम्हीसुद्धां नामदेव-तुकाराम म्हणून ओरडा'. इतकं बोलल्यावर ते थोडा वेळ स्तब्ध राहिले. नंतर दोन्ही हात उंच करून त्यांनीं ' नामदेव-तुकाराम ' आरोळी ठोकली. ती आरोळी थांबताच सर्व सभेनं ' नामदेव-तुकाराम ' म्हणून प्रत्युत्तरादाखल आरोळी ठोकली. झालं ! सभेचं काम संपलं ! कामगारांची ट्रेड युनिअन स्थापन झाली. सभेचं काम संपल्यानंतर तिथं जमलेल्या वृत्तपत्रकारांचे बातमीदार आमचीं नांवं समजून घेण्यासाठीं पुढं सरसावले. त्यांच्याबरोबरच मुंबईचे त्यावेळचे सी. आय. डी. इन्स्पेक्टर पटवर्धन हेही आमची चौकशी करूं लागले. परंतु आम्ही त्यांच्याकडे विशेष लक्ष दिलं नाहीं.

या संपाबद्दलची सर्व हकीगत लिहून मी ती ' बॉम्बे क्रॉनिकल ' कडे पाठवली. ती ' क्रॉनिकल ' नं समग्र छापलीही. क्रॉनिकलचा तो अंक घेऊन वडील माझ्याकडे आले. ते म्हणाले, ' तुझं पत्र या अंकांत आलं आहे तें वाच ! ' त्यांनीं माझ्या हातांत अंक दिला आणि निघून गेले. मी या संपासंबंधानं जे कांहीं दिवे लावले त्याबद्दल त्यांना वाईट वाटत होतं कीं आनंद होत होता हे समजण्याला कांहीं मार्ग नव्हता.

संप संपल्यानंतर, किंवा खरं सांगायचं म्हटलं तर फिसकटल्यानंतर, थोड्याच दिवसांनी लो. टिळक मुंबईला आले. ते सरदारगृहांत उतरले होते. सहज फिरतां फिरतां एके दिवशीं संध्याकाळी आम्ही लोकमान्याना भेटण्याचं ठरवलं आणि ताबडतोब सरदार-गृहाकडे वळलों. सरदारगृहांत गेल्यानंतर लोकमान्यांची चौकशी करतांच एक माणूस आम्हाला त्यांच्याकडे घेऊन गेला. लोकमान्य एका गादीवर लोडाशीं टेकून बसले होते. त्यांचा पोशाख अगदीं साधा होता. म्हणजे धोतर आणि सुताच्या गुंड्या असलेला मलमलीचा सदरा, गळ्याजवळच्या गुंड्या त्यानीं लावल्या नव्हत्या. त्यांच्या चेहेऱ्यांत गंभीरपणापेक्षां उग्रपणा अधिक दिसत असे. त्यांच्या जाड भुवया आणि जाडजूड मिशा यामुळे त्याचा कुणालाही वचक वाटे. आम्ही आंत गेलों त्यावेळेस त्यांना नमस्कार करून त्यांच्याजवळच गादीवर बसलों. लोकमान्याच्या पलिकडेच एका आरामखुर्चीवर तात्यासाहेब केळकर स्वस्थ पडले होते. त्यांच्यासमोर एका खुर्चीवर अद्यावत पाश्चात्य पोशाख केलेला एक तरुण गृहस्थ बसला होता. त्यावेळीं मला वाटतं मुंबईत सक्तीचं मोफत शिक्षण सुरू करण्याबाबतची चर्चा चालली होती. त्यासंबंधानं लोकमान्यांनीं म्हटल्याचं आठवतं, कीं ' पहिल्या प्रथम सरकारनं मुलांचं सक्तीचं शिक्षण सुरू करावं ; मुलींचं सक्तीचं शिक्षण सुरू करण्याचं कारण नाहीं. ' या बाबतींतच वाद घालण्यासाठीं तो समोर बसलेला तरुण गृहस्थ आला होता. त्यानं लोकमान्यांना विचारलं, ' आपल्या या भूमिकेवरून आपण मुलींच्या शिक्षणाविरुद्ध आहांत असं

वाटतं.' लोकमान्य म्हणाले, 'अहो, तसं नाहीं. मी मुलींच्या शिक्षणाविरुद्ध मुळींच नाहीं. असं पाहा, मुलांपैकीं आज ऐशीं टक्के मुलं शिक्षण घेतच आहेत आणि फक्त वीस टक्के मुलांचा प्रश्न शिल्लक राहिलेला आहे. मुलींपैकीं फक्त वीस टक्के आज शिक्षण घेत आहेत आणि ऐशीं टक्के मुलींचा प्रश्न शिल्लक आहे. तेव्हां आम्ही म्हणतों कीं सरकार प्रथम या वीस टक्के मुलांचं काय करतें तें पाहूं आणि नंतर मुलींचा विचार करूं.'

लोकमान्यांच्या उद्गारावरून मी एवढाच अर्थ घेतला कीं मोफत सक्तीच्या शिक्षणाची योजना सरकार अंमलांत आणील असं त्यांना वाटत नव्हतं—आणि त्याप्रमाणें त्यांनीं बोलून दाखवलं. परंतु त्या गृहस्थाची खात्री पटेना. त्यानं पुन्हा वाद घालण्यास सुरवात केली. तेव्हां लोकमान्यांनीं त्याला मध्येच थाबवलं आणि म्हटलं, 'हें पाहा, हे तात्यासाहेब केळकर आणि हे भिडे. काय म्हणणं आहे तें तुम्ही यांना सांगा. मी या दोन स्वामींशीं बोलतों.' इतकं बोलून ते आमच्याकडे वळले. हे त्यांचे उद्गार ऐकून मला तर फारच आनंद झाला आणि अभिमानही वाटला. आम्ही खरोखर पाहिलं तर त्यांचं नुसतं दर्शन घ्यायला गेलो होतो. भिड्यांसारख्या एका मोठ्या सरकारी हुद्द्यावर असलेल्या माणसाशीं बोलण्याचं बंद करून ते आमच्याशीं बोलतील अशी आम्ही मुळींच अपेक्षा केली नव्हती लोकमान्याची बोलण्याची तऱ्हा काहीं निराळीच होती· त्यांच्या बोलण्यांत साधेपणा आणि मनमोकळेपणा ओतप्रोत भरलेला आम्हाला दिसून आला. त्यांनीं आमची प्रथम चौकशी केली. स्वामी गोविंदानंद हे रामकृष्ण मिशनमध्ये काम करतात आणि मी ब्राह्मसमाजाचं कार्य करतो हे ऐकल्यानंतर त्याना एकप्रकारचं आश्चर्यच वाटलं. आम्ही त्याच्याशीं नुकत्याच झालेल्या संपाविषयीं बोलण्याचा विचार केला, परंतु तो विषयच निघाला नाही. कारण ते धर्माविषयींच बोलूं लागले. रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, त्याचप्रमाणे ब्राह्मसमाजाचे थोर पुढारी, विशेषतः राजा राममोहन रॉय यांच्याविषयीं त्यांना बराच आदर असलेला दिसला. बोलता बोलता सहज मी त्याना हिमालयात गेल्याचं सांगितलं. 'हिमालयात? हिमालयांत कशाला गेला होतां?' 'कशाला गेलो होतो तें नक्की सांगता येत नाही. परंतु देवाचा साक्षात्कार होईल अशी माझी कल्पना होती!' 'देवाचा साक्षत्कार?' ते हळूच पुटपुटले 'साक्षात्कार होणं न होणं हे आपल्या देवाच्या कल्पनेवर अवलंबून आहे. प्रत्येकाच्या मनाच्या घडणीप्रमाणे तो देवाविषयींची आपली कल्पना ठरवीत असतो. हा साक्षात्कार होण्यासाटीं लोक निरनिराळ्या मार्गानं जातात. आपल्या धर्मशास्त्रांत तीन मार्ग सांगितले आहेत. त्यामध्यें कर्ममार्ग सर्वांना सहज साधता येण्यासारखा आहे. परंतु कर्ममार्ग म्हणजे काय तें आपण आपल्या परिस्थितीवरून ठरवलं पाहिजे.' अशा रीतीनं ते आमच्याशीं बराच वेळ बोलत बसले होते त्यांनीं धर्माविषयीं जी उत्कृष्ट चर्चा केली ती जर कुणी ऐकली असती तर हा गृहस्थ राजकीय क्षेत्रांतील ब्रिटिश सरकारशीं सतत लढत असणारा

कसलेला मुत्सद्दी आहे असं वाटलं नसतं. लोकमान्यांच्या भाषणापेक्षां त्यांच्या व्यक्तित्वाचाच आमच्या दोघांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. दोन दिवसांनीं लोकमान्यांनीं उत्तर हिंदुस्थानावर दौरा काढला. त्यावेळीं स्वामी गोविंदानंद रामकृष्ण मिशनचं काम सोडून त्यांच्याबरोबर निघून गेले आणि मी प्रार्थनासमाजाचं काम करण्यांत मग्न झालों.

माझं मुख्य काम म्हणजे प्रचार करणं आणि सुबोधपत्रिकेत लेख लिहिणं. याच वेळीं मी सुबोधपत्रिकेच्या इंग्रजी विभागांत लेख लिहिण्यास सुरवात केली. हे माझे पहिले लेख बहुतेक पाश्चात्य तत्त्वज्ञानावर असत. कांहीं महिन्यानीं सुबोधपत्रिकेच्या इंग्रजी विभागाचा मी सपादक झालो. माझा दृष्टिकोन त्यावेळेस खिस्तानुकूल असल्यामुळें आणि प्रार्थनासमाज महाराष्ट्र संत–विशेषतः तुकाराम–यांना अनुकूल असल्यामुळे आमच्यामध्ये लहान सहान खटके उडूं लागले. विशेषत: सार्वत्रिक संपामध्यें मी ज्योजेफ बॅपटिस्टांबरोबर काम केलं म्हणून सर नारायण थोडे नाराजच होते. मला आता आठवतं, कीं हा संप मिटविण्याकरितां जो लवाद नेमण्यांत आला होता, त्यावर सर नारायणाचीच नेमणूक झाली होती. पुढं या लवादानं कोणता निर्णय दिला आणि हा संप कां फिसकटला याविषयी मला आतां कांहीच आठवत नाहीं. पण लोकमान्य टिळक वारले, तेव्हा मात्र आमचे मतभेद विकोपास गेले. ते वारल्यावर यंग थीस्ट युनियनतर्फे आम्ही लोकमान्यासाठीं दुखवट्याची सभा घेण्याचं ठरविलं तेव्हां प्रार्थनासमाजांतील वडील मंडळींचं पित्त खळबळून गेलं. पण या संस्थेचा मी सेक्रेटरी असल्यामुळे आणि बहुतेक तरुण मंडळींनीं मला पाठिंबा दिल्यामुळे आम्ही ती सभा प्रार्थना मदिरामध्येच भरवली. परंतु खरा प्रसंग तर पुढेंच आहे. मी सुबोधपत्रिकेमध्ये Ecce Homo या शीर्षकाखालीं लोकमान्यांवर एक जळजळीत मृत्युलेख लिहिला. मला त्यांच्याविषयीं जे जे काहीं वाटत होतं, ते सर्व त्या लेखांत लिहून टाकलं. मला त्याबद्दल काहीच वाटलं नाहीं. या लेखामुळे आपल्यावर काहीं संकट येणार अशी मला कल्पनाही नव्हती. पण रविवारीं सकाळीं तो अंक बाहेर पडला आणि डॉ. रामकृष्णपंत भांडारकर याचे कनिष्ठ बंधु श्री. वासुदेव भाडारकर यांनीं तो वाचला. वाचल्याबरोबर तो अंक तसाच घेऊन ते तडक सर नारायणाच्या बंगल्यावर गेले. तो लेख सर नारायणनीं वाचला आणि ते भडकले. त्यांनी लगेच अध्यक्ष या नात्यानं तांतडीचं सर्क्युलर काढून त्याच दिवशी संध्याकाळीं समाजाच्या मॅनेजिग कमिटीची सभा बोलावली. मी कमिटीवर यावेळीं प्रथमच निवडून आलो होतों. तेव्हां तें सर्क्युलर माझ्याकडे आलं. मी तें सही करून परत पाठवलं. त्या सर्क्युलरच्या पाठीमागं किती वादळ माजलं आहे याची मला कल्पना नव्हती. मी वेळेवर कमिटीच्या सभेला हजर राहिलो. वक्तशीरपणाबद्दल सर नारायणची ख्याती असल्यामुळे तेही वेळेवर आले. बाकीचे सभासद त्यांच्यापूर्वीच आले होते. सभेच्या

कामाला सुरवात होतांच सर नारायणनीं पहिला प्रश्न विचारला, कीं 'सुबोधपत्रिका हें प्रार्थनासमाजाचं अधिकृत मुखपत्र आहे कीं काय?' कुणालाच उत्तर द्यायचा धीर होईना. परंतु कांहीं वेळानं भाऊसाहेबांनीं त्यांना सांगितलं, की 'हें प्रार्थनासमाजाच मुखपत्र आहे.' नंतर 'या पत्राच्या इंग्रजी विभागाचा संपादक कोण?' म्हणून दुसरा प्रश्न त्यांनीं विचारला. तेव्हां अर्थातच मला 'मी आहें' म्हणून सांगावं लागलं. माझ्याकडे त्यांनीं डोळे वटारून पाहिलं आणि ते मला म्हणाले, 'Do you think that what you have written is true?' मला त्याचा प्रश्न अपमानास्पद वाटला. मी त्याना लगेच उत्तर दिलं, 'Do you think I would have written it if it were not true?' माझं हे उत्तर ऐकून कमिटींतील सभासद तर थंडच झाले. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं सर नारायणांच्या रागाचा पारा एकदम खालीं उतरला. ते माझ्याजवळ आले आणि पितृतुल्य प्रेमानं मला म्हणाले, 'तूं लहान आहेस. तुला कांही कांहीं गोष्टी समजत नाहींत, आणि वृत्तपत्रव्यवसाय म्हणजे काय हें तर तुला मुळींच माहीत नाहीं. तूं भोळ्या भावानं टिळकाच्याविषयीं कांहीं तरी लिहिलंस. पण मी त्याना चांगला ओळखत होतो. तुझ्यासारख्या तरुण मुलाच्या मनावर छाप पाडण्याची कला त्यांनीं चांगल्या रीतीनं साध्य करून घेतली होती!' सर नारायण इतके आपुलकीनं आणि प्रेमानं बोलत होते, कीं मला त्याना पुन्हा उत्तर देण्याचं धाडस झालं नाहीं. पण मनांतल्या मनांत मी आश्चर्यचकित झालों, कीं याच गृहस्थानं 'Times of India' मध्यें आपले पूर्वीचे सर्व मतभेद विसरून लोकमान्यांवर एक अत्यंत उत्कृष्ट लेख लिहिला होता. सर नारायण पुढें म्हणाले, 'तूं माझ्या बंगल्यावर ये. मी तुला लेख डिक्टेट करीन आणि तूं लिहून घेत जा. त्यायोगानं तुझ्या अनुभवात अधिक भर पडेल!' मी कांहीं त्यांच्या बंगल्यावर जाणार नव्हतों आणि त्यांचे लेखही उतरून घेणार नव्हतों. तरीसुद्धां औपचारिकरीत्या मी त्यांचे आभार मानले आणि माझ्यावरचं संकट टळलं.

आणखी एका प्रसंगीं सर नारायणांची कशी गंमत झाली ती सांगतो. एके रविवारीं सकाळीं नऊ किंवा दहा वाजता स्टुडंट ब्रदरहुडतर्फे कार्लाइलवर त्यांचं व्याख्यान होतं. व्याख्यान प्रार्थनामंदिरांतच होतं. त्यांचं व्याख्यान चालू असतानाच मी मंदिरात जाऊन अगदी शेवटच्या बाकावर बसलो. बोलता बोलतां सर नारायण तरुण पिढीविषयीं बोलू लागले. ते म्हणाले, 'हल्लीची तरुण पिढी बौद्धिक दृष्ट्या अतिशय बेशिस्त आहे. हल्लींच्या मुलांना सिनेमा, नाटकं, चहा पिणं, सिगारेट पिण याखेरीज दुसर कांहीं सुचत नाहीं. कोणत्याही एका विषयाचा अभ्यास ते मन लावून करणार नाहींत. कॉलेजमधला विद्यार्थीसुद्धा आपल्या अध्यापकाच्या व्याख्यानाकडे मुळींच लक्ष देत नाहीं. परीक्षेचे दिवस येईपर्यंत वेळ चैनींत किंवा आळसांत काढायचा आणि परीक्षेची वेळ जवळ आली कीं कुणाच्या तरी नोटस् घ्यावयाच्या

व रात्रीचा दिवस करून त्या नोटस् पाठ करून कसबसं पास व्हायचं.' या सर्व प्रकाराबद्दल ते जहालवादाला दोष देत. तरुण पिढीच्या निमित्तानं त्यांनीं जहालवाद्यांना अकारण शिव्या दिल्या. एवढच करून ते थांबले नाहींत. ते पुढं म्हणाले, 'आज मी कार्लाइलवर व्याख्यान देत आहे. माझी खात्री आहे कीं, कार्लाइलचं सर्वांत महत्त्वाचं पुस्तक 'Sartor Resartus' हें आज जमलेल्या मंडळीपैकीं कुणीही वाचलं नसेल.' असं म्हणून ते म्हणाले, 'मला आज तुमची परीक्षाच घ्यायची आहे. कार्लाइलचं हें पुस्तक ज्यानं वाचलं असेल, त्यानं हात वर करावा.' मी शेवटच्या बांकावर बसलों होतों. याकरितां त्यांना स्पष्ट दिसावं म्हणून मी उभा राहिलों आणि माझा हात वर केला. सर नारायणना मास्तरकी करण्याची बरीच खोड होती. प्रार्थनासमाजांतील सभासदाना, जाहीर सभेतील श्रोत्यांना, इतकंच नव्हे, तर प्रांतिक कायदेमंडळाचे ते जेव्हां पहिले अध्यक्ष झाले त्यावेळीं त्या मंडळाच्या सभासदांनासुद्धां, ते शाळेतील मुलांप्रमाणें लेखीत. मला ही त्यांची खोड माहीत होती आणि मला वाटलं कीं या पुस्तकाबाबत ते माझी जाहीर परीक्षा घेणार. मी कांहीं डगमगलो नाहीं. मी तसाच उभा राहिलों. माझ्याकडे पाहातांच सर नारायणांच्या वक्तृत्वाचा ओघ एकदम थांबला आणि तरुण नि जहालवाद याविषयीं आणखी एक चकार शब्दही न काढता त्यांनीं पुन्हा कार्लाइलवर बोलायला सुरवात केली.

एकदां सुबोधपत्रिकेमध्ये मी लोणावळ्यावरून मुंबईपर्यंतचं प्रवासवर्णन एका लेखांत केलं होतं. खंडाळ्याच्या घाटाचं वर्णन करतांना मी वर्डस्वर्थच्या कविताचा बराच आधार घेतला होता. ते होते पावसाळ्याचे दिवस. आणि त्या दिवसांमध्ये उंच कड्यावरून खालीं खोल दरीमध्यें जे धबधब्यासारखं पाणी पडत असे, त्याचं वर्णन मी वर्डस्वर्थच्या शब्दांत असं केलं होतं, 'This sounding cataract haunted me like passion.' इतकंच नव्हे तर बहुतेक माझा सर्व लेख वर्डस्वर्थच्या अवतरणानंच भरला होता असं म्हटलं तरी चालेल. तो लेख मीं माझ्या नावानं प्रसिद्ध न करतां 'एक्स. वाय. झेड.' या नांवान प्रसिद्ध केला होता. अर्थात सर नारायणना तो लेख मी लिहिला होता हे माहीत नव्हतं म्हणून एका अज्ञात लेखकानं आपल्या आवडत्या कवीचा असा भरमसाट उपयोग करावा याचं त्यांना वैषम्य वाटलं. सुबोधपत्रिकेचा तो अंक ज्या दिवशीं बाहेर पडला, त्या दिवशी सर नारायणांची प्रार्थनामंदिरात उपासना होती. व्याख्यानामध्ये त्यांनीं या लेखाचा वारंवार उल्लेख केला. पण त्या उल्लेखांत थोडासा उपहास होता असं मला दिसून आलं. त्यांची उपासना संपल्याबरोबर मी त्यांना सांगितलं कीं, 'तो लेख मी लिहिला आहे.' आणि त्याना विचारलं कीं, 'वर्डस्वर्थ मला समजला नाही असं आपल्याला म्हणायचं होतं का ?' ते म्हणाले, 'छे, छे ! तसं मुळींच नाहीं. You must not misunderstand me' असं घाईनं म्हणत

ते आपल्या गाडींत जाऊन बसले आणि निघून गेले. भाऊसाहेब वैद्य तिथं जवळच उभे होते. ते म्हणाले, ' काय रे , तूं स्वतःला फार शहाणा समजतोस ? तुझी स्वतः-चीच वृत्ति फार संशयी आहे. सर नारायणांचा तसा मुळींच उद्देश नव्हता. ते सरळ भावानं बोलले, आणि तूं त्याचा भलताच अर्थ केलास. ' भाऊसाहेबांचे उद्गार ऐकून मलाही फार वाईट वाटलं, परंतु मी काहींच बोललों नाहीं. पुढं सर नारायण जेव्हा भेटतील तेव्हां त्यांची क्षमा मागायची अस मी ठरवलं होतं.

परतु ही क्षमा मागायचा प्रसंग कधीं आलाच नाहीं. कारण त्यांची माझी शेवटची भेट झाली प्रार्थनासमाजाच्या मॅनेजिंग कमिटीच्या बैठकींत. त्यावेळीं सर्वां-समोर अशा गोष्टीचा उल्लेख करणं मला शक्य नव्हत. दुसरं असं कीं, त्या बैठकींत आम्ही एका महत्त्वाच्या ठरावावर चर्चा करीत होतो. तो ठराव कुणाच्या नावानं पुढं आणला होता हें मला आतां नक्की आठवत नाहीं. परंतु मला इतकं नक्की आठवतं कीं त्र्यंबकराव दिघास्कर, जयरामनाना वैद्य आणि मी या तिघानीं तो ठराव तयार केला होता. त्यावेळच्या प्रार्थनासमाजाच्या दृष्टीनं ठरावाचं स्वरूप जरा जहाल होतं हें खरं. तो ठराव असा होता, ' प्रार्थनासमाजाचा जो सभासद जाहीर किवा खाजगीरीत्या मूर्तिपूजेमध्ये कोणत्याही कारणास्तव सामील होत असेल, त्याला प्रार्थना समाजाच्या व्यासपीठावर बसण्याचा अधिकार असू नये. ' या ठरावावर कडाक्याची चर्चा झाली. मी कमिटीचा सभासद होतोच. पण मला वाटतं, त्र्यंबकराव आणि जयरामनाना य दोघांनाही या बैठकीस हजर राहाण्यास कमिटीनं परवानगी दिली होती. चर्चा जरी कडाक्याची झाली, तरी एकही सभासद या ठरावाला उघडपणे विरोध करूं शकला नाहीं. शेवटीं सर नारायणनीं विचारलं, ' हा ठराव जर अंमलात आला, तर हा ठराव अंमलांत येण्यापूर्वी ज्या सभासदांनीं मूर्तिपूजा केली असेल त्यानाही तो लागू आहे कीं काय ? ' मी त्यांना तत्काल उत्तर दिलं कीं, ' या ठरावाचा भूतकालाशीं मुळीच संबंध नाहीं. तो फक्त भविष्य काळाला लागू आहे. ' त्र्यंबकराव आणि जयरामनाना या दोघांनीं मान डोलावली. तेव्हां सर नारायण म्हणाले, ' हा ठराव कमिटीने पास करायला मुळीच हरकत नाहीं. ' सर नारायणांनीं हे उद्गार काढल्याबरोबर तो ठराव पास झाला हें सांगायला नकोच.

आमच्या या ठरावाचा परिणाम सातारचे रा. ब. काळे यांना मात्र विनाकारण भोगावा लागला. प्रार्थनासमाजाच्या वार्षिक उत्सवासाठीं ते मुंबईला आले होते. या उत्सवाच्या कार्यक्रमांत रावबहादुरांची उपासना किंवा व्याख्यान ठेवायचें किंवा नाहीं याबद्दल प्रार्थनासमाजाचे दुय्यम सेक्रेटरी जनार्दन गं. गद्रे यांच्याशीं माझा बराच वाद झाला. गद्यांना रावबहादुरांविषयीं जितकी आपुलकी वाटत होती तितकीच मलाही वाटत होती. पुढें पुढें तर रावबहादुरांची आणि माझी चांगलीच मैत्री जमली

होती. परंतु आम्हीच ठराव केला तर तो त्यांच्या बाबतींत तरी मोडावयाचा कसा? शेवटीं गद्रे म्हणाले कीं, 'रावबहादुरांचं व्याख्यान आपण चार वाजतां ठेवूं, आणि त्यांच्या व्याख्यानासाठीं व्यासपीठासमोरच टेबल आणि खुर्ची मांडूं. म्हणजे आपो-आपच तंटा मिटेल.' मी या तडजोडीला जरी कबूल झालों तरी आमच्या तरुण मंडळीपैकीं कुणीच त्यांच्या व्याख्यानाला हजर राहिले नाहींत.





कित्येक दिवसांपासून सर्व-धर्म-पंथीयांना एका व्यासपीठावर आणावं, ही कल्पना माझ्या मनांत बरेच दिवस घोळत होती. सर्व धर्मांचीं मूलभूत तत्त्वं एक आहेत अशी जर सर्व धर्मीयांची खात्री झाली, तर धर्मांच्या किंवा जातींच्या नांवानं विनाकारण जो कलह माजतो, तो माजणार नाहीं अशी मला आशा वाटत होती. ह्या कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याचा योग लवकरच जुळून आला. स्कूल ऑफ रिलिजन्स या नांवाची मीं एक नवीन संस्था स्थापन केली. या संस्थेचे के. नटराजन् अध्यक्ष होते व बॅ. मुकुंदराव जयकर, जस्टिस मिर्झा, प्रो. पी. ए. वाडिया आणि श्री. के. नरीमन हे उपाध्यक्ष होते. या संस्थेच्या कार्यकरी मंडळावर निरनिराळ्या धर्मांचे प्रतिनिधी घेण्यांत आले होते. या संस्थेच्यातर्फे ज्या विद्वानांनीं व्याख्यानं दिलीं त्यामध्यें बॅ. ए. ए. फैजी आणि मिस रिबेका रुबेन यांचा प्रामुख्यानं उल्लेख केला पाहिजे. या संस्थेतर्फे मीं मुंबईच्या निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास करण्यासाठीं अभ्यास-मंडळं स्थापन केलीं होतीं. या संस्थेच्या जाहीर सभांना लोकांची इतकी विलक्षण गर्दी होत असे कीं, माझी कल्पना बरीच यशस्वी होणार अशी मला आशा वाटूं लागली. वर्तमानपत्रांतूनही आम्हाला बरीच प्रसिद्धि मिळाली. या प्रसिद्धीचा परिणाम असा झाला कीं, ए. पॉल नांवाच्या वाय. एम्. सी. ए. मध्यें काम करणाऱ्या गृहस्थानं याच धोरणाला अनुसरून मद्रासला इंटर नॅशनल फेलोशिप या नांवाची संस्था स्थापन केली. हा गृहस्थ कांहीं महिन्यांनीं मुंबईला याच संस्थेची शाखा स्थापन करण्यासाठीं आला. त्याला घेऊन मिस् नेसबिट् ( आतां मिसेस मॅक्लीन ) माझ्याकडे आल्या. मि. पॉल यांचा इथं येण्यांत काय उद्देश आहे हें समजावून घेतल्यानंतर मी मिस्. नेसबिट्ना म्हणालों, ‘ मुंबईमध्यें स्कूल ऑफ रिलिजन्स या नांवाची संस्था असतांना अशी संस्था पुन्हां इथंच निघावी हें मला प्रशस्त वाटत नाहीं. ’ तेव्हां मि. पॉल म्हणाले कीं, ‘ आमच्या संस्थेचे उद्देश आणि कार्य व्यापक स्वरूपाचं असल्यामुळें या दोन्ही संस्थांत विरोध येईल असं मला वाटत नाहीं. ’ मी म्हणालो, ‘ ठीक आहे, तुमचा

आग्रहच असेल तर तुम्ही ही संस्था इथं स्थापा. माझी कांहीं त्याला ना नाहीं.' तेव्हां मिस् नेसबिट्ट् लगेच म्हणाल्या, 'तसं चालायचं नाहीं. तुम्हांला या संस्थेंत सामील व्हावं लागेल आणि आम्हांला मदत करावी लागेल. एक दोन दिवसांतच आम्ही प्राथमिक सभा भरवणार आहोंत. त्या सभेला तुम्ही आलं पाहिजे.' मीं म्हटलं, 'ठीक आहे.'

पुढें एक दोन दिवसांनींच ही प्राथमिक सभा मिस् नेसबिट्ट्च्या घरीं भरली होती. त्या सभेत ही संस्था स्थापन करण्याचं ठरलं आणि कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलं. या कार्यकारी मंडळावर जस्टिस मिर्झा, प्रो. वाडिया, मि. एन्. एम्. जोशी, सेकंडरी ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. हॅम्ले, मिस किचिंग, टाईम्स ऑफ इंडियाचे मि. डेव्हिस आणि मी इतकी मंडळी होतों. कदाचित् आणखी एकदोन सभासद असतील. परंतु त्यांचीं नांवं मला आतां आठवत नाहींत. या कार्यकारी मंडळाच्या पहिल्या बैठकीच्या वेळीं मिस् नेसबिट् यांनीं आम्हांला जेवण दिलं. जेवतांना आमच्या निरनिराळ्या विषयांवर गप्पा चालल्या होत्या. जेवण संपल्यावर आम्ही दिवाणखान्यांत येऊन बसलों. त्यावेळेस दक्षिण आफ्रिकेतील केनिया प्रकरणावर वर्तमानपत्रांत बरीच चर्चा चालली होती. अर्थात् आमच्याही चर्चेचा विषय तोच होता. ही चर्चा सुरू कुणी केली तें आतां आठवत नाहीं; परंतु मि. डेव्हिस काय बोलले तें मात्र मला चांगलं आठवतं. ते म्हणाले, 'केनिया प्रांतांत ब्रिटिश लोकांनीं आपल्यासाठीं चांगली हवेशीर जागा राखून ठेवली, आणि हिंदी लोकांना दलदलीचा प्रदेश दिला, यांत वैषम्य वाटण्यासारखं खरोखरच कांहीं नाहीं. कारण या हिंदी लोकांना सामाजिक जीवन काय तें माहीत नाहीं. नागरिकांचं कर्तव्य कोणतं याची त्यांना जाणीव नाहीं. आणि ब्रिटिश लोकांच्या मानानं त्यांची नीतिमत्ता अत्यंत निकृष्ट ठरते.' मि. डेव्हिसचे हे उद्गार ऐकून मी रागानं लाल झालों. तरीसुद्धां कांहीं न बोलतां मी जस्टिस मिर्झांकडे पाहिलं; नंतर प्रो. वाडियांकडे पाहिलं; आणि एन्. एम्. जोशींकडे पाहिलं. त्यानंतर शेवटीं मी प्रिन्सिपॉल हॅम्ले यांच्याकडे पाहिलं. कारण त्यांचा जन्म ऑस्ट्रेलियामध्यें झाला असल्यामुळें माझी अशी समजूत होती कीं, त्यांचा दृष्टिकोन थोडा निराळा असेल. माझी त्यांची नजरानजर होतांच ते उठले आणि बोलूं लागले. त्यांनीं अशी सुरुवात केली, 'Every Englishman comes to a colony with the ideals of the Empire on his back.' मी त्याना पुढें बोलूंच दिलं नाहीं. मी उठून उभा राहिलों आणि डेव्हिसना म्हणालों, 'मि. डेव्हिस, तुम्ही जें आतां कांहीं बोललांत त्यामध्यें सत्य किती आहे आणि असत्य किती आहे त्याचा मला विचार करायचा नाहीं. तुमचे उद्गार मला लागले, हें मी कबूल करतों. पण मी हिंदी आहें म्हणून ते मला लागले नाहींत हे लक्षांत ठेवा. तुम्ही इंटरनॅशनल फेलोशिपच्या कार्यकारी मंडळाचे सभासद आहांत आणि मीही सभासद आहें. तेव्हां या कार्यकारी सभासदाच्या नात्याने मी तुम्हांला

विचारतों कीं हिंदी लोकांविषयीं तुमचं मत खरोखर जर असं असेल तर तुम्ही या संस्थेंत कां सामील झालांत ? या कार्यकारी मंडळाचं सभासदत्व तुम्ही कां पत्करलंत ? मी या विषयाची अधिक चर्चा करूं इच्छित नाहीं. पण मी तुम्हांला इतकाच इशारा देतों कीं, एक तर तुम्ही हिंदी लोकांविषयींचं जुनाट मत बदला नाहीं तर आपल्या सभासदत्वाचा राजिनामा तरी द्या.' इतकं बोलून मी खालीं बसलों. मी चिडूनच बोललो होतो. अर्थात् माझ्या चिडण्यानं सबंध वातावरण बिघडून गेलं. जो तो घरीं जाण्याची घाई करूं लागला.

दुसऱ्याच दिवशीं मि. डेव्हिस यानीं आपला राजिनामा पाठवला. इंटरनॅशनल फेलोशिपची पहिली सभा प्रि. जॉन् मॅकेन्झी यांच्या घरीं झाली. त्यावेळीं आमचे मुख्य वक्ते ने. ना. श्रीनिवास शास्त्री हे होते. ते नुकतेच इंग्लंडहून परत आले होते. त्यांचा त्यावेळचा इंग्लंडमधील अनुभव विशेष समाधानकारक नव्हता, हे अम्हांला त्यांच्या भाषणांतील प्रत्येक शब्दांत दिसून आलं. त्यांच्या भाषणाचा सारांश इतकाच होता कीं 'इंटरनॅशनल फेलोशिप ही संस्था आमच्या देशांत यशस्वी होणं शक्य नाहीं. याचं कारण अगदीं उघड आहे. जो देश परतंत्र आहे, त्या देशानं स्वतंत्र देशाविषयीं कितीही बंधुभाव दाखवला, तरी स्वतंत्र देशातील लोक, विशेषतः अधिकारावर असलेले लोक, परतंत्र असलेल्या लोकाना तुच्छच लेखणार. पण तुम्ही हा प्रयत्न करतां आहांत तर ठीक आहे. तुम्हाला यश यावं अशी माझी इच्छा आहे. मी स्वतः मात्र या बाबतींत निराशावादी बनलो आहें!' शास्त्रीजीच्या भाषणाचा परिणाम इतकाच झाला कीं या संस्थेचे अर्धेअधिक सभासद गळले.

याच सुमारास महात्मा गांधींवर ॲपेन्डीसायटिससाठीं शस्त्रक्रिया करण्यांत आली होती आणि ते प्रकृति सुधारण्यासाठीं जुहूला येऊन राहिले होते. इंटरनॅशनल फेलोशिपच्यातर्फे महात्माजींकडे एक शिष्टमंडळ पाठविण्याचं ठरलं. या शिष्टमंडळावर मी, मिस नेसबिट आणि २–३ माणसं होतीं. त्यांचीं नांवं मला आतां आठवत नाहींत. आम्ही जुहूला दुपारीं दोनच्या सुमारास जाऊन पोचलों. महात्माजींच्या बंगल्यावर जाऊन पोचतांच एक वृद्ध इंग्रज गृहस्थ हसतमुखानं आमचं स्वागत करायला आला. या गृहस्थाचा पोषाख अगदीं साधा होता. तो धोतर नेसला होता आणि वर शर्ट. माझी अशी कल्पना आहे कीं, त्याचे डोक्यावरील केस आणि दाढी पिंगट रंगाची असून मधून मधून रुपेरी रंगाचे केस चमकत होते. त्याचे डोळे निळे असून त्यांत हिरवट-पणाची झांक मारत होती. त्याचे गाल गाजरासारखे लालबुंद होते. या गृहस्थाचं नांव सी. एफ्. ॲन्ड्र्यूज. त्यांनीं दक्षिण आफ्रिकेत महात्माजींबरोबर काम केलं होतं; आणि त्यांची आजारीपणांत देखभाल पाहायला या बंगल्यांत ते येऊन राहिले होते. मि. ॲन्ड्र्यूजनीं आम्हांला सांगितलं, 'महात्माजी आतांच झोपले आहेत.' ते उठेपर्यंत

त्यांनीं आम्हाला वाट पाहायला सांगितली. परंतु आमचा वेळ कांहीं कंटाळवाणा गेला नाहीं. कारण मि. अँड्र्यूज आमच्याशीं सारखे बोलत होते. त्यांचा मोकळा नि मनमिळावू स्वभाव आम्हांला खूपच आवडला. त्यांनीं आमच्या संस्थेची मोठ्या आस्थेनं चौकशी केली. तिच्यासंबंधीं निरनिराळे प्रश्न विचारले. आपले आतांपर्यंतचे दक्षिण आफ्रिकेंतले आणि हिंदुस्थानांतले सर्व अनुभव सांगितले. केनिया प्रकरणावर त्यांचीं मतं निश्चित स्वरूपाचीं आणि ब्रिटिशविरोधी अशीं होतीं. ते जें कांहीं बोलले तें आतां मला आठवत नाहीं. परंतु सी. एफ. अँड्र्यूजबद्दल निदान माझं मत तरी फार चागलं झालं.

महात्माजी उठल्याबरोबर अँड्र्यूजनीं आम्हांला त्यांच्याकडे नेलं. महात्माजी लोकमान्य टिळकांसारखे गादीवर बसले होते. आम्ही त्यांच्यासमोरच पण जरा दूर अंतरावर खालींच बसलों. महात्माजींचं त्यावेळचं शब्दचित्र काढणं खरोखर कठीण आहे. ते बसले होते तरीसुद्धां साधारणपणें ते उंच असावेत, असा कुणाचाही समज होई. त्यांची देहयष्टि बारीक असली तरी कणखर होती. बसतांना, मला वाटतं, ते एक पाय उलटा मोडून आणि पाठ ताठ करून बसत. त्यांची मान शरीराच्या मानानं जरा लांबच आहे; आणि डोक्याचा आकार लांबट म्हणण्यापेक्षां गोलच म्हणतां येईल, त्यांच्या डोक्याच्या मानानं त्यांचं नाक आणि कान बरेच मोठे दिसतात. त्यांच्या टाळूवर केस नसल्यामुळें आणि बाकीचे केस बारीक कापल्यामुळें त्यांचं डोकं संन्याशासारखं दिसे. त्यांच्या चेहेऱ्यावरून खरोखर त्यांच्या असामान्य गुणांची ओळख पटणं शक्य नाहीं. परंतु त्यांच्या हसऱ्या डोळ्यामध्यें बारीक नजरेनं पाहाणाऱ्याला एक प्रकारचं अलौकिक तेज दिसे हें सुद्धां तितकंच खरं आहे. महात्माजी नुसता एक आंखुड पंचा नेसले होते. त्यांच्या उघड्या अंगावर शालीसारखं कांहींतरी होतं. महात्माजींना आम्ही अभिवादन केल्यानंतर त्यांच्या प्रकृतीची चौकशी केली. नंतर मिस् नेसब्रिट्नं त्यांना आमच्या संस्थेची माहिती करून दिली. पुरवणीदाखल मध्यें मध्यें मी सुद्धां कांहींतरी बोलत होतों. यावर महात्माजी कांहीं बोललेच नाहींत. त्यांनीं इतर विषयावर आमच्याजवळ बोलायला सुरुवात केली. त्यांच्या प्रकृतीवर अधिक ताण पडूं नये म्हणून आम्ही आमचं संभाषण आटोपतं घेतलं. आम्ही उठणार इतक्यांत महात्माजींनीं आपली तीव्र नजर माझ्यावर रोखली आणि ते मला म्हणाले, 'So you want to be an internationalist before you are a nationalist.' इतकं बोलून ते मोठ्यानं हसले. हे उद्गार त्यांनीं मला उद्देशून कां काढले त्याचं कारण उघड होतं. परंतु मला त्यावेळीं तें कांहीं कळलं नाहीं. त्यांची या संस्थेविषयीं सहानुभूति नाहीं हें कळून मला त्यांचा राग आला. मला वाटतं, मी परत आल्यानंतर त्यांच्या संकुचित राष्ट्रवादावर १।२ लेखही खरडले असतील.

## मॅकेन्झी पतिपत्नी

इंटरनॅशनल फेलोशिपची पहिली सभा मि. मॅकेन्झी यांच्या घरीं भरली होती, असं मीं वर म्हटलं आहे. परंतु माझी त्यांची प्रथम भेट कशी झाली ती हकीगत जरा गंमतीची आहे. मी नगरला असतांना तेथील एम्. पी. जी. मिशन हायस्कूलचे प्रिन्सिपॉल रेव्ह. जे. सी. विन्स्लो यांची माझी भेट झाली. विन्स्लो दिसायला फार देखणे दिसत. त्यांना पाहिल्याबरोबर मला हेमबाबूंचीच आठवण झाली. त्यांनीं अंगांत एक पांढरा पायघोळ झगा घातला होता. त्यांच्या दृष्टीमध्यें एक प्रकारचा स्वप्नाळूपणा आढळे. एके दिवशीं ते मला म्हणाले 'मी या शाळेचं काम लवकरच सोडून देणार आहें आणि हिंदी पद्धतीवर एक खिस्त सेवा संघ स्थापन करणार.' ही त्यांची कल्पना त्यांनीं लवकरच मूर्त स्वरूपांत आणली. मला आतां आठवतं कीं, प्रथम त्यांनीं हा संघ जुन्नरला स्थापन केला. नंतर कांहीं दिवसांनीं तो संघ पुण्याला आणला. रेव्ह. विन्स्लो हे प्रिन्सिपॉल मॅकेन्झीचे निकटचे स्नेही होते. ते मुंबईला आले, कीं ते त्याच्याच घरीं उतरत. मॅकेन्झींना विन्स्लोनीं माझ्याविषयीं कांहीतरी सांगितलं असावं. कारण एके दिवशीं त्यांनीं कार्ड पाठवून मला चहाला बोलावलं. ठरलेल्या वेळेवर मी त्यांच्या बंगल्यावर जाऊन पोचलों, चौकशी करतांच तिथल्या नोकरानं मला थोडं उर्मटपणाचं उत्तर दिलं. 'परंतु साहेब अजूनही कॉलेजांतून आले नाहींत' एवढं त्यानं सांगितलं. मी तडक कॉलेजांत गेलों. कॉलेजांत गेल्यावर प्रिन्सिपॉलच्या खोलींत प्रोफेसरांची मीटिंग भरली होतीं. मी खोलीसमोर उभा आहे असं पाहून एक इंग्रज प्रोफेसर स्विंगडोअर उघडून बाहेर आला आणि मला 'काय पाहिजे' म्हणून दरडावून विचारूं लागला. मी त्याला सांगितलं कीं, 'मला मॅकेन्झीना भेटायचं आहे.' तो मला म्हणाला 'मॅकेन्झीसाहेब आतां भेटणार नाहींत, कामांत आहेत.' मीही थोडासा रागावलो. मी त्याला म्हटलं, कीं 'मेहरबानी करून मॅकेन्झीसाहेबांना सांगा कीं, चिटणीस तुम्हांला भेटायला आले आहेत.' तो गृहस्थ परत गेला आणि थोड्या वेळानं मॅकन्झीसाहेबांनीं दरवाज्यांतून डोकं बाहेर काढलं. त्यांच्या एका डोळ्यावर पट्टी बांधलेली होती. ते मला म्हणाले कीं, 'मि. चिटणीसना सांगा कीं, मिसेस मॅकेन्झी त्यांची बंगल्यावर वाट पाहाताहेत. मी थोड्या वेळानं तिथं येतोंच.' मी त्यांना म्हटलं, 'अहो, माझंच नांव चिटणीस,' तेव्हा ते हंसत हंसत बाहेर आले नि त्यांनीं माझ्याशीं हस्तांदोलन केलं. ते म्हणाले, 'मी आतां पांच मिनिटांत येतों. तुम्ही जाऊन बसा.' मी परत त्यांच्या बंगल्यावर गेलों. तेव्हां मिसेस मॅकेन्झी माझी वाट पाहात होत्या. नोकराचा कुठं पत्ताही नव्हता.

मिसेस मॅकेन्झींना माझी ओळख करून दिल्यानंतर आम्ही आंत जाऊन बसलों. त्या म्हणाल्या, 'आपण चहा प्यायला सुरुवात करूं. इतक्यांत मॅकेन्झी येतील. एक अनपेक्षित काम निघाल्यामुळें त्यांना यायला जरा वेळ लागेल.' चहा पितां पितां एकदम मी त्यांच्याशीं बायबलावर बोलायला सुरुवात केली. कारण त्या वेळेस विल्सन कॉलेजांतील

मुलांनीं निमकर–डांगे यांच्या नेतृत्वाखालीं बायबल-विरोधी चळवळ सुरू केली होती. मी मिसेस मॅकेन्झीना म्हटलं कीं, ‘ तुम्ही बायबलचं शिक्षण मुलांना आणि मुलींना सक्तीनं देतां ही चूक आहे. या तुमच्या सक्तीमुळं बायबलविषयीं विनाकारण मुलां-मुलींच्या मनांत द्वेष निर्माण होतो. आतां तुम्ही माझीच गोष्ट घ्या. माझ्यावर कुणी बायबल वाचायची केव्हांही सक्ती केली नव्हती. मी आपणहून तें वाचायला लागलो. आणि मी तुम्हांला प्रांजलपणे सांगतो, मला हा ग्रंथ फार आवडतो. नुसत्या धार्मिक आणि नैतिक तत्त्वाकरतांच नव्हे, तर इतर वाङ्मयीन गुणाकरितांही हा अमोल ग्रंथ प्रत्येक हिंदी माणसाने वाचावा अशी माझी इच्छा आहे. पण तुम्ही तो ग्रंथ सक्तीनं आमच्या मुलां-मुलींवर लादतां त्यामुळे बायबल ही काहींतरी भयंकर चीज आहे असं त्यांना वाटलं तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ’ हे माझं बोलणं ऐकून मिसेस मॅकेन्झींना आश्चर्य वाटलं. त्या म्हणाल्या, ‘ बायबलचा प्रसार करण्यासाठीं तर आम्ही या संस्था काढतो. तसं नसतं तर आम्ही हिंदुस्थानांत तरी कशाला आलों असतों?’ हे मिसेस मॅकेन्झींचे उद्गार ऐकून मी नंतर कांहींच बोललों नाहीं. इतक्यांत मि. मॅकेन्झी आले. आणि उशीर लावल्याबद्दल औपचारिकरीत्या दिलगिरी प्रदर्शित करून चहा घेण्यासाठीं खुर्चीवर बसले. नंतर त्यांनी माझी आणि विन्स्लोंची भेट कशी आणि कुठं झाली याची चौकशी केली. तेव्हां मी त्यांना सांगितलं, ‘ रेव्ह. विन्स्लोंची अशी इच्छा आहे कीं, मीं त्यांच्याबरोबर ख्रिस्तसेवा संघांत काम करावं, परंतु सांप्रदायिक ख्रिस्त धर्मावर माझा मुळीच विश्वास नाहीं. म्हणूनच यांच्या सूचनेचा मला विचारच करता येत नाहीं.’ यानंतर बोलतां बोलतां आम्ही तत्त्वज्ञानाकडे वळलों. त्यावर बरीच चर्चा झाल्यानंतर मॅकेन्झी मला म्हणाले ‘ मला लाइबूनिझ्जचं तत्त्वज्ञान अत्यंत समाधानकारक वाटतं. विशेषतः प्रो. विल्डन कार यांनीं त्या तत्त्वज्ञानाच जें स्पष्टीकरण केलं आहे, त्यावरून मला असं वाटतं कीं, तात्त्विक क्षेत्रांतील कोणताही प्रश्न तत्त्वज्ञानाच्या सहाय्यानं सुटूं शकेल ! ’ यावर मी थोडा वेळ कांही बोललों नाहीं. बोलावं कीं न बोलावं याचा मी विचार करीत होतो. पण शेवटीं मी बोललोंच. मी त्यांना म्हटलं, ‘ हें पहा मि. मॅकेन्झी, लाइबूनिझ्जचा सिद्धांत ( Theory of Monads ) आहे, त्या सिद्धांतानं ज्ञानासंबंधाचे सर्व प्रश्न सुटतील असं वाटतं का ? मला तसं वाटत नाहीं. याचं एकच उदाहरण आपण घेऊं. लाइबनिझ्ज आणि कार यांनीं म्हटल्याप्रमाणें मोनाड म्हणजे एक windowless soul आहे. याचा अर्थ मोनाड म्हणजे सीलबंद केलेली पेटी आहे. या पेटींतून अंतःस्फूर्तीनं सर्व ज्ञान बाहेर पडणार. असं जर आहे तर बाह्य जगाचं ज्ञान किंवा ज्याला आपण external sense म्हणतों, तें आपल्याला कुठून येतं ? ’ माझा प्रश्न एकून मि. मॅकेन्झी बुचकळ्यांत पडले. नंतर ते मला

म्हणाले, 'हा प्रश्न तसाच महत्त्वाचा असल्यामुळें विचार करावा लागेल.' त्यानंतर इकडच्या तिकडच्या गप्पा होऊन मी घरीं परत आलो.

कांहीं दिवसानीं हिंदू आणि ख्रिश्चन एथिक्स नांवाचं पुस्तक मि. मॅकेन्झी यांनीं प्रसिद्ध केलं. इंडियन सोशल रिफॉर्मरचे संपादक मि. के. नटराजन् यांनीं तें पुस्तक माझ्याकडे परीक्षणासाठीं पाठवलं. मी त्या पुस्तकावर विस्तृत परीक्षण लिहून मि. नटराजन्‌कडे पाठवलं. त्या परीक्षणामध्ये मी असं लिहिलं होतं कीं, हिंदूंच्या नीतिशास्त्राविषयीं जरी मि. मॅकेन्झी यांनीं थोड्या फार प्रमाणांत अचूक लिहिलं होतं, तरी मि. मॅकेन्झींची ख्रिस्ती नीतिशास्त्राविषयींची कल्पना चुकीची वाटते. या माझ्या विधानाच्या समर्थनार्थ मी मॅकेन्झींच्या पुस्तकांतील कांहीं उतारे दिले होते. माझं परीक्षण ज्यावेळीं रिफॉर्मरमध्यें प्रसिद्ध झालं त्यावेळीं मि. मॅकेन्झी स्कॉटलंडमध्यें होते. ज्यावेळीं त्यांच्या हातांत हा रिफॉर्मरचा अंक पडला त्यावेळी ताबडतोब त्यांनीं पत्र लिहून मि. नटराजन्‌ना कळवलं कीं, मी माझ्या लेखामध्यें लिहिलेले कांहीं उतारे चुकीचे आहेत. मि. नटराजन्‌नीं तें पत्र रिफॉर्मरमध्ये प्रसिद्ध केल्यानंतर एका आठवड्यानं त्या पत्राला मी दिलेलं उत्तर त्यांनीं छापल. त्या माझ्या उत्तरानं ज्या माझ्या उताऱ्यांना मि. मॅकेन्झींनीं आक्षेप घेतला होता, त्या उताऱ्याशिवाय आणखी बरेच उतारे त्या पुस्तकांतून मी दिले; आणि त्या उताऱ्यावरून मी हे स्पष्टपणे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला कीं, मि. मॅकेन्झी यांची ख्रिस्ती नीतिमीमासा ही अध्यात्मवादावर अवलंबून असल्यामुळे ती खरोखर नीतिमीमासाच ठरत नाही. यावर मि. मॅकेन्झींनीं काहींच उत्तर धाडलं नाहीं.

इंडियन सोशल रिफॉर्मर कॉन्फरन्सचं अधिवेशन त्यावर्षी कोकोनाडा इथं भरणार होतं. ही परिषद भरविण्याची तयारी करण्यास तूं कोकोनाडाला जातोस का? म्हणून मला नटराजन्‌नीं विचारल. मी त्यांना होय म्हणून सांगितलं. त्याप्रमाणं कोकोनाडाला जाऊन मी परिषदेची सर्व तयारी केली. कोकोनाडा इथं असलेले प्रमुख आणि प्रतिष्ठित यांची मी एक प्राथमिक सभा बोलावली. त्या सभेला पितापूर कॉलेजचे त्यावेळचें प्रिन्सिपॉल डॉ. रामकृष्ण राव, त्याच कॉलेजमध्यें शिकवीत असलेले प्रो. पी. रामस्वामी आणि दुसरे कांहीं प्रोफेसर, त्याचप्रमाणें कोकोनाडा येथील प्रमुख वकील हजर राहिले होते. तिथल्या तेलगु सुशिक्षितांची वृत्ति मला अतिशय विनम्र वाटली. मला असा संशय येतो, कीं या लोकाना महाराष्ट्र किंवा इतर प्रांतासंबंधीं एक प्रकारचा न्यूनगंड आहे. वास्तविक रीतीनं त्या सभेला हजर असलेले बरेच लोक माझ्यापेक्षां वयानं, ज्ञानानं किंवा विद्वत्तेनं कितीतरी श्रेष्ठ होते. म्हणूनच मला त्यांचा तो विनम्रभाव पाहून एक प्रकारची लाज वाटली, पण नंतर माझ्या ध्यानांत आलं कीं मी मि. नटराजन्‌चा प्रतिनिधि म्हणून तिथं गेलो होतो. तेव्हां त्यानीं केलेला माझा सन्मान व्यक्तिशः माझा सन्मान नसून तो मि. नटराजन् यांचा सन्मान होता.

या ठिकाणीं मि. नटराजन् यांच्याविषयीं लिहिणं जरूर आहे. हे गृहस्थ मूळचे मद्रासचे, परंतु सर नारायणांच्या सांगण्यावरून ते मुंबईला येऊन स्थानिक झाले होते. त्यांनीं कांहीं लोकांच्या मदतीनं इंडियन सोशल रिफॉर्मर काढला. अगदीं कमी वेतन घेऊन त्यांनी ते पत्र बरीच वर्षं चालवून नांवारूपास आणलं. मि. नटराजन् यांच्याविषयीं प्रार्थनासमाजांतील लोकांना बराच आदर वाटे. त्या आदराला ते सर्वथैव पात्र होते. त्यांची साधी राहणी त्यांच्या निस्पृहपणाला साजेशीच होती. माझी आणि मि. नटराजन् यांची प्रथम ओळख व्हायला कारण माझा उद्दामपणा. त्यांनीं प्रार्थना समाजांत वेदान्तावर व्याख्यान दिलं होतं कीं रिफॉर्मरमध्यें त्यावर लेख लिहिला होता, तें मला आतां नक्की आठवत नाहीं; परतु त्यांच्या वेदान्तावर मी सुबोध पत्रिकेंत सडकून टीका केली. प्रार्थना समाजांतील कांहीं मंडळी खूप घाबरली. भाऊसाहेब वैद्य तर मला स्वच्छ म्हणाले कीं, 'तूं नटराजन्सारख्या माणसावर टीका केलीस, आतां बघ पुढल्या रिफॉर्मरच्या अंकांत तुला ते झोडपून काढतील.' मी त्यांना म्हटलं, 'त्यांत काय! झोडपलं तर झोडपलं. पण त्यानीं जर माझ्या लेखाला उत्तर दिलं, तर प्रत्युत्तर देण्याची माझी तयारी आहे. मी माझ्या लेखांत त्यांच्याविषयीं कोणताही अनादर दाखवलेला नाहीं. फक्त त्यांचे मुद्दे खोडून काढले आहेत.' नटराजन्नीं रिफॉर्मरमध्यें उत्तर दिलं; पण अगदीं थोडक्यांत. मी त्यांच्या कांहीं मुद्यांविषयीं गैरसमज करून घेतला आहे, असं त्यांनीं लिहिलं होतं. हें त्यांचं उत्तर आल्यानंतर मी पुन्हां एक लांबलचक लेख लिहून माझ्या बाजूचं समर्थन अत्यंत सौम्य शब्दांत केलं होतं. आमचा वाद जरी इथंच संपला तरी या वादामुळेंच माझा आणि त्यांचा संबंध अधिक दृढ होऊं लागला. याच श्रेय अर्थात त्यांच्या औदार्याला आहे हें मी सांगायला नकोच. माझा त्यांचा संबंध दृढ होण्याचं आणखी एक मुख्य कारण म्हणजे मधून मधून मी रिफॉर्मरसाठीं निरनिराळ्या विषयांवर लेख लिहीत असें.

याच सुमारास मिस् नेसबिट्च्या बरोबर काम करणाऱ्या ख्रिस्ती शिक्षकिणींसाठीं मी भगवद्गीतेवर व्याख्यान देत होतों. हीं व्याख्यानं मी किती दिलीं हें सांगतां येत नाहीं. या व्याख्यानामुळें माझी आणि मिस् नेसबिट्ची मैत्री अधिकाधिक दृढ होत गेली; आणि मी जेव्हां विलायतेला जायला निघालो, त्यावेळीं त्यानीं मला हरतऱ्हेची मदत कशी केली तें ओघाओघानं येईलच.

# ९



ब्राह्मसमाजाच्या प्रचारकासाठीं ब्रिटिश आणि अमेरिकन युनिटेरियन्स, यांनीं शिष्यवृत्त्या ठेवल्या होत्या, त्याचा उल्लेख पहिल्या भागात आलाच आहे. या शिष्यवृत्त्या कुणाला द्यायच्या हें ठरवणारी कमिटी ब्राह्मसमाजानंच नेमलेली असे. त्यानंतर ही कमिटी बरखास्त झाली; व ब्रिटिश युनिटेरियन असोसिएशननं या शिष्यवृत्तीसाठीं उमेदवार निवडण्याचा अधिकार आपल्याकडे राखून ठेवला. उमेदवारांनीं अर्ज कलकत्त्याच्या डॉ. हेरंबचंद्र मैत्र यांच्याकडे पाठवावयाचे आणि त्यांनीं ते अर्ज इंग्लंडमधील युनिटेरियन असोसिएशनकडे पाठवायचे असं ठरलं होतं.

बऱ्याच मित्रांनीं आग्रह केल्यावरून मी माझा अर्ज हेरंबबाबूंकडे पाठवला. त्या अर्जाबरोबर भाऊसाहेब वैद्य यांनीं माझी शिफारस करणारं पत्रही पाठवून दिलं होतं. हेरंबबाबूंनीं मला पत्र पाठवून माझ्याकडून कांहीं इंग्रजी लेख मागवून घेतले; आणि ते लेख, तो अर्ज आणि भाऊसाहेबांचं पत्र लंडनला पाठवून दिलं. मी विलायतेला जाण्याचा विचार करीत आहें, हें ऐकल्याबरोबर मिस् नेसबिटना फार आनंद झाला. त्यांनीं त्या ज्या कॉलेजांत शिकत होत्या त्या कॉलेजच्या प्रिन्सिपॉलला माझ्या संबंधानं पत्र पाठवलं. दोनतीन महिन्यांनीं मला लंडनमधून पत्र आलं. त्या पत्रांत असोसिएशननं मला शिष्यवृत्ति दिल्याचं नमूद केलं होतं. हें पत्र आल्यानंतर जायला अवधि फार थोडा होता. आणि माझ्याजवळ एक कपर्दिकही नव्हती. कारण या सगळ्या भानगडी करीत असतांना पैशाच्या बाबतींत लक्ष घालण्यास मला वेळच मिळाला नाहीं. आतां विलायतेला जायचं कसं हा माझ्यापुढें एक मोठा प्रश्न उभा राहिला. पासपोर्ट मिळायला मला कांहींच अडचण पडली नाहीं. कारण तें विशेष खर्चाचं काम नव्हतं. मला वाटूं लागलं कीं, जाण्याकरितां जर आपल्याला पैसे उभे करतां आले नाहींत तर ही शिष्यवृत्ति मला मिळून न मिळून सारखीच. शेवटीं मीं ही गोष्ट भाऊसाहेबांकडे काढली. ते म्हणाले, 'तूं कां घाबरतोस ? सगळी व्यवस्था आपोआपच होईल.' भाऊसाहेबांनीं कर्ज काढून मला सहाशें रुपये दिले. प्रार्थनासमाजानं अडीचशें दिले.

वामनराव सोहनी यांनीं १५० रु. दिले. झालं, मला प्रवासापुरते पैसे मिळाले. पैसे मिळाल्यानंतर मी कपडे वगैरे करण्याच्या तयारीला लागलों. माझ्या एका मित्रानं ( उदयराम शिवराम ) एक काश्मिरी सूट बक्षिस दिला. डॉ. माधवराव केळकर यांनींही एक सूट बक्षिस दिला. भाऊसाहेबांनीं आपला गरम ओव्हरकोट माझ्या स्वाधीन केला. आणि मिस् नेसबिट्नं एक जाड ब्लॅंकेट दिलं. अर्थात् मला फारच थोड्या वस्तू विकत घ्याव्या लागल्या. शिवाय एका अनुभवी माणसानं मला सांगितलं कीं या ठिकाणीं कपडे खरेदी करण्यांत अर्थ नाहीं. तुम्हाला जे कपडे लागतील ते तुम्ही इंग्लंडमध्यें खरेदी करा. माझ्या मनांत कांहीं गरम शर्ट खरेदी करण्याचं होतं, परंतु प्रो. मॅक्लीननी मला बाजूला सांगितलं कीं तुम्ही गरम शर्ट करण्याच्या भानगडींत न पडतां नुसते कॉटनचे शर्ट घ्या.

प्रो. मॅक्लीन आणि मिस् नेसबिट् यांचा वाङ्निश्चय कांहीं दिवसांपूर्वीच झाला होता. प्रो. मॅक्लीन त्यावेळीं विल्सन कॉलेजच्या रेसिडेन्सीचे सुपरिंटेंडेंट होते. एके दिवशीं प्रो. मॅक्लीननीं मला जेवायला बोलावलं. पाश्चात्यांची जेवण्याची पद्धत आमच्याहून वेगळी आहे, हे मला त्यावेळेपर्यंत कळलं नव्हतं. मी जेव्हां टेबलाकडे जेवायला बसलो, तेव्हां माझ्यासमोर असलेला तो कांट्याचमच्याचा पसारा पाहून मी मनांतल्या मनांत गांगरलों. कुठला चमचा कुठल्या डिशसाठीं याची मला मुळींच जाणीव नव्हती. म्हणून मि. मॅक्लीनचं मी अनुकरण करण्याचा प्रयत्न केला. तरीसुद्धां जेवतांना मी बारीक सारीक बऱ्याच चुका केल्या. मिस् नेसबिट्च्या त्या लक्षांत आल्या. पण त्या कांहीं बोलल्या नाहींत. परंतु नंतर माझी अशी कल्पना आहे कीं मला टेबल मॅनर्स शिकविण्याविषयीं त्यांनीं आपल्या भावी पतीला सांगितलं असाव. कारण पुन्हां एकदां मि. मॅक्लीननीं मला जेवायला बोलावलं. त्यावेळीं मिस् नेसबिट् हजर नव्हत्या आणि अगदीं पहिल्यापासून कुठला चमचा कोणत्या वेळीं वापरायचा, तोंडाचा आवाज न करतां सूप कसा प्यायचा, त्याचप्रमाणें सूप थोडासा बशींत शिल्लक राहिल्यानंतर बशी कोणत्या बाजूनें उचलायची, तसंच डिश संपल्यानंतर चमचा व कांटा कसा ठेवायचा याचं समग्र शिक्षण त्यानीं मला आडपडदा न ठेवतां दिलं. हें त्यांनीं शिक्षण दिलं, याबद्दल मला त्यांचे अजूनही आभार मानावेसे वाटतात. कारण मी ज्या बोटीनं प्रवास केला, त्या बोटींत एका शीख विद्यार्थ्याला टेबल मॅनर्स मुळींच माहीत नसल्यामुळें आपल्या खोलींत एकटंच जेवावं लागलं.

मी माझ्या तिकिटाची व्यवस्था टॉमस कुक ॲंड कंपनी यांच्याकडे केल्यामुळें मला कुठलाच त्रास होण्याचा संभव नव्हता. मी कोलंबोच्या मार्गानं फ्रेंच बोटीनं जाण्याचं ठरवलं होतं. कोलंबोला जाण्यासाठीं ज्या दिवशीं रात्रीं मी व्हिक्टोरिया स्टेशनवरून मद्रासला जायला निघालों, त्यादिवशीं स्टेशनवर प्रार्थनासमाजांतील

बरीच मंडळी मला निरोप देण्यासाठीं आली होती. मुंबईहून निघाल्यानंतर मी तिसऱ्या दिवशीं सकाळीं मद्रासला येऊन पोचलों. स्टेशनवरून खालीं उतरतांच टॉमस कुकचा मनुष्य मला भेटला आणि माझं सामान घेऊन तो सरळ स्पेन्सर हॉटेलमध्ये निघाला. स्पेन्सर हॉटेल हें मद्रासमध्यें उच्च दर्जाचं हॉटेल होतं याची मला कल्पना नव्हती. त्याचा दररोजचा दर १४-१५ रु. होता. एका दिवसासाठीं इतके पैसे खर्च करण्याची कल्पना मला सहन झाली नाहीं. परंतु कोलंबोला जाण्यासाठीं मी त्याच दिवशीं निघणार असल्यामुळें मला त्याचं विशेष वाटलं नाहीं. मुंबईहून निघाल्यापासून पांचव्या दिवशीं मी कोलंबोला पोचलों. चौकशींअंतीं मला असं कळलं कीं माझी बोट यायला चार दिवसांचा अवधि होता. अर्थात् कोलंबोला मला चार दिवस इकडे तिकडे फिरून काढावे लागले. मी तिथं ग्लोब हॉटेलमध्ये उतरलों होतों. त्या हॉटेलचा व्यवस्थापक सिलोनचा रहिवासी होता. तो पाहुण्यांची व्यवस्था उत्तम रीतीन ठेवीत असे.

पांचव्या दिवशी माझी बोट कोलंबो बंदरांत आली. ती मसाजीटीस मारी ताग कंपनीची असून त्या बोटीचं नांव आन्द्रेलेबॉ असं होतं. कां कुणास ठाऊक पण त्या बोटीला पाहून माझं अंतःकरण भरून आलं; मला तिच्याविषयीं एक प्रकारचा आपलेपणा वाटू लागला. या बोटींत आपल्याला कमींत कमी १८–१९ दिवस काढावे लागणार अर्थात् तिच्या सुरक्षिततेवर माझी सुरक्षितता अवलंबून होती. माझ्या मनांत दुसरा एक विचार आला. या बोटीवरचे सर्व लोक फ्रेंच असणार ; आपल्याला तर फ्रेंच भाषा येत नाहीं ; समजा, मला सडकून भूक लागली आणि त्या लोकांना कांहीं कळलं नाहीं ; तर मग काय करायचं ? आपण चार दिवस कोलंबोंत फुकट घालवले, ते फ्रेंच शिकण्यांत घालवले असते तर ! पण नंतर माझं मलाच हसूं येऊं लागलं. बोटीवर इंग्रजी जाणणारा एकही मनुष्य असूं शकणार नाही ही अशक्यच गोष्ट आहे. कदाचित् त्या फ्रेंच लोकांनासुद्धां इंग्रजी येत असेल. मी सकाळचा ब्रेकफास्ट हॉटेल-मध्यें घेतला आणि लगेच बोटीवर जायला निघालों. हॉटेलचा मॅनेजर मला म्हणाला, ‘ तुम्ही दुपारचं जेवण जेवून जा ; कारण बोट इतक्यांत सुटणार नाहीं !’ परंतु बोटी-वर जाण्याची मला घाई झाली होती म्हणून मी सामान घेऊन निघालो. बोटींत आत शिरल्याबरोबर पासपोर्टाची व्यवस्थित रीतीनं पाहाणी झाली. त्यानंतर एक वृद्ध फ्रेंच गृहस्थ हसत हसत पुढें आला. त्यानं माझ्या हातांतली हँडबॅग काढून घेऊन पुढें चालू लागला. माझं बाकीचं सामान घेऊन माझ्यामागून एक माणूस येत होता. तो वृद्ध गृहस्थ मला केबिनमध्यें घेऊन गेला. त्या केबिनमध्यें दोघाची व्यवस्था होती. पण दुसरा उतारू तिथं मला दिसेना. तो वृद्ध गृहस्थ त्या केबिनकडे बोट दाखवून माझ्याशीं कांहींतरी बोलला. मी काय त्याला उत्तर देणार ? परंतु त्याची एकंदर वृत्ति इतकी विनम्र होती कीं मला त्याची मुळींच भीति वाटली नाहीं. उत्तरादाखल मी

त्याला 'होय' म्हणून जोरानं मान हालवली. तेव्हां तो मोठ्यानं हसला, मी समजलों कीं बरोबर उत्तर दिलं. नंतर २।४ दिवसांनीं मला कळलं कीं माझ्याकडून कांहीं विशेष बक्षिस मिळेल म्हणून त्यानं मला स्वतंत्र केबिन दिली होती. माझं सामान आल्यानंतर मी तें माझ्या खोलींत व्यवस्थित लावून ठेवलं. माझा बिछाना पसरण्यासाठीं होल्डॉल हातांत घेतला. पण पाहातो तों माझा बिछाना अगोदरच तयार करून ठेवला होता. त्यावेळीं मला प्रो. मॅक्लीनचे शब्द आठवले. त्यांनीं मला बजावून सांगितलं होतं कीं होल्डॉल नेण्याची कांहीं जरूर नाहीं. त्यांची भावी पत्नी प्रवास करतांना नेहमीं होल्डॉल घेऊन हिंडते म्हणून त्यांनीं तिची बरीच टिंगल केली होती. मी स्वतःशींच हसलो आणि होल्डॉल खालीं ठेवून दिला.

मी स्वतःशींच थोडा वेळ विचार करीत बसलों. मला एक मोठी भीति वाटत होती ती डायनिंग हॉलमध्यें जाण्याची. स्पेन्सर किंवा ग्लोब हॉलमध्यें असतांना मी माझं जेवण खोलींतच मागवीत असें. परंतु आतां तसं कांहीं जमायचं नाहीं. डायनिंग हॉलमध्यें मला जेवायला जावं लागणारच. हे विचार माझ्या मनांत येत असतांना मी केबिनमध्येंच बसून राहिलों. थोड्या वेळानं धीर चेपल्यावर मी केबीनच्या बाहेर इकडे तिकडे फिरूं लागलों. पाहातों तर माझ्या शेजारच्या दोनतीन केबीनमध्यें चिनी मुली चिक्कार भरलेल्या. जरा पुढें जाऊन बघतो तर दोनतीन मुलं माझ्या बाजूला येतांना आढळलीं. एका मुलाचा तो अवतार पाहून मला हसूंच आलं. त्यानं गंजीफ्रॉक घातला होता. त्या गंजीफ्रॉकवर रात्रीं झोपतांना घालायचा पट्टयाचा पायजमा चढवला होता. त्या पायजम्यावर गरम पायमोजे घातले होते. आणि त्या पायमोज्यांवर गार्टर्स उलटे बांधले होते. त्याचा तो अवतार पाहून मला हसूं आलंच; परंतु बरंही वाटलं. मी मनांत म्हटलं, कांहीं झालं तरी मी या मुलाइतका बावळटपणा करणार नाहीं खास. इतक्यांत लंचची घंटा झाली. आमचा डायनिंग हॉल खालच्या मजल्यावर होता, तेव्हां मॅक्लीन-साहेबांचं नांव घेऊन मी जिना उतरूं लागलों. माझ्या सुदैवानं मला पाहातांच तो वृद्ध गृहस्थ पुढें आला आणि मला घेऊन एका टेबलाजवळ गेला. त्यानं एका खुर्चीकडे बोट दाखवलं त्यावर जाऊन मी बसलो, बसल्याबरोबर मी प्रथम कांटेचमचे किती आहेत तें पाहिलं. मॅक्लीनसाहेबांनीं मला दाखवून दिले होते त्यापेक्षां इथं कमीच होते. नंतर मी आजुबाजूला पाहायला सुरुवात केली, बहुतेक सर्व लोक फ्रेंच आणि चिनी दिसत होते. त्या फ्रेंच लोकांत एकदोन इंग्रज होते, एक स्कॉच होता आणि एक आयरिश होता. पण त्यावेळीं मला हा फरक कळला नाहीं. मी अगदीं हताश झालों. इतक्यात माझ्या टेबलापासून तिसऱ्या टेबलावर एका कोपऱ्यांत एक हिंदी विद्यार्थी मला आढळला. तोही माझ्याकडे एकसारखा टक लावून पाहात होता. इतक्यात मटणाची कसली तरी डिश आली म्हणून आम्ही खायला सुरुवात केली. खाणं

संपल्यावर मी नॅपकीननं तोंड पुसलं आणि वर गेलों. केबिनमध्ये गेल्यानंतर तो हिंदी विद्यार्थी माझ्याकडे आला. त्याचे केस साधारण पिंजारलेले होते. वयाच्या मानानं त्याच्या मिशा जरा मोठ्या दिसल्या. तो वर्णानं काळा असून फारसा उंच नव्हता; तरी अंगानं किरकोळ असल्यामुळें उंचच दिसे. मी माझ्या गादीवर बसलों होतों. तो समोरच्या गादीवर बसला. तो म्हणाला, 'माझं नांव रंगा.' मी म्हटलं, 'माझं नांव चिटणीस.' आम्ही उभे राहून हस्तांदोलन केलं आणि खालीं बसलों. त्यानं मला पहिला प्रश्न केला, 'तुमच्या या केबिनमध्यें पार्टनर कोण आहे?' मी म्हटलं, 'कुणी नाहीं.' तेव्हां तो म्हणाला, 'तुमच्या केबिनमध्यें मी राहायला आलों तर चालेल का?' तेव्हां मी म्हटलं, 'वा! आलां तर फार चांगलं होईल. मी तर इथं एकटाच आहें. शेजारीं या चिनी मुली आहेत. आलांत तर सोबत होईल!' असं थट्टेनं म्हणालों. तो म्हणाला, 'हें पाहा, माझा केबिन ह्या तुमच्या केबिनपेक्षा लहान आहे; आणि तेथें माझ्याखेरीज आणखी तीन चिनी गृहस्थ आहेत.' इतकं बोलून तो तडक निघालाच; आणि आपलं सर्व सामान घेऊन माझ्या केबिनमध्यें आला. रंगा माझ्या केबिनमध्यें आल्यानंतर माझे दिवस मात्र आनंदांत जाऊं लागले. कारण रंगाला बडबडण्याची खूप संवय होती तो आपल्या प्रांतांतील समाजसुधारणेच्या चळवळीविषयीं मला बऱ्याच गोष्टी सांगे. इतकंच नव्हे तर कांहीं सनातनी वृत्तीचे नवरे आपल्या बायकांना कसा त्रास देत, याचं जेव्हां तो रसभरित वर्णन करी, तेव्हां तर माझ्या अंगावर शहारे उठत. त्यानं या समाजसुधारणेबाबत कांहीं लेख लिहिले होते. मी सुबोध पत्रिकेच्या इंग्रजी भागाचं संपादन करीत होतो, हें कळल्याबरोबर त्यानं मला ते लेख दाखविले. आणि मीही संपादकाच्या ऐटीनं त्या लेखासंबंधानं सूचना केल्या व त्याच्या भाषेचीही सुधारणा केली.

रंगाशिवाय माझी आणखी कांहीं दिवस गेल्यावर बऱ्याच लोकांशीं ओळख झाली. त्यांपैकीं तो आयरिश आणि तो स्कॉच हे माझ्या अतिशय दृढ परिचयाचे झाले. विशेषतः त्या आयरिश गृहस्थाला माझ्याविषयीं अतिशय जिव्हाळा वाटे. त्याला कारण होतं. पाणी गरम असल्यामुळें पाण्यामध्यें बर्फ घालण्याची मला जरुरी वाटे. परंतु स्टुअर्टनें म्हणजे त्या वृद्ध फ्रेंच गृहस्थानं मला सांगितलं, कीं 'तुम्ही बिअर घेत असाल तरच तुम्हांला बर्फ मिळेल!' मी म्हटलं, 'ठीक आहे.' आणि त्या आयरिश गृहस्थाला घेऊन मी डायनिंग हॉलमध्ये गेलो. मी माझ्यासाठीं पाणी मागवलं आणि एक बिअरचं ग्लास मागवलं. मी माझ्या पाण्यांत बर्फ टाकला. बिअरचा ग्लास आयरिश गृहस्थाला दिला. तेव्हांपासून त्यानं माझी पाठ सोडली नाहीं. त्या आयरिश आणि स्कॉच गृहस्थाची मैत्री असल्यामुळें माझी आणि त्या स्कॉचचीही चांगली ओळख झाली, परंतु त्याची घरची परिस्थिती चांगली असल्यामुळें मला त्याला बिअरचा ग्लास देण्याची पाळी केव्हांच आली नाहीं.

अठरा किंवा एकोणीस दिवसांनीं आम्हीं मार्सेल्स बंदरांत उतरलो. तिथून आगगाडीनं कॅलेला जाऊन कॅलेहून डोव्हरपर्यंत मला परत बोटीनं प्रवास करायचा होता. तो आयरिश आणि स्कॉच गृहस्थ मार्सेल्स इथं १।२ दिवस थांबणार होते. परंतु मी त्या दिवशीं निघण्याचं ठरवल्यामुळे तेही माझ्याबरोबर निघाले. आमची गाडी रात्रीं निघणार होती. म्हणून आम्ही सर्व दिवसभर शहरांत भटकण्याचं ठरवलं. भटकतां भटकता आम्ही एका तयार कपड्यांच्या दुकानासमोर आलों. तो आयरिश गृहस्थ डोळे मिचकावून मला हसत म्हणाला, 'हें पाहा, तूं ऑक्सफर्डला जाणार आहेस. हा तुझा जुना ओव्हरकोट तिथं चालायचा नाहीं. या शोकेसमध्यें हा ओव्हरकोट आहे तो तूं पाहा. तुला अगदीं बरोबर बसेल.' मी त्याच्या मनांतील भाव ओळखला. गरीब बिचारा शिपाई! पण मी तरी काय करूं? तो ओव्हरकोट इतका उंची दिसत होता कीं, त्याला बरीच जबरदस्त किंमत पडेल या विचारानं मी स्तब्ध बसलो. पण त्याची आणि माझी इतकी सलगी झाली होती कीं त्यानं मला ओढून आंत नेलं. अर्थात् मी दुकानदाला किंमत विचारली. त्यानं सांगितलं, 'तीनशें फ्रँक.' त्याचं तें उत्तर ऐकून मी तर गारच झालों. मी माझ्या स्कॉच मित्राकडे पाहिलं. त्यानं त्याला विचारलं, 'पाउंडस् किती?' दुकानदारानं ताबडतोब उत्तर दिलं, 'दीड पौंड.' हें उत्तर ऐकून माझ्या जिवांत जीव आला. मागाहून माझ्या लक्षांत आलं कीं लढाईपूर्वी एक पौंडाची पंचवीस फ्रँक जरी किंमत होती, तरी फ्रेंच नोटांच्या भरमसाट वाढीमुळें एका पौंडाला दोनशें फ्रँक मिळत. मी तो ओव्हरकोट विकत घेतला. इतकंच नव्हे तर फ्रेंच पद्धतीचा सूटही विकत घेतला. ताबडतोब मी तो नवीन ओव्हरकोट अंगावर चढवला आणि भाऊसाहेबांचा ओव्हरकोट त्या आयरिश माणसाच्या स्वाधीन केला. त्यांचा तो ओव्हरकोट देतांना मला खूप वाईट वाटलं. परंतु भाऊसाहेबांची कशीही समजूत करीन असं मी मनाचं समाधान मानून घेतलं.

गाडींत बसतांना माझी आणि रंगाची चुकामूक झाली; कारण आमचीं तिघांचीं सेकंड क्लासचीं तिकिटं होतीं आणि रंगानं थर्ड क्लासचं तिकिट काढलं होतं. आम्ही आमच्या डब्यांत येऊन बसलो. मी खिडकीजवळ एका कोपऱ्यांत बसलों. माझ्यासमोर माझे दोन मित्र बसले होते. बसल्यानंतर मी त्यांना सांगितलं कीं सतत बूट घातल्यामुळे माझ्या पायाचीं बोटं फार दुखताहेत. माझ्या दोन्ही मित्रांनीं मला सांगितलं, 'तुम्ही बूट काढा आणि तुमचे पाय आमच्या दोघांच्यामध्यें ठेवा.' त्याप्रमाणें मी बूट काढले आणि समोरच्या सीटवर आरामशीर पाय सोडले. थोड्या वेळानं एक फ्रेंच गृहस्थ माझ्या शेजारीं येऊन बसला. त्याच्यामागून खूप झुबकेदार मिशा आणि कल्ले असलेला एक फ्रेंच लष्करी अधिकारी येऊन माझ्याच बाजूला पण दुसऱ्या कोपऱ्यांत येऊन बसला. त्याचा निळ्या रंगाचा लष्करी पोषाख होता. आणि त्याच्या छातीवर

बरेच बिल्ले आणि फिती दिसत होत्या. थोड्या वेळानं हा गृहस्थ माझ्याकडे डोळे वटारून पाहूं लागला. मी त्याच्याकडे लक्ष दिलं नाहीं, पण बिल्ले आणि फिती पाहून थोडा वचकलों. मी माझ्या दोन मित्रांकडे पाहिलं. माझ्या स्कॉच मित्रानं माझ्याकडे पाहून एक डोळा मिचकावला. मलाही थोडासा धीर आला. मी त्या लष्करी अधिकाऱ्याकडे थोडा वेळ पाहिलं आणि नंतर खिडकीबाहेर पाहू लागलो. थोड्या वेळानं तो अधिकारी माझ्या शेजारीं असलेल्या फ्रेंच गृहस्थाशीं रागानं बोलू लागला. त्या फ्रेंच गृहस्थाला इंग्रजी येत होतं. त्यान मला सांगितलं कीं 'तुम्ही बूट काढून आपले पाय समोरच्या सीटवर ठेवले ते त्याला आवडलं नाहीं. तो तुम्हांला आपले बूट घालायला सांगतोंय. मी माझ्या स्कॉच मित्राकडे पाहिलं. त्यानं नकारार्थी मान हालवली. मी त्या फ्रेंच गृहस्थाला सांगितलं, 'मला तसं करतां येत नाही.' त्यानं त्या अधिकाऱ्याला तसंच सांगितलं. त्यामुळें तो अधिकच चिडला व डब्याबाहेर निघून गेला. थोड्या वेळानं गार्डला घेऊन आला. गार्ड आमच्याजवळ आला. त्यानं मला विचारलं, 'तुम्ही बूट कां घालीत नाहीं ?' मी उत्तर देण्यापूर्वींच माझ्या स्कॉच मित्रानं त्याला सांगितलं, 'त्याचे दोन्ही पाय सुजले आहेत. त्याला पायांत बूट घालतां येणार नाहींत. पाय खालीं ठेवले कीं त्याचे पाय दुखूं लागतात.' गार्डनं त्या फ्रेंच अधिकाऱ्याला तसंच सांगितलं. तो गृहस्थ गप्प बसला. परंतु तो माझ्या शेजारीं असलेल्या फ्रेंच गृहस्थाला म्हणाला, 'यांनीं मला हें अगोदर कां नाहीं सांगितलं ?' त्या फ्रेंच गृहस्थानं इंग्रजींत मला तोच प्रश्न विचारला. मी त्याला शांतपणान उत्तर दिलं, 'मला त्यानं विचारलं होतं कुठं ? मग सांगणार काय ?'

पॅरिसला पोचल्यानंतर आम्हांला गाडीतून उतरण्याची जरूर पडली नाहीं. कारण पॅरिसहून कॅलेला जाणाऱ्या गाडीला आमचा डबा जोडण्यांत आला होता. कॅलेहून डोव्हरला आम्ही बोटींतून गेलों. आणि डोव्हरहून लंडनच्या व्हिक्टोरिया स्टेशनवर तिसऱ्या प्रहरीं साडेतीन वाजता उतरलों. मार्सेहून ब्रिटिश युनिटेरियन असोसिएशनच्या सेक्रेटरीला मी तार केली होती. परंतु स्टेशनवर उतरल्यानंतर मला कुणीच भेटलं नाहीं. रंगा माझ्याबरोबर डोव्हरपासून होताच साडेतीन वाजतां लंडनला गडद अंधार पाहून मला थोडीशी भीति वाटलीच. परंतु रंगाला लंडनची चांगली माहिती होती. तो म्हणाला, 'गोव्हर स्ट्रीटवरील इंडियन स्टुडंटस् होस्टेलमध्यें घेऊन जातों.' परंतु होस्टेलमध्यें गेल्यावर आढळून आलं कीं तिथं एकही जागा रिकामी नव्हती. तेव्हां रंगानं मला समोर असलेल्या किंग्सलीन हॉटेलमध्यें नेलं आणि तिथं माझी तात्पुरती राहाण्याची व्यवस्था केली. माझी व्यवस्था केल्यावर रंगा निघून गेला. त्या हॉटेलमध्यें जाईपर्यंत जवळ जवळ आठ वाजले होते. अशा वेळीं तिथं कांहीं खायला मिळेल अशी आशा नव्हतीच. तरीसुद्धां माझ्यासाठीं लॅंडलेडीनं कसला तरी

गरम सूप, कॉफी आणि सॅंडविचेस तयार केल्या. प्रवासाचा शीण गेल्यामुळें मी खाणं संपल्याबरोबर झोपलों आणि सकाळीं आठ वाजतां उठलों. ब्रेकफास्ट झाल्यानंतर ब्रिटिश युनिटेरियनच्या ऑफिसकडे जायला निघालो. त्यांचं ऑफिस स्ट्रॅंड भागांत होतं. त्यावेळीं सकाळीं मला इतकी कडक थंडी वाजत होती, माझ्या अंगांत गरम जाड सूट होता, ओव्हरकोट होता, गरम हातमोजे होते, तरीसुद्धां मी थंडीनं कुडकुडत होतों. लंडनच्या थंडीची मला संवय नसल्यामुळें कदाचित् असं झालं असेल. असोसिएशनच्या ऑफिसमध्यें जाऊन पोचल्यानंतर असोसिएशनचे सेक्रेटरी डॉ. मेलन सामोरे आले आणि माझ्याशीं त्यांनीं हस्तांदोलन केलं. प्रवासाची वगैरे औपचारिकरीत्या चौकशी केल्यानंतर मी ऑक्सफर्डला कधीं जाणार म्हणून त्यांनीं विचारलं. मी त्यांना म्हटलं कीं 'मी इथं आलों आहे एवढं कळवण्यासाठींच मी इथं आलों. तुमच्या लंडनचं कुंद वातावरण आणि ही असली थंडी मला कांहीं परवडणार नाहीं. म्हणून मी अकराच्या गाडीनं ऑक्सफर्डला जाण्यासाठीं निघणार आहे.' डॉ. मेलन नुसते हसले आणि मला त्यांनीं २० पौंडांचा चेक लिहून दिला. हे पैसे माझ्या शिष्यवृत्तीपैकींच होते. परंतु मी तो चेक परत केला, आणि त्यांना सांगितलं कीं 'माझ्याजवळचे पैसे संपले म्हणजे मग मी आपल्याकडून पैसे मागवीन.' इतकं बोलून मी बाहेर आलो. बाहेर येतांना मला वाटेंत प्रो. एन्. जी. वेलिंगकर भेटले. मला पाहिल्यावर त्यांना आश्चर्य वाटलं पण त्यांना पाहून मला अधिक आश्चर्य वाटलं, कारण त्यांची प्रकृति ढासळून गेलेली दिसत होती. ते स्ट्रॅंड भागांतच एका हॉटेलमध्यें उतरले होते. त्यांनीं मला आपल्याकडे जेवायला बोलावलं. परंतु मला ऑक्सफर्डला जायची घाई असल्यामुळें 'पुढें केव्हांतरी येईन' असं सांगून वेळ मारून नेली. मी माझ्या हॉटेलमध्यें परत आलों आणि लगेच सामान घेऊन निघालों तो पॅडिंग्टन स्टेशनवर आलों.

# १०

पॅडिंग्टनहून ऑक्सफर्डला पोचायला दीड तास लागला. तिथं उतरल्यानंतर मी एक गाडी ठरवली. त्या गाडीचा अवतार पाहून मी थक्क झालो. आमच्या मुंबईला व्हिक्टोरिया आहेत, तशाच तऱ्हेची एकंदर व्यवस्था होती. पण गाडीवानाची जागा खूप उंच होती. त्याच्याशीं बोलायचं झाल्यास बगळ्यासारखी मान उंच करावी लागे. मी त्याला मॅंचेस्टर कॉलेजचा पत्ता सांगितला. साधारण दहा मिनिटांनी त्यानं गाडी एका भव्य इमारतीपाशीं उभी केली. मी खालीं उतरलों आणि दारांतली घंटा वाजवली. त्याबरोबर तिथल्या गड्यानं दार उघडून माझ्याकडे पाहिलं. मी कॉलेजमध्ये येणार ही सर्वांची अपेक्षा होती असं दिसलं. तो मला घेऊन कॉलेजच्या डीनकडे गेला. आमचे डीन जवळजवळ साठ वर्षांचे वृद्ध गृहस्थ होते. उंच, सडपातळ, चेहेरा सुरकुतलेला, नाकावर चष्मा, केसांच्या मध्यभागीं भांग काढलेला.—या गृहस्थाचा एकंदर रुबाब पाहून हा आपला प्रोफेसर व्हायला लायक आहे असं मी मनाशीं ठरवलं. आमच्या डीनचं नांव डॉ. हेन्री गौ असं होतं. डॉ. गौ मला घेऊन रेसिडेन्सींत गेले. रेसिडेन्सींतली सर्वांत मोठी खोली माझ्यासाठीं राखून ठेवली होती. खोलींत जातांच ते एका खुर्चीवर बसले. खुर्चीसमोर असलेल्या फायरप्लेसकडे बोट दाखवून ते म्हणाले, 'या फायरप्लेसची सबंध चौकट ट्यूडर पीरिअडची आहे.' ट्यूडर पीरिअडचं नांव ऐकतांच मला धसका बसला. ऑक्सफर्डचं वातावरण जुनाट आहे, असं मला बऱ्याच लोकांनीं सांगितलं होतं. तेव्हां व्हिक्टोरिया राणीच्या काळचं वातावरण तिथं असेल अशी मी कल्पना केली होती. पण ट्यूडर पीरिअड !—म्हणजे पंधराव्या सोळाव्या शतकांत जाणार कीं काय ? मी डॉ. गौकडे पाहिलं; आणि माझी खात्री झाली कीं ते ट्यूडर पीरिअडला अगदीं शोभून दिसतील. हे विचार माझ्या मनात आले, पण मी ते बोलून दाखवले नाहीत. थोड्या वेळानं डॉ. गौ निघून गेले. लंचची वेळ झाल्याबरोबर बाकीचीं मुलं कशीं दिसतात हें पाहाण्यासाठीं मी डायनिंग रूममध्यें गेलों. माझे सहाध्यायी बहुतेक इंग्रज होते; एक स्कॉच होता आणि एक हंगेरियन होता. मी मुकाट्यानं खायला बसलों, तेव्हां तो

हंगेरियन मुलगा माझ्या शेजारीं येऊन बसला. त्यानं माझ्याशीं बोलायला सुरुवात केली. त्याचे ते इंग्रजी उच्चार आणि धाटणी पाहून मला हसूंच आलं. इंग्रजी शिकण्याचा तो आटोकाट प्रयत्न करीत होता. परंतु त्यांत त्याला विशेषसं यश आल्याचं दिसून आलं नाहीं.

फ्रान्सिस बालाझची आणि माझी थोड्या वेळांतच गट्टी जमली. त्यानं मला कॉलेजविषयीं निरनिराळ्या हकीगती सांगायला सुरुवात केली. कारण तो माझ्यापेक्षां एक वर्ष अगोदर आला होता. तो मूळचा राहाणारा ट्रान्सिल्व्हेनिया प्रांतांतला. ट्रान्सिल्व्हेनिया हा मूळचा हंगेरीचा भाग. परंतु व्हर्साय तहान्वयें तो रुमेनियाला तोडून दिला होता, याची फ्रान्सिसला फार खंत वाटे. तो मला म्हणाला कीं ' ट्रान्सिल्व्हेरियामध्यें तीस लाख हंगेरियन आहेत. आणि वीस लाख रूमेनियन आहेत. आणि प्रेसिडेंट विल्सनच्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वान्वये जर मतमोजणी झाली असती तर आम्ही हंगेरींतच राहिलो असतों. परंतु दोस्त राष्ट्रांना रुमेनियाला खुश करायचं होतं. पण त्याचा परिणाम काय झाला ? आज आम्हा हंगेरियन लोकांचे सर्व राजकीय आणि नागरिक हक्क रूमेनियन सरकारनं काढून घेतले आहेत. ही सर्व लॉईड जॉर्ज आणि ब्रिटिश साम्राज्यवाद्यांची कारवाई. गेल्या युद्धामुळें आमची अशी स्थिति झाली, म्हणून मला युद्ध नकोसं झालं आहे. आणि साम्राज्यवाद नष्ट करायचा म्हणजे त्याला एकच उपाय आहे. आणि तो म्हणजे समाजवाद ; That is why I am a pacifist and I am a socialist.' त्याची ती बोलण्याची तऱ्हा आणि आवेश पाहून मला तर सारखं हसूंच येत होतं. संध्याकाळीं सात वाजतां जेवणाची वेळ झाली, तेव्हां डॉ. गौनीं मला आपल्या शेजारीं बसवून घेतलं. डॉ. गौनीं छोटीशी प्रार्थना केल्यानंतर आम्ही जेवायला बसलों. जेवतांना डॉ. गौनीं माझी बरीच चौकशी केली. बोलतां बोलतां ते मध्येच थांबले आणि माझ्याकडे वळून मला म्हणाले, ' तूं इंग्रजी बोलायला कुठं शिकलास ? ' मी म्हटलं, ' हिंदुस्थानांत ! ' मला त्यांच्या प्रश्नाचा खरोखर राग आला. म्हणून मी त्यांना सांगितलं कीं, ' हिंदी लोक कोणत्याही भाषेंत सहज प्राविण्य मिळवूं शकतात. ' ' ठीक, ठीक, ' असं वरच्यावर म्हणून त्यांनीं दुसऱ्या विषयाला सुरुवात केली. जेवण झाल्यानंतर फ्रान्सिस मला एका पॅसिफिस्ट सभेला घेऊन गेला. तिथं कोण मुख्य वक्ता होता तें आतां आठवत नाहीं, पण त्याचं भाषण संपल्यानंतर मी त्या वक्त्याला अनेक प्रश्न विचारून हैराण केलं. त्या वक्त्याला त्याचीं उत्तरं देतां आलीं नाहींत. सभा संपल्यानंतर फ्रान्सिस मला म्हणाला, 'My head was with you and my heart was with the speaker' मी त्याला लगेच चिडून म्हटलं, 'गाढव आहेस तूं. तुला हें शेक्सपिअरच्या वेळचं हेड आणि हार्टचं जुनाट मानसशास्त्र कुणी शिकवलं ? ' फ्रान्सिस कांहींच बोलला नाहीं आणि आम्ही दोघे परत कॉलेजमध्यें आलों.

दुसऱ्या दिवशीं फ्रान्सिसनं माझा नक्षा उतरविण्याचं ठरवलं. तो सकाळींच माझ्याकडे आला आणि मला म्हणाला कीं, 'आज रात्रीं मी एक सभा बोलावली आहे. त्या सभेला कॉलेजमधलीं मुलं आणि सर्व प्रोफेसर येणारच. परंतु त्याशिवाय काहीं बाहेरचीं माणसंही मी बोलावलींत!' मी त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनं पाहूं लागलों. तो म्हणाला, 'या सभेत मी तुझं व्याख्यान ठेवलं आहे. तुला आज रात्रीं बोलावं लागेल.' त्याला मी म्हटलं, 'कशावर बोलूं?' तो म्हणाला, 'तूं आम्हांला ब्राह्मसमाजाची माहिती साग.' मी म्हटलं, 'ठीक आहे.' आणि तो निघून गेला. रात्रीं नऊ वाजतां ती सभा होती. ती सभा ज्यूनिअर कॉमन रूम (J. C. R.) मध्यें ठेवण्यांत आली होती. मी नऊ वाजता तिथं जाऊन पाहातों, तर खोली भरगच्च भरून गेली होती. आमच्या कॉलेजचे डीन आणि इतर प्रोफेसरही हजर होते आणि माझ्या ओळखीचे नसलेले इतर काहीं बाहेरचे स्त्रीपुरुषही हजर होते. मनांतल्या मनांत मी फ्रान्सिसवर खूप चरफडलों. परंतु बाहेर बोलायची सोय नव्हती. आंत गेल्यावर डॉ. गौनीं माझी ओळख करून दिली. आणि नंतर मी बोलायला उभा राहिलों. एकेश्वरी खिस्ती धर्म आणि एकेश्वरी ब्राह्मधर्म या दोहोंमधील फरक मी अगोदर समजावून सांगितला. त्यानंतर राजा राममोहन रॉय, देवेद्रनाथ ठाकूर, केशवचंद्र सेन यांच्या कामगिरीचं वर्णन केलं आणि शेवटीं ब्राह्मधर्म हाच व्यापक धर्म असल्यामुळें तो हिंदुस्थानांतच नव्हे तर सबंध जगाचा धर्म होणार असा विश्वास प्रगट करून मीं माझं व्याख्यान संपवलं. व्याख्यान देताना मी कुठंही अडखळलो नाहीं, किंवा मी सावकाशही बोलत नव्हतो. व्याख्यान संपल्यानंतर डॉ. गौनीं माझी पाठ थोपटली. पण ते काहीं बोलले नाहींत. एक आयरिश तरुणी पुढे आली आणि मला म्हणाली, 'तुमचं व्याख्यान तुम्ही लिहून काढलं नाहीं. तुमच्या हातात नोटस्सुद्धां नव्हत्या. असं असतांना तुम्हीं इतकं अस्खलित इंग्रजी कसं बोलूं शकतां?' मी तिला म्हटलं, 'हं! त्यात काय आहे? हिंदुस्थानात माझ्यापेक्षा अधिक चागलं बोलणारे किती तरी लोक आहेत.' मी माझ्या खोलींत गेल्यानंतर थोड्या वेळानं फ्रान्सिस माझ्याकडे आला. त्याचे डोळे पाण्यानं भरले होते. तो मला म्हणाला, 'तुझी आज फजिती करण्याचा मी निश्चय केला होता. दुसरे विद्यार्थी त्यांत सामील होते. पण तूं आज आमची चांगली जिरवली. माझी गोष्ट तर सोडून दे. कारण मी हंगेरियन आहें. पण मी तुला सांगतो कीं आपलं व्याख्यान पूर्वी लिहून न काढतां एकाही इंग्रज विद्यार्थ्याची तुझ्यासारखं व्याख्यान देण्याची छाती व्हायची नाहीं.'

दुसरे दिवशीं आमचा तत्त्वज्ञानाचा तास होता. तत्त्वज्ञानाच्या तासासाठीं मी नेहमीं तिसऱ्या वर्गातील मुलांबरोबर बसत असे. मी वर्गांत बसल्यानंतर थोड्याच वेळानं आमच्या कॉलेजचे प्रिन्सिपॉल आले. त्यांचं नांव एल्. पी. जॅक्स. डॉ. जॅक्स

हे दिसायला खूप ठेंगू दिसत. त्यांचा चेहेरा चौकोनी असून डोक्यावरचे केस रुपेरी होते. त्यांचे डोळे मात्र नितळ आकाशाप्रमाणें निळे होते. जॅक्स हे इंग्लंडमधले एक नामांकित गृहस्थ होते; हिबर्ट जर्नलचे संपादक आणि ग्रंथकार या नात्यानं त्यांनीं बरीच कीर्ति कमावली होती. डॉ. जॅक्स आम्हाला तत्त्वज्ञान शिकवीत असत. तिसऱ्या वर्गासाठीं त्यांनीं हॅरी बेर्जसॉ याचं तत्त्वज्ञान घेतलं होतं. बोलतांना एकेक शब्द आठवून बोलल्यासारखं ते सावकाश बोलत. हॅरी बेर्जसॉंचं तत्त्वज्ञान मीं पूर्वीच वाचलं होतं. विशेषतः त्यांचे Time and free will, Matter and Memory, Creative Evolution आणि Introduction to Metaphysics हे ग्रंथ माझ्या परिचयाचे असल्यामुळें मला डॉ. जॅक्सच्या व्याख्यानांत नवीन असं कांहीं आढळलं नाहीं. परंतु त्यांची सांगण्याची पद्धत मात्र विलक्षण होती. डॉ. जॅक्स आमचा फिलॉ-सॉफिकल सेमिनार घेत असत. ती सेमिनारची पद्धत मला वाटतं फक्त ऑक्सफर्डमध्येंच आहे. या पद्धतीला ट्युटोरिअल सिस्टीम असंही म्हणतात. या सिस्टीमचं जरा विस्तृत वर्णन केलं पाहिजे. फक्त दहा बारा विद्यार्थीच प्रिन्सिपॉलच्या खोलींत जमत असत. मी नेहमीं डॉ. जॅक्सच्या पाठीमागं फायरप्लेसच्या जवळ इझिचेअर होती, तीवर बसत असे. एकदां डॉ. जॅक्स आम्हाला ब्रॅडलेचं तत्त्वज्ञान समजावून सांगत होते. तें समजावून सांगितल्यावर डॉ. जॅक्स म्हणाले, 'आतां ब्रॅडले याचे मुद्दे डॉ. मार्टिनो यांनीं कसे खोडून काढले तें आपण पाहूं.' मी त्यांना लगेच म्हणालों, 'डॉ. मार्टिनो यांना ब्रॅडलेचे मुद्दे खोडून काढतां येणं शक्य नाहीं.' ते लगेच मागें वळून मला म्हणाले, 'कां?' मी त्यांना म्हटलं, 'त्याचं कारण उघड आहे. डॉ. मार्टिनो हे वारल्यानंतर ब्रॅडले तत्त्ववेत्ता म्हणून प्रसिद्धीला आला.' हे माझे उद्गार ऐकल्याबरोबर डॉ. जॅक्स इतर विद्यार्थ्यांकडे पाहून हसले आणि म्हणाले, 'When a student puts a professor in a corner, he must stay there.' असं म्हणून त्यांनी तो विषयच सोडून दिला. त्यांचा हा प्रांजलपणा पाहून मी त्यांची चूक सुधारली याचं माझं मलाच वाईट वाटलं.

एकदां डॉ. जॅक्सनीं आम्हाला डिनर द्यायचं ठरवलं. त्या डिनरसाठीं त्यांनीं ऑक्सफर्डमधल्या बऱ्याच बड्या मंडळींना बोलावलं होतं. त्यांनीं आम्हां सर्वांना जीं आमंत्रणपत्रकं पाठवलीं, त्याखालीं Evening dress असे शब्द होते. हे शब्द पाहिल्याबरोबर मी, फ्रान्सिस आणि दुसरे इंग्रज विद्यार्थी एवढ्यांनीं त्या डिनरला जायचं नाहीं असं ठरवलं. आम्हा सर्वांकडे Evening dress होते. आणि त्यांनीं जरी आमंत्रणपत्रिकेवर तसं लिहिलं नसतं तरी आम्ही सर्व Evening dress मध्येंच गेलों असतों. परंतु त्यांची निमंत्रणपत्रिका पाहिल्याबरोबर आमचं डोकं भडकलं आणि आमच्या मनांत सामाजिक समतेचं वारं खेळत असल्यामुळें आम्ही Evening dress

घालून आलंच पाहिजे अशी आमच्यावर केलेली सक्ति आम्हाला आवडली नाहीं. दुसरे दिवशीं डॉ. जॅक्सनीं आम्हाला विचारलं तेव्हां मी त्यांना साफ सांगितलं कीं, 'Evening dress वर आमचा विश्वास नाहीं.' इतकंच बोलून मी थांबलों नाहीं, तर मी आणि फ्रान्सिसनं आमचे इव्हिनिंग सूट होते ते विकून टाकले. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं इव्हिनिग ड्रेस घालावा की नाहीं यावर कॉलेजमध्यें चर्चा झाली. त्यावेळीं डॉ. जॅक्स अध्यक्ष होते. त्या चर्चेमध्यें इव्हिनिंग ड्रेस घालावा या मताचा व्हाइट-हाऊस या नांवाचा मुलगा होता. आणि त्याला विरोध करणाऱ्यांमध्यें मी मुख्य होतों. व्हाइट हाऊस बोलतांना म्हणाला, 'कडक इस्त्रीचा शर्ट न घालतां जर प्लेटचा सॉफ्ट शर्ट वापरला तर इव्हिनिंग ड्रेस घालायला अत्यंत सोयीस्कर असतो.' त्याला उत्तर द्यायला मी उभा राहिलों. प्रथम मी डॉ. जॅक्सकडे बोट दाखवलं आणि म्हटलं, 'जरी आज टॉमस कार्लाईल नामशेष झाला असला, तरी कार्लाईलचं कपड्याचं तत्त्वज्ञान आपल्याला आजच्या अध्यक्षांच्या ग्रंथांत पाहायला सापडतं!' मी त्याखेरीज इतर बरेच मुद्दे सांगितले. पण ते आतां आठवत नाहींत. शेवटीं मतमोजणी झाली तेव्हां दोन्ही बाजूंला सारखीं मतं पडलीं. अर्थात या प्रश्नाचा निकाल अध्यक्षांच्या मतावर अवलंबून होता. अध्यक्षांनीं कांहीं विचार न करतां आमच्या बाजूला मत देऊन ते मोकळे झाले. बिचारा व्हाईटहाऊस फिका पडला.

मी ऑक्सफर्डला येऊन पोचलो, त्यावेळीं मिस् अर्विनचं पत्र मला लगेच मिळालं. मिस् अर्विन या कॅरिहॉल कॉलेजच्या प्रिन्सिपॉल. याच कॉलेजमध्यें मिस् नेसबिटनीं शिक्षण घेतलं होतं. मिस् अर्विनचं पत्र आल्यानंतर मी लगेच समजलों कीं, ही मिस् नेसबिटची कारवाई आहे. 'कॅरिहॉलला येऊन तुम्ही व्याख्यानं द्या' अशी मिस् अर्विननीं त्या पत्रांत मला विनंति केली होती. त्या पत्राला मी उत्तर पाठवलं कीं, 'मी शनिवार, रविवार या दोन दिवशीं मोकळा असल्यामुळें याच दिवशीं तिथं येऊं शकेन इतर दिवशीं माझा अभ्यास आणि प्रोफेसरचीं व्याख्यानं असल्यामुळें मी येऊं शकत नाहीं.' मिस् अर्विन यांनीं माझ्या सोईप्रमाणें व्याख्यानं ठेवलीं. आणि त्याप्रमाणं दर शनिवार, रविवारीं बर्मिंगहॅमला जायचं मी ठरवलं. बर्मिंगहॅमला सेलिओक कॉलेजीस नांवाची सात कॉलेजीस आहेत. त्या सातांपैकीं कॅरिहॉल हें एक कॉलेज आहे. कॅरिहॉल कॉलेजमध्यें मी पहिल्यानं गेलों त्यावेळीं तें मुलींचं कॉलेज आहे याची पहिली कल्पना आली. त्या कॉलेजांतच मला रेव्ह. टिळकाची मुलगी तारा टिळक भेटली. त्याच कॉलेजमध्यें मिस् कॉर्निश नावाची एक प्रोफेसर होती. ती माझ्याकडे नेहमीं येऊन हिंदु तत्त्वज्ञान म्हणजे काय याविषयीं माहिती मिळ-वण्याचा शक्य तितका प्रयत्न करी. मी कॅरिहॉलमध्यें किती व्याख्यानं दिलीं तें आतां आठवत नाहीं. एकदां सबंध सेलिओ कॉलेजसाठीं व्याख्यान देण्याचा माझ्यावर प्रसंग

आला. मी व्याख्यानासाठी 'ख्रिस्त आणि बुद्ध' हा विषय निवडला होता. मी माझ्या व्याख्यानांत सांगितलं कीं नुसत्या नैतिक दृष्टया आपण विचार केला तर बुद्धाचीं तत्त्वं ख्रिस्ताच्या तत्त्वापेक्षां श्रेष्ठ ठरतात. माझं व्याख्यान ऐकतांना श्रोत्यांमध्यें बरीच गडबड उडाली. पण मला कुणी प्रश्न विचारायला धजला नाहीं. मी दुसऱ्या दिवशीं तिथं राहाणार होतों आणि मला पुढें होणाऱ्या गोष्टींची कांहीं कल्पनाही नव्हती. संध्याकाळीं मी कॅरिहॉलमधल्या मुलींबरोबर टेनिस खेळत असतांना एक मुलगी आली आणि मला म्हणाली, 'तुम्हांला मिस अर्विन बोलावताहेत. जरुरीचं काम आहे.' मी तिला म्हटलं कीं, 'माझा सेट पुरा झाल्याशिवाय मी येणार नाहीं.' आमचा आणखी एक गेम पुरा झाला आणि मिस् अर्विन बाहेर आल्या. त्यांचा चेहरा जरा संतापलेला दिसत होता. त्या मला म्हणाल्या, 'मि. चिटणीस, तुमच्यावरील जबाबदारीची तुम्हाला जाणीव आहे का ? तुम्ही जें व्याख्यान दिलंत त्याबाबत मी एक सभा बोलावली आहे. आणि त्याकरता मॅन्चेस्टर युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर डॉ. फार्कर यांना मुद्दाम बोलावलं आहे. ते तुमची केव्हांची वाट पाहाताहेत. आणि तुम्ही आपले टेनिस खेळत बसलांहात.' मिस् अर्विन आल्याबरोबर माझ्याबरोबर खेळणाऱ्या पोरी कुठच्या कुठं पळून गेल्या होत्या. मी सुद्धां माझी रॅकेट काखेंत घातली आणि मिस् अर्विन बरोबर गेलों.

पाहातों तर सबंध दिवाणखाना भरगच्च भरलेला आणि एका बाजूला डॉ. फार्कर शांतपणें बसले होते. डॉ. फार्करचा आणि माझा पूर्वीचा थोडासा परिचय होता. ते हिंदुस्थानांतील वाय्. एम्. सी. ए. चे सेक्रेटरी असतांना मि. मॅकेन्झीकडे त्यांची माझी ओळख झाली होती. मी आत गेल्याबरोबर डॉ. फार्करशीं हस्तांदोलन केलं आणि त्यांच्या शेजारीं बसलों. डॉ. फार्कर काहीं फार बोलले नाहींत. त्यांचा चेहेरा गंभीर दिसत होता. ते मला म्हणाले, 'तुम्ही सेलिओ कॉलेजपुढे जें व्याख्यान दिलंत, त्या व्याख्यानांत तुम्ही म्हणालांत कीं बुद्धाचीं नीतितत्त्वं येशू ख्रिस्ताच्या नीतितत्त्वापेक्षां श्रेष्ठ आहेत. याचा खुलासा करून घेण्यासाठीं आज ही सभा बोलावलीय. आणि मला मॅन्चेस्टरहून मुद्दाम बोलावून आणलं आहे.' मी त्यांना म्हटलं, 'तुम्ही मॅन्चेस्टरहून आलां आहांत हें ठीक आहे. परंतु खुलासा करण्यासारखं यांत कांहींच नाहीं. मीं जें बोललों तें बोललों. And I abide by every word I have said.' तेव्हां डॉ. फार्कर म्हणाले कीं, 'तुमचं मत चूक आहे. येशू ख्रिस्तानं ईश्वर हा आपला पिता आहे असं मानलं. आणि बुद्ध हा निरीश्वरवादी होता. यावरून येशू ख्रिस्ताचं नीतितत्त्व श्रेष्ठ आहे असं तुम्हाला वाटतं का ?' मी त्यांना म्हटलं, 'मुळींच नाहीं, ईश्वर हा पिता आहे, हें गृहीत तत्त्व आहे. हें गृहीत तत्त्व येशू ख्रिस्तानं मान्य केलं, पण बुद्धानं मान्य केलं नाहीं. एवढाच फरक आहे. या जगाचा निर्माता ईश्वर आहे. आणि तो ईश्वर आपला पिता आहे, हे कांहीं येशू ख्रिस्तान सिद्ध केलं नाहीं. मी तुमच्या-

प्रमाणेंच बायबलचा अभ्यास केला आहे. पण मला हें तत्त्व सिद्ध केल्याचं कुठं आढळलं नाहीं. नव्या करारांत कुठं सिद्ध केलं असलं तर मला दाखवा मग मी माझी चूक कबूल करतों.' बिचारे डॉ. फार्कर ! मला खरोखर त्याचा अपमान करण्याची इच्छा नव्हती. परंतु त्यांनीं आपणहून हें संकट ओढवून घेतल त्याला मी काय करूं ? नंतर मिस् अर्विननीं डॉ. फार्करना आपल्याबरोबर नेल आणि तिथल्या सर्व मुली माझ्याभोवतीं गोळा झाल्या. कांहीं मुली माझ्या पायाजवळ बसल्या. त्या मुलींनीं नानातऱ्हेचे प्रश्न विचारून मला बेजार केलं. मी त्यांना शेवटीं इतकंच म्हटलं कीं, 'मी टेनिस खेळत होतों. आणि मला मिस् अर्विननीं येऊन थांबवलं. याबद्दल त्यांना मी केव्हाही क्षमा करणार नाहीं !' यावर त्या मुली ज्या खो खो हसत सुटल्या, त्यामुळे हॉल हादरून गेला.

सेलिओ कॉलेजांतून परत येताना मी बर्मिंगहॅम इथं डॉ. पारधी यांच्या घरीं उतरलो. डॉ. पारधी यांनीं ॲलोपॅथिक वैद्यकीचा पूर्ण अभ्यास केला होता. पण ॲलोपॅथिकवरून त्यांचा विश्वास उडाल्यामुळें त्यांनीं होमिओपॅथीची प्रॅक्टिस सुरू केली होती. डॉ. पारधी हे बर्मिंगहॅममध्यें एक सुप्रसिद्ध डॉक्टर आहेत. त्यांना सर्वजण बर्मिंगहॅममध्यें ब्लॅक डॉक्टर म्हणून ओळखतात. कारण त्यांचा वर्ण काळासावळाच आहे. त्यानीं एका इंग्रज बाईशीं लग्न केलं असून तिच्यापासून त्यांना मुलंही झालीं आहेत. ही बाई दिसायला जितकी सुंदर आहे, तितकाच तिचा स्वभावही गोड आहे. एकदां डॉक्टरांचा आणि माझा वाद रंगात आला असतां आमचं दोघांचं कडाक्याचं भांडण व्हायची वेळ आली. तेव्हां तिनं मोठ्या चातुर्यानं टेनिसचा विषय काढला आणि आमचा वादविवाद तिथंच संपला.

कलकत्ता युनिव्हर्सिटीचे तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर राधाकृष्णन् हे ऑक्सफर्डला हिबर्ट लेक्चरर म्हणून येणार होते. ही बातमी प्रथम मला माझ्या प्रिन्सिपॉलनीं सांगितली. राधाकृष्णन्‌चं हिंदी तत्त्वज्ञानाच्या इतिहासावर एक मोठं पुस्तक अगोदरच इंग्रजींत प्रसिद्ध झालं होतं. आणि त्यामुळेंच त्यांना ही लेक्चररशिप मिळाली असावी. त्यांचं पहिलं लेक्चर ज्या दिवशीं ठरलं होतं, त्या दिवशीं सकाळीं प्रो. राधाकृष्णन् मला भेटले. त्यांची ती किरकोळ, उंच, काळी मूर्ति पाहून मला थोडं चमत्कारिक वाटलं. मी राधाकृष्णन्‌ना घेऊन एका कॅफेमध्यें चहा प्यायला गेलो. चहा पितांना ते मला म्हणाले, 'मी इकडे येताना मि. नटराजननीं मला तुमची भेट घ्यायला सांगितलं. पहिल्याप्रथमच मी इथं आल्यामुळें जरा भांबावल्यासारखा झालो आहे. मीं तुम्हाला सांगितलं तर आश्चर्य वाटेल, पण मी माझ्या क्लासरूमच्या बाहेर अजूनपर्यंत व्याख्यान दिलेलं नाहीं. तुम्ही मला या व्याख्यानासंबंधानं कांहीं टिप्स् दिल्या तर बरं होईल. विशेषतः इंग्रजी उच्चारासंबंधानं माझ्या बऱ्याच चुका होतील अशी मला भीति

वाटते. ' राधाकृष्णन्‌चे हे उद्गार ऐकून मी आश्चर्यानं थक्क झालों. त्यांची ती विनम्र वृत्ति पाहूनच मला स्वतःला माझी लाज वाटूं लागली. काय बोलावं तें मला सुचेना. परंतु शेवटीं बरीच चर्चा झाल्यानंतर त्यांनीं एक एलोक्युशन टीचर एंगेज करावा असं ठरवलं. त्या दिवशीं राधाकृष्णन्‌च्या व्याख्यानाला बरीच गर्दी जमली. त्यांच्या व्याख्यानासाठीं डॉ. व मिसेस् पारधी बार्मिंगहॅमहून मुद्दाम आले होते. त्यांचं व्याख्यान सव्वातासपर्यंत अस्खलीत इंग्रजीमध्यें झालं. व्याख्यानासाठीं त्यांनीं आपल्या हातांत नोटस्‌सुद्धा घेतल्या नव्हत्या. 'हिंदूंच्या धार्मिक आणि सामाजिक चालीरीति' हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता. व्याख्यानाचा विषय रुक्ष असल्यामुळे त्याचा श्रोत्यांच्या मनांवर चांगला परिणाम झाला नाहीं. त्यांचं व्याख्यान ऐकल्यावर मी त्यांच्यावर थोडा चिडलोंच होतों. व्याख्यान संपल्यावर आम्ही चहा प्यायला बाहेर गेलो. मी त्यांना पहिल्या प्रथम प्रश्न केला कीं, 'तुम्ही हा विषय व्याख्यानासाठीं कां निवडलात ? आमच्या जुनाट झालेल्या चालीरीति हल्लीं हिंदुलोकसुद्धां पाळत नाहींत. तेव्हां त्यांचं परकीय देशांत प्रदर्शन करण्याचं कांहीं कारण नाहीं, असं मला वाटतं.' तेव्हां राधाकृष्णन् मला म्हणाले, 'ही कांहीं माझी चूक नाहीं. डॉ. जॅक्स मला म्हणाले कीं, आम्हांला हिंदूंच्या तत्त्वज्ञानाची माहिती आहे. पण त्यांच्या चालीरीति आम्हांला माहीत नाहींत, म्हणून त्यावर तुम्ही बोला. मग मी तरी काय करणार ?' मी त्यांना सांगितलं, 'डॉ. जॅक्स गेले उडत. उद्या तुम्ही व्याख्यानासाठीं शंकराचार्यांचा मायावाद घ्या.' त्याप्रमाणें त्यांनीं तोच विषय दुसरे दिवशीं घेतला. दीडतास ते सारखे बोलत होते. आणि त्यांचं व्याख्यान इतकं उत्तम झालं कीं, सर्व श्रोते मंत्रमुग्ध होऊन गेले. एका हिंदी गृहस्थाचं इंग्रजी भाषेवरील इतकं अप्रतीम प्रभुत्व पाहून सर्वांना आश्चर्य वाटलं.

आमच्या कॉलेजमध्यें ॲथ्रॉपॉलॉजी शिकवण्यासाठीं प्रो. पेरी येत असत. त्यांची व्याख्यानं देण्याची पद्धत कांहीं औरच होती. आज या गृहस्थानं मोठमोठीं पुस्तकं लिहिलीं आहेत. पण त्यावेळीं ते नुकतेच पुढं येत होते. एक दिवस आमच्या वर्गात ते हिंदुधर्माची माहिती सांगत होते. ही माहिती त्यांनीं आमच्या पौराणिक कालावरून घतली होती. हिंदु लोक अनेक देवतांची पूजा करतात. इतकंच नव्हे तर त्यांचा धर्म मूर्तिपूजेवरच आधारलेला आहे, असं सांगून ब्रह्मा, विष्णु, महेश इत्यादि देवतांचं स्वरूप काय आहे, तें विशद करून सांगत होते. माझ्या शेजारीं व्हाइटहाऊस बसला होता. त्यानं माझ्याकडे वळून हळूच विचारलं कीं, 'प्रोफेसरसाहेब हिंदुधर्माविषयीं सांगतात तें बरोबर आहे का ?' मी जोरानं मान हालविली. आणि राधाकृष्णन्‌नीं दिलेल्या व्याख्यानाची त्याला आठवण करून दिली. त्यावर व्हाइटहाऊस उठून उभा राहिला आणि म्हणाला, 'सर, तुम्ही ही जी हिंदु धर्माची माहिती देतां ती चुकीची आहे.' प्रो. पेरींच्या चेहऱ्यावर रागाची छटा आली. ते म्हणाले, 'कोण म्हणतो चुकीची

आहे ?' तेव्हां व्हाइटहाऊसनं माझ्याकडे बोट करून म्हटलं, 'हा हिंदु विद्यार्थी इथं बसला आहे तो म्हणतो, तुमची माहिती चुकीची आहे.' तेव्हां ते माझ्याकडे वळून म्हणाले कीं, 'माझी माहिती चुकीची आहे हें तुला सिद्ध करावं लागेल.' मी उठून उभा राहिलों आणि त्यांना सांगितलं कीं, 'तसं सिद्ध करणं काही कठीण नाहीं. हिंदुधर्म हा ख्रिस्ती धर्म किंवा मुसलमानी धर्मासारखा ऐतिहासिक धर्म नाहीं. म्हणजे तो एका विशिष्ट व्यक्तीवर अवलंबून नाहीं. तरी हिंदुधर्माला इतिहास आहे, आणि तो इतिहास हेंच सांगतो कीं, वैदिक कालानंतर उपनिषद् काळीं हिंदु लोकांनीं शुद्ध अशा एकेश्वरी धर्माचा स्वीकार केला होता. आर्यांचा धर्म हा शुद्ध एकेश्वरी धर्मच होता. मूर्तिपूजा ही तिथल्या अनार्य लोकांची. शिव हा मुळचा अनार्य लोकांचा देव. मी आर्य–अनार्य असा भेद करीत नाहीं, आणि मला वंशश्रेष्ठत्वाची बाधा झालेली नाहीं. परंतु हिंदु-धर्माची माहिती सांगणाऱ्या प्रोफेसरनं, हा जो मी फरक सांगितला तो लक्षांत ठेवला पाहिजे.' हें त्या प्रोफेसरनीं ऐकून घेतलं. आणि नंतर मला म्हटलं, 'हें पहा, I have no prejudice against your religion.' मी त्यांना सरळ उत्तर दिलं, 'It does not matter if you have. My religion will survive your prejudice.' हें माझं वाक्य ऐकल्यावर मुलांनीं टाळ्या पिटल्या. आमचे प्रोफेसर खूप भडकले. ते तसेच उठून प्रिन्सिपॉलकडे गेले आणि त्यांनीं माझ्या विरुद्ध तक्रार केली. डॉ. जॅक्सनीं मला त्या संबंधानं विचारलं. तेव्हां मी त्यांच्या स्वतःच्या लेखाकडे बोट दाखवलं. त्यांनीं हिबर्ट जर्नेलमध्यें लेख लिहून हिंदु धर्म आणि ख्रिस्ती धर्म यांतला फरक दाखवण्याचा प्रयत्न केला होता. तो फरक दाखवतांनासुद्धां हिंदुधर्माचं स्वरूप विकृत केलं नव्हतं. यावर ते हसले आणि मला म्हणाले, 'You must not expect too much from your professor.' इतकं बोलले आणि ते निघून गेले. प्रो. पेरी हे स्वभावानं फार चांगले गृहस्थ होते. ते सुद्धां हा प्रसंग लवकरच विसरून गेले. इतकंच नव्हे तर पुन्हां हिंदुधर्माविषयीं बोलतांना 'मी बरोबर आहे कीं नाहीं' असं ते विनो-दानं नेहमीं मला विचारीत. मलासुद्धां त्यांना दुखावल्याबद्दल वाईट वाटलं आणि आपण होऊन मी त्यांची नंतर क्षमा मागितली.

दुसरे आमचे प्रोफेसर आर. एच. टॉनी. मि. टॉनी हे त्यांच्या The Sickmen of the Acquisitive Society या पुस्तकामुळं बरेच प्रसिद्धीस आले होते. मी तिथं होतो त्यावेळेस ते Religion and the rise of Capitalism हें पुस्तक लिहीत होते. मि. टॉनी हे फारच मनमिळाऊ होते. त्यांना अहंकार असा मुळींच नव्हता. अंगानं ते खूप धिप्पाड असून त्यांचा काळा सूट आणि पिंजारलेले केस पाहिले कीं कुणालाही हसूं आलं असतं. त्यांच्या विजारीला तर कधींच इस्त्री केलेली नसायची. त्यामुळें ती ढोपराकडे नेहमीं फुगलेली दिसायची. त्यांचा चेहरा नेहमीं हंसतमुख आणि

त्यांची शिकवण्याची पद्धत अगदींच अनौपचारिक. ते आम्हांला अर्थशास्त्र आणि समाजशास्त्र शिकवीत. त्यांच्या सभोवतीं आम्हीं चामड्यानं मढवलेल्या खुर्च्यांवर बसलों कीं प्रथम ते आपली पाईप खिशातून काढीत आणि मुलांनाही आपल्या पाईप काढायला सांगत. एकाद्या मुलाजवळ काड्याची पेटी नसली तर ते स्वतः त्याची पाईप पेटवीत. माझी मात्र त्यावेळीं फार पंचाईत व्हायची. कारण मला तंबाखू ओढायची मुळींच संवय नव्हती. त्यानीं मला एकदोनदां विचारलं, 'Why don't you smoke?' पण मी काय उत्तर देणार! प्रोफेसर आणि बाकीचे सर्व विद्यार्थी पाईप किंवा सिगरेट ओढायचे. आणि मी मात्र एकटा तसाच बसून राहायचा. मी या विद्यार्थ्यांपासून वेगळा उमटून पडतों ही कल्पना मला सहन होईना, आणि याला उपाय काय करावा याचा मी विचार करीत बसलों. पण कांहीं दिवसांनीं मी एक निश्चय केला. बाजारांत जाऊन मी एक पाईप खरेदी केला. आणि स्वीट क्रॉप नांवाचा तंबाखू खरेदी केला. मला कॉलेजमध्यें जायचं होतं; परंतु तिथं न जातां मी खोलीवर गेलों. आणि मी माझ्या खोलीचं दार आणि खिडक्या बंद करून माझे कपडे काढून ठेवले आणि नाइट्र सूट घातला. त्यानंतर काड्याची पेटी, तंबाखू आणि पाईप घेऊन बिछान्यावर बसून राहिलों. पाईपमध्यें मी तंबाखू भरला. त्यानंतर पाईप तोंडांत धरून मी ती पेटवली. मी ती ओढायला सुरुवात करतांच पाइपमधून धूर यायला लागला तेव्हां उशीवर डोकं ठेवून डोळे मिटून मी स्वस्थ पडून राहिलों. पाइप ओढण्यान मला कांहीतरी होणार अशी मला भीति वाटत होती. परतु कांहीं झाल तरी टॉनीच्या वर्गांत जो एकलकोंडेपणा वाटतो तो नको, असं म्हणून मी जोरजोरानं पाइप ओढायला सुरुवात केली. थोड्या वेळानं माझं डोकं गरगरायला लागलं आणि ठसकाही लागला. तेव्हां थोडा वेळ उठून बसलों आणि पुन्हां झोंपलों. बऱ्याच वेळानं माझी पाइप विझून गेली. तरीही मी तसाच पडून राहिलो होतों. नंतर मी डोळे उघडून पाहिलं तेव्हा मला आढळून आलं कीं, फक्त माझं डोकं जड झालं होतं! परंतु त्या पलीकडे मला काहींच झालं नव्हतं. थोड्या वेळानं उठून मी कपडे केले. आणि कॉलेजमध्यें गेलो. आणि सर्व मुलांच्या देखत मी माझी पाइप काढली आणि ओढू लागलों. पुढल्या खेपेला जेव्हां मि. टॉनीनीं वर्ग घेतला तेव्हां मी माझ्या खिशातून पाइप काढली. त्यांनीं आपली पाइप पेटवण्यापूर्वी माझी पाइप पेटवली. ती पेटवीत असतांना 'सद्गुणापेक्षां दुर्गुणांत अधिक माणुसकी आहे कीं काय?' असा विचार माझ्या मनाला चाटून गेला. कारण माझ्या दृष्टीनं मी आतां दुर्गुणी बनलों होतों.

ऑक्सफर्डला हिंदी विद्यार्थ्यांचा एक क्लब आहे. त्याला ऑक्सफर्ड मजलीस असं म्हणतात. दर रविवारीं संध्याकाळी ऑक्सफर्डमधील हिंदी विद्यार्थी त्या ठिकाणीं

जमत आणि निरनिराळ्या विषयांवर चर्चा करीत. या चर्चेचे विषय अनेक असत आणि त्या चर्चेत भाग घेणारे सर्व विद्यार्थी स्वदेशाभिमानानं ओतप्रोत भरलेलीं अशीं भाषणं करीत. मी ज्यावेळीं प्रथम मजलीसमध्यें गेलो त्यावेळीं एक विद्यार्थी हिंदी स्वातंत्र्याविषयीं बोलतांना ब्रिटिश सरकारवर जळजळीत शब्दांत टीका करीत होता. मला त्या मुलाचं कौतुक वाटलं. त्या मुलाचं नांव नेहरू असून नेहरू कुटुंबापैकींच एक होता असं मला कळलं. तो कसला अभ्यास करीत आहे याची चौकशी करतां मला एकानं सांगितलं कीं, तो आय्. सी. एस्. चा अभ्यास करण्याकरतां इथं आला आहे! माझी एकदम निराशा झाली. ज्या ब्रिटिश सरकारवर कडक शब्दात तो टीका करीत होता, त्या सरकारचीच नोकरी पत्करण्याच्या हेतूनं हा मुलगा इथं आला आहे, हा विचार मनात येतांच त्याच्या भाषणाची मला चीड आली. त्या दिवसापासून मी क्वचितच मजलीसमध्यें जात असें. मजलीसमध्ये न जाण्याचं दुसरं महत्त्वाचं कारण म्हणजे मला बहुतेक दर रविवारीं चर्चतर्फे किंवा एकाद्या दुसऱ्या संस्थेतर्फे व्याख्याना-साठीं आमंत्रण असायचंच.

१९२६ साल हें अनेक दृष्टीनं अत्यंत महत्त्वाचं वर्ष होतं. याच वर्षी लिऑ ट्रॉट्स्की याचं Where is Britain going? हे पुस्तक माझ्या पाहाण्यांत आलं. माझ्या कॉलेजातील अनेक विद्यार्थ्यांना माझ्या प्रमाणंच सोव्हिएट रशिया-विषयीं सहानुभूति वाटत असल्यामुळें माझ्याप्रमाणेंच त्यांनाही ते पुस्तक आवडलं. आम्ही पांचसहा जणांनीं एकत्र जमून तें पुस्तक दोनतीन वेळां वाचलं आणि नंतर त्यावर खूप चर्चा केली. त्या पुस्तकाला ब्रेल्स्फर्ड यांनीं प्रस्तावना लिहिली होती. ब्रेल्स्फर्ड हे त्यावेळीं स्वतंत्र मजूर पक्षाचं मुखपत्र ‘ लीडर ’ याचे संपादक होते. ब्रेल्स्फर्ड यांनीं आपल्या प्रस्तावनेत असं म्हटलं होतं कीं, ‘ मला जरी स्वतःला ट्रॉट्स्कीचीं मतं पसंत नसलीं तरी सुद्धां वैयक्तिक मतस्वातंत्र्याविषयीं आदर बाळगण्याची जी ब्रिटिश प्रथा आहे, त्या प्रथेला अनुसरूनच हें पुस्तक आम्ही प्रसिद्ध करीत आहोत. ’ मला ब्रेल्स्फर्डनं लिहिलेले सर्वच शब्द आतां बरोबर आठवत नाहींत, कारण तें पुस्तक वाचल्याला आज अठराहून अधिक वर्षं झालीं पण ट्रॉट्स्कीचीं मतं आम्हां सर्वांना आवडलीं. याचं कारण त्यावेळीं आम्ही मार्क्सवादाचा कसून अभ्यास केला होता हें नव्हे, तर रॅम्से मॅकडॉनॉल्ड, जिमी टॉमस, स्नोडन् आणि त्यांची पत्नी एथेल स्नोडन या मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांना त्यानं ज्या शेलक्या शिव्या हासडल्या होत्या त्यामुळं तो आमच्यामध्यें फारच लोकप्रिय झाला. ट्रॉट्स्कीचे दुसरे ग्रंथ आणून वाचण्याचं आम्ही ठरवलं. इतकंच नव्हे तर मी आणि फ्रान्सिस यांनीं ट्रॉट्स्की ग्रुप स्थापन करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत आम्हाला फारसं यश आलं नाहीं. या नंतर थोड्या दिवसांनीं कोळशाच्या खाणींत काम करणाऱ्या कामगारांचीं

गाऱ्हाणीं आमच्या कानांवर येऊं लागलीं. सरकारनं मदत करण्याचं थांबवलं म्हणून म्हणा किंवा मालकांनीं कामाचे तास आणि पगार यासंबंधानं दुराग्रहाचं धोरण ठेवल्यामुळें म्हणा, कोळशाच्या खाणींत काम करणाऱ्या कामगारांनीं संप करण्याचं ठरवलं. आणि त्यांच्याबद्दल सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं ब्रिटिश ट्रेड युनियन कॉंग्रेसनं सार्वत्रिक संप करण्याचा निश्चय जाहीर केला. इंग्लंडमध्यें सर्वत्र खळबळ उडाली. सर्वांचं धाबं दणाणून गेलं. बाल्डविन सरकारनं तडजोड करण्याचा शक्य तितका प्रयत्न केला, पण तो निष्फळ ठरला. या सार्वत्रिक संपाचे पुढारी मॅक्डोनॉल्ड, जिमी टॉमस आणि हेंडरसन हे होते. त्यांच्याबरोबर मायनर्स फेडरेशनचा जनरल सेक्रेटरी कुक याचंही नांव वर्तमानपत्रांच्या मथळ्यांत चमकूं लागलं.

मे ची पहिली तारीख उजाडली आणि सार्वत्रिक संप सुरू झाला. सकाळीं आम्हांला ब्रेकफास्टसाठीं दूध मिळेनासं झालं, दुसऱ्याही जरुरीच्या वस्तु मिळेनाशा झाल्या. ऑक्सफर्डमधील सर्व वातावरण प्रक्षुब्ध होऊन गेलं. गोदीमध्यें, कारखान्यांत, काम करण्यासाठीं आणि ट्रॅम, बसेस चालविण्यासाठीं ऑक्सफर्डमधील सर्व कॉलेजांतील विद्यार्थी ब्लॅक लेग्ज म्हणून पुढं सरसावले; या संपफोड्या कारवाया करण्यासाठीं सर्व कॉलेजें पुढं सरसावलीं. पण आमचं कॉलेज मात्र त्याला अपवाद होतं. आमचे प्रि. डॉ. जॅक्स यांनीं आम्हांला स्पष्ट सांगितलं कीं, 'इतर विद्यार्थ्यांप्रमाणं तुम्हांला संपफोड्याचं काम करायचं असेल तर तुम्हांला मी मुळींच अडथळा करणार नाहीं. पण त्याबद्दल कुणावर सक्तीही करणार नाहीं. तुमची मर्जी होईल त्याप्रमाणं तुम्ही संपफोड्याचं काम करा, नाहींतर संपवाल्यांना मदत करा,' इतकं सांगून डॉ. जॅक्स निघून गेले. मीं फ्रान्सिसकडे पाहिलं. फ्रेडनं माझ्याकडे पाहिल्यावर आम्ही तिघेही मोठ्यानं हसलों आणि आम्ही एकमेकांच्या हातावर जोरानं टाळ्या दिल्या. फ्रेडचा हात माझ्यापेक्षां अधिक लांब रुंद असल्यामुळें माझा हात दुखायला लागला. आम्ही तिघे कॉलेजच्या बाहेर पडलों ते आमच्या आवडत्या कॅफेंत शिरलों. तिथं आम्ही नेसल्स मिल्कचा चहा घेतला. चहा घेतांना आम्ही आमचा पुढला कार्यक्रम आंखला. संपवाल्यांना मदत कशी करायची याचा आम्ही विचार करूं लागलों. आम्ही प्रथम ऑक्सफर्डमध्यें लोकमत तयार करायचं ठरवलं. त्याप्रमाणें प्रत्येक रस्त्याच्या कोपऱ्यांतून संपवाल्यांची बाजू लोकांपुढं मांडण्याचा आम्ही प्रयत्न केला. सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारखं बोलत राहिल्यामुळें आमचे तिघांचे घसे सुकून अगदीं कोरडे झाले होते. पुढील आठवड्यांत आम्ही लंडनला जायचं ठरवलं. परंतु मेच्या आठ तारखेला सर जॉन सायमन् यांनीं हाऊस ऑफ कॉमन्समध्यें असं जाहीर केलं कीं, 'असा सार्वत्रिक संप करणं बेकायदेशीर कृत्य आहे.' नवव्या तारखेला मॅकडोनॉल्ड प्रभृति पुढाऱ्यांनीं संप मागं घेतल्याचं जाहीर केलं. आणि आमचे सर्व मनोरथ कोसळून पडले. शेवटीं

ट्रॉट्स्कीनं या लोकांविषयीं जें भाकीत केलं होतं तें खरं ठरलं; हें पाहून या पुढाऱ्यांविषयीं आमचा तिरस्कार आणि ट्रॉटस्कीविषयींचा आदर द्विगुणित झाला. दहा, अकरा तारखेला सर्वत्र सामसूम झालं. आमचे सर्व व्यवहार पूर्ववत् सुरू झाले आणि ऑक्सफर्डमधील विद्यार्थी पुन्हा अभ्यासांत रंगून गेले.

ऑक्सफर्डचं नवीन वर्ष मेकॅल्मस् टर्मनं सुरू होतं. ही टर्म आठ आठवड्यांची असते. ही टर्म संपल्यावर सहा आठवड्यांची सुट्टी मिळते. त्यानंतर हिलरी आणि ट्रिनिटी टर्ममध्यें सहा आठवड्यांची पुन्हां सुट्टी मिळते. ट्रिनिटी टर्म संपल्यानंतर तीन महिने आणि वीस दिवसांची सुट्टी मिळते. या मोठ्या सुट्टींत मी कोनिंग्जबर्गला जायचं ठरवलं. कोनिंग्जबर्ग इथं इमॅन्युअल कातचं सबंध आयुष्य गेलेलं. इमॅन्युअल कांत हा माझा आवडता तत्त्ववेत्ता असल्यामुळे त्याच्यामुळें जे गाव प्रसिद्धीला आलं, ते गांव पाहून यावं अशी मला उत्कट इच्छा झाली. कोनिंग्जबर्गला गेल्यानंतर तिथलं एकंदर वातावरण पाहून मला आश्चर्याचा धक्काच बसला. कांतची राहाण्याची जागा सुद्धां त्याच्या एकंदर कीर्तीला साजेशी नव्हती. तिथल्या विद्यालयांतील प्रोफेसर चर्च ऑफ इंग्लंडमधल्या एकाद्या धर्मोपदेशकाप्रमाणें दिसत होते. त्यापैकीं कांहीं प्रोफेसरांशीं माझी ओळख झाली. त्यांच्यापैकीं ज्यांना इंग्रजी येत होतं त्यांच्याशीं कांतच्या तत्त्वज्ञानाच्यासंबंधानं माझा बराच कडाक्याचा वाद झाला. कारण जे भाववादी होते त्यांचा हेगलकडे अधिक कल झुकत होता आणि जे भौतिकवादी होते त्यांना कांतचं तत्त्वज्ञान भाववादी वाटे. कांतच्या तत्त्वज्ञानाचं समर्थन करतां करतां माझ्या अगदीं नाकीं नऊ आले. शेवटीं त्यांनीं कांतच्या ज्ञानाच्या सिद्धान्तावर मला एक प्रबंध लिहायला सांगितला. या प्रबंधासाठीं कांतचं The Critique of Pure Reason या ग्रंथाचा मी फक्त पृथक्करणात्मक (analytical) भाग निवडला होता. हा प्रबंध खरोखर मी अगदीं थोड्या दिवसांत लिहून दिला असता, पण मी त्या विद्यालयांत एक वर्ष तरी राहिलं पाहिजे अशी अट घातली. अर्थात् मी मनांत आणलं असतं तरी सुद्धां एक वर्ष तिथं राहाणं शक्य नव्हतं. परतु मी ती सबंध सुट्टी तिथंच काढली. मी जायला निघालो त्यावेळीं सर्व प्रोफेसर माझ्याशीं प्रेमानं वागले. त्यांनीं पुन्हां पुढल्या वर्षी येण्याचा आग्रह केला. मी ऑक्सफर्डला परत आल्यानंतर माझा प्रबंध जवळजवळ अर्धा लिहून काढला. पुढल्या वर्षाच्या मोठ्या सुट्टींत मी पुन्हां कोनिंग्जबर्गला गेलो आणि तिथं असतांना माझा प्रबंध मी त्या प्रोफेसरांना वाचायला दिला. माझा प्रबंध वाचून त्यांचं समाधान झालं. परंतु त्यांच्या विद्यालयाचे मी कांही तांत्रिक नियम न पाळल्यामुळें डॉक्टरेटसाठीं तो प्रबंध मान्य करावा कीं नाहीं याबद्दल त्या प्रोफेसरांमध्यें मतभेद झाला. मला खरोखर या गोष्टीची कांहींच जाणीव नव्हती. शेवटीं मला एका प्रोफेसरनं जेव्हां ही गम्मत सांगितली, तेव्हां मजा वाटली. त्यांच्या

दृष्टीनं दुसरी एक अडचण उपस्थित झाली होती; माझा प्रबंध जर्मन भाषेंत नव्हता. अर्थात तो प्रबंध जर्मन भाषेंत मला लिहितां येणं शक्य नव्हतं. शेवटीं मी जेव्हां जायला निघालों त्यावेळीं तत्त्वज्ञान शाखेच्या प्रोफेसरांची सभा झाली. आणि माझ्या नांवामागं डॉक्टर ऑफ फिलॉसफी ही पदवी लावण्याची परवानगी देण्यांत यावी अशी विद्यालयाला शिफारस केली. मी जेव्हां परत इंग्लंडला आलों तेव्हां डॉ. जॅक्सच्या शिफारशीवरून रॉयल सोसायटी ऑफ लिटरेचर या संस्थेनं मला सभासद निवडला आणि डॉ. जे. इस्टलीन कार्पेंटर यांच्या शिफारशीवरून रॉयल एशियाटिक सोसायटीनं मला आपला सभासद करून घेतलं. याच सुमारास डॉ. श्वाइट्झरला उत्तर म्हणून मी येशू ख्रिस्ताचं चरित्र लिहिलं होतं. ते चरित्र आमच्या कॉलेजचे डीन डॉ. गौ यांना इतकं आवडलं कीं नव्या कराराच्या परीक्षेत त्यांनीं मला पहिला वर्ग दिला. समाजशास्त्र आणि मानसशास्त्र यामध्येंही मला पहिला वर्ग मिळाला. फक्त जुना करार आणि इतिहास यांमध्यें माझी मुळींच प्रगति न झाल्यामुळें मी जवळजवळ नापास होण्याच्या बेतांत होतो. परंतु इतर परीक्षांतील माझं नैपुण्य पाहून त्या त्या विषयांवरील प्रोफेसरांनीं मला कसाबसा तिसरा वर्ग दिला.

याच सुमारास शिकागो येथील मिड्विल् कॉलेजचे प्रेसिडेंट डॉ. साउथवर्थ यांच्याशीं माझा पत्रव्यवहार चालू होता. कारण ऑक्सफर्डचा अभ्यासक्रम संपल्यानंतर मी अमेरिकेला जाण्याचा विचार करीत होतो. डॉ. साउथवर्थकडे मी माझ्या येशू ख्रिस्ताच्या जीवनाची टाईप केलेली एक प्रत पाठविली होती. डॉ. साउथवर्थनीं मला मिड्विल् कॉलेजांत येण्यासाठीं आमंत्रण केलं होतं. त्यांनीं माझ्या सर्व खर्चाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली होती. मी अमेरिकेला जायला निघणार इतक्यांत हिंदुस्थानांतून मला एक पत्र आलं. पत्रात कांहीं कौटुंबिक अडचणींचा उल्लेख होता. ते पत्र वाचल्यानंतर मी अमेरिकेला जाण्याचा बेत रद्द केला आणि ऑस्ट्रेलियन् शिपिंग कंपनीच्या ऑस्टर्लि नांवाच्या बोटीनं स्वदेशीं येण्यास निघालो.

# ११

मी मुंबईत आल्यानंतर कांहीं दिवसांनी सबंध गुजरात प्रांतावर एक महान् संकट कोसळलं. अतिवृष्टि झाल्यामुळे गुजरातेंतील गांवंच्या गांवं वाहून गेलीं, लोकांचं पीक बुडालं, लोकांना खायला मिळेनासं झालं. गुजरातचं हें संकट निवारण करण्यासाठी प्रार्थनासमाजानं एक रिलीफ फंड काढला. मला गुजरातला या रिलीफच्या कामासाठीं जावं लागलं. मी अहमदाबादला जाऊन पोंचल्यावर माझे मित्र गट्टुलाल ध्रुव यांच्याकडे जाऊन उतरलो. गट्टुभाईनीं मला सांगितलं, 'तुम्हांला या निमित्तानं जें कांहीं काम करायचं असेल, तें स्थानिक कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या सहकार्यानं करा.' त्यावेळीं सरदार वल्लभभाई अहमदाबाद म्युनिसिपालटीचे अध्यक्ष होते, आणि दादासाहेब मावळंकर सेक्रेटरी होते. कॉंग्रेस कमिटीच्या कचेरीत मी मावळंकरांना जाऊन भेटलो आणि त्यांना सांगितलं कीं, 'मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या वतीनं येथील संकटग्रस्ताना मदत करण्यासाठीं मी आलो आहें.' माझी सर्व हकीगत ऐकून घेतल्यानंतर मावळंकरांनीं मला सरदार वल्लभभाईंची भेट घ्यायला सांगितलं. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं मी सरदारांच्या घरीं गेलों. सरदारसाहेब दुसऱ्या एक दोन माणसांशीं बोलत बसले होते. मी त्यांना आपल्याशीं कांहीं बोलायचं आहे, असं म्हटल्यावर ते म्हणाले, 'मला आतां वेळ नाहीं. तुम्ही पुन्हां केव्हां तरी या.' मीं त्यांना हळूच म्हटलं, 'माझं स्वतःचं खासगी काम असं कांहीं नाहीं किंवा आपल्याकडे नोकरी मागायला आलों नाहीं. तुमच्या प्रांतांत सध्यां जें संकट ओढवलं आहे, तें निवारण करण्याचा थोडासा प्रयत्न करण्यासाठीं आलों आहें.' हे माझे उद्गार ऐकतांच सरदार ताबडतोब उठले; आणि मला घेऊन आंतल्या खोलींत गेले. त्यांनीं मला तुम्ही लोकांना कुठल्या प्रकारची मदत करणार असे अनेक प्रश्न विचारले. मी त्यांना सांगितलं कीं, 'प्रार्थनासमाजानं या कामाप्रीत्यर्थ एक स्वतंत्र फंड उभारला आहे. त्याचे पैसे जसजसे जमतील, तसतसे ते खर्च करण्याचा समाजानं मला अधिकार दिला आहे.' सरदार वल्लभभाईनीं थोडा वेळ विचार केला आणि नंतर मला ते म्हणाले, 'अहमदाबाद जिल्ह्याला मदतीची विशेष जरुरी आहे असं वाटत नाहीं. आनंद जिल्ह्यांत मात्र पावसानं फारच कहर करून

टाकला आहे. तेव्हां तुम्ही त्या जिल्ह्यांत जाऊन जर काम केलंत तर बरं होईल.' मी 'ठीक आहे' म्हटलं आणि तिथून निघालों. त्या दिवशीं रात्रीं माझा गुजराती मित्र हरिप्रसाद याला घेऊन निघण्याची तयारी करीत होतो. इतक्यांत अचानक एक गृहस्थ तिथं आला आणि मला म्हणाला, 'अहमदाबाद जिल्ह्याला तुमच्या सारख्यांच्या मदतीची जरुरी असतांना तुम्ही आनंद जिल्ह्यांत कां जातां तें मला कळत नाहीं ?' वल्लभभाईंनीं जें मला सांगितलं ते मी त्याला सगळं सांगितलं. तेव्हां तो म्हणाला 'वल्लभाईंना स्वतःलाच आमच्या जिल्ह्यांतील खेड्यांची माहिती नाहीं. तुम्हांला माझं म्हणणं खोटं वाटत असेल, तर मी तुम्हांला इथून जवळच असलेल्या एका खेड्यांत घेऊन जातों. तुमची खात्री पटली तर तुम्ही इथं रहा, नाहीं तर खुशाल दुसरीकडे जा.' मी हरिप्रसादला म्हटलं, 'आजचा दिवस आपण इथंच राहूं या. उद्यां सकाळीं हा गृहस्थ म्हणतो त्या खेड्यांत जाऊन स्वतःच पहाणी करून येऊं.'

त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर आम्ही एक बैलाची गाडी ठरवली आणि अहमदाबादपासून चार मैलांवर असलेल्या रखियाल गांवीं गेलों. त्या गांवांत गेल्याबरोबर आम्हांला जीं एकेक दृश्यं तिथं दृष्टीस पडलीं, तीं पाहून मला आश्चर्याचा धक्काच बसला. गांवात कांहीं मोजक्या घरांशिवाय बहुतेक सर्व घरं पडलीं होतीं आणि कांहीं थोडे वाणी सोडून दिले तर बहुतेक लोकांना अन्न मिळण्याची पंचाईत दिसून आली. आम्ही तावडतोब तेथील गावकऱ्यांची सभा बोलावली आणि हरिप्रसादानं गुजरातींत त्यांना आमचा तिथं येण्याचा उद्देश सांगितला. तेव्हां एकामागून एक गांवकरी आम्हांला आपलीं गाऱ्हाणीं सांगूं लागला, आणि मी त्यांना मदत कोणत्या स्वरूपांत करायची याचा विचार करूं लागलो. गांवात हिंवतापाची साथ होती. तेव्हां मी निश्चय केला कीं, आपल्याजवळ जे कांहीं थोडे पैसे आहेत, त्यांचा प्रथम या लोकां-साठीं उपयोग करायचा. मी आणि हरिप्रसाद तावडतोब परत अहमदाबादला आलों. प्रथम बँकेंत जाऊन आम्ही एक अकौंट ओपन केला. नंतर कमी दरांत आम्हांला माल देईल असा एक वाणी पाहून आम्हांला जो जो माल लागेल तो तो त्यानं पुरवा-यचा असा त्याच्याशीं करार केला. त्यानंतर तांदुळ, बाजरी, जोंधळा जे जें कांहीं मिळेल, तें तें आम्ही मोठ्या प्रमाणांत खरेदी केलं. नंतर केमिस्टच्या दुकानांत जाऊन क्विनिन, फ्रूट सॉल्ट, सिडलिट्झ पावडर, कॅस्टर ऑईल, आयोडिन, कापूस, बोरीक पावडर, कॅरबॉलिक सोप इत्यादि जिन्नस खरेदी केले. हा सर्व माल आम्ही गाडींत घातला आणि रखियालला पुन्हां परत गेलों. ज्या लोकांच्या जवळ मुळींच धान्य नव्हतं, त्या प्रत्येकाला एकेक पायली तांदूळ, गहूं वगैरे धान्य दिलं. आमच्याजवळचं सर्व धान्य संपल्यानंतर मी माझी औषधाची पेटी घेऊन प्रत्येक घराची पहाणी करायला निघालो. तेव्हां कुणाला ताप आला होता, कुणाचं पोट दुखत होतं, तर कुणाचं डोकं

दुखत होतं. आम्हाला त्यांच्या रोगांचा अंदाज करतां आला, त्याप्रमाणें त्याना औषधं दिलीं. आमच्या सुदैवानं आमच्या या उपचारानं एकही प्राणी दगावला नाहीं हें सांगणं इथं जरूर आहे. शेवटीं फिरतां फिरतां आम्ही एका झोपडीजवळ आलों, त्या झोंपडींत एक बाई कण्हत होती. तिथं दुसरं कुणीच नव्हतं. आम्ही बाईला बाहेर बोलावलं, तो तिचा हात एका मळक्याशा फडक्यात बांधलेला होता. 'काय झालंय तुझ्या हाताला ?' म्हणून विचारताच तिनं ते फडकं सोडून आम्हांला हात दाखवला. तिचा हात पाहिल्या-बरोबर माझं डोकं गरगरू लागलं. तिच्या हाताला कसली तरी जखम झाली असून ती सेप्टिक झाली होती. ती जखम सबंध हातभर पसरली होती आणि त्या जखमेंत बराच पू साचलेला होता. हाताकडे पाहिल्यानंतर मी हरिप्रसादकडे पाहिलं. हरिप्रसाद माझ्याकडे पाहून हसूं लागला. जणूं काय तो मला आपल्या डोळ्यांनीं विचारीत होता कीं, 'हिच्या हातावर आतां तुम्ही कसला उपचार करतां तें मी पाहातो.' मी कांहीं न बोलतां खालीं बसलो नि माझी पेटी उघडली. पेटींतून हायड्रोजन पेरॉक्साइड बाहेर काढलं आणि तोंड फिरवून कापसाच्या बोळ्यानं तिची जखम धुऊं लागलों. जखम धुतल्यानंतर मी त्या जखमेवर बोरीक पावडर टाकली. मी आयोडीन लावणार होतो पण त्या बाईनं शंख केला असता म्हणून तो विचार सोडून दिला. नंतर ती जखम स्वच्छ कपड्यानं बाधून तिला बजावलं कीं, आम्ही उद्या पुन्हां इथं येईपर्यंत तूं ही पट्टी सोडूं नकोस. इतकं सर्व होईपर्यंत बराच वेळ गेला आणि आम्हांला सपाटून भूक लागली. तेव्हा आम्ही परत अहमदाबादला आलो.

मी गुजरातच्या खऱ्या परिस्थितीचं वर्णन एका लेखात करून तो लेख हॉर्निमनच्या 'इंडियन नॅशनल हेरल्ड' कडे पाठविला. हॉर्निमन हेरल्डचे संपादक होते. त्यानीं माझा लेख अग्रलेखाशेजारीं छापला. त्यानंतर या पत्रांत माझे लेख वारंवार येऊं लागले. विशेषतः अहमदाबाद जिल्ह्यांतील खेड्याकडे कॉंग्रेस कार्य-कर्त्यांनीं कसं दुर्लक्ष केलं होतं, त्याचं सविस्तर वर्णन मी करीत असे. हे माझे लेख आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं बॉम्बे क्रॉनिकलचे संपादक मि. सय्यद अबदुल्ला ब्रेलवी आणि वैकुंठ मेहता हे अहमदाबादला आले. त्यांना एक दिवस माझ्या लेखाचा खरेपणा पटवून देण्यासाठीं मी ब्रेलवी आणि वैकुंठभाई यांना घेऊन रखियाल गांवीं गेलो. तिथली परिस्थिति कशी आहे, हें त्यांना प्रत्यक्ष पाहायला मिळाल. मि. ब्रेलवींनीं, आपल्या वर्तमानपत्रात यासंबंधानं मी लिहीन, असं मला आश्वासन दिलं. परंतु मुंबईत गेल्यानंतर त्यासंबंधानं त्यांनीं चकार शब्दही लिहिला नाहीं ! बरोबरच आहे. कारण सरदार वल्लभभाई म्हणजे कॉंग्रेसमधलं एक बडं प्रस्थ. त्यांच्याविरुद्ध क्रॉनिकलच्या संपादकानं लिहिणं म्हणजे शिष्टाचार भंग करण्या-सारख होतं ! मि. हॉर्निमननीं मात्र माझे लेख तसेच चालू ठेवले.

रखियालप्रमाणंच अहमदाबादच्या सभोवतीं जीं दुसरीं खेडीं होतीं, त्या खेड्यांची आम्ही पाहाणी केली. प्रथम माझा असा विचार होता, कीं रखियालमधेंच राहून तेथील लोकांचीं घरं बांधून द्यायचीं. परंतु तो वेळ घर बांधणीला अनुकूल नसल्यामुळें मला तो बेत बदलावा लागला. रखियालप्रमाणंच बाकीच्या गांवातही माझा उपक्रम मी चालू ठेवला. एका गांवांतील लोकांनीं मात्र मला साफ चकवण्याचा प्रयत्न केला. त्या गांवचं नांव मला आतां आठवत नाहीं. पण त्या गावांत गेल्यावर मी हरिप्रसादला तिथल्या लोकांच्या गरजा काय आहेत, याची यादी करून घ्यायला सांगितलं. ती यादी पाहिल्याबरोबर माझ्या पोटांत एकदम धस्स झालं. कारण त्या गांवांकरतां मला कमीत कमी दोन हजार रुपये खर्च करावे लागणार होते. यादींत आपलीं नांवं सांगणारे लोक साधारण सुखवस्तुपैकीं दिसत होते. परंतु मी कांहीं बोललों नाहीं. यादी तयार केल्यानंतर आम्ही बाहेर आलों तो वाटेत आम्हांला एक माणूस भेटला. त्याचे कपडे फाटलेले होते आणि पोट अगदीं खोल गेलेलं होतं. त्या गांवांतील पुढारी आमच्याबरोबर होता. त्याला विचारलं, ' हा कोण ? ' त्यानं उत्तर दिलं, ' उंः ! हा ठाकेडा आहे. तुम्ही त्याच्याकडे लक्ष देऊं नका. ' असं म्हणून माझा हात धरून तो पुढें चालूं लागला. मी माझा हात सोडवून घेतला, तिथंच उभा राहिलों, आणि हरिप्रसादला त्याची माहिती काढून घ्यावयाला सागितलं. त्याच्या हकीगतीवरून आम्हाला कळलं कीं ज्या लोकांची आम्ही यादी करून घेतली, ते सर्व पाटीदार होते; आणि खरी उपासमार होत होती शेतावर राबणाऱ्या ठाकेडांची. मी हरिप्रसादच्या हातून ती यादी घेतली आणि फाडून तिचे तुकडे केले. त्या ठाकेडाला मी म्हणालों, ' तुम्ही लोक जिथं राहतां तिथं मला घेऊन चला. ' आम्ही तिथं पोचल्यावर ठाकेडांची एक नवीन यादी तयार केली. आमचे पैसे संपल्यानंतर मी परत मुंबईला आलों. परंतु आर्य महिला समाजाच्या वतीनं डॉ. काशीबाई नवरंगे यांनीं मला पुन्हा विनंती केली. त्यांचे पैसे कांहीं लोकाना घरं बांधून देण्यातच संपले.

गुजरातेतून परत आल्यानंतर लीला नगरकर नांवाच्या मुलीशीं माझा विवाह ब्राह्मसमाज पद्धतीनं झाला. परंतु ब्राह्मधर्मविधि कायदेशीर नव्हता म्हणून आम्हांला १८७२ च्या सिव्हिल मॅरेज ॲक्टाप्रमाणें विवाह रजिस्टर करावा लागला. विलायतेला जाण्यापूर्वी मी माझ्या पत्नीला राममोहन स्कूलमध्यें पाहिलं होतं. तिची थोरली बहीण सरोजिनी ही सुद्धां राममोहन शाळेत सातवींत शिकत होती. तिची दुसरी वडील बहीण मनोरमा हीसुद्धां त्याच शाळेंत शिकत होती. या मुली राममोहन शाळेंत शिकत असतांना माझी आणि प्रो. नगरकरांची ओळख झाली आणि आमची ओळख दिवसेंदिवस वाढत गेली. प्रो. नगरकर हे पूर्वी नवविधान ( ब्राह्मधर्मांतील केशवचंद्रांचा पंथ ) पंथाचे एक प्रचारक होते. १८९३ सालीं शिकागो इथं जी सर्व धर्मपरिषद

भरली, त्या परिषदेला ते आणि प्रतापचंद्र मुजुमदार नवविधानाचे प्रतिनिधि म्हणून गेले होते. त्यांच्या बरोबर स्वामी विवेकानंद हेही होते. परंतु स्वामीजींना कोणत्याच धर्मसंस्थेनं प्रतिनिधि म्हणून अमेरिकेला पाठवलं नव्हतं. ते स्वयं-प्रेरणेनेंच अमेरिकेला गेले. त्यामुळं त्यांच्या मार्गांत बऱ्याच अडचणी उपस्थित झाल्या. परिषदेंत शिरकाव करून घेण्यासही त्यांना जड गेलं. परंतु परिषदेमध्यें भाषण करण्याची संधि त्यांना मिळाल्याबरोबर त्यांनीं आपल्या अलौकिक वक्तृत्वानं सबंध परिषद जिंकली. तरीसुद्धां प्रतापचंद्र मुजुमदार आणि प्रो. नगरकर यांचं वक्तृत्व कमी दर्जाचं नव्हतं. या परिषदेच्या कामकाजाचे जे मोठमोठाले ग्रंथ प्रसिद्ध आहेत, त्या ग्रंथामध्यें प्रो. नगरकरांचं भाषण सांपडेल. त्या भाषणावरूनच त्यांनीं अमेरिकन लोकांचीं मनं कशीं त्वरित काबीज करून घेतलीं हें दिसून येईल. ती परिषद संपल्या-नंतर प्रो. नगरकरांनीं युनायटेड स्टेट्समध्यें व्याख्यानाचा दौरा काढला होता. या दौऱ्यामध्यें त्यानीं अनेक अमेरिकनांची मैत्री संपादन केली होती. त्यांमध्यें डॉ. संडरलंड यांचा प्रामुख्यानं उल्लेख केला पाहिजे. डॉ. संडरलंड यानीं हिंदी स्वातंत्र्यावर लिहिलेलं पुस्तक जगप्रसिद्ध आहे.

गेलं महायुद्ध संपल्यानंतर प्रो. नगरकर यांनीं एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्रोफेसर म्हणून अनेक वर्षे काम केलं. या नोकरींतून निवृत्त झाल्यानंतर त्यांनीं इंदूरच्या कॉलेजमध्ये प्रोफेसरचं काम केलं. त्यानंतर त्यानीं 'टाइम्स ऑफ इंडिया'चे खास बातमीदार या नात्यानं काम केलं. पुढे प्रकृति ढासळल्यामुळें ते सेवानिवृत्त झाले. याच वेळीं माझी त्यांची ओळख झाली आणि त्यांच्या घरीं उपासना चालविण्यासाठीं अनेक वेळां जात असल्यामुळं ओळख दाट झाली. प्रो. नगरकर याच्यावर प्रार्थनासमाज कांहीं कारणामुळें नाराज आहे याची मला पूर्ण जाणीव नव्हती. त्याचप्रमाणें प्रो. नगरकर प्रार्थनामंदिराला 'पांढरी मजीद' कां म्हणत हेंही मला माहीत नव्हतं. एक दिवस मी त्याना 'यंग थीस्ट युनियन' तर्फे व्याख्यानाला बोलावलं. त्याच्या अगोदर या संस्थेतर्फे ज्ञानोदयचे संपादक मि. एडवर्ड्स यांना मी व्याख्यान देण्यास बोलावलं असतां त्या सभेचं अध्यक्षस्थान प्रो. नगरकर यांनीं स्वीकारावं अशी मी व्यवस्था केली होती. प्रार्थनासमाजांतील काहीं दुढ्ढाचार्यांना हें माझं करणं कांहीं आवडलं नाहीं आणि त्यांनीं तसं बोलूनही दाखवलं. परंतु मी तें सर्व हसण्यावारी नेलं.

अशा रीतीनं विलायतेला जाण्यापूर्वीच माझा आणि नगरकर कुटुंबाचा बराच संबंध आला होता. अर्थात् विलायतेहून परत आल्यानंतर मी लीलाशीं लग्न करायचं ठरवलं. लीला त्यावेळीं नुकतीच फर्स्ट इअर पास होऊन इंटरमध्यें गेली होती. आमच्या विवाहाला वडील सावत्र बंधु श्री. श्री. व. नगरकर आणि आय. सी. एस. मध्यें

असलेले श्री. चंद्रकांत नगरकर या दोघांची मान्यता होती. आमच्या विवाहापूर्वी कांहीं महिने अगोदर प्रो. नगरकर परलोकवासी झाले होते.

१९२८ सालीं तरुण महाराष्ट्रीय परिषद भरली. त्या परिषदेचे बाळासाहेब खेर अध्यक्ष होते आणि मी स्वागताध्यक्ष होतो. त्या परिषदेचं मुख्य वैशिष्ट्य हेंच होतं की ज्याप्रमाणें तिनं पूर्ण राजकीय स्वातंत्र्याला पाठिंबा दिला, तसाच सामाजिक पुरोगामित्वाला तिनं मोठ्या आवेशानं मान्यता दिली. या परिषदेमध्यें जमलेल्या सभासदांपैकीं बरेचसे माझे मित्र होते; काळे, काणेकर, त्याप्रमाणे वसंतराव कर्णिक यांची ओळख या परिषदेच्या निमित्तानं प्रथम झाली. काळे यांची प्रथम ओळख झाली तेव्हांचा गमतीदार प्रसंग मला आठवतो. स्वागत समितीच्या बैठकींत परिषदेपुढें येणाऱ्या ठरावांची चर्चा झाली. ती चर्चा चालू असतां एक लांब केस ठेवलेला तीक्ष्ण डोळ्यांचा आणि बंगाली पद्धतीचा पोशाख केलेला तरुण माझ्याकडे आला. माझ्या हातांत त्यानं एक कागद दिला, आणि मला म्हणाला, ' मला हे ठराव परिषदेपुढें मांडावयाचे आहेत. ' मी त्या कागदाकडे न पाहाता त्या तरुणाकडें पाहिलं. त्याला कागद परत देऊन मी त्याला म्हटलं, ' या परिषदेमध्यें हिंदुसभावाद्यांचे कुठलेही ठराव आम्ही घेणार नाहीं. ही पुरोगामी तरुणांची परिषद आहे. ' तो तरुण कांहीं न बोलतां आपल्या जागीं जाऊन बसला. थोड्या वेळानं चहा पिण्यासाठीं सभेचं काम मीं तात्पुरतं तहकूब ठेवलं होतं. त्यावेळीं तोच तरुण माझ्या शेजारीं येऊन बसला. त्यानं हलक्या आवाजांत मला म्हटलं, ' तुम्ही मला हिंदुमहासभावादी कां म्हटलंत ? निदान माझ्यावर असला शेरा मारण्यापूर्वी तुम्ही माझे ठराव तरी वाचून पाहायला हवे होते. ' हे त्याचे उद्गार ऐकल्यावर माझं मलाच हसूं येऊं लागलं. कांहीं न बोलतां पुन्हां मी त्याचा तो कागद हातीं घेतला नि ठराव वाचले. त्यांपैकीं प्रत्येक ठराव पुरोगामी स्वरूपाचा होता. ताबडतोब मी त्या तरुणाची क्षमा मागितली आणि ते ठराव चर्चेसाठीं घेण्याचं ठरवलं. ही माझी आणि के. नारायण काळे यांची पहिली भेट. त्यानंतर अनेक कारणांनीं आमचे संबंध दृढ होत गेले.

ही परिषद भरल्यानंतर थोड्याच दिवसांनीं काळे, आळतेकर, बापूराव आपटे, काणेकर माझ्या घरीं रात्रीं नाट्यविषयाची चर्चा करण्यासाठीं जमूं लागले. मी त्यावेळीं गिरगांवांत राममोहन आश्रमाच्या वरच्या मजल्यावर राहात असें. पुरोगामी स्वरूपाची एक नमुनेदार नाट्यसंस्था काढायची हाच एक विचार आमच्या मनांत घोळत होता. ही चर्चा किती दिवस चालत होती तें आतां कांहीं आठवत नाहीं. कारण याच वर्षी ब्राह्मसमाजाची शंभरी साजरी व्हायची होती; आणि त्या गडबडींत मी असल्यामुळें मला या विषयाकडे विशेष लक्ष द्यायला अवसर मिळाला नाहीं.

याच सुमारास माझा मित्र फ्रान्सिस बलाज अमेरिकेहून जपानच्या मार्गानं हिंदुस्थानांत आला. त्यानं मला जपानची बरीच माहिती सांगितली. इतकंच नव्हे, तर त्यानं ज्या जपानी लोकांशीं ओळखी केल्या होत्या, त्या सर्वांचीं नांवं आणि पत्रं मला दिलीं. ब्राह्मसमाजाच्या शतसांवत्सरीच्या निमित्तानं मी जपानला जाण्याचं ठरविलं. त्यासाठीं सर्व तयारी केली. यावेळीं मी ब्राह्मसमाजावर कांहीं लेख लिहिले, ते ' टाइम्स ऑफ इंडिया ' मध्यें प्रसिद्ध झाले. त्याच वेळीं हेमबाबूंनीं डॉ. भांडारकर यांचं चरित्र आणि प्रार्थनासमाजाचा इतिहास हीं दोन पुस्तकं मला इंग्रजींत लिहायला सांगितलीं होतीं. या पुस्तकाचा कांहीं भाग सुबोध-पत्रिकेच्या इंग्रजी भागात प्रसिद्ध झाला आहे. परंतु हीं दोन्ही पुस्तक प्रकाशांत आलीं नाहींत. त्याला कारण हेमबाबूंचा गबाळेपणा. मी त्यांना दोन्हीं हस्तलिखितं पाठवलीं होतीं. परतु शंभरीच्या गडबडींत त्यानीं तीं कुठं हरवलीं ते त्यांचं त्यांनाच माहीत नव्हतं. मी बरींच पत्रं पाठविलीं. हेमबाबूंनीं त्या हस्तलिखितांचा कसून शोध केला. परंतु तीं गेलीं तीं गेलीच. मला पुष्कळ वाईट वाटलं आणि हेमबाबूंचा रागही आला. कारण त्या दोन्ही पुस्तकांवर मी बरेच परिश्रम घेतले होते. परंतु आज मला त्याचं कांहींच वाटत नाहीं. ज्या दृष्टिकोनांतून हीं दोन पुस्तकं लिहिलीं गेलीं होतीं तो दृष्टिकोन संपूर्ण आध्यात्मवादी होता. आज तशा प्रकारच्या आध्यात्मवादावर माझा मुळींच विश्वास बसत नाहीं. प्रार्थनासमाजाचा हीरकोत्सव साजरा झाला त्यावेळीं मी, Freedom, Religion and Reality या नांवाच एक पुस्तक प्रसिद्ध केल. परतु मी तें समग्र लिहिलं नव्हतं. तो अनेकांच्या लेखांचा एक संग्रह होता. त्यात माझे स्वतःचे २।३ लेख होते. त्या पुस्तकांत डॉ. इस्टलीन कार्पेंटर प्रभृति विद्वानांचे अनेक लेख होते. माझ्या स्वतःच्या लेखाचा विचार केला तर मला असं वाटूं लागतं कीं ते लेख मी पुस्तकरूपानं प्रसिद्ध केले नसते तर बरं झालं असतं. याशिवाय येशू ख्रिस्त, राममोहन रॉय, इमॅन्युअल कान्त प्रभृति थोर विभूतींवर छोटीं छोटीं पुस्तकं मीं प्रसिद्ध केलीं होतीं. तीं आज उपलब्ध आहेत किंवा नाहींत तें मला माहीत नाहीं. बहुतेक नसावींत अशी मी आशा करतों !

मीं जपानला निघण्यापूर्वी ' टाइम्स ऑफ इंडिया ' चे त्यावेळचे संपादक मि. शेपर्ड यांनी मला बोलावून विचारलं, ' तुम्ही जपानमध्यें आहांत तोंपर्यंत टाइम्सच्या बातमीदाराचं काम कराल किंवा काय ?' मी त्यांना सांगितलं, ' मी बातमीदाराच काम करायला तयार आहें. परंतु जपानमध्यें माझा संबंध तेथील धर्मसंस्थेशीं येणार असल्यामुळें फक्त त्या संस्थांविषयींची माहिती मी टाइम्सला पुरवायला तयार आहें. ' त्याप्रमाणें माझे कांहीं लेख ' टाइम्स ऑफ इंडिया ' मध्यें प्रसिद्ध झालेले मीं जपानहून आल्यानंतर मला पाहायला मिळाले. ब्राह्मसमाजाची शंभरावी जपानला जाऊन तिथं साजरी करावी हा विचार माझ्या मनांत त्यावेळीं कां आला तें सांगतां येत नाहीं. माझा

मित्र फ्रान्सिस बलाज यानं जपानची जी माहिती मला सांगितली त्यावरून जपानला जाण्याची इच्छा मला होणं साहजिक होतं. केशवचंद्रांचे समकालीन आणि ब्राह्मसमाजाचे नांवाजलेले एक पुढारी प्रतापचंद्र मुजुमदार जपानला गेले होते. त्याचप्रमाणें डॉ. रवींद्रनाथ ठाकूर हेसुद्धां जपानला जाऊन आले होते. परंतु ब्राह्मधर्माचं प्रचाराचं कार्य जपानमध्यें जाऊन करावं हा विचार पहिल्या प्रथम फक्त माझ्याच डोक्यांत आला याचा मला किती तरी अभिमान वाटला. त्या अभिमानांत अहंपणाचा भाग किती मोठा होता तें मला आज सांगतां येत नाहीं. ब्राह्मसमाजाची शंभरी हिंदुस्थानांतील अनेक गांवांत साजरी होत होती. त्याप्रमाणें ती कोकोनाडा इथंही साजरी झाली. त्यावेळीं तेथील ब्राह्मपुढारी सर व्यंकटराव नायडू यांनीं मला कोकोनाडाला व्याख्यान देण्यासाठीं बोलावलं. अर्थात् मुंबईहून कोकोनाडा, कोकोनाडाहून कलकत्ता आणि कलकत्त्याहून जपान असा माझा प्रवासाचा क्रम आपोआपच ठरला. कोकोनाडाहून ज्यावेळीं मी कलकत्त्याला जाऊन पोचलों, त्यावेळीं साधारण ब्राह्मसमाजांत शंभरीची बरीच धामधूम चालू होती. जो भेटेल तो कामांत गर्क असलेला दिसायचा. दोन मिनिटं थांबून बोलायलासुद्धां कुणाला वेळ नव्हता. तरीसुद्धां ब्राह्मधर्माचं प्रचारकार्य करण्यासाठीं मी जपानसारख्या अनोळखी नि दूर देशांत जाणार याचं सर्वांना कौतुक वाटत होतं. समाजाचे वृद्ध पुढारी आणि इतर तरुणतरुणी यांनीं माझ्यावर अभिनंदनाचा नुसता वर्षाव केला. माझ्या सन्मानार्थ एकदोन सभा झाल्या. एकदोन उपासना झाल्या हें सांगायला नकोच. दादामहाशयांनीं मला त्यावेळीं उपदेश केला. उपदेश करताना त्यांचे डोळे भरून आले नि कंठ सद्गदित झाला. ते म्हणाले, ‘ पूर्वी भगवान् बुद्धानं आपल्या अनुयायांना आपल्या धर्माचा प्रचार करण्यासाठीं चारीं दिशांना पाठवलं. आज ब्राह्मसमाज तुला पाठवीत नाहीं; तूं आपणहून जातो आहेस. ही एक ईश्वरी प्रेरणा आहे असं मी समजतों. तुझ्या हातून अशींच महत्कार्य घडोत असा माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे.’ त्यांचे हे शब्द मी मराठींत दिले आहेत. आणि त्यात मूळ बंगालींतला जिव्हाळा आलेला नाहीं. परंतु ते जे शब्द बोलले ते अजूनही माझ्या लक्षात आहेत.

# १२



मी जपानला निघालों तो एका जपानी कार्गो बोटींतून. दुसऱ्या बोटींत जागा न मिळाल्यामुळें मला या बोटींतून नाइलाजानं प्रवास करावा लागला. युरोपमधून प्रवास करून आल्यामुळं निरनिराळ्या देशांतील निरनिराळं अन्न खाण्याचे माझ्यावर अनेकवार प्रसंग आले. परंतु जपान्यांचं खाणं कसं असतं याची चौकशी करतां मला जी बातमी मिळाली होती, तिनं मी अगदींच घाबरून गेलों. ईल नांवाच्या माशाची आमटी आणि भात हे जपान्यांचं मुख्य खाणं. या आमटीला इतका उग्र वास येतो कीं ती तोंडांत घालणंच शक्य नसतं. ही बातमी ऐकल्यावर मी जरा विचारांत पडलो. त्या कार्गो बोटीनं जपानला पोहोचायला कमीत कमी बावीस दिवस लागणार होते. इतके दिवस जर आपल्या पोटांत अन्न गेलं नाहीं तर आपली काय गत होणार हा विचार मनाला त्रास देऊं लागला. शेवटीं यावर बराच विचार केल्यानंतर आणि कांहीं मित्रांनीं सांगितल्यावरून मी एक कुकर खरेदी केला. त्याचप्रमाणे तांदूळ, डाळ वगैरे खिचडीला लागणारे जिन्नस खरेदी केले. कुकरसाठीं स्टोव्ह घ्यावा लागला. तेव्हां स्टोव्हबरोबर चहाचं सामान खरेदी केलं आणि पाश्चराईज केलेल्या दुधाचे सीलबंद डबे बरेच खरेदी केले. सकाळच्या न्याहारीसाठीं फोर्डसचे डबे व इतर जिन्नस खरेदी केले. अशा रीतीनं जय्यत तयारी केल्यानंतर एकदांचा बोटींत जाऊन बसलो. मालाची बोट ती. अर्थात् तिचं स्वरूप काय असणार! त्याचं वर्णन करण्याची जरुरी नाहीं. राहाण्याची, विशेषतः झोपण्याची व्यवस्था यथतथाच होती. परंतु माझा होल्डॉल बरोबर असल्यामुळें मी त्याची फिकीर केली नाहीं.

बोटीमध्यें बहुतेक सर्व प्रवासी जपानी होते. डेकवर प्रवास करणारे मात्र बरेचसे शीख स्त्रीपुरुष होते. त्यांच्या एकंदर पेहेरावावरून ते परदेशांत मजुरी करण्यास जात होते असा अंदाज कुणालाही आला असता. त्यांपैकीं कांहीं जणांची मी ओळख करून घेतली. कारण जपानी बोटीवर भाषेची अडचण होतीच. त्यामुळे कुणाही जपानी स्त्रीपुरुषाशीं मला बोलतां येणं शक्य नव्हतं. जपानी लोकांनीं इंग्रजी भाषेवर किती कडक

बहिष्कार घातला आहे त्याचा जर अनुभव कुणाला घ्यायचा असेल तर त्यानं जपानी बोटींतून अवश्य प्रवास करावा. केबिनचा प्रवासी असा मी एकटाच होतों. तरीसुद्धां जपानी प्रवाशांपैकीं एकानंही तुसडेपणा दाखवला नाहीं. उलट आमची कुठं तरी भेट झाली म्हणजे नुसतं हसून आपल्याला बोलण्याची इच्छा आहे असं दर्शवीत; परंतु त्यांना इंग्रजी येत नव्हतं, नि मला जपानी येत नव्हतं. म्हणून नुसतं हसण्यापलीकडे आम्हाला कांहीं करतां आलं नाहीं. जपानी स्त्रियासुद्धां अगदीं मनमोकळेपणानं वागत. त्यांच्या वागण्यावरून त्यांना वर्णभेदाची बाधा झाल्याचं मला दिसून आलं नाहीं. जपानी स्त्रियांपैकीं बहुतेकांनीं पाश्चात्य पद्धतीचे झगे घातले होते; त्यांची वागण्याची पद्धतीही बहुतेक पाश्चात्य धर्तींचीच होती. परंतु त्यांच्या कांहीं चालीरीति पाहून मी प्रथम भांबावून गेलो. कारण युरोपमध्यें त्यांतलं माझ्या दृष्टीस कांहींच पडलं नव्हतं. एक दिवस सकाळीं मी केबिनच्या बाहेर येऊन पाहातों, तर एक जपानी स्त्री आपल्याच केबिनच्या समोर न्हाव्याच्या समोर बसून केस कापून घेत होती. स्पेनमध्ये एकाच सलूनमध्यें स्त्री-पुरुष केस कापून घेतांना मी पाहिले होते. म्हणून मला त्याचं विशेष कांहीं वाटलं नाहीं. म्हणून मी तसाच डेकवर येरझाऱ्या करूं लागलो. परत केबिनकडे येतांना पाहातों तर तो न्हावी त्या स्त्रीच्या तोंडावरून वस्तरा फिरवीत होता. तें पाहिल्यावर मी चमकलो आणि तसाच थबकून उभा राहिलों. त्या न्हाव्यानं त्या स्त्रीच्या भुवया वस्तऱ्यानं कोरल्या आणि कपाळावर उगवलेले मधले केस वस्तऱ्यानं काढून टाकले. मी तिथं उभा राहून पाहात आहें याचं तिला मुळींच वैषम्य वाटलं नाहीं. उलट कांहीं वेळानं उभं राहून तिनं आपला झगा झाडला आणि ती आपल्या केबिनमध्यें निघून गेली.

दुसरा असाच एक चमत्कारिक प्रसंग माझ्यावर आला. तो मी इथंच सांगून टाकतों. आमच्या सर्वांच्या केबिन्स एका बाजूला रांगेनं होत्या. केबिनच्या समोर बाथरूम बांधल्या होत्या. एक दिवस सकाळीं मी माझ्या केबिनच्या दारांत उभा होतो. इतक्यांत समोरच्या बाथरूमचं दार उघडलं गेलं आणि त्या बाथरूममधून एक जपानी स्त्री बाहेर आली. तिला पाहिल्याबरोबर मी जरा मागें सरकलों. कारण ती विवस्त्र होती. मला तिनं पाहिलं, तरीसुद्धां ती हळुहळू पावलं टाकीत चालली होती. खोलींत गेल्यानंतर मात्र तिनं दरवाजा बंद करून घेतला आणि मला हायसं वाटलं. या लोकांच्या आणखी असल्या किती विलक्षण चालीरीति पाहायला मिळणार आहेत याचा मी विचार करूं लागलों.

या बोटीचं नांव मी विसरून गेलो होतों. कारण ती बोट मला मुळींच आवडली नाहीं. पण त्या नांवाच्या पुढें मास हे शब्द होते, एवढं मात्र खास. कलकत्त्याहून निघाल्यानंतर या बाईसाहेब तिसऱ्या दिवशीं रंगूनला येऊन पोचल्या. रंगूनला ही बोट माल नेण्यासाठीं तीन दिवस थांबणार होती. मी रंगूनला येऊन त्या ठिकाणीं माझा

दोन दिवस मुक्काम होणार आहे, ही बातमी हेमबाबूंनीं तेथील ब्राह्मसमाजाच्या सेक्रेटरीला पत्रद्वारें अगोदरच दिल्यामुळें या तिन्ही दिवशीं माझीं जाहीर व्याख्यानं रंगूनला ठेवण्यांत आलीं. त्यांपैकीं पहिलं व्याख्यान रंगून हायकोर्टाचे त्यावेळचे चीफ जस्टिस मि. दास यांच्या अध्यक्षतेखालीं झालं. त्या व्याख्यानांत मी ब्राह्मधर्म आणि मार्क्सवादाचा आर्थिक सिद्धान्त यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. तो माझा प्रयत्न यशस्वी होता असं मला आज वाटत नाहीं. परंतु अध्यक्षांना तें भाषण फार आवडलं आणि ब्राह्मसमाजाच्या सेक्रेटरीनं मला विनंती केली कीं जपानला जाण्याचा नाद मी सोडावा आणि रंगूनला कायमचं स्थायिक होऊन राहावं.

रंगूनला माझे दोन तीन दिवस अत्यंत गडबडींत गेले. ज्या बंगाली गृहस्थांकडे माझी राहाण्याची सोय केली होती ते रंगूनमधल्या एका हायस्कूलचे हेडमास्तर होते, परंतु तिथल्या ब्राह्मसमाजाचे पुढारी असल्यामुळें त्यांना अधिक महत्त्व होतं. त्यांनीं माझ्यासाठीं भरपूर कार्यक्रम आंखला होता. दुसऱ्या दिवशींच माझं जाहीर व्याख्यान ब्राह्मसमाजांतच झालं. त्या व्याख्यानाचा विषय काय होता, तें मला आतां नक्की आठवत नाहीं. परंतु व्याख्यान संपल्यानंतर एक सडपातळ ठेंगू गृहस्थ माझ्याकडे आले आणि त्यांनीं मला चहाचं आमंत्रण दिलं. मीं हेडमास्तरांकडे पाहिलं. त्यांनीं मान डोलावली तेव्हां मीं होय म्हटलं. दुसरे दिवशीं सकाळीं मी आणि हेडमास्तर चहासाठीं त्या गृहस्थाकडे गेलों. गृहस्थ मध्यम स्थितींतला दिसला. घरामध्यें अव्यवस्था मात्र बरीच होती. चार दोन मुलं इकडे तिकडे खेळत होतीं. दिवाणखान्याच्या आंतल्या खोलींत एक लठ्ठ बाई पाठमोरी बसली होती. थोड्या वेळानं चहाचा ट्रे घेऊन ती बाई आमच्यासमोर आली. तिला पाहिल्याबरोबर मी एकदम दचकलों. तिनं दिलेला कप माझ्या हातून पडण्याच्या बेतांत होता. परंतु सावरून धरल्यामुळें तो तसाच हातांत राहिला. पुन्हा मी तिच्याकडे पाहिलं नाहीं. खालीं मान घालून चहा पिऊं लागलों. माझ्या मनांत एक विचार येऊन गेला. नऊ वर्षांपूर्वी जी मुलगी मला भेटली आणि जिच्या प्रेमांत मी अचानक सांपडलों, ती हीच असेल का ? खात्री करून घेण्यासाठीं चोरून एकदां मी तिच्याकडे पाहिलं. तीच असल्याबद्दल माझ्या मनांत शंका उरली नाहीं. गेल्या नऊ वर्षांत किती फरक पडला होता तिच्यांत ! शरीरानं ती स्थूल झाली होती. इतकंच नव्हे तर तिच्या कपाळावर आंठ्या आणि डोळ्यांमध्यें त्रासिकपणा दिसत होता. पूर्वी तिचा चेहरा किती गोड आणि हसतमुख असे. बायका संसारांत पडल्या कीं त्यांच्या मनाचा आणि चेहऱ्याचा टवटवीतपणा आठनऊ वर्षांतच सुकून जातो कीं काय असा विचार माझ्या मनांत आला. चहा प्याल्यानंतर मी तिथं फार वेळ उभा राहिलों नाहीं. थोडंसं औपचारिक संभाषण झाल्यानंतर हेडमास्तर नि मी घरीं परत आलों.

त्याच दिवशीं माझी बोट रंगूनहून निघणार होती. मला निरोप देण्यासाठीं ब्राह्म-समाजांतील बरीच मंडळी आली होती. एका ब्राह्म गृहस्थानं एक नवी कोरी पानानं भरलेली चंची मला दिली. तो म्हणाला, बोट फार हालायला लागली आणि पोटांत मळमळायला लागलं कीं तुम्ही पान खात जा, म्हणजे तुम्हाला बरं वाटेल. त्याच्या चंचीचा मी आनंदानं स्वीकार केला. त्या चंचीचा मला पुढं बराच उपयोग झाला, हें सांगायला नकोच. रंगूनहून आमची बोट दोनतीन दिवसांनीं पिनांगला येऊन पोचली. बोट त्या ठिकाणीं फारच थोडा वेळ थांबणार असल्यामुळं शहरामध्यें जाऊन मी नुसता फेरफटका करून आलों. पिनांगनंतर आमची बोट सिंगापूरला थांबली. तिथं तिचा मुक्काम दोन दिवस असल्यामुळं एका गुजराती गृहस्थाकडे मी उतरलों होतों. या गृहस्थाकडे पूर्वी प्रो. धर्मानंद कोसंबी आपल्या मुलीसह येऊन राहिले होते. कोसंबींच्या रागीटपणाच्या आणि आततायीपणाच्या कांहीं मजेदार गोष्टी त्यानं मला सांगितल्या. मला कोसंबींच्या रागीटपणाचा थोडासा अनुभव होताच. तो आठवला म्हणून इथंच सागतो.

माझा हंगेरियन मित्र फ्रान्सिस बलाज माझ्याकडे मुंबईला कांहीं दिवस राहिला होता. तो असतांना प्रो. धर्मानंद कोसंबी कांहीं कामानिमित्त माझ्याकडे आले होते. ते कशासाठीं आले होते तें आतां कांहींच आठवत नाहीं. परंतु ते आमच्या खोलींत आले त्यावेळीं मी आणि फ्रान्सिस बौद्ध धर्मावर चर्चा करीत होतों. फ्रान्सिस मोठमोठ्यानं आपलं बौद्ध धर्मावरील मत प्रातिपादन करीत होता. मी त्याचं बोलणं शांतपणानं ऐकून घेत होतो. प्रो. कोसंबी आंत आल्याबरोबर मी त्यांची आणि फ्रान्सिसची ओळख करून दिली. त्यांची ओळख झाल्यावर फ्रान्सिसला अधिकच चेव आला आणि तो म्हणाला, ‘बुद्ध धर्मात विधायक स्वरूपाचीं अशीं नीतितत्त्वं मुळींच नाहींत.’ अशी त्याची बडबड बराच वेळ चालली होती. आणि इकडे प्रोफेसर साहेबांचा रागाचा पारा चढूं लागला. ते माझ्याकडे वळून म्हणाले, ‘या गृहस्थाचं म्हणणं तुम्हांला पटतं का?’ मी म्हणालो, ‘हो, माझंही म्हणणं जवळ जवळ तसंच आहे, असं म्हणायला हरकत नाही.’ मी जवळजवळ विचार केल्याशिवायच बोललों होतों. पण फ्रान्सिसला नाखुश करण्याची माझी इच्छा नव्हती आणि वरून शांत दिसणारे हे गृहस्थ आपल्यावर एकदम भडकतील याची तर मला मुळींच कल्पना नव्हती. कल्पना असती तर मी मुळींच बोललो नसतों. माझ्या बोलण्याचा परिणाम एकदम असा झाला की प्रोफेसरसाहेबांनीं अगदीं शेलक्या शब्दांत आमची हजेरी घेतली. नंतर कांहीं वेळानं ते शांत झाले आणि बुद्धधर्मावरील एका ग्रंथाचं त्यांनीं नांव घेतलं. आम्ही त्या पुस्तकाचं कधीं नांवही ऐकलं नव्हतं. त्यांनी आम्ही हें पुस्तक कधी वाचलं आहे का म्हणून जेव्हां विचारलं, तेव्हां आम्ही चक्क नाहीं म्हणून सांगितलं.

तेव्हां ते पुन्हा आमच्यावर भडकले आणि आम्हाला वाटेल तसं बोलूं लागले. आतां मात्र मला त्यांचा राग आला. माझी गोष्ट सोडली तरी माझ्या मित्राचा अपमान करण्याची त्यांना मुळींच जरूर नव्हती. त्यांच्या म्हणण्याचा सारांश इतकाच होता की त्यांनी उल्लेख केलेला ग्रंथ ज्यांनीं वाचला नाही, त्याला बुद्ध धर्मावर मत देण्याचा मुळींच अधिकार नाही. यावर मी त्यांना विचारलं, ' आपण इमॅन्युअल कान्तचा Critique of Pure Reason हा ग्रंथ वाचला आहे का ? तो ग्रंथ जर आपण वाचला नसाल तर आपल्याला कोणत्याच विषयावर मत देण्याचा अधिकार नाहीं. ' यावर त्यांनीं खूप बडबड केली. शेवटी ते एकदम शांत झाले. त्यांचा स्वभाव खरोखरच सरळ आणि दिलदार असल्यामुळें जातां जातां ते म्हणाले, ' मी तुम्हांला बोललों याबद्दल मला फार वाईट वाटतं. मी तुमची दोघांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागतों. ' यावर ' शांत डोकं ठेवून चर्चा केली असती तर बरं झालं असतं ' असं काहीं तरी मी पुटपुटलो. त्यावर स्वारी पुन्हा उसळली आणि म्हणाली, ' तुम्ही जर असं म्हणाल तर मी जें तुम्हाला बोललो ते पुन्हा बोलेन आणि पुन्हां मी तुमची क्षमा मागेन ' हे त्याचे उद्गार ऐकून आम्हां दोघांना जें हसूं कोसळलं तें आवरतां आवरतां पुरेवाट झाली. प्रो. धर्मानंद कोसंबी यांच्या त्यानं ज्या गमतीदार गोष्टी सागितल्या त्या या पार्श्वभूमीवर अधिकच उठावदार दिसल्या.

सिंगापूरहून मी हाँगकाँगला येऊन पोचलो. हॉगकॉग इथं पुहुमल ब्रदर्स या प्रसिद्ध सिंधी व्यापाऱ्याची पेढी आहे. त्या फर्मचे मॅनेजर बोटीवर मला घेऊन जाण्यासाठीं आले होते. या ठिकाणीं एक सांगणं आवश्यक आहे कीं मुंबईहून निघतांनाच पुहुमल ब्रदर्सकडून एका गुजराती गृहस्थाच्या साहाय्यानं शिफारसपत्रं मिळालीं होतीं. त्या पत्रांचा हाँगकॉग नि जपान इथं फारच मोठा उपयोग झाला. हॉगकॉग शहर डोंगराच्या पायथ्याशीं वसलं असल्यामुळें त्या शहरांत एकच मोठा रस्ता होता. डोंगराच्या उतरंडीवर शहर असल्यामुळं रात्रीं शहरांत दिवे लागले म्हणजे बोटीच्या डेकवरून शहराची शोभा विशेष दिसत असे. ती शोभा पाहाण्यांत मी गुंग असतांना आमची बोट चालूं लागली. फोर्मोसाच्या जवळ येत असताना समुद्र बराच खवळला होता. आमची बोट वजनानं मोठी नसल्यामुळं ती हालूं लागली. परंतु मला त्याचं विशेष कांहीं वाटलं नाहीं. तांबड्या समुद्रासारख्या खवळलेल्या समुद्रातून यापूर्वीं मी दोनदां प्रवास केला होता. तांबड्या समुद्राच्या मानानं फोर्मोसाचा समुद्र शांत होता असं म्हटलं तरी चालेल. पण बाकीचे प्रवासी बेचैन होऊन गेले. आपण जपानला कधी जाऊन पोचतो असं त्यांना होऊन गेलं. माझासुद्धां प्रवास अपेक्षेपेक्षां अधिक लांबल्यामुळें मलाही प्रवासाचा कंटाळा आला, आणि कधीं एकदां जपानला जाऊन पोचतों असं मला झालं. शेवटीं एकदांची आमची बोट कोबे बंदरांत येऊन थडकली.

मला उतरून घेण्यासाठीं पुहुमल ब्रदर्सचा मनुष्य आणि मिझावा नावाचा जपानी मनुष्य आला होता. मिझावानं आपलं कार्ड पुढें केल्याबरोबर मी त्याच्याशीं हस्तादोलन केलं. कारण त्याची मला त्यापूर्वीच माहिती मिळाली होती. हा गृहस्थ जरी जपानी होता तरी कोबे इथल्या बाहाई असेंब्लीचा तो सेक्रेटरी होता.

मुंबईस बरेच दिवसांपूर्वी जेव्हां स्कूल ऑफ रिलिजन्सची मी सुरुवात केली, त्यावेळीं आमच्या सभाना बाहाई धर्मीयांना मी मुद्दाम बोलावून आणीत असें. ब्राह्म धर्म आणि बाहाई धर्म हे दोन्हीही उदारमतवादी असल्यामुळें एकमेकांबरोबर सहकार्य करण्याकडे नेहमीं त्यांचा कल असे. प्रार्थनासमाजाच्या वार्षिक उत्सवाच्या वेळीं बाहाई धर्मावर एक व्याख्यान ठेवण्यावर माझा विशेष कटाक्ष असे. त्यावेळीं सुरतचे विख्यात कायदेपंडित एन्. आर. वकील वार्षिक व्याख्यानं देत असत. मि. वकील हे बाहाई होते. अखिल भारतीय बाहाई संघाचे ते अध्यक्ष होते. याच धर्माचे एक उत्साही प्रचारक इष्मतुल्ला कोरेशी यांची माझी बरीच दाट ओळख झाली. मी जपानला जाणार असं त्यांना कळल्याबरोबर ते मला म्हणाले, ' तोकिओ आणि कोबे या दोन शहरांत आमचे संघ आहेत. कोबे इथल्या संघाचे सेक्रेटरी मिझावा याना मी पत्र पाठवतों. तुम्ही कोबेला पोचलांत कीं तिथं ते तुम्हाला येऊन भेटतील. तोकिओ इथल्या आमच्या सेक्रेटरी मिस् अलेक्झाडर या नांवाच्या एक अमेरिकन बाई आहेत, तुमचीं तोकिओंत व्याख्यानं होणारच आहेत, तेव्हां तुम्हाला त्या कुठल्या तरी सभेंत गांठतील. '

मिझावा यांचं कापडाचं दुकान होतं. त्या दुकानाचं नांव बम्मर्षे ( Bon-Marche ) असं होतं. मिझावा ज्यावेळीं बोटीवर आले, त्यावेळीं जपानी पोलिसांनीं माझी कसून चौकशी चालवली. माझा पासपोर्ट त्यांनीं उलटसुलट तपासून पाहिला. जपानला फक्त धर्मकार्य करण्यासाठींच मी आलो आहें; माझ्या येण्यामागं कोणताही राजकीय हेतु नाहीं असं मी जेव्हां त्याना समजावून सांगितलं, त्यावेळी त्यांनीं मला बोटींतून खालीं उतरण्याची परवानगी दिली. ही सर्व गडबड चालली असतांना मी मिझावा कुठं आहे म्हणून पाहूं लागलो, त्यावेळीं तो गृहस्थ लपतछपत आपली हॅट डोळ्यांवर ओढून घेऊन गर्दीतून वाट काढीत गॅंगवेमधून चालला होता. त्याची विचित्र वागणूक पाहून मला जरा आश्चर्य वाटलं. परंतु मी कांहीं बोललों नाहीं, किंवा त्याला हाकही मारली नाही. पुहुमलच्या माणसानीं माझं सामान खालीं नेण्याची अगोदरच व्यवस्था करून ठेवली होती. तेव्हां त्याच्याबरोबर मी न बोलतांच निघालो. त्या माणसानं मी खालीं आल्याबरोबर टॅक्सी ठरवली आणि पुहुमलच्या मॅनेजरच्या घरीं निघाला. या मॅनेजरचं घर कोबेच्या परकीय विभागांत ( Foreign Quarters ) होतं. या विभागाचं वैशिष्ट्य हेंच कीं या विभागांतील राहाणी पाश्चात्य पद्धतीची होती. घरीं

गेल्यावर मला पुहुमलचा सिंधी मॅनेजर भेटला आणि त्यानं माझं मनःपूर्वक स्वागत केलं. मी अंगांतील कोट आणि कार्डिगन बाजूला काढून ठेवला आणि दिवाणखान्यांत आरामखुर्चीवर विश्रांती घेत पडलो. इतक्यांत टेलिफोनची घंटा वाजली. मॅनेजरनं रिसीव्हर हातांत घेतला, कानाला लावल्याबरोबर त्यानं ताबडतोब माझ्यापुढे केला. मला आश्चर्यच वाटलं. कोबेला येऊन मला पांच मिनिटं झालीं नाहींत तोंच मला टेलिफोन करणारा हा गृहस्थ कोण असावा असा विचार करीत मी फोन कानाला लावला. पाहातों तर माझा जपानी मित्र मिझावा. त्यानं अगोदरच पुहुमलच्या माणसाकडून माझा पत्ता काढून घेतला होता. पहिल्या प्रथम त्यानं टेलिफोनवर हसायलाच सुरुवात केली. नंतर कांहीं वेळानं तो म्हणाला, ' मी एकदम असा निघून आलों याचं तुम्हांला आश्चर्य वाटलं असेल नाहीं ? माझी वागणूक तुम्हांला विचित्र वाटली असेल, परंतु तुम्हाला माझी सर्व हकीगत समजल्यावर सर्व गोष्टींचा आपोआप उलगडा होईल. तुमची ब्रेकफास्ट संपते न संपते तोच मी तिथं येतों.' आणि खरोखरच माझं खाणं आटपण्या-पूर्वी तो गृहस्थ येऊन उभा राहिला. आमचे मॅनेजर खाणं आटोपल्यावर लगेच पेढीवर जाणार होते. तेव्हा आम्हां दोघांना आयताच निवांत वेळ मिळाला.

मी आणि मिझावा एकमेकांसमोर बसलों. मिझावानं बोलायला सुरुवात केली. तो म्हणाला, ' मी जरी बाहाई धर्मीय असलो आणि बाहाई संघाचा एक कार्यकर्ता असलों तरीसुद्धां मी खरोखर कम्युनिस्ट आहे. म्हणूनच पोलिसांचा माझ्यावर डोळा असतो. पोलिसांना चुकवून तुम्हाला बोटीवर येऊन कसं भेटावं याची मला खरोखर चिंता पडली होती. तुम्हांला भेटण्याची तर मला अतिशय उत्कट इच्छा होती. म्हणूनच सर्व प्रका-रचा धोका पत्करून मी तुमच्या भेटीला आलों. तुमची भेट झाली नि तुमचा पत्ता मिळाला. तेव्हां मला तिथं थांबण्याचं मुळीच कारण नव्हतं. पोलीस तुमची चौकशी करण्याच्या गडबडींत आहेत असं पाहून मी तिथून निसटलों आणि थेट घरी आलों. आल्याबरोबर मी तुम्हांला फोन केला.' यानंतर त्यानं जपानांत पसरलेल्या कम्युनिझमची अधिक माहिती देण्यास सुरुवात केली. परंतु मी त्याला मध्येच थांबवून म्हटलं, ' हें पाहा मि. मिझावा, तुमच्या मैत्रीचा मला लाभ झाला हें मी माझं भाग्य समजतो. पण मी जपानला आलो आहें तो अगदीं निराळ्या कारणासाठीं. माझं कार्य संपलं कीं मी इथून स्वदेशी जाणार. मला तुमच्या राजकारणामध्यें कोणत्याच रीतीनं भाग घ्यायचा नसल्यामुळें आणि त्यामुळें नसत्या भानगडी माझ्या मार्गांत उपस्थित होणार असल्या-मुळें तुम्ही मला ही माहिती देऊं नये अशी माझी इच्छा आहे.' मी हें सर्व मनापासून बोललों आणि त्याचं मन दुखवूं नये म्हणून शक्य तितका जपून बोलत होतों. तो माझ्याकडे सारखा टक लावून पाहात होता. त्याच्या चेहेऱ्यावर निराशेच्या रेषा मला स्पष्ट दिसत होत्या; त्यांत कदाचित् तिरस्काराचीही रेषा असूं शकेल. कांहीं वेळानं तो

हसला आणि मला म्हणाला, ‘ठीक आहे. तुम्ही म्हणतां तसंच होऊं द्या. तुम्ही ब्राह्मधर्म प्रचारक आणि मी बाहाई संघाचा सेक्रेटरी अशी आपली जोडी चांगली शोभून दिसेल. मी तुम्हांला तुमच्या कार्यांत शक्य ती मदत करीन. माझं गुपित मात्र कुठं बाहेर फोडूं नका म्हणजे झालं.’

कोबेला मी पोचलों त्या दिवशीं रात्रीं सिंधी लोकांचा त्यांच्या क्लबमध्यें कसला तरी समारंभ होता. त्या समारंभाला पुहुमलचे मॅनेजर मला घेऊन गेले. आपल्या सर्व मित्रांशीं नि तिथं जमलेल्या इतर मंडळींशीं त्यांनीं माझी ओळख करून दिली. त्या ठिकाणीं मला अर्थातच चार दोन औपचारिक शब्द बोलावे लागले. माझं भाषण संपल्यानंतर तिथल्या एका प्रमुख व्यक्तीनं अशी सूचना केली कीं दुसऱ्या दिवशीं ‘ इंडिया क्लब ’मध्यें माझं जाहीर व्याख्यान व्हावं. त्यानं सूचना करण्याचा अवकाश, तिथल्या सर्व मंडळींनीं लगेच पुष्टि दिली. झालं, माझं व्याख्यान ठरलं. परत घरीं यायला एक वाजला. प्रवासाच्या शिणानं मी अगदींच दमून गेलों होतों. घरीं आल्यावर मला झोप कधीं लागली तें कळलंसुद्धां नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ नऊच्या सुमारास मी उठलों. उठल्यानंतर कांहीं वेळानं एक जपानी मुलगी हातामध्यें गरम पाण्याचा जग घेऊन आली. मला पाहिल्याबरोबर अगदीं लवून तिनं अभिवादन केलं आणि तोंडांतल्या तोंडांत कांहींतरी पुटपुटली. मला तिचं बोलणं मुळींच कळलं नाहीं. पण तिचा हसरा चेहेरा पाहून बरं वाटलं. मी दिवाणखान्यांत येतो तर मॅनेजर माझी वाट पाहात होते. त्यांना अगोदरच उशीर झाल्यामुळें कसंबसं खाणं उरकलं नि ऑफिसांत तातडीनं जायला ते निघाले. जाण्यापूर्वीं मात्र माझ्या संध्याकाळच्या व्याख्यानाची आठवण करून द्यायला ते विसरले नाहींत. व्याख्यानाची आठवण होतांच माझा आळस कुठल्या कुठं पार नाहींसा झाला. खाणं आटोपतांच मी व्याख्यानाच्या तयारीला लागलों. कोबेसारख्या शहरीं माझं हें पहिलंच व्याख्यान होणार असल्यामुळें आणि त्या माझ्या व्याख्यानावर माझे इतर कार्यक्रम अवलंबून असल्या-मुळें त्या व्याख्यानाची चांगली तयारी करावी असं मला वाटूं लागलं. व्याख्यानाची तयारी असं मी म्हणतों आहें खरा परंतु खरं बोलायचं तर अजूनपर्यंत मी व्याख्यानाची तयारी अशी कधींच केली नाहीं. सबंध व्याख्यान लिहून काढणं दूरच राहो, परंतु व्याख्यानाचे मुद्दे कागदावर टिपून घेण्याचा व्यवस्थेशीरपणाही माझ्या अंगीं नव्हता आणि अजूनही नाहीं. याचा अर्थ मला तोंडाला येतें तें मी बरळतों असा नव्हे. अस्खलित बोलण्याची देणगी ज्याला लाभलेली असते त्याच्या हातून हा प्रमाद बरेच वेळां घडतो. माझ्या हातून हा प्रमाद कधीं झाला नाहीं. ब्राह्मसमाजाचे एक प्रसिद्ध पुढारी ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यांच्या वक्तृत्वाचा प्रभाव हिंदुस्थानांतच नव्हे तर इंग्लंडांतसुद्धां बराच पडला होता. ते वाटेल त्या विषयावर वाटेल तेव्हां बोलूं शकतात

असा लोकांचा त्यांच्या बाबतींत विनाकारण गैरसमज झाला होता. परंतु एके दिवशीं खरोखरच ते Nothing या विषयावर बोलले.

वस्तुस्थिति अशी असते कीं ज्याला अस्खलित बोलण्याची संवय असते, तो संभाषणांत किंवा इतर प्रसंगी सुद्धां भाषण करण्याच्या पद्धतीनंच बोलत असतो. हें संभाषण अनेक वेळां अनेक विषयावर होत असतं. अर्थात या विषयांचा तो नेहमींच विचार करतो. म्हणून जाहीर सभेच्या वेळेस जरी तो बोलला तरी जाहीर संभाषणांत या विषयांतील कोणता तरी विषय आणि मुद्दे असतातच. म्हणून जाहीर भाषणाच्या वेळी फक्त विषयाची निवड करावी लागते. माझं संध्याकाळीं जाहीर व्याख्यान होणार होत, तें कोबे येथील हिंदी व्यापाऱ्यांपुढे. इथल्या हिंदी व्यापाऱ्यापैकी बहुतेक सिंधी होते. म्हणून कबीर आणि नानक या दोन संतांवर बोलायचं मी ठरवलं. न्यायमूर्ति रानडे यानीं The rise of the Mahratta power या आपल्या ग्रंथांत महाराष्ट्रीय संतानीं केलेल्या कामगिरीचा उपयोग सांस्कृतिक क्रांति व राजकीय क्रांति घडवून आणण्याकडे कसा झाला याचं सुंदर विवेचन केलं आहे. राजकीय क्रातीशी खरोखर मला त्यावेळी कांहीं कर्तव्य नव्हतं म्हणून मुसलमान आणि हिंदु या दोन संस्कृतींचा समन्वय घडवून आणून कबीर व नानक यांनीं एक नवीन प्रकारची संस्कृति कशी घडवून आणली याचंच विवेचन मी माझ्या व्याख्यानांत करण्याचं ठरवलं

ठरल्याप्रमाणे सायंकाळी माझं व्याख्यान झाल. या व्याख्यानाचा परिणाम असा झाला की, तिथं जमलेल्या हिंदी व्यापाऱ्यानी मला एक थैली अर्पण करण्याचा निश्चय जाहीर केला. त्याप्रमाणे प्रत्येक व्यापाऱ्यानं ५१ येन ( जवळ जवळ ६२–६३ रुपये ) त्या थैलीसाठी वर्गणी म्हणून देण्याचं ठरवलं. या सभेला कांही जपानी गृहस्थ आले होते. त्यांत अर्थात् माझा जपानी मित्र होताच. त्यान इतरांशीं माझी ओळख करून दिली. परंतु त्यांना इंग्रजी येत नसल्यामुळे नि समजतही नसल्यामुळें मला त्यांच्याशी बोलता आलं नाही. माझा जपानमधील अनुभव असा आहे कीं साधारणतः जपानी लोकांना इंग्रजी येत नाही आणि माझ्या जाहीर भाषणाच्या वेळी मला दुभाषाची हटकून मदत घ्यावी लागे जपाननं इंग्रजी मालाप्रमाणें इंग्रजी भाषेवरही अनेक वर्षे संपूर्ण बहिष्कार टाकला होता. पुढे पुढे इंग्रजी भाषेवर बहिष्कार टाकल्यामुळे आपलं वाङ्मयीन दृष्टया बरंच नुकसान होत असं त्याना आढळून आलं असावं. कारण मी गेलो त्यावेळी निरनिराळ्या शहरीं त्यानीं English Speaking Societies काढलेल्या मला आढळल्या मि मिझावा याला मात्र चांगलं इंग्रजी येत होतं त्यामुळे कोबे शहरांतील माझं कार्य सुकर झालं इंडिया क्लबमध्यें माझं व्याख्यान झाल्यावर कोबे शहरात अनेक ठिकाणी मि. मिझावान माझीं व्याख्यानं घडवून आणलीं. त्यापैकी बहुतेक व्याख्यानं मी बौद्धधर्मीयांच्या मंदिरात दिलीं .असं

म्हटलं तरी चालेल. जपानमध्यें बौद्धधर्मीयांची संख्या जवळ जवळ ७० टक्के असून ख्रिस्तीधर्मीय १० टक्के आणि शिंटोधर्मीय २० टक्के होते. या शिंटो धर्मांत दोन विभाग आहेत. एक राजधर्म समजला जाणारांचा आणि दुसरा भाग साधारण लोकांसाठीं असा समजला जातो. राजधर्म म्हणजे बहुतेक राजदरबारीं घडवून आणलेले अनेक समारंभ नि विधी; यापेक्षां त्याला अधिक महत्त्व नव्हतं. परंतु साधारण लोकांचा धर्म हा एका विशिष्ट जपानी लोकांमध्यें लोकप्रिय होता. या साधारण धर्मांतसुद्धां अनेक पंथ आहेत. त्यांपैकीं तेनरिक्यो नांवाचा पंथ अत्यंत प्रभावशाली आणि महत्त्वाचा समजला जातो. या पंथाविषयींची माहिती पुढे आपोआप येईल.

कोबेहून मी याकोहामाला गेलो. याकोहामा शहर २।३ वर्षांपूर्वीं धरणीकंपानं उध्वस्त झालं होतं. परंतु मी गेलो त्यावेळीं ठिकठिकाणीं नवीन इमारती आढळल्या. याकोहामा शहरीं पुहुमल ब्रदर्सची पेढी होती. अर्थात त्याच्या मॅनेजरनं माझी उत्तम बडदास्त राखली हें सागायला नकोच. याकोहामा हें तोकिओ शहराच्याजवळ असल्या-मुळें रोज सकाळीं तोकियोला जाऊन संध्याकाळीं याकोहामाला परत येणं शक्य होतं; आणि माझ्या मॅनेजरनं सुद्धां याकोहामाला मी राहावं असा आग्रह धरल्यामुळें मीं तिथंच मुक्काम करण्याचा बेत केला. दुसऱ्या दिवशीं याकोहामाच्या वाय. एम्. सी. ए. त माझं व्याख्यान झालं. आणखी एक दोन व्याख्यानं त्या ठिकाणी होणार होतीं. परंतु तोकिओ शहरांतच ब्राह्मसमाजाची शतसांवत्सरी साजरी करण्याचा माझा विचार होता म्हणून मला तीं नाकारावीं लागलीं. याकोहामाला येऊन पोचल्याबरोबरच, तोकिओ येथील गृहस्थांचीं नांवं आणि पत्ते मला फ्रान्सिसनं दिले होते, त्यांना पत्रं पाठवलीं. या गृहस्थांपैकीं ' असाही शिम्बून ' नांवाच्या सुप्रसिद्ध दैनिकाचे संपादक मि. सुगीमुरा, मिनेसेतो पक्षाचे एक पुढारी आणि वासेदा युनव्हर्सिटीमध्यें प्राध्यापकाचं काम करणारे मि. उचिगासकी आणि तोकिओ येथील हायस्कूलचे प्रिन्सिपॉल मि. इमाबूका यांचीं मला ताबडतोब पत्रं आलीं. दुसऱ्या गृहस्थांचीं पत्रं कांहीं दिवसांनीं आलीं. त्या गृह-स्थांची नांवं मला आतां आठवत नाहीत. सुगीमुरांनीं तर दुसऱ्या दिवशीं तार करूनच मला दुपारी १ वाजतां जेवायला बोलावलं होतं. मी बरोबर १ वाजतां त्यांच्या ऑफिस-मध्यें जाऊन पोचलो. त्यावेळीं आंतल्या खोलींत जेवणाच्या टेबलावर जेवणाची सर्व तयारी दिसत होती. जेवण पाश्चात्य पद्धतीचं असल्यामुळें मला हायसं वाटलं. सुगीमुरांनीं ताबडतोब मला हिंदुस्थानविषयीं अनेक प्रकारचे प्रश्न विचारायला सुरुवात केली. आपल्या तरुण वयांत सुगीमुरा ऑक्सफर्ड येथील मॅंचेस्टर कॉलेजांत शिकले होते. म्हणून त्या कॉलेजची त्यानी बरीच चौकशी केली. त्यानंतर मी जपानला कशासाठी आलो आहें हें त्यांना मी समजावून सांगितलं. मी बोलत असतांना एक कॅमेरामन तिथं आला आणि त्यानं आमचे फोटो घेतले. सुगीमुरांशीं मी बोलत असतांना हे गृहस्थ

म्हणजे जपानमधलं एक बडं प्रस्थ आहे याची मला मुळींच कल्पना नव्हती. त्यांची संपूर्ण माहिती मिळाल्यानंतर मी त्यांच्यावर एक लेख लिहून तो टाइम्स ऑफ इंडियाचे संपादक शेपर्ड यांजकडे पाठवला आणि त्यांनीं तो प्रसिद्धही केला. जेवण झाल्यावर आम्ही बराचं वेळ बोलत बसल्यामुळें मला दुसऱ्या कुणाची भेट त्या दिवशीं घेतां आली नाहीं. म्हणून मी याकोहामाला परतलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून पाहातों तर एक जपानी गृहस्थ दिवाणखान्यांत माझी वाट पाहात होता. मला पाहातांच तो उभा राहिला आणि त्यानं माझ्यापुढें एक लखोटा केला. त्या लखोट्यामध्यें आदल्या दिवशीं घेतलेल्या फोटोच्या दोन प्रती आणि 'असाही शिम्बून' चा ताजा अंक होता. तें वर्तमानपत्र उघडून पाहातों तों सबंध मजकूर जपानी भार्षेत छापलेला. मला त्याचा कांहींच अर्थबोध होईना. म्हणून मी तो मॅनेजरकडे नेला. त्यानं तो खालींवर करून पाहिला आणि एका कोपऱ्यांत छापलेला माझा फोटो त्यानं मला दाखवला. त्या फोटोखालींच माझ्याविषयीं थोडीशी माहिती देऊन जपानला येण्यांत माझा उद्देश काय आहे हें स्पष्ट करून सांगितलं होतं. त्यानंतर माझा नि सुगीमुरांचा थोडासा पत्रव्यवहार झाला. माझ्या कार्यात त्यांची दुसरी कांहीं मदत झाली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं वासिदा युनिव्हर्सिटीमध्यें मीं प्रो. उचिगासकी यांची भेट घेतली. प्रो. उचिगासकी हे जपानी पार्लमेंटचे एक सभासद होते हें मी सांगायला विसरलों. प्रो. उचिगासकी यांनीं मला तोकिओमधील प्रमुख व्यक्तींकडे नेण्याचं कबूल केलं होतं. त्याप्रमाणें ते मला प्रथम इंपीरिअल युनिव्हर्सिटीचे लायब्रेरियन डॉ. अनेझाकी यांच्याकडे घेऊन गेले. बुद्धधर्मांचे विद्वान अभ्यासक अशी डॉ. अनेझाकी यांची ख्याती तिन्ही खंडांत पसरली होती. त्याच ठिकाणीं शिंटो धर्मावर एक मोठा ग्रंथ ज्यानं नुकताच प्रसिद्ध केला होता त्या डॉ. कातोची गांठ पडली. डॉ. नितोबे यांनाही मी भेटलों. डॉ. नितोबे हे त्यावेळीं जपानी लॉर्डोच्या सभेचे सभासद होते. या सर्व गृहस्थांनीं ब्राह्मसमाजाची शतसांवत्सरी उत्तम प्रकारं साजरी करण्यास मदत करण्याचं आश्वासन दिलं. तोकिओ इंपीरिअल युनिव्हर्सिटी, वासिदा युनिव्हर्सिटी आणि तेथील दुसऱ्या ४।५ युनिव्हर्सिट्यांमध्यें माझीं व्याख्यानं झालीं.

खुद्द तोकिओमध्यें सोळा युनिव्हर्सिट्या आहेत. त्या सर्वांचीं नांवं आठवणं अशक्य आहे. तोकियो येथील वार्षिक भोजन (Annual Dinner) समारंभाच्या वेळीं मुख्य वक्ता म्हणून माझं भाषण झालं. ब्राह्मसमाजाची सांवत्सरी साजरी करण्यासाठीं तिथं एक कमिटी नेमली गेली. त्या कमिटीमध्यें प्रो. उचिगासकी, इमाबूका, एक बंगाली गृहस्थ मि. मुजुमदार वगैरे त्या कमिटींत होते. त्या समारंभाचा सर्व खर्च उचिगासकी आणि मुजुमदार या दोघांनीं देण्याचं औदार्य दाखवल्यामुळें माझी

एक मोठी चिंता दूर झाली. हा समारंभ इंपीरिअल युनिव्हर्सिटीच्या पोस्ट ग्रॅज्युएट क्लबच्या भव्य दिवाणखान्यांत करण्याचं ठरलं. या समारंभासाठीं बड्या बड्या लोकांना उचिगासकी आणि मुजुमदार या दोघांच्या सहीचीं आमंत्रणं गेलीं होतीं. समारंभाच्या वेळीं सर्व दिवाणखाना भरून गेला. तेथें जमलेल्या प्रत्येकं पाहुण्याची माझ्याशीं ओळख करून देण्यांत आली. प्रत्येक पाहुण्यानं मला आपलं व्हिजिटिंग कार्ड सादर केलं. शेवटीं या कार्डोचं एक मोठं पुडकं बांधून मी माझ्या शेजारीं बसलेल्या सिंधी मित्राच्या हवालीं केलं. हिंदुस्थानांत गेल्यावर या सर्व लोकांशीं पत्रव्यवहार करायचा व तो सतत चालू ठेवायचा म्हटलं, तरी मला दोन सेक्रेटरींची जरूर लागली असती.

भाषण करण्यासाठीं ज्या वेळेला मी प्रथम उभा राहिलों, त्यावेळीं प्रथम ब्राह्म-समाजाचा इतिहास आणि त्या समाजाच्या तीन प्रमुख पुढाऱ्यांचं कार्य याची मी संक्षिप्त माहिती दिली. त्यानंतर हिंदुस्थानांत जन्मास आलेल्या बुद्ध धर्माचं थोडक्यांत वर्णन करून त्या धर्मानं अतिपूर्वेकडील प्रदेश कसे व्यापून टाकले हें सांगितलं. भाषणाच्या शेवटीं ब्राह्म धर्मामध्येंच सर्व धर्मोचा समन्वय घडून आलेला आहे नि म्हणूनच ब्राह्म धर्म हा एकच धर्म विश्वधर्म होण्यास लायक आहे हें मी दाखवून दिलं. माझ्या भाषणां-तील बहुतेक सर्व मुद्दे प्रो. उचिगासकी यांना पटले. आणि त्याप्रमाणें त्यांनीं बोलूनही दाखविलं. प्रो. उचिगासकी हे युनिटेरियन पंथाचे असून माझ्याप्रमाणेंच ऑक्सफर्ड येथील मॅन्चेस्टर कॉलेजमध्यें त्यांनीं अभ्यास केला होता.

यानंतर माझं एक व्याख्यान इंटरनॅशनल फेलोशिप किंवा फेलोशिप ऑफ रिकन्सीलिएशन या संस्थेतर्फे झालं. या व्याख्यानाला अगदीं निवडक मंडळी आली होती. या मंडळीमध्यें एक बंगाली गृहस्थ होता. हा गृहस्थ दिसायला उंच, अंगानं स्थूल नि वर्णानं काळासावळा, गोल चेहेऱ्याचा आणि बटबटीत डोळ्यांचा असा होता. तो अगदीं माझ्यासमोर बसल्यामुळें व्याख्यान देतांना माझी दृष्टि आपोआपच त्याच्याकडे वळे. तो गृहस्थ माझं व्याख्यान लक्षपूर्वक ऐकत होता. माझं व्याख्यान संपल्यावर तो गृहस्थ माझ्याजवळ येऊन बसला आणि त्यानं मला आपली ओळख करून दिली. त्या गृहस्थाचं नांव रासबिहारी बोस. हा गृहस्थ १९१६ सालीं बॉब-फेकीच्या कटांत सामील झाला होता. म्हणून त्यानं हिंदुस्थानांतून पळून येऊन जपान-मध्यें वास्तव्य केलं होतं. जपानमध्यें बरींच वर्षे राहिल्यामुळें त्यानं जपानी भाषा पूर्ण आत्मसात करून घेतली होती. त्यानं जपानी भाषेंतील एक दोन मासिकंही त्यावेळेस चालविलीं होतीं. रासबिहारी बाबूनं जपानी स्त्रीशीं लग्न केल्यामुळें त्याला तिथं कायमचा रहिवासी म्हणून राहातां आलं.

दुसऱ्या दिवशीं त्यांच्या आमंत्रणावरून मी जेव्हां त्यांच्या घरीं गेलों, तेव्हां त्यांचा तो टुमदार बंगला, त्या बंगल्यासमोर असलेली छोटीशी बाग, त्या बंगल्यांतील एकंदर सुव्यवस्था पाहून प्रसिद्ध हिंदी क्रांतिकारक रासबिहारी बोस ते हेच का अशी मला शंका आली. त्यांनीं माझ्याजवळ हिंदी क्रांतिकारक चळवळीविषयीं बरीच चौकशी केली. परंतु मला त्या चळवळीची कांहींच माहिती नसल्यामुळें मी त्यांना समाधानकारक उत्तर देऊं शकलों नाहीं. त्यांच्या बोलण्यावरून मात्र प्रत्यक्ष राजघराण्यांत आणि वरिष्ठ वर्गांत त्यांचं वजन असावं असं दिसलं. त्यावेळीं जपानचे मुख्य प्रधान बॅरन टनाका यांची तुमची ओळख करून देतों असं ते म्हणाले. त्याचप्रमाणें शिंटो धर्मांतील तेनरिक्यो पंथाचे धर्मगुरू त्यावेळेस अगदीं लहान म्हणजे सोळा वर्षांचे होते, त्यांनाही जाऊन मी भेटावं असा रासबिहारी बाबूंनीं आग्रह धरला. मला नवल वाटतं तें हेंच कीं, माझा हिंदी राजकारणाशीं कोणत्याही रीतीचा संबंध नाहीं हें कळून आल्याबरोबर त्यांनीं तो विषय ताबडतोब सोडून दिला, आणि फक्त धर्माविषयींच चर्चा सुरू केली.

त्याच व्याख्यानाच्या वेळीं माझी मि. अलेक्झांडरशीं गांठ पडली. त्यांनीं आपल्या बाहाई संघामध्यें येऊन एक तरी व्याख्यान द्या असा आग्रह धरला. त्यांच्या संघाचं काम जपानमध्यें जोरांत चाललं होतं असं म्हणतां येणार नाहीं, तरी सुद्धां त्यांचा बाहाई धर्मावर दृढ विश्वास असल्यामुळें त्यांनीं आपल्या धर्माच्या प्रचाराचं कार्य अनेक वर्षे चालू ठेवलं होतं. माझं त्यांच्या संघांत भाषण झालं, त्यावेळीं मी बाहाई धर्म आणि ब्राह्म धर्म यांमध्यें खरोखर किती साम्य आहे तें दाखविण्याचा प्रयत्न केला. त्या दोन धर्मांत फरक असला तर एवढाच होता कीं ब्राह्म धर्म ऐतिहासिक दृष्ट्या हिंदु संस्कृतींतून जन्मास आला होता आणि बाहाई धर्म हा मुसलमान संस्कृतींतून जन्मास आला होता. शिवाय बाहाई धर्मांत विभूतिपूजा आहे ती ब्राह्म धर्मांत नाहीं. म्हणजे ज्याप्रमाणें युनिटेरियन खिस्ती धर्म येशू खिस्तावर केंद्रित झाला आहे त्याप्रमाणें बाहाई धर्म बाहाउल्लावर केंद्रित झाला आहे. हा एक फरक सोडून दिल्यास या तिन्हीही उदार धर्मांमध्यें अभ्यासकाला बरंच साम्य आढळून येईल.

# १३

ब्राह्मसमाजाच्या शतसांवत्सरीचा मुख्य समारंभ संपल्यानंतर इंपीरियल युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांपुढे माझीं अनेक व्याख्यानं झाली, परंतु त्यामध्ये उल्लेखनीय असं कांहीच नाहीं. तोक्किओंतील माझा कार्यक्रम संपल्यानंतर किओतो येथील ओतानी युनिव्हर्सिटीचे प्रो. सुझुकी आणि त्यांची अमेरिकन पत्नी यांनी आमंत्रण दिल्यावरून मी त्या युनिव्हर्सिटीत व्याख्यानं देण्यासाठीं किओतोला गेलो. या ठिकाणीं मला बुद्धधर्मीय प्रचारक आणि अधिकारी बरेच भेटले. त्यांच्या सांगण्यावरून मी तेथील मंदिरांना भेट दिली. त्या ठिकाणीं एका मंदिरांत असलेल्या अतिशय वृद्ध अशा धर्मगुरूनं मला जपानी भाषेंत लिहिलेले, परंतु उत्कृष्ट बांधणी केलेले असे बरेच धर्मग्रंथ दिले. या धर्मग्रंथांचा मला कांहींच उपयोग करतां आला नाहीं हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

मी कोबेला परत आल्यानंतर माझा मित्र मिझावा यानं मला एका प्रोफेसरच्या घरीं नेलं. या प्रोफेसरचं नांव मला आतां आठवत नाहीं ; परंतु त्याची राहाणी संपूर्ण जपानी पद्धतीची होती. त्याचं राहाण्याचं घर बाहेरून इतकं नाजूक दिसलं कीं तें खरोखर कागदाचं बनवलं आहे कीं काय असा कुणालाही भास झाला असता. आंत शिरल्यानंतर मिझावानं आपले बूट काढायला सुरुवात केली. त्याचं अनुकरण करून मीही माझे बूट काढले. बूट काढल्यानंतर मिझावानं जवळच पडलेल्या अतिशय नाजूक दिसणाऱ्या अशा मखमलीच्या सपाता घातल्या व तसलाच एक जोडा माझ्यापुढें केला. आम्ही सपाता पायांत घालून आंत शिरलों इतक्यांत त्या प्रोफेसरची बायको पुढें आली, व गुढगे टेकून तिनं आम्हाला अभिवादन केलं. हा प्रकार पाहून मी तर अगदीं गोंधळून गेलों. आपण सुद्धां गुढगे टेकावेत असा विचार क्षणभर माझ्या मनांत आला. परंतु तसं कांहीं न करतां मी मिझावाकडं पाहिलं. त्यानं कंबरेपर्यंत वाकून अभिवादन केलं. अर्थात् मीही त्याचंच अनुकरण केलं. ती स्त्री उठली आणि आम्हाला घेऊन आंतल्या दिवाणखान्यांत गेली. त्या घरांत सर्व ठिकाणीं अतिशय मऊ नि स्वच्छ अशा चटया घातल्या होत्या. त्यांची स्वच्छता बिघडूं नये म्हणूनच बाहेरून येणाऱ्यांसाठीं त्या सपाता ठेवल्या होत्या. आंत गेल्यावर आम्हांला प्रोफेसरसाहेब

भेटले. त्यांनीं लवून अभिवादन केलं आणि आम्हीही वाकून नमस्कार केला. नंतर आम्ही तिघेही चटईवर बसलों. आमच्या समोरच प्रोफेसरसाहेबांची बायको बसली. पण तीही गुढगे मोडून बसली होती. मी त्या प्रोफेसरशीं दोनतीन तास चर्चा केली पण त्या सबंध वेळांत त्यांची स्त्री तशीच बसून राहिली होती. आमचं संभाषण मात्र ती लक्षपूर्वक ऐकत होती. ऐकत असतांना ती मधून मधून म्हणजे चार–पांच मिनिटांनीं आमच्यापुढें असलेल्या लहान कपांत किटलींतून हिरव्या रंगाचा चहा ओतत होती. त्याचप्रमाणें आमच्या पुढें तिनं निरनिराळ्या प्रकारचीं फळं ठेवलीं होतीं. बोलत असतां फळं खायला माझी मुळींच हरकत नव्हती. परंतु तो हिरवा चहा एक दोनदां प्याल्यानंतर तो पुन्हां प्यावासा मला वाटेना. परंतु त्यांचा शिष्टाचार बिघडेल म्हणून कसाबसा घशाखालीं मी ओतत होतो. शेवटीं एकदाचा हा खाजगी समारंभ संपला, आणि आम्ही दोघे घरीं जाण्यासाठीं उठलों. यावेळीं प्रोफेसरसाहेब आम्हांला दरवाजापर्यंत पोचवायला आले आणि बूट घालून निघालो त्यावेळीं ते पुनः पुनः वाकून आम्हांला अभिवादन करूं लागले. माझा मित्रही तसाच वाकूं लागला नि मलाही तसंच वाकावं लागलं. मला इतक्या वेळ वाकावं लागलं कीं, माझी कंबर मोडते कीं काय असं मला वाटूं लागलं. पाहुण्यांचा आदरसत्कार करणं मला स्वतःला पसंत नाहीं असं नाहीं. परंतु जपानी लोकांची आदरसत्कार करण्याची पद्धति कळसाला जाऊन पोचल्यासारखी दिसते. याच्याही पलिकडचे असे आदरसत्काराचे दुसरे प्रकार आहेत. परंतु त्यांचा उल्लेख न केलेलाच बरा. कारण तसल्या आदरसत्काराचा स्वीकार करण्याचा प्रसंग माझ्यावर केव्हांच आला नाहीं.

जपानहून तडक अमेरिकेला जावं असा मी विचार करीत होतो. शिकागो येथील मिडव्हील कॉलेजचे प्रेसिडेण्ट डॉ. साउथवर्थ यांनीं मला मी ऑक्सफर्डला असतांनाच आमंत्रण दिलं होतं हें मी यापूर्वीच सांगितलं आहे. डॉ. साउथवर्थ आणि त्याच्या पत्नी ब्राह्मसमाजाच्या शतसांवत्सरीसाठीं हिंदुस्थानांत येणार होते. तत्पूर्वी त्यांची अमेरिकेंत भेट घ्यावी आणि त्यांच्याबरोबरच हिंदुस्थानांत परत यावं असं माझ्या मनानं घेतलं होतं. परंतु पुन्हां एकदां घरगुती अडचणी माझ्या मार्गांत आडव्या आल्या आणि मला माझा बेत बदलावा लागला. या अडचणीमुळेंच तांतडीनं मी कोबेहून हिंदुस्थानांत यायला निघालों. येतांना एकाद्या जपानी मारूचा आश्रय घ्यावा लागला नाहीं हें मी माझं भाग्य समजतो. बी. आय्. एस्. एन्. कंपनीच्या एका बोटीवर सेकंड क्लासचा एक बर्थ मला अनायासं मिळाला. त्यामुळे माझा सबंध प्रवास अत्यंत सुखाचा झाला. कलकत्याला येऊन पोचल्याबरोबर ब्राह्मसमाजांत जिकडं तिकडं माझा सन्मान करण्यांत आला. यावेळीं डॉ. ड्रमण्ड यांच्या नेतृत्वाखालीं ब्रिटिश युनिटेरियन्सचं एक शिष्टमंडळ सबंध हिंदुस्थानांत आपल्या उदार धर्मतत्त्वांच्या

प्रचारार्थ दौरा काढणार होतं. परंतु त्यांना हिंदुस्थानची कांहींच माहिती नव्हती. म्हणून साधारण ब्राह्मसमाजाचे त्यावेळचे अध्यक्ष पंडित कृष्णकुमार मित्र यांनीं मी या शिष्टमंडळाच्या बरोबर जावं असा आग्रह धरला. डॉ. हेमचंद्र सरकारही तेंच म्हणाले; पण माझी फार पंचाईत झाली. आपण अतिशय आजारी आहोत अशी माझ्या पत्नीची तार आल्यामुळें मी मुंबईला कधीं जाऊन पोचेन असं मला झालं होतं, परंतु सर्वांनीं फारच आग्रह धरला. डॉ. ड्रमण्डसुद्धां मला फार आग्रह करूं लागले; परंतु ते हसत हसत पण जरा खोंचक स्वरांत मला म्हणाले, 'तुम्ही नुकतेंच जपानमध्यें ब्राह्मसमाजाची शतसांवत्सरी करून आलां आहांत. तेव्हां अर्थातच तुमच्या या कार्याचं लोकांना अधिक महत्त्व व कौतुक वाटणार. आम्ही इंग्लंडहून आलों असलों तरी तुमच्यापुढें आम्ही फिक्केच पडणार.' डॉ. ड्रमण्डचा माझा इंग्लंडमध्यें बराच निकट परिचय झाला होता. म्हणूनच ते इतक्या सलगीनं बोलले; परंतु त्यावेळीं मात्र मला त्यांचा खूप राग आला. मी त्यांना चिडून उत्तर दिलं कीं तुमच्याबरोबर दौऱ्यावर येण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. डॉ. ड्रमण्डना माझं उत्तर बरंच झोंबलं असावं आणि त्यांना वाईटही वाटलं असावं, असा माझा अंदाज आहे. कारण त्यांनीं आपल्या दौऱ्यांतून सबंध मुंबई विभाग वगळला होता. त्याला दुसरीही कारणं होतीं, परंतु तीं या ठिकाणीं सांगण्यासारखी नाहींत. कारण डॉ. ड्रमण्डविषयीं मी लिहूं लागलों कीं त्यांना लागतील अशा बऱ्याचशा गोष्टी मला लिहाव्या लागतील आणि असल्या गोष्टी या आठवणींतून वगळण्याचं मी प्रथमपासूनच ठरवलं आहे. या शिष्टमंडळाबरोबर बाबू बिपिनचंद्र पाल यांनीं जाण्याचं कबूल केल्यामुळें माझ्यावरचं संकट टळलं आणि मी मुंबईला परत आलों.

मी मुंबईला परत आल्यानंतर तीन किंवा चार महिन्यांनीं डॉ. साऊथवर्थ आपल्या पत्नीसह मुंबईला आले. मुंबईत त्यांच्या ओळखीचं कुणीच नसल्यामुळें मलाच त्यांची सर्व व्यवस्था करावी लागली. खर्च करण्याच्या बाबतींत अमेरिकन लोक किती स्वतंत्र वृत्तीचे असतात हें मला त्यांच्या उदाहरणावरून चांगलंच कळून आलं. वास्तविक पाहिलं तर हिंदुस्थानांत आलेल्या ब्रिटिश आणि अमेरिकन पाहुण्यांचा खर्च ब्राह्मसमाजानं करावयाचा होता आणि समाजाची त्याला तयारीही होती. परंतु डॉ. साऊथवर्थ आणि मिसेस साऊथवर्थ यांच्यासाठीं आम्हांला एक पैचाही खर्च आला नाहीं. त्यांच्या गळ्यांत घालण्यासाठीं आणलेल्या हारांसाठीं खर्च करावा लागला तेवढाच. डॉ. साऊथवर्थ ताजमहाल हॉटेलमध्यें उतरले. ते ज्या दिवशीं आले, त्या दिवशीं संध्याकाळी प्रार्थनासमाजांत त्यांचं व्याख्यान ठेवलं होतं. व्याख्यानाच्या अगोदर एक तास त्यांना आणण्यासाठीं मी आणि माझी पत्नी ताजमहाल हॉटेलमध्यें गेलों. आम्हांला पाहिल्याबरोबर त्या वृद्ध पतिपत्नींना फार आनंद झाला. थोडा वेळ

इकडल्या तिकडल्या औपचारिक गोष्टी बोलल्यानंतर आम्ही प्रार्थनासमाजांत यायला निघालों. त्यांच्यासाठीं मी टॅक्सी अगोदरच ठरवली होती. त्यांना मागच्या सीटवर बसायला सांगून आम्ही पुढल्या सीटवर बसणार होतो. परंतु डॉ. साऊथवर्थ आणि मिसेस साऊथवर्थनीं माझ्या पत्नीला आपणा दोघांच्यामध्ये बसवून घेतलं अर्थात पुढल्या सीटवर एकट्यानंच बसून राहाणं मला योग्य न वाटल्यामुळे मी ड्रायव्हरच्या शेजारीं असलेल्या सीटवर जाऊन बसलो. वाटेंत डॉ. साऊथवर्थची सारखी बडबड चालली होती. बोलतां बोलता मध्येंच थांबून ते म्हणाले, 'मिडव्हील कॉलेजतर्फे डॉ. हेमचंद्र सरकार याना मी Doctor of Divinity ही पदवी अर्पण करणार आहें. ही पदवी अर्पण करण्यांत आम्हीं सरकार यांचा सन्मान करणार नसून आमच्या कॉलेजचा सन्मान करीत आहोत!' त्यांची ही लीनता पाहून मला खरोखर फार आश्चर्य वाटलं. परंतु मी कांहीच बोललो नाही. इतक्यांत आमची गाडी प्रार्थना-समाजसमोर येऊन उभी राहिली. मी गाडीचं दार उघडून खाली उतरलो, आणि मागचं दार उघडून माझ्या पत्नीला अगोदर उतरण्यास खूण केली. ती उतरल्यानंतर मी दरवाजा धरून तसाच उभा राहिलों. पाहातो तर मिसेस साउथवर्थ यांनीं आपल्या बॅगमधून एक लांब अशी फणी काढून आपल्या पतीचे वाऱ्यानं विस्कटलेले केस सारखे करून मधोमध पाडलेला भांग बरोबर आहे कीं नाही तें निरखून पाहिलं. या एकाच गोष्टीवरून मिसेस साऊथवर्थ आपल्या पतीची किती काळजी घेत होत्या हें स्पष्टपणें दिसून आलं. त्यांच्या त्या वागण्यांतील साधेपणा सभोंवताली असलेल्या लोकांच्या लक्षांत आल्यावाचून राहिला नाही. डॉ. साउथवर्थचीं मुंबईत दोन व्याख्यानं झाल्यानंतर ते कलकत्त्याला निघून गेले.

ऑक्सफर्ड इथं रस्किन कॉलेज आहे; त्याच धर्तीवर मुंबईत एक कॉलेज स्थापन करावं असा विचार माझ्या मनांत कित्येक वर्षे घोळत होता. ब्राह्मसमाजाची शतसांवत्सरी संपल्यानंतर माझ्या कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याची शक्यता मला दिसूं लागली. प्रार्थना समाजाच्या मॅनेजिंग कमिटीनं या संस्थेसंबंधानं प्रथम बरेच आक्षेप घेतले. परंतु शेवटीं समाजाच्या विद्यमानेंच हें कॉलेज काढावं असं ठरलं. प्रार्थना-समाजाकडून अर्थातच आर्थिक मदतीची अपेक्षा मीं केली नाहीं. कॉलेजसाठीं राममोहन आश्रम वापरण्याची परवानगी समाजाच्या कमिटीनं दिली ही एकच केवढी तरी मोठी मदत होती. कॉलेजमध्यें येणारे विद्यार्थी कामगार वर्गांतून किंवा मध्यम वर्गाच्या खालच्या थरांतून येतील अशी माझी अपेक्षा होती. अर्थात् असल्या विद्यार्थ्यांना निर्वाहाचं साधन म्हणून दिवसा कांहीं तरी काम करावं लागणारच; म्हणून मी कॉलेजचे वर्ग सायंकाळीं ७॥ ते ९॥ पर्यंत घेण्याचं ठरवलं. हे वर्ग चालविण्यासाठीं मला प्राध्यापकही फार हुशार आणि आपल्या विषयांत पारंगत असे

मिळाले. या प्राध्यापकांपैकीं बॅरिस्टर थडाणी ( हे मुंबईंतील एक श्रीमंत गृहस्थ होते ), डॉ. व्ही. के. आर. व्ही. राव, डॉ. पी. एम्. जोशी, प्रो. राममूर्ति प्रतापगिरी, मिस् राजसबाई डोंगरे यांचीं नांवं मला आठवतात. या कॉलेजमध्यें इंग्रजी, समाज-शास्त्र, अर्थशास्त्र, मजुरांची संघटना इत्यादि विषय शिकविले जात. हें कॉलेज काढल्यानंतर कांहीं महिन्यांनीं विजगापट्टण येथील आंध्र रीसर्च युनिव्हर्सिटी, मार्सेय येथील Aranique Universities de France आणि अमेरिकेतील South Dakota University या शिक्षण संस्थांनी या कॉलेजला मान्यता दिली होती. परंतु हें कॉलेज माझ्या नेतृत्वाखालीं १९३१ च्या जुलै २१ पर्यंतच राहिलं. या कॉलेजचा आणि माझा संबंध कां तुटला तें पुढें ओघाओघानं येईलच.

याच वेळीं पुरोगामी नाट्यसंस्था स्थापण्याविषयींचे विचार माझ्या मनांत येऊं लागले. पूर्वीं माझ्या घरीं श्री. काळे, आळतेकर, काणेकर आणि बापूराव आपटे ही मंडळी या विषयाची चर्चा करण्यासाठीं माझ्याकडे जमत असे हे पूर्वी सांगितलंच आहे. हीच मंडळी पुन्हां अधिक नियमितपणें माझ्या घरीं जमूं लागली. आमचा चर्चेचा विषय आधुनिक नाटकं आणि नाटककार हा होता हे सांगायला नकोच. आधुनिक नाटककारामध्यें हेन्रीक इब्सेनला आम्ही सर्वांत मोठा मान देत असूं. ज्याप्रमाणें पूर्वीच्या काळीं मराठी रंगभूमीवर गद्य नाटकाची सुरुवात शेक्सपीअरच्या नाटकानंतरच झाली, त्याचप्रमाणें आधुनिक रंगभूमीवर इब्सेनला आणला पाहिजे अशी आम्हां सर्वांची उत्कट इच्छा होती. आमच्या चर्चेचा नेहमींचा विषय बहुतेक हाच असे. आम्ही ही चर्चा किती दिवस केली तें मला आतां आठवत नाहीं. माझे मित्र श्री. काणेकर यांनीं इब्सेनच्या ‘ Doll’s House ’ चं रूपांतर करण्यास याच वेळीं सुरुवात केली असावी असं वाटतं. परंतु नक्की काहीच आठवत नाही. ही आमची चर्चा कांहीं दिवसांनी एकदम बंद पडली. आणि व्यक्तिशः जरी आमचे स्नेहसंबंध तसेच कायम राहिले तरीसुद्धां नाट्य विषयाची चर्चा करायला आम्हांला पुढें फुरसदच उरली नाहीं. माझ्यापुरतं बोलायचं झाल्यास त्याचं मुख्य कारण हेंच कीं मी अगदी आकस्मिक आणि अनपेक्षितरीत्या एकदम राजकारणांत जाऊन पडलो. या राजकारणाची हकीगत मी पुढील भागांत सांगणार आहें.

# १४



एके दिवशीं सकाळीं मुंबई यूथ लीगचे सेक्रेटरी श्री. कोप्पीकर माझ्याकडे आले आणि म्हणाले, ' आमच्या यूथ लीगच्या कार्यकारी मंडळामध्यें कॉमरेड रॉयचा मॅनिफेस्टो आम्ही पास करून घेतला आहे. त्या मॅनिफेस्टोचा मुंबई नि उपनगरांत प्रचार करण्यासाठीं आम्ही यूथ लीगच्यातर्फे अनेक सभा भरवणार आहोंत. त्यांपैकीं पहिली सभा आज रात्रीं माटुंग्याला भरणार आहे. त्या सभेचं अध्यक्षस्थान तुम्ही स्वीकारावं अशी आमची सर्वांची इच्छा आहे.' मला त्यांची ही विनंती ऐकून जरा आश्चर्यच वाटलं. कारण हिंदुस्थानांत आल्यापासून मी कोणत्याही राजकीय सभेत भाग घेतला नव्हता. शिवाय रॉयच्या मॅनिफेस्टोची ही काय भानगड आहे ती मला मुळींच माहीत नव्हती. म्हणून मी नकार दिला. परंतु कोप्पीकर हट्ट घेऊन बसले. ते म्हणाले, ' या सभांचं अध्यक्षस्थान जर तुम्ही स्वीकारलं नाहींत, तर मला या सभा भरवणं मुष्कील जाईल. कारण या सभांत कम्युनिस्टांचे दोन गट हजर राहातील आणि त्यांच्यामध्यें लाथाळी सुरू होईल. म्हणून या दोन्ही गटांना आवरून धरणारा निःपक्षपाती अध्यक्ष मला पाहिजे.' ते एवढं बोलल्यानंतर मला नाहीं म्हणण्याचं जिवावर आलं. ठरल्यावेळीं मी सभेच्या जागीं जाऊन पोचलों. त्या ठिकाणीं सर्वच मंडळी मला अनोळखी दिसली. त्या दिवशीं बोलणाऱ्या वक्त्यांमध्येसुद्धां सुंदर कावाडीशिवाय मी दुसऱ्या कुणालाच ओळखत नव्हतो. थिऑसॉफिकल सोसायटीत सुंदर असतांना माझी आणि त्याची ओळख झाली होती. तथापि तो विलायतेहून परतल्या-नंतर त्याच्या वृत्तींत किती तरी फरक झाला होता. पूर्वी त्याच्या डोळ्यांत आध्यात्मिक कोमलतेची चमक दिसे. त्याच डोळ्यांत मार्क्सपंथी भौतिकवादाचा बेडरपणा शिरला होता. सभेला सुरुवात झाली. मी अध्यक्षस्थानीं बसल्यानंतर सुंदर कावाडीनं प्रथम बोलायला सुरुवात केली. त्यानं रॉयच्या मॅनिफेस्टोंत असलेली कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीची कल्पना विशद करून सांगण्याचा प्रयत्न केला.

त्यानंतर कॉ. शेख बोलायला उठला. या गृहस्थाविषयीं जहाल गटामध्यें अनेक अफवा पसरल्या होत्या. तो वर्णानं गोरापान होता आणि त्याचं नाक तरतरीत होतं.

म्हणून तो खरोखर जातीनं काश्मिरी ब्राह्मण असून शेख हें टोपण नांव पोलिसांना चकविण्यासाठीं त्यानं धारण केलं आहे अशी बाजार गप्प कांहीं जणांनीं उठवली होती. तो रॉय पक्षाचा असल्यामुळें त्या वेळचे अतिजहालवादी कम्युनिस्ट त्याला पाण्यांत पाहात असत. त्यांनीं अशी गप्प उठवून दिली कीं, शेख हा ' सेकंड इंटरनॅशनल' चा हस्तक असून खऱ्या क्रांतिकारक पक्षाला म्हणजे कम्युनिस्टांना हाणून पाडण्यासाठीं तो हिंदुस्थानांत आला आहे. वस्तुस्थिति अशी होती, कीं कॉ. रॉय हे प्रथम थर्ड इंटर-नॅशनलच्या वतीनेंच काम करीत. १९२९ सालीं त्यांना थर्ड इंटरनॅशनलमधून काढण्यात आलं. तेव्हांपासून कॉ. रॉयनीं आपला स्वतंत्र असा कम्युनिस्ट गट स्थापन केला; पण तो मात्र हिंदुस्थानपुरताच. हिंदुस्थानच्या बाहेर म्हणजे जर्मनी, अमेरिका वगैरे देशांमध्ये उजव्या कम्युनिस्टांचा पक्ष अगोदरच स्थापन झाला होता. त्या पक्षाचं नेतृत्व ब्रॅण्डलर, थालाय्मार, लव्हस्टोन प्रभृति एकेकाळीं जगप्रसिद्ध असलेल्या कम्यु-निस्ट पुढाऱ्यांकडे होतं. या पुढाऱ्यांना थर्ड इंटरनॅशनलमधून अगोदरच काढण्यांत आलं होतं. कॉ. रॉय थर्ड इंटरनॅशनलच्या बाहेर आल्यानंतर याच पक्षाला सामील झाले. याच वर्षी म्हणजे १९२९ सालीं लिऑ ट्रॉट्स्की आणि त्याचा डावा- कम्युनिस्ट गट यांची थर्ड इंटरनॅशनलमधून हकालपट्टी झाली होती हें मी जातां जातां सांगून ठेवतों. अर्थांत थर्ड इंटरनॅशनलमध्यें फक्त एकच कम्युनिस्टांचा गट शिल्लक राहिला. तो गट म्हणजे सोव्हिएट रशियांत सत्तारूढ झालेल्या कम्युनिस्टांचा. या गटाचं नेतृत्व कॉ. जोसेफ स्टालीन याच्याकडे होतं. मी वर ज्या सभेचा उल्लेख केला आहे, त्या सभेमध्यें रॉयवादी आणि स्टालीनवादी असे दोनच गट हजर होते. माझा स्वतःचा कल जरी ट्रॉट्स्कीकडे होता, तरी आतांपर्यंत राजकरणांत प्रत्यक्ष भाग घेण्याचा प्रसंग न आल्याकारणानं मीं त्यासंबंधानं सुसंघटित असा विचार कधींच केला नव्हता.

कॉ. शेखचं भाषण संपल्यानंतर कोप्पीकर प्रभृति दोन-तीन वक्त्यांनीं रॉयच्या मॅनिफेस्टोवर भाषणं केलीं. सर्व वक्त्यांचीं भाषणं संपल्यानंतर या विषयावर आणखी कुणाला कांहीं बोलायचं आहे किंवा काय असा प्रश्न मी विचारल्याबरोबर कॉ. एस्. व्ही. देशपांडे यांचा धाकटा भाऊ बोलायला उठला. तो बोलायला उठल्याबरोबर माझ्या शेजारीं व्यासपीठावर बसलेले रॉयवादी चुळबूळ करूं लागले. ' या गृहस्थाला बोलूं देऊं नका ' अशा अर्थाची खूण कॉ. शेखनं मला केली. मला कॉ. शेखचा खूप राग आला. त्याच्याकडे दुर्लक्ष करून कॉ. देशपांडेला बोलायची परवानगी मी दिली. त्यानं आपल्या भाषणांत कॉ. रॉयच्या मॅनिफेस्टोवर खूपच टीकेची झोड उठवली आणि कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीच्या कल्पनेची त्यानं टिंगल केली. त्याचं भाषण संपल्यानंतर समारोप करतांना देशपांडेच्या टीकेचं मी खंडन केलं. खरोखर पाहिलं असतां स्टालीनवाद्यांचा त्या वेळचा अतिजहालपणा कुणालाही पटण्यासारखा नव्हता. रॉयवादी

माझ्यावर बेहद्द खुष झाले. यूथ लीगच्या प्रत्येक सभेचं अध्यक्षस्थान मला द्यायचं असा आपला निश्चयही कोप्पीकरनीं मला बोलून दाखवला. स्टालीनवादी मात्र हिरमुसले होऊन मुकाट्यानं घरीं गेले.

त्यावेळेपासून जहालवादी चळवळीचा एक पुढारी म्हणून मी एकदम पुढें आलों. ही जी अवास्तव प्रसिद्धि मला मिळाली तिचं मला मनांतल्या मनांत हसूं येई. परंतु माझे विचार मीं कधींच कुणाला बोलून दाखवले नाहींत. यूथ लीगतर्फें एकामागून एक सभा भरविण्याचा कोप्पीकरनीं तडाखा चालवला होता. प्रत्येक सभेला अध्यक्ष म्हणून माझी नेमणूक हटकून व्हायची. सुंदर कावाडी आणि कॉ. शेख यांना माझ्याविषयीं एकाएकीं आपलेपणा वाटूं लागला. त्यांच्या प्रेमळ नि उत्साही वागणुकीमुळेच मी रॉयवादाकडे हळुहळू झुकूं लागलो.

कांहीं दिवसांनीं यूथ लीग बेकायदेशीर ठरली आणि आमच्या पाठीमागची एक संस्था नामशेष झाली. अर्थात् आम्हांला दुसऱ्या संस्थेची जरूरी भासूं लागली. लवकरच कॉंग्रेसमध्यें असलेल्या जहालवाद्यांची 'स्वतंत्र भारत सभा' स्थापन झाली. या संस्थेचा अध्यक्ष म्हणून माझीच निवड करण्यांत आली. या संस्थेमध्यें अनेक जहालवादी होते. त्यांपैकीं कॉ. वसंतराव कर्णिक, डॉ. शेट्टी, कॉ. ए. एन्. शेट्टी, मि. पुतली, मि. एन्. एस्. चेट्टी, डॉ. रंगाचारी यांचा प्रामुख्यानं उल्लेख केला पाहिजे. कारण अगदीं पहिल्या रॉय गटामध्यें या मंडळींचा समावेश झाला होता. स्वतंत्र भारत सभेतर्फें कॉ. रॉयच्या मॅनिफेस्टोचा आम्ही पूर्वीपेक्षां अधिक जोरानं प्रचार चालवला. हें काम इतकं प्रचंड प्रमाणांत वाढलं कीं, आम्हांला दिवसाला तीन तीन सभा उरकाव्या लागत असत. शेवटीं आमचा प्रचार एवढा प्रभावी ठरला की ही सभा स्थापन झाल्यापासून पंधरा वीस दिवसांच्या आंत ती बेकायदेशीर ठरली. अर्थातच आमचं सर्व काम एकदम थंड पडलं.

आमच्या संस्थेतर्फें एक सभा आम्ही दादरला घेतली होती. या सभेचा अध्यक्ष मीच होतो हें कांहीं सांगायला नकोच. ठरलेल्या वक्त्यांचीं भाषणं झाल्यानंतर माझ्या खुर्चीपाठीमागें बसलेला एक तरुण पुढें आला आणि मला म्हणाला, 'सर, मला या मॅनिफेस्टोवर भाषण करायचं आहे.' 'सर' हा शब्द ऐकल्याबरोबर मी चपापलों आणि त्याच्याकडे पाहिलं. त्याच्या अंगावर मी एकदम ओरडलों. मी म्हणालो, 'नाम्या, तूं सभेत जहाल भाषणं करायला कधीं शिकलास? आणि तुला या विषयांत काय समजतंय? बस खालीं.' असं म्हणून मी त्याच्याकडे पाठ फिरवली. तो बिचारा मुकाट्यानं बसला. परंतु कांहीं दिवसांनीं तो स्टालीनवाद्यांना जाऊन मिळाला. माझ्या अरेरावी वर्तनाचाच तो परिणाम असावा कदाचित्. नामाला मी लहानपणापासून ओळखत होतों. तो आणि त्याची वडील बहीण माणक कलकत्त्याला प्रथम आपले वडील जयराम-

नाना वैद्य यांच्याबरोबर आलीं. त्यावेळीं नामा आठ–नऊ वर्षांचा असावा. त्या दोघांना कलकत्त्यांतील अनेक प्रेक्षणीय स्थळं मी दाखवलीं होतीं. पुढें राममोहन स्कूलमध्यें मी शिक्षक असतांना तीं दोघं माझ्या वर्गांत शिकत होतीं. अर्थात् माझा नि नामाचा गुरु–शिष्याचा संबंध होताच. परंतु जयरामनानांचा आणि माझा स्नेहसंबंध दाट असल्यामुळें मला तीं दोघं आपल्या भावंडांसारखीं वाटत. कांहीं दिवसांनीं नामा मॅट्रिक पास होऊन सेंट झेवियर कॉलेजमध्यें गेला. परंतु कम्युनिस्टांच्या नादीं लागल्या-मुळे त्यानं आपला अभ्यासक्रम मध्येंच थांबवला. माणकचं लग्न मुंबईंत प्रार्थनासमाजांत १९२८ सालीं डॉ. पंजाबराव देशमुख यांच्याशीं झालं. ब्राह्मविवाहविधि करण्याचे वेळीं आपल्याला सप्तपदी हवी असा माणकनं हट्ट धरला होता. परंतु सप्तपदी करणं ब्राह्म-धर्मतत्त्वाला अनुसरून नाहीं अशी जेव्हा मी तिची समजूत घातली तेव्हां तिनं हट्ट सोडला. नामा फार दिवस कम्युनिस्टांच्या सहवासांत राहिला नाहीं. जिवाचा बराच आटापिटा केल्यानंतर तो १९३२ सालीं इंग्लंडला निघून गेला. तिथंही बरींच वर्षं झगडल्यानंतर आपल्या गुणांच्या आणि कर्तबगारीच्या जोरावर 'टाइम' नांवाच्या अमेरिकन नियतकालिकाचा इंग्लंडमधील खास प्रतिनिधि तो बनला. हाच पूर्वीचा नामा आज सुरेश वैद्य या नांवानं प्रसिद्ध आहे.

'स्वतंत्र भारत सभा' बेकायदेशीर झाल्यानंतर आमच्या चळवळींत बराच विस्कळीतपणा आला. खाजगी रीतीनं भेटण्याची आणि विचारविनिमय करण्याची सोय नव्हती. अशा परिस्थितींत कांहीं दिवस गेले. त्यानंतर एक दिवस सुंदर काबाडी माझ्याकडे आला आणि मला म्हणाला, 'आज रात्रीं माझ्याकडे कांहीं निवडक मंडळी जमणार आहेत. त्यावेळीं तुम्ही मि. चेट्टींना घेऊन या. आपण पुढील कार्यक्रमाची कांहीं तरी निश्चित दिशा ठरवूं.' ठरल्याप्रमाणें रात्रीं मी, चेट्टी आणि काणेकर काबाडीच्या घरीं गेलों. त्यावेळीं काणेकरांचा कल स्टालीनवादाकडे थोडासा झुकत होता, परंतु मीं त्याची फिकीर केली नाहीं. काणेकरांचे व माझे वैयक्तिक संबंध निकट असल्यामुळें त्यांच्यापासून कोणतीही गोष्ट गुप्त ठेवण्याचं मला कारण नव्हतं. आम्ही काबाडीच्या घरीं गेलों, त्यावेळीं कॉ. शेख, डॉ. शेट्टी, कॉ. कर्णिक, अनंत शेट्टी, आणि पुतली ही मंडळी अगोदरच येऊन बसली होती. माझ्या डाव्या बाजूला एक साधारण स्थूल अंगाचा, धिप्पाड नि वर्णानं काळासावळा असा एक गृहस्थ बसला होता. त्या गृहस्थाची आणि माझी ओळख करून देतांना सुंदर म्हणाला, 'हे डॉ. महंमूद, लखनौहून आले आहेत. किसान चळवळींत हे काम करतात.' मी रीतसर त्या गृहस्थाशीं हस्तांदोलन केलं. परंतु नंतर त्याच्याकडे विशेष लक्ष दिलं नाहीं. तो गृहस्थही कांहीं न बोलतां स्वस्थ बसून राहिला होता. कांहीं वेळानं सभेच्या कामाला सुरुवात झाली. मी नेहमींप्रमाणें अध्यक्षस्थानीं होतों. आरंभीं कॉ. शेखनं असा ठराव मांडला कीं,

आपला एक स्वतंत्र राजकीय गट असावा. त्या गटाचं अधिष्ठान कॉ. रॉयच्या मॅनिफेस्टोवर आधारलेलं असावं. कॉ. शेखच्या ठरावाला कुणी तरी दुजोरा दिला. पण मी कॉ. शेखला विरोध केला. मी म्हटलं, ' आपला स्वतंत्र राजकीय गट असावा याविषयीं कुणाचं दुमत होईल असं वाटत नाहीं. परंतु कॉ. रॉयचा मॅनिफेस्टो स्वीकारण्यापूर्वी त्यावर चर्चा करून त्यासंबंधीं आपणा सर्वांचं एकमत होत आहे कीं नाहीं तें आपण प्रथम पाहिलं पाहिजे. ही मी सूचना करतों त्याला एक विशिष्ट कारण आहे. आपण गेल्या महिना–दोन महिन्यांत या मॅनिफेस्टोचा किती तरी प्रचार केला. त्यावेळीं मला असं आढळून आलं कीं, या मॅनिफेस्टोचा प्रचार करणारा प्रत्येकजण मनाला वाटेल तसा अर्थ लावतो. कित्येकांना तर तो मॅनिफेस्टो समजलेलाच नाहीं, असं मला वाटतं. म्हणून त्या मॅनिफेस्टोचा स्वीकार करण्याअगोदर आपण एके ठिकाणीं बसून त्याच्यावर चर्चा करूं. त्यांतील सर्व मुद्यांवर जर एकमत झालं तरच आपल्या राजकीय गटानं त्याचा स्वीकार करावा. '

माझे उद्गार ऐकल्याबरोबर कॉ. शेखचा चेहेरा रागानं लालबुंद झाला. मी कॉ. रॉयच्या मॅनिफेस्टोलाच विरोध करीत आहे अशी त्यानं मनाची समजूत करून घेतली. यानंतर बराच कडाक्याचा वादविवाद झाला. तो दोन तीन तास चालला होता. चेट्टी आणि काणेकर यांनीं माझी बाजू उचलून धरली, परंतु बाकीच्या कॉमरेडस्नीं शेखला पाठिंबा दिला. या वादांतून कांहींच निष्पन्न होत नाहीं असं पाहून मी माझ्या शेजारीं बसलेल्या गृहस्थांकडे वळलों आणि त्यांना या प्रश्नावर मत द्यायला सांगितलं. त्यांनीं आपले दोन्ही खांदे उडवून मला म्हटलं, ' मला यांत कांहीं समजत नाहीं. मी लखनौ-हून आलेला माणूस आहे. तुमचं तुम्हीच काय तें आपसांत ठरवा. ' हे त्यांचे उद्गार ऐकून मला त्यांची खूप चीड आली पण मी त्यांना कांहीं बोललों नाहीं. शेवटीं मीं शेखला म्हटलं, ' आपण हा प्रश्न मताला टाकूं. ' शेखनं कबूल केलं. माझ्या बाजूला मी, चेट्टी, काणेकर आणि आणखी एक इसम अशी चौघांचीं मतं पडलीं आणि शेखच्या बाजूनं शेख, कर्णिक, दोन शेट्टी, पुतली अशीं पांच मतें पडलीं. तें पाहून मी खुर्चीवरून उठलों आणि शेखला म्हटलं, कीं ' तुझ्या बाजूला पांच मतं पडलेलीं आहेत तेव्हां तूं या मंडळींचा स्वतंत्र गट स्थापन कर. मी मात्र या गटांत सामील होणार नाहीं. ' इतकं बोलून मी निघालों. मला पोचविण्यासाठीं सुंदर कावाडी जिन्या-पर्यंत आला. जिना उतरतांना मी सुंदरला म्हटलं, ' तूं या लखनौच्या माणसाला सभेला कशाला बोलावलंस ? मला तर तो अगदीं बुद्दू दिसतो. ' इतकं बोलून मी झपाझप जिना उतरून खालीं गेलों. इतक्यांत काणेकर आणि चेट्टी हेही जिना उतरून खालीं आले. आम्ही आपापल्या घरीं गेलो. त्यावेळीं मी आणि चेट्टी चौपाटी रोडवर राहात होतों ;

पण निरनिराळ्या घरांत. चेट्टी हे माझे साडू लागतात हें जातां जातां सांगून टाकतों. काणेकर प्रार्थनासमाजाजवळील कॉंट्रॅक्टर चाळींत राहात होते.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुंदर नि शेख माझ्या घरीं आले आणि म्हणाले, 'आज रात्रीं आम्ही न्यू इरा हायस्कूलमध्यें जमणार आहोंत. त्यावेळेस रॉयच्या मॅनिफेस्टोवर आपण चर्चा करूं. तुम्ही चेट्टींना घेऊन या.' चेट्टी नि मी त्या सभेला गेलों. आम्ही मॅनिफेस्टोवर बरीच चर्चा केली. त्या मॅनिफेस्टोमध्यें स्वदेशीचा उल्लेख आला होता. चर्चा करतांना स्वदेशी म्हणजे काय असा प्रश्न सुंदरनं केला. त्या प्रश्नाचं उत्तर चेट्टींनीं दिलं. डॉ. महंमूद तिथं होतेच. त्यांनीं शेवटीं 'Swadeshi is a form of taxation' असं म्हणून त्या विषयावर जवळ जवळ अर्धा तास विवेचन केलं. तें विवेचन ऐकून मी अगदीं थंड झालों. याच माणसाला मी काल बुद्दू म्हटलं याचं मला हसूं आलं. विवेचन करतांना डॉ. महंमूद म्हणाले कीं, 'कॉ. रॉयच्या निकट सहवासांत मी बरींच वर्षे असल्यामुळें त्यांचं मन मी चांगलं ओळखूं शकतों. या मॅनिफेस्टोचा अर्थ काय तो मला तुमच्यापेक्षां अधिक चांगल्या रीतीनं सांगतां येईल.' बराच वेळ चर्चा झाल्यानंतर आमची सभा आटोपली. मी नि चेट्टी घरीं जायला निघालों. रस्त्यांत बोलतांना मी चेट्टींना म्हटलं, 'हा विलक्षण डोक्याचा मनुष्य दिसतो मला. 'स्वदेशी' शब्दाचा खरा अर्थ त्यानें किती उत्तम रीतीनें समजावून सांगितला. मला वाटतं, कॉ. रॉयच्या निकट सहवासांत बरींच वर्षे हा असला पाहिजे.' यावर धीम्या वृत्तीचे चेट्टी एकदम उसळून म्हणाले, 'नाहीं. नाहीं. तुम्ही म्हणतां तें चूक आहे. हा गृहस्थ कॉ. रॉयच असला पाहिजे.' यावर मी मोठ्यानं हसलों आणि म्हणालों, 'हें तुम्ही कांहीं तरी सांगतां मि. चेट्टी. कॉ. रॉय या गृहस्थापेक्षां कितीतरी मोठा असला पाहिजे. वयानं हा गृहस्थ फार तर चाळीस वर्षांचा असेल.' यावर चेट्टी कांहीं बोलले नाहींत.

त्यानंतर रॉय गटाच्या वारंवार सभा होत. त्या सभांसंबंधानं महत्त्वाचं असं कांहीं सांगण्यासारखं नाहीं. परंतु १९३१ च्या मार्चमध्यें कराचीला कॉंग्रेसचं अधिवेशन भरणार होतं त्या अधिवेशनामध्यें आमच्या गटानं कोणतं धोरण ठेवायचं तें ठरविण्यासाठीं कर्णिकांच्या घरीं आमची सभा भरली होती. डॉ. महंमूद अर्थात् त्या सभेला हजर होतेच. हें धोरण ठरवतांना कॉ. रॉयच्या ( Decolonisation ) च्या प्रबंधावर बरीच चर्चा झाली. 'त्या प्रबंधानुसार आपण कॉंग्रेसमध्यें राहून कॉंग्रेसच्या कार्यक्रमाला जहालवादी कलाटणी द्यायची, कॉंग्रेसनेत्यांचा सुधारणावाद लोकांच्या समोर पदोपदीं आणून त्याचं खंडण करायचं आणि आपला पक्ष बळकट करून सबंध कॉंग्रेसला क्रांतिकारक बनवायची हें धोरण आपण ठेवलं पाहिजे' असं डॉ. महंमूद म्हणाले. त्यावर मी म्हणालों कीं, 'हें धोरण मुळींच प्रभावी ठरणार नाहीं. आपण कॉंग्रेसच्या

बाहेर जाऊन आपला स्वतंत्र पक्ष स्थापन केला पाहिजे. कॉंग्रेस व कॉंग्रेसनेत्यांना अविरत विरोध करून आपला विधायक कार्यक्रम जनतेसमोर ठेवण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे.' त्यावेळीं ट्रॉट्स्कीवादाची सावली माझ्या मनावर वरीच दाट असल्यामुळें मी वरील भूमिका स्वीकारली होती. यावर बराच वादविवाद झाला, परंतु डॉ. महंमूदना माझं मत पटलं नाहीं. तेव्हां मी सभेंतून निघून गेलों. चेट्टी मात्र तसेच बसून राहिले होते. अर्थात कांहीं दिवस तरी माझा रॉय ग्रुपशीं संबंध राहिला नाहीं. कराची कॉंग्रेसला चेट्टी, कर्णिक वगैरे बरेच रॉयवादी गेले. मी मात्र तसाच मागें राहिलों.

कॉंग्रेसचं कराचीचं अधिवेशन भरण्यापूर्वी कॉंग्रेस वर्किंग कमिटीची बैठक लॅबर्नम रोडवरील मणीभुवनमध्ये भरली होती. या बैठकीला हजर राहाण्यासाठीं कमिटीनं बाबू सुभाषचंद्र बोस यांना बोलावलं होतं. कराचीला त्याच सुमारास नवजवान भारत सभेची परिषद भरणार होती. त्या परिषदेचे अध्यक्ष म्हणून सुभाषबाबूंची निवड झाली होती. मुंबईतील नवजवान भारत सभेचा मी अध्यक्ष होतों. त्यावेळीं मी आणि चेट्टी मणीभुवनच्या शेजारींच सरस्वती व्हिलामध्यें राहात होतों म्हणून सुभाषबाबूंना आमच्या घरीं चहाला बोलावण्याचं आम्ही ठरवलं. सुभाषबाबू आले आणि आम्ही त्यांच्याशीं बरीच चर्चा केली. गांधी-आर्विन करारावद्दल आम्ही पूर्ण नापसंती दर्शविली. सुभाषबाबूंनाही तो करार पसंत नव्हता असं दिसलं. त्यानंतर आमचा कार्यक्रम आम्ही त्यांच्यापुढें ठेवला. आमच्या चळवळीचं नेतृत्व स्वीकारण्याची आम्ही त्यांना विनंती केली. सुभाषबाबू एकदम गंभीर झाले, आणि ते म्हणाले, 'जहाल चळवळ जितकी पाहिजे तितकी देशामध्यें प्रभावी झालेली नाहीं. अशा परिस्थितींत मी कॉंग्रेस पुढाऱ्यांबरोबर आतांपासूनच जर फटकून वागूं लागलों आणि निराळा राजकीय सवता सुभा उभा करण्याचा प्रयत्न केला तर त्यामुळें जहाल चळवळीचं नुकसान होणार आहे.' सुभाषबाबूंचे उद्गार ऐकून माझी बरीच निराशा झाली. सुभाषबाबू नि डॉ. महंमूद हे एकाच माळेचे मणी आहेत अशी मी माझ्या मनाची समजूत करून घेतली.

कराचीला ही सर्व मंडळी गेल्यानंतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं प्रार्थनासमाजांत कसल्या तरी निमित्तानं स्नेहसंमेलन भरलं होतं. त्या स्नेहसंमेलनांत मला नेहमींप्रमाणें भाग घ्यावा लागला होता. कारण राजकीय चळवळींत जरी मी पडलो होतों, तरी सुद्धां प्रार्थनासमाजाशीं माझे असलेले पूर्वींचे संबंध अजूनही कायम होते. प्रार्थनासमाजांतच राजकीय विषयावर अभ्यास-मंडळ मी घेत असें, पण त्याची प्रार्थनासमाजांतील मंडळींना विशेषशी माहिती नव्हती. सुबोधपत्रिकेंत मात्र माझे जहाल स्वरूपाचे जे लेख येत ते वाचून समाजांतील काहीं बुद्रुक मंडळींना माझा संशय येऊं लागला. परंतु माझा जहालवाद लोकमान्य टिळकांच्या राजकारणापुढें जाणार नाहीं अशी त्यांची अपेक्षा होती. स्वतंत्र भारत सभेचा आणि कांहीं दिवसांनीं नवजवान

भारत सभेचा ज्यावेळीं मी अध्यक्ष झालों, तेव्हां मात्र समाजांतील कांहीं राजकीय सनातन्यांचं धाबं दणाणून गेलं. कारण त्यांचा प्रामाणिक समज असा झाला होता कीं, नवजवान भारत सभा ही दहशतवाद्यांची संस्था असून तिचं नेतृत्व मी स्वीकारलं आहे. त्यांचा हा गैरसमज दूर करण्याचं मला कारणच पडलं नाहीं. कारण या संस्थेसंबंधीं स्पष्टपणें मला त्यांनीं कधींच विचारलं नव्हतं. अर्थात वरवर पाहाणाऱ्याला माझे प्रार्थना-समाजाशीं असलेले संबंध पूर्वी होते तसेच कायम आहेत असा भास होई. त्या संबंधाचा एकेक धागा हळूहळू तुटत चालला होता हें माझ्याही त्यावेळीं ध्यानांत आलं नाहीं. अर्थात प्रार्थनासमाजाच्या प्रत्येक कार्यक्रमांत मी पूर्वीच्याच उत्साहान आणि तळ-मळीनं भाग घेत आहें अशी माझी व इतरांची समजूत होती.

स्नेहसंमेलनाची गडबड राममोहन आश्रमाच्या दुसऱ्या मजल्यावर चालली असतां मला खालून कुणी तरी मोठ्यानं हाका मारूं लागलं. मी खिडकीशीं येऊन खालीं पाहातों तर कॉ. सी. जी. शहा, कॉ. बी. टी. रणदिवे प्रभृति स्टॅलिनवादी कम्युनिस्ट मला खालीं येण्याविषयीं जोरजोरानं हातानं खुणावीत होते. मी तसाच खालीं गेलों. कॉ. शहा मला म्हणाले, ' तुमच्याकडे अत्यंत निकडीचं काम आहे. तुम्हीं आतांच्या आतां घरीं चला. ' ही काय गडबड आहे म्हणून बघण्यासाठीं लीला खिडकींत आली. मी तिला खालीं येण्याची खूण केली आणि प्रार्थनासमाजाच्या बाहेर मिळालेल्या टॅक्सींत बसून आमच्या घरीं गेलों. वाटेंत माझ्याशीं कुणी कांहींच बोलेना. त्यांचं काय जरूरीचं काम होतं तें न समजल्यामुळें मी गप्प राहिलों होतों. घरीं आल्यानंतर आम्ही तसेच दिवाणखान्यांत बसलों. नंतर मीं कॉ. शहाला विचारलं, ' कॉमरेड, ही गडबड तरी काय आहे ? तुम्ही मला इतक्या तांतडीनं कशाला बोलावून आणलंत ? कीं हा तुमचा नवीन तऱ्हेचा विनोद आहे ? ' तेव्हां कॉ. रणदिवे यांनीं आपला चेहेरा पूर्वीपेक्षां अधिक गंभीर केला आणि ते म्हणाले, ' हें पाहा, मी तुम्हाला अत्यंत महत्त्वाची बातमी सांगणार आहें. ती ऐकून तुम्हाला आश्चर्याचा धक्काच बसेल. तुम्ही ज्या डॉ. महंमूदबरोबर आतांपर्यंत काम करीत होतां ते दुसरे तिसरे कुणी नसून खुद्द मानवेंद्रनाथ रॉय आहेत. ' ही बातमी ऐकून मी मनांतल्या मनांत हादरलोंच. परंतु बाहेरून शांतपणाचा आव आणून मी म्हटलं, ' अंः ! त्यांत काय आहे. डॉ. महंमूद हे कॉ. रॉय आहेत ह्या बातमीमध्यें तुम्हाला इतकं घाबरण्याचं कारण काय ? आणि इतक्या तांतडीनं ही बातमी सांगण्याइतकं काय महत्त्व आहे ? ही बातमी तुम्ही मला पोष्टानं कळवली असती तरी चाललं असतं. ' हे उद्गार ऐकल्यानंतर कॉ. रणदिव्यांच्या चेहेऱ्यावर थोडी तिरस्काराची झांक दिसली. ते म्हणाले, ' ही नुसती बातमी सांगण्यासाठींच आम्ही इथं आलों नाहीं, तर तुम्हाला सावधगिरीची सूचना द्यायला मुद्दाम आलों आहोंत. ' मी म्हटलं, ' सावधगिरीची सूचना ? ' ' होय. सावधगिरीची सूचना. ' असं रणदिवेनीं ठांसून म्हटलं, ' डॉ. महंमूद हे कॉ. रॉय आहेत हें जर तुम्हांला मान्य असेल तर मी

असं विचारतों कीं कॉ. रॉय हिंदुस्थानांत आले कसे ? त्यांनीं पासपोर्ट कसा मिळवला ? त्यांनीं पासपोर्ट forge केला असं आपण घटकाभर समजूं, तरी सुद्धां कराची किंवा मुंबई बंदरांत उतरतांना त्यांच्यासारखा धिप्पाड गृहस्थ पोलिसांच्या काकदृष्टींतून कसा निसटला ? यावर माझं स्वतःचं उत्तर असं आहे, कीं रॅम्से मॅकडोनाल्डच्या मदतीनं कॉ. रॉय हिंदुस्थानांत आले. हें दुसऱ्या शब्दांत सांगायचं म्हणजे ते ब्रिटिश साम्राज्यशाहीचे हस्तक आहेत, म्हणूनच ते येऊं शकले.' कॉ. रणदिव्यांचे हे उद्गार ऐकून माझं मन चलबिचल झालं. रॉय गटाच्या धोरणासंबंधानं माझा नुकताच डॉ. महंमूदशीं खटका उडाला होता. तेव्हां कॉ. रणदिवेनीं डॉ. महंमूद म्हणजे कॉ. रॉयवर जो आरोप केला त्याचा मला हत्यारासारखा उपयोग करतां आला असता. परंतु मी तो विचार मनांत मुळींच ठरूं दिला नाहीं. मात्र कॉ. रॉयना ते कराची कॉंग्रेसहून परत आल्यानंतर हिंदुस्थानांत ते कसे आले त्याबद्दल संपूर्ण माहिती विचारायची असा मी मनाशीं निश्चय केला.

स्टालीनवादी कम्युनिस्टांशीं माझे वैयक्तिक संबंध स्नेहाचे होते. परंतु कॉ. रॉयविरुद्ध ते घाणेरडा प्रचार करूं लागले, हें मात्र मला बिलकुल आवडलं नाहीं. स्टालीनवादी कम्युनिस्टांचं धोरण अतिजहालवादी होतं. थर्ड इंटरनॅशनल जे हुकूम सोडील त्याची अक्षरशः अंमलबजावणी करणं हें आपलं आद्य कर्तव्य आहे असं स्टालीनवादी समजत. थर्ड इंटरनॅशनलचं धोरणसुद्धां स्वतंत्रपणें आंखलं जात नसे. थर्ड इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळावर रशियन कम्युनिस्टांचें हुकमी बहुमत असल्यामुळें सोव्हिएट रशियाच्या परराष्ट्र धोरणाला पोषक असंच धोरण थर्ड इंटर-नॅशनल ठरवीत असे. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगायचं म्हणजे थर्ड इंटरनॅशनल सोव्हिएट रशियाच्या परराष्ट्रखात्याची एक दुय्यम शाखा होती. १९२८ सालीं थर्ड इंटरनॅशनलची सहावी कॉंग्रेस भरली. त्याच कालांत रशियाची पंचवार्षिक योजना अंमलांत येण्यास सुरुवात झाली. ही योजना यशस्वी व्हायची असेल तर तिच्यासाठीं रशियन जनतेनं स्वार्थत्याग करण्यास तयार झालं पाहिजे होतं. रशियन जनतेमध्यें उत्साह निर्माण करण्यासाठीं सोव्हिएट रशिया हा एकच देश समाजवादी आहे आणि या देशासभोवतीं साम्राज्यवादी आणि भांडवलशाही राष्ट्रांचं कडं पडलं आहे. हीं राष्ट्रं सोव्हिएट रशियावर आक्रमण करून तेथील समाजवादाचा कधीं विध्वंस करतील त्याचा नेम नाहीं, म्हणून या समाजवादाचं संरक्षण करण्यासाठीं संरक्षक साधनांचं विपुल उत्पादन झालं पाहिजे. त्यासाठीं पंचवार्षिक योजना जितक्या लवकर अंमलांत येईल तितकी चांगली. या घोषणेला अनुसरून सोव्हिएट रशियाला इतर देशांशीं फटकून वागणं प्राप्त होतं. म्हणून थर्ड इंटर-नॅशनलनं जगांतील सर्व कम्युनिस्टांना आपापल्या देशांतील सर्व राजकीय पक्षांशीं फटकून वागण्याचा संदेश दिला !

हिंदी स्टालीनवादी त्याप्रमाणें वागूं लागले. कॉंग्रेस ही भांडवलदारांची संस्था आहे आणि तिचा उद्देश भांडवलदारांचं राज्य स्थापन करण्याचा आहे असा प्रचार त्यांनीं सुरू केला. तसंच ट्रेड युनियन कॉंग्रेस ही सुधारणावादी संस्था आहे, ती देशांत कामगारांची आणि किसानांची क्रांति करूं शकणार नाहीं असा आरोप त्यांनीं त्या संस्थेवर ठेवला. या दोन्ही संस्थांतून बाहेर फुटून त्यांनीं कामगार किसानांच्या नांवावर एक पक्ष स्थापन केला, आणि लाल ट्रेड युनियन कॉंग्रेस काढली. या दोन्ही संस्थांमध्यें एकही कामगार किंवा शेतकरी नव्हता हे सांगण्याची जरुरी नाहीं. स्टालीनवाद्यांचं हें अतिजहालवादी धोरण कुसीनेन नांवाच्या एका सौंदर्यशास्त्राच्या प्रोफेसरनं थर्ड इंटरनॅशनलच्या सहाव्या कॉंग्रेसमध्ये सादर केलेल्या प्रबंधांत ग्रथित केलं होतं. रॉयनीं याच कॉंग्रेसमध्ये वसाहतीवरील आपला प्रबंध सादर केला होता, परंतु तो प्रबंध कॉंग्रेसनं मान्य केला नाहीं, इतकंच नव्हे तर दुसऱ्या अनेक कारणांवरून एका वर्षाच्या आंतच कॉ. रॉयना थर्ड इंटरनॅशनलमधून काढून टाकण्यांत आलं. त्यानंतर कॉ. रॉयनीं आपलं धोरण स्वतंत्रपणं मांडण्यास सुरुवात केली, परंतु तें धोरण मॉस्कोला मान्य नसल्यामुळे जे स्टालीनवादी पूर्वी कॉ. रॉयकडून राजकीय शिक्षणाचे धडे घेत होते ते सर्व कॉ. रॉयवर उलटले नि त्यांच्याविरुद्ध प्रचार करूं लागले. कॉ. कुसीनेन आणि कॉ. रॉय यांच्या प्रबंधांतील मुख्य फरक हिंदी राजकीय परिस्थितीच्या पृथक्करणासंबंधानं नसून प्रत्यक्ष कार्यक्रमासंबंधानं होता. कॉ. कुसीनेनचं म्हणणं असं होतं कीं, हिंदी भांडवलदारांचा वर्ग आपल्या देशांत समाजक्रांति होईल या भीतीनं ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं तडजोडीचं नेहमींच धोरण ठेवील आणि कोणतीही क्रांतिकारक चळवळ दडपण्याचा प्रयत्न करील. देशांतील कामगार नि शेतकरी हेच क्रांतीचे मुख्य आधारस्तंभ होत, आणि याच लोकांचा स्वतंत्र राजकीय पक्ष निर्माण झाला पाहिजे. कॉंग्रेस हा भांडवलदारांचा पक्ष असल्यामुळें या पक्षानं त्या किंवा इतर पक्षांशीं कोणताच संबंध ठेवतां कामा नये. लेनिनच्या साम्राज्यशाहीवरील पुस्तकाचा आधार घेऊन कॉ. रॉयनीं असा सिद्धांत मांडला कीं, हिंदुस्थानांतील ब्रिटिश भांडवल ज्या प्रमाणांत कमी होत जाईल, त्या प्रमाणांत ब्रिटिश साम्राज्यशाहीला हिंदी भांडवलाची जरुरी लागेल. म्हणून ब्रिटिश साम्राज्यशाहीला हिंदी भाडवलदारांसंबंधानं उदार धोरण ठेवावं लागेल. या उदार धोरणाच्या चौकटींत हिंदी भांडवलदारांच्या आर्थिक आणि राजकीय अशा सर्व महत्त्वाकांक्षा पूर्ण होण्याचा संभव असल्यामुळें हिंदी भांडवलशाही क्रांतिकारक चळवळीपासून अलिप्त राहील किंवा तिला विरोधही करील. राष्ट्रीय कॉंग्रेससंबंधानं कॉ. रॉयचं असं म्हणणं होतं कीं, कॉंग्रेस हा एक पक्ष नसून ती चळवळ आहे. या चळवळीचं नेतृत्व प्रतिक्रांतिकारक असलं तरी त्यांत सामील होणारा बहुजनसमाज क्रांतिकारक वृत्तीचा आहे, म्हणून कम्युनिस्टांनीं या चळवळींत

सामील होऊन त्या चळवळीचं प्रतिक्रांतिकारक नेतृत्व हाणून पाडण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अशा प्रकारचा या दोन कम्युनिस्ट पक्षांच्या मतप्रणालींत फरक होता.

कॉ. रॉय कराचीहून आल्यानतर चेट्टींच्या सांगण्यावरून मी त्यांना भेटायला गेलो. नाहीं तरी मी आपणहून जाणारच होतो. परंतु कॉ. रॉयचा निरोप आल्यानंतर सर्व काम बाजूला ढकलून मी त्यांच्या भेटीला गेलों. डॉ. महंमूद हेच कॉ. रॉय आहेत हें आम्हां सर्वांना आतां कळून चुकलं होतं. कराचीला पंडित जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस वगैरेंची त्यांनीं भेट घेतली ती रॉय म्हणूनच घेतली. पंडित जवाहर-लालजी युरोपमध्ये असतांना त्यांची नि कॉ. रॉयची अगोदरच भेट झाली होती. म्हणूनच त्यांना नव्यानं पंडितजींना आपली ओळख करून देण्याचं कारण नव्हतं. मला पाहातांच कॉ. रॉय हसूं लागले. नंतर ते मला म्हणाले, 'तुमचा ट्रॉट्स्कीवाद पूर्वी-इतकाच भडक राहिलेला आहे कीं आतां फिक्का झाला आहे?' मी या प्रश्नाला कांहींच उत्तर दिलं नाहीं. थोड्या वेळानं आम्ही कराची कॉंग्रेसविषयीं बोलूं लागलों. बोलतां बोलतां कॉ. रॉयनीं माझ्यापुढे सिगारेटचा डबा केला. मी त्यांना सिगारेट ओढीत नाहीं म्हणून सांगितलं. कॉ. रॉय पुन्हा हसूं लागले. परंतु यावेळीं त्यांच्या हास्यांत बराच उपरोध भरलेला होता. ते म्हणाले, 'अस्सं! एकूण तुम्ही जातिवंत धर्मोपदेशक आहांत. बरोबरच आहे, ब्राह्म धर्माच्या प्रचारकानं आपल्या अंगीं कोणतंही व्यसन लावून घेऊं नये. त्यानं फारच सोवळेपणानं राहिलं पाहिजे—नाहीं?' असं म्हणून ते मोठ्यानं हसूं लागले. मला त्याचा खूप राग आला आणि मी त्यांच्या हातांतून सिगारेटचा डबा जवळ जवळ हिसकावून घेतला म्हटलं तरी चालेल. त्या डब्यातली एक सिगारेट काढली आणि ती पेटवून संथपणानं मी त्यांच्याकडे पाहात ओढूं लागलों. वस्तुस्थिति अशी होती कीं मला ऑक्सफर्डला असतांनाच धूम्रपान करण्याची संवय होती. परंतु हिंदुस्थानांत आल्यानंतर काहीं दिवसांनीं मीं ती संवय अजिबात सोडून दिली होती. माझ्या नीतिकल्पना पारंपरिक नीतिकल्पनेपेक्षां अगदींच वेगळ्या असल्या-मुळें कॉ. रॉयनीं मला दिलेला सोवळेपणाचा टोमणा बिलकुल सहन झाला नाहीं. या माझ्या रागाचा परिणाम इतकाच झाला कीं त्या दिवसापासून मी माझी आवडती पाइप पुन्हां ओढूं लागलो.

# १५



रॉयगटामध्यें मी अशा अगदीं अनौपचारिक रीतीनें पुन्हां सामील झालों. डॉ. महंमूदशीं झालेला खटका मी अजिबात विसरून गेलों होतो. इतकंच नव्हे तर रॉयच्या मॅनिफेस्टोचा आधार घेऊन रॉयवादाचा प्रचार करण्यांत मी पूर्वीपेक्षां अधिक उत्साहानं भाग घेऊं लागलो. पण माझी आंतरिक इच्छा अशी होती कीं रॉयवादी आणि स्टालीनवादी या दोन्ही गटांनीं आपले पूर्वींचे भेद विसरून जाऊन एक संयुक्त राजकीय पक्ष स्थापावा. या दृष्टीनं मी बरीच खटपटही केली. मी प्रार्थनासमाजामध्यें ज्या सभा बोलावीत असे, त्या सर्वांना मी न चुकतां स्टालीनवाद्यांना बोलावीत असें आणि तेही न चुकतां सर्व सभांना हजर राहात. या आमच्या सभा खरोखरच्या सभा नसून खाजगी बैठकी होत्या, तरीसुद्धां हजर राहाणाऱ्या दोन्ही सांप्रदायांची इतकी गर्दी होत असे कीं राममोहन आश्रमाचा तळमजला याला अगदींच अपुरा पडे. हें माझं धोरण कॉ. शेखसारख्या कॉ. रॉयवाद्यांना मुळींच पसंत पडत नसे. त्यांचा माझा या संबंधानं बराच मोठा वाद होई. परंतु मी माझं धोरण केव्हांही बदललं नाहीं. या आमच्या बैठकीला कॉ. देशपांडे, रणदिवे, शहा, काणेकर प्रभृति मंडळी नियमानं हजर राहात असल्यामुळें चर्चेला नेहमींच रंग चढे. एकदां अशीच एक सभा आम्ही स्टुडंट ब्रदरहुडमध्यें घेतली होती, त्या सभेमध्यें कॉ. रॉय आपली कॉन्स्टिट्युअंट असेंब्लीची कल्पना स्पष्ट करून सांगणार होते. त्या सभेला स्टालीनवादी, रॉयवादी व इतर बरेच लोक हजर होते. त्यावेळीं माझे मित्र प्रभाकर पाध्ये हे नेहमीं स्टालीनवाद्यांबरोबर फिरत असल्यामुळें तेही या सभेला हजर राहिले होते. सभेच्या अध्यक्षस्थानीं नेहमींप्रमाणें मी होतो. सभेंतील मुख्य भाषण कॉ. रॉयचं होतं. कॉ. रॉयचं भाषण संपल्यानंतर देशपांडे, रणदिवे प्रभृति स्टालीनवाद्यांनीं लहान लहान भाषणं करून कॉ. रॉयच्या भूमिकेविषयीं नापसंती व विरोध दर्शविला. त्यानंतर एक दोन रॉयवादी बोलले. नंतर कुणीच बोलायला उभा राहात नाहीं असं पाहून मी म्हटलं, 'श्री. प्रभाकर पाध्ये यांना या विषयावर कांहीं तरी बोलायचं आहे असं मला वाटतं.' हे माझे शब्द ऐकल्याबरोबर पाध्ये उठले आणि त्यांनीं एकदम सांगून टाकलं कीं, 'रॉयवादी

कार्यक्रम unscientific आहे.' unscientific हा शब्द ऐकल्याबरोबर कॉ. रॉय खवळले आणि त्यांनीं पाध्यांचा खरपूस समाचार घेतला.

एके दिवशीं कॉ. शेख माझ्या घरीं आला आणि म्हणाला, 'रॉयनीं कांहीं जरुरीच्या कामासाठीं तुम्हाला बोलावलं आहे.' त्यावेळीं रॉय पेडर रोडवरील एका बंगल्यांत गुप्तपणानं राहात असत. मी तिथं गेल्यावर कॉ. रॉय म्हणाले, 'युरोपहून नुकतीच आपली एक कॉमरेड इथं आली आहे. ती सध्या बॅलार्ड पिअरवरील ग्रँड हॉटेलमध्ये उतरली आहे. तिला जाऊन तुम्ही भेटावं अशी माझी इच्छा आहे.' मी रॉयकडून निघालों तो तडक ग्रँड हॉटेलमध्यें गेलों, आणि 'लुइझे गाइझलरची खोली कुठं आहे?' असं मी हॉटेलच्या मॅनेजरला विचारलं. लुइझे गाइझलर तिथंच एका युरोपियन गृहस्थापाशीं बोलत कोचावर बसली होती. तिच्याकडे मॅनेजरनं आपलं बोट दाखवलं. मी लूकडे गेलों आणि तिला माझी ओळख करून दिली. तिनं माझ्याशीं जोरानं हस्तांदोलन केलं. शेजारीं असलेल्या गृहस्थाशीं दोन औपचारिक शब्द बोलून ती मला घेऊन आपल्या खोलींत गेली. कांहीं वेळ इकडल्या तिकडल्या गप्पा मारल्या-नंतर मीं तिला माझ्या घरीं येऊन राहाण्याची विनंती केली आणि तिनं ती आनंदानं मान्य केली. ती म्हणाली, 'आत्तांच आपण निघूं या.' तिच्या सामानाची आवराआवर करून तिनं तें एका चाकराच्या हवालीं केलं आणि आम्ही खालीं गेलों. लू आपले बिलाचे पैसे चुकते करीत होती. इतक्यांत मॅनेजरनं मला खूण केली आणि आपल्याकडे बोलावलं. तो हलक्या स्वरांत मला म्हणाला, 'हें पाहा, कोणत्याही पुरुषाला एकट्या असलेल्या स्त्रीच्या खोलींत जाऊं देण्याचा शिरस्ता नाहीं. तुम्ही तो शिरस्ता मोडलात याचं फार दुःख होतं.' मी त्या मॅनेजरच्या तोंडाकडे थोडा वेळ पाहिलं आणि मोठ्यानं हसलों. इतक्यांत लू माझ्याजवळ येऊन 'काय भानगड आहे' म्हणून विचारूं लागली. मी तिला म्हटलं, 'भानगड वगैरे कांहीं नाहीं. हा मॅनेजर शिष्टपणाचा आव आणून मला थोडासा उपदेश करण्याचा प्रयत्न करीत होता. मी तुला पैज मारून सांगतों कीं कॉमरेड, हें तुझं हॉटेल ब्रिटिशांच्या मालकीचं असलं पाहिजे. कारण असल्या बाबतींत भलताच शिष्टपणा करण्याचं त्यांच्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही माणसाला धाडस व्हायचं नाहीं.' हें सर्व मी मॅनेजरला ऐकूं येईल इतक्या मोठ्यानं बोलत होतों. अर्थात् त्याला निराळं उत्तर देण्याची मला मुळींच जरुरी पडली नाहीं.

कांहीं वर्षांनीं मला अगदीं नाइलाजास्तव ग्रँड हॉटेलमध्यें जावं लागलं. कलाशंकरच्या राजाचा धाकटा भाऊ ब्रजेशसिंग या हॉटेलमध्यें उतरला होता, अर्थात् त्याची भेट घेण्यासाठीं मला तिथं जावं लागलं. त्यावेळीं ब्रजेश जेवीत होता. जेवतांना त्यानं तोंड अगदीं आंबट केलं होतं. जेवतां जेवतांच तो मला म्हणाला, 'You know,

English food is English food. But this food is super English.' इतकं बोलून त्यानं पुढ्यांतली डिश बाजूला केली. मी त्याला म्हटलं, 'हें पाहा, आपण जेवायला दुसरीकडे जाऊं आणि या हॉटेलच्या इंग्रजीपणाविषयीं म्हणशील तर इथले व्यवस्थापक भलताच शिष्टपणा दाखवतात.' असं म्हणून मी लूच्या वेळीं घडलेली हकीगत त्याला सांगितली. ती ऐकल्यावर त्याच्या तोंडावरचा आंबटपणा साफ निघून गेला आणि तो असा खो खो हसत सुटला कीं त्याचा तोल जाऊन तो खुर्चीवरून पडतो कीं काय अशी मला भीति वाटली.

लू आमच्या घरीं आली, त्यावेळीं आमचं घर म्हणजे एक प्रकारचा राजकीय आखाडाच बनला होता. आमच्या राजकारणावरील चर्चा रात्रीं दोन-तीन वाजेपर्यंत चालत. जमलेल्या मंडळींची चहापाण्याची आणि खाण्यापिण्याची व्यवस्था करतां करतां आमचा आचारी तर बेजार होऊन गेला. त्यानं एक–दोनदां नोकरी सोडून जाण्याची धमकीसुद्धां आम्हांला दिली होती. विशेषतः आमच्या गटांतील कांहीं कॉमरेड्स आणि गिरणी कामगार युनियनमधील कांहीं गिरणी कामगार वेळीं-अवेळीं येऊन जेवण्यासाठीं थांबत त्यावेळीं मात्र खरोखर त्याची तिरपिट उडे. परंतु त्यावेळीं आमचीं सर्वांचीं डोकीं क्रांतीच्या विचारानं भडकलेलीं. तेव्हां एका क्षुल्लक आचाऱ्याच्या सोईचा किंवा गैरसोईचा विचार कोण करतो ! शेवटीं तो आचारी कंटाळून निघून गेलाच आणि त्याच्या ऐवजीं आम्ही एक बाई स्वयंपाक करण्यास ठेवली. तीसुद्धां अशीच कंटाळून गेली. पण तिनं आमची नोकरी सोडायच्या अगोदरच मी रॉय गटांतून बाहेर पडलो होतों आणि आमच्यावरील हें संकट टळलं.

लू घरीं आल्यानंतर तिची आणि कॉमरेड रॉयची कशी भेट करवून द्यायची याचा आम्हांला विचार पडला. कारण लू ज्या दिवशीं आमच्या घरीं आली त्याच दिवसापासून आमच्या घरावर पोलिसांचा सक्त पाहारा होता. आमचं घर लॅबर्नम रोडवर होतं. या रस्त्याच्या दोन्ही टोकांला गुप्त पोलिसांच्या दोन टॅक्सी नेहमीं उभ्या असत. त्याशिवाय आमच्या घरावरून येणारे जाणारे दोन तीन पोलीस बातमीदार होते ते वेगळेच. ही परिस्थिति लक्षांत घेऊन मीं लूला म्हटलं कीं, 'तूं रॉयना भेटण्याच्या भानगडींत न पडतां सरळ लखनौला व्रजेशसिंगाकडे जा. हें सर्वांच्या दृष्टीनं हिताचं आहे.' नाहीं तरी लू मुंबईहून लखनौला जाणारच होती, म्हणून लूनं एकदम माझी सूचना मान्य केली आणि त्याप्रमाणें तिनं त्या दिवशीं जाण्याचीही तयारी केली. ती तयारी करीत असतांना कॉ. रॉयची चिठ्ठी आली, कीं 'मला भेटल्याशिवाय लूला लखनौला जाऊं देऊं नका.' लूला मी ती चिठ्ठी दाखविली. तिनं ती वाचल्यानंतर प्रश्नार्थक मुद्रेनं माझ्याकडे पाहिलं. मी तिला 'नाहीं' म्हणून मानेनंच सांगितलं. पण ती म्हणाली, कीं 'कॉ. रॉयची चिठ्ठी आल्यावर त्यांना भेटल्याशिवाय जाणं मला बरं

दिसत नाहीं, तेव्हां त्यांना भेटण्याचा मला प्रयत्न करून पाहिलाच पाहिजे.' मी म्हटलं, 'ठीक आहे. आपण संध्याकाळीं त्यांच्या भेटीला जाऊं.'

संध्याकाळ झाली आणि आम्हीं दोघेजण बाहेर पडलो. चालतां चालतां मीं लूला बजावलं, कीं 'तूं मागं पाहूं नकोस.' कांहीं वेळ चालल्यानंतर मीं मागं नजर टाकली. एक दोन पोलीस बातमीदार येत होते. ते सुद्धां चालतच येत होते. तेव्हां त्याना झुकांडी देऊन जाणं कठीण नाहीं असं मला वाटलं. आम्ही चालत चालत सेसील रेस्टॉरंटपाशीं आलों आणि तिथं उभ्या असलेल्या एका टॅक्सीत बसलों. टॅक्सीवाल्याला चौपाटीच्या बाजूनं जायला सांगितलं नि नंतर डाव्या बाजूला वळून सॅडहर्स्ट ब्रिज ओलांडून लॅमिग्टन रोडवरून गाडी सरळ पुढे न्यायची असा इषारा मी त्याला दिला. त्यावेळी कॉ. रॉय क्लबरोडवर राहात होते. त्या बाजूला आमची गाडी वळतांच मीं मागं पाहिलं, तो एक टॅक्सी आमचा पाठलाग करीत आहे असा मला संशय आला. म्हणून मी ड्रायव्हरला गाडी थांबवायला सांगितलं. आमची टॅक्सी थांबल्याबरोबर पाठीमागून येणारी टॅक्सी थांबली. माझा संशय अधिक दृढ झाला. मी लूला म्हटलं कीं, 'रॉयला भेटण्याची आशा तूं सोडून दे. आपण परत घरीं जाऊं.' लूनं संमति दिल्याबरोबर मी तिला म्हटलं कीं, 'आपण घरीं जाण्यापूर्वीं आपल्या पाठीमागून येणाऱ्या या लोकांची जरा मजा करूं.' असं म्हणून मी ड्रायव्हरला भायखळा स्टेशनवर गाडी न्यायला सांगितली. आमच्या पाठीमागून ती दुसरी टॅक्सी येत होती हे सांगायला नकोच. भायखळा स्टेशनवर येऊन पोचल्यानंतर आम्ही सावकाशपणें आंत शिरलो आणि तिकीट ऑफिसजवळ जाऊन व्हिक्टोरिया टर्मिनसचं तिकीट काढलं. आमच्या पाठीराख्यांनीं आपली टॅक्सी स्टेशनांतच थांबवली आणि आम्ही कुठलीं तिकिटं काढलीं याची चौकशी करून त्यांनींसुद्धां बोरीबंदरचींच तिकिटं काढलीं असा माझा तर्क आहे. परंतु त्यांना हे करण्याला जरा वेळ लागला आणि ते प्लॅटफॉर्मवर येऊन पोचेपर्यंत आमची गाडी चालू लागली. गाडी चालतां चालतां त्यांपैकीं दोन इसमांनीं उडी मारली आणि बाकीचे प्लॅटफॉर्मवर गाडीकडे पाहात उभे राहिले. गाडी सुरू झाल्यावर मी लूला म्हटलं, 'आपण बाकीच्या सर्वांना चुकवलं. पण दोन माणसं गाडींत आहेत. त्याची आपण आणखी थोडी गंमत करूं. सॅडहर्स्ट रोड स्टेशनवर गाडी आली कीं ती थांबण्यापूर्वींच आपण दोघं खालीं उतरूं.' त्याप्रमाणे सॅडहर्स्ट रोडवर गाडी थांबते न थाबते तोच आम्ही खालीं उतरलो नि स्टेशनच्या बाहेरच्या दरवाजाकडे धावत गेलो. त्याच स्टेशनवरून रस्त्यावर यायला बऱ्याच पायऱ्या लागतात आणि झपझप पावले टाकतांना लूची त्रेधा उडाली. पायऱ्या उतरून खालीं आल्यावर पाहातों तर एकच व्हिक्टोरिया तिथं उभी होती. त्या व्हिक्टोरियांत आम्ही चढलो आणि ती भरधांव सोडण्यास आम्ही गाडीवाल्याला सांगितलं.

आमची गाडी चालू झाली त्यावेळीं शिल्लक राहिलेले आमचे दोन पाठीराखे स्टेशनच्या पायऱ्यांवर उभे राहून आमच्याकडे पाहात होते. लू त्यांच्याकडे पाहून खदखदां हसूं लागली. आणि तिनं आपल्या हातांतला रुमाल उंच उडवला. लू म्हणाली, 'हें पाहा, आतां हे लोक कांहीं पाठलाग करीत नाहींत. तेव्हां आपण रॉयना भेटण्याचा प्रयत्न करूं.' मी म्हटलं, 'तें नाहीं जमणार, या लोकांची गंमत करतां करतां मी अगदीं दमून गेलोंय आणि मला घरीं कधीं जाऊन पोचेन असं झालंय.' नंतर आम्ही दोघं घरीं आलों. दुसरे दिवशीं मणिबेन कारा यांनीं लूची आणि रॉयची भेट घडवून आणण्याचा प्रयत्न कला आणि तो यशस्वी झाला. त्यासाठीं मणिबेननीं लूला हिंदी स्त्रीचा पेहराव चढवून तिच्या तोंडावर बुरखा ओढल्यामुळें मणिबेनचा प्रयत्न सफल झाला.

याच सुमारास बुंदेलखंड कामगार आणि किसान परिषदेचं दुसरं अधिवेशन झांशीला भरणार होतं. या अधिवेशनाचं अध्यक्षस्थान मी स्वीकारावं अशी कॉ. रॉयची इच्छा होती. कॉ. रॉय हे झांशीला कांहीं दिवस राहिल्यामुळें तिथल्या किसान आणि कामगार कार्यकर्त्यांमध्यें त्यांचं बरंच वजन होतं. ते कार्यकर्ते कॉ. रॉयना मि. बॅनर्जी या नांवानं ओळखत. अर्थात् मि. बॅनर्जींनीं झांशीला पत्रं लिहिलीं आणि त्यांच्या सूचनेप्रमाणें तिथल्या कार्यकर्त्यांनीं परिषदेचं अध्यक्षस्थान स्वीकारण्याची मला विनंती केली. मी त्यांची विनंती मान्य केली खरी, परंतु परिषद अगदीं थोड्याच दिवसांत भरणार असल्यामुळें माझं अध्यक्षीय भाषण कसं लिहून आणि छापून होणार याची मला काळजी पडली. खरं पाहिलं तर मला फक्त बारा–तेरा तासांचाच अवधि होता. कारण दुसऱ्या दिवशीं झांशीला जाण्यासाठीं मुंबईहून निघणं मला भाग होतं. माझी चिंता मीं लूला बोलून दाखविली. तेव्हां ती म्हणाली, 'हें पहा कॉमरेड, तूं कांहीं चिंता करूं नकोस. तूं अगोदर त्या भाषणाचा विचार कर. आणि मला भराभर सांगत जा, मी तें लघु-लिपींत लिहून घेईन आणि नंतर टाइप करीन.' लू खरोखर आमच्या घरीं थोड्या दिवसांसाठीं पाहुणी म्हणून आलेली. तिला असा त्रास देणं बरं नव्हे असं मला वाटलं. आणि तसं मीं तिला बोलूनही दाखवलं. तेव्हां ती एकदम भडकली आणि मला वाटेल तें बोलूं लागली. मी तिला एकदम गप्प केलं आणि म्हटलं, 'तुझ्या म्हणण्या-प्रमाणें होऊं दे.' त्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यानंतर मीं तिला माझं भाषण डिक्टेट केलं, तिनं तें नंतर टाइप केलं. ते भाषण संपूर्ण टाइप होईपर्यंत रात्रीं तीन वाजले. परंतु लूनं हुं का चूं केलं नाहीं. माझं भाषण तयार झाल्यानंतर लूनं पुन्हां एकदां तें समग्र वाचून पाहिलं आणि ती मला म्हणाली, 'हें पाहा, कॉमरेड तुझं भाषण चांगलं वठलंय. परंतु मला त्यांत एक मोठा दोष दिसतो. रॉयला हें भाषण आवडेल असं मला वाटत नाहीं.' हे तिचे उद्गार ऐकून या भाषणावरून पुन्हां माझा रॉयशीं खटका

उडणार कीं काय अशी भीति मला वाटूं लागली. म्हणून मीं तिला विचारलं, 'माझं भाषण रॉयना आवडणार नाहीं असं तूं कां म्हणतेस?' ती म्हणाली, 'तुम्ही आपल्या भाषणांत ठिकठिकाणीं लिऑ ट्रॉट्स्कीचा जो उल्लेख केला आहे तो रॉयना मुळींच आवडणार नाहीं. कॉ. रॉय हे कट्टर स्टालीनवादी आहेत. आणि थर्ड इंटरनॅशनलच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकींत त्यांनीं अनेकवेळां ट्रॉट्स्कीला विरोध केला होता. म्हणूनच ट्रॉट्स्कीच्या पोरकट अतिजहालवादाचा ( Infanitle ultra leftism ) शिक्का ते तुमच्या डोक्यावर मारल्याखेरीज राहाणार नाहींत. कांहीं असलं तरी ट्रॉट्स्कीचा अशा रीतीनं उल्लेख करणं आपल्या ' लाइन ' ला धरून होणार नाहीं असं मला वाटतं. ' हे तिचे उद्गार ऐकून तिच्या पक्षाभिनिवेशाचं जरी मला कौतुक वाटलं, तरी तिचं म्हणणं मला पटलं नाहीं. मीं तिला म्हटल, ' कॉमरेड रॉयना आवडो न आवडो, मी कॉ. ट्रॉट्स्कीचा उल्लेख माझ्या भाषणांतून वगळायला तयार नाहीं. ' ल् कांहीं न बोलतां गप्प बसून राहिली. उजाडल्याबरोबर माझं भाषण कॉ. रॉयना दाखविण्यासाठीं मी घराबाहेर पडलों.

मी घराबाहेर पडलों तेव्हां माझ्या पाठीमागं एक पोलिसचा बातमीदार होताच. मी गवालिया टॅकला ट्रॅममध्यें बसलों. तोही माझ्या मागून ट्रॅममध्यें चढला. मला रॉयना भेटण्याची तर निकड होती. म्हणून या माणसाला टाळायचा कसा याचा विचार मी करूं लागलों. टॅक्सी करून जावं तर हा दुसऱ्या टॅक्सीमधून यायचा. अर्थात् ट्रॅमनंच पुढं जावं असा मी निश्चय केला. चर्नी रोड जंक्शनजवळ ट्रॅम आल्यानंतर माझ्या मनांत एक विचार आला आणि मी तावडतोब खालीं उतरलों. त्यावेळीं उजव्या बाजूच्या बिल्डिंगमध्यें डॉ. मुळगांवकरांचं नर्सिंग होम होतं. मी तडक आंत इमारतींत शिरलों. आणि मागं वळून पाहातों तर तो इसम फुटपाथवर उभा राहून मी ज्या बाजूनं आत शिरलों तिकडे पाहात होता. मी लिफ्टमधून तडक पाचव्या मजल्यावर गेलों आणि नर्सिंग होममधून इमारतीच्या दुसऱ्या टोकाला गेलो. तिथं दुसरा लिफ्ट होताच. त्या लिफ्टमधून खालीं येऊन बाहेर आलों. आणि लॅमिंग्टन रोडच्या बाजूनं चालायला लागलों. कांहीं वेळानं मागं वळून पाहिलं तर तो इसम कुठं दिसेना. बऱ्याच वेळानं जेव्हां मी रॉयकडून परत आलों, तेव्हां तो इसम त्या इमारतीच्या चर्नी रोडच्या टोंकाकडे तसाच उभा होता. मी त्याला दिसावं म्हणून मुद्दाम त्याच्या अंगावरून गेलों. तेव्हां तो पुन्हां माझ्या पाठीमागून चालूं लागला.

कॉ. रॉयनीं माझं भाषण लक्षपूर्वक वाचलं. वाचतांना मधून मधून त्यांच्या भिवया वर चढत होत्या. परंतु ते कांहीं बोलले नाहींत. सबंध भाषण वाचून काढल्या-नंतर ते मला म्हणाले, ' डॉक्टर, भाषण फार छान आहे. पण हे ट्रॉट्स्कीचे References काढून टाकावे लागतील. ' मी म्हणालों, ' तुम्हीच काढा ते. ' तेव्हां त्यांनीं फाउंटन

पेननं माझ्या भाषणावर मधून मधून रेघा मारल्या. मला त्यांचं हें करणं आवडलं नाहीं. परंतु मी त्यांना कांहींच बोललो नाहीं. मात्र झांशीला गेल्यावर माझं मूळचं भाषण जसं आहे तसंच वाचून दाखवायचं असा मीं मनाशीं निश्चय केला. झांशीला ज्या माणसाकडे मला उतरायचं होतं त्याचा पत्ता रॉयकडे होता. तो मी त्यांच्याकडून मागून घेतला. आणि परत घरीं येऊन प्रवासाला निघण्याची तयारी करूं लागलो.

झांशीला कुठं उतरायचं हें मला माहीत असल्यामुळें गाडी झांशी स्टेशनवर आल्यावर मी खालीं उतरलों. माझ्या बरोबरच स्टालीनवादी कॉ. श्रीनिवास सरदेसाई गाडींतून उतरले. त्यांना पाहिल्याबरोबर मला आश्चर्यच वाटलं. आणि मी तें त्यांना बोलूनही दाखवलं. ते म्हणाले, कीं 'मी ट्रेड युनियनच्या कामासाठीं बीनाला कांहीं दिवसांपूर्वी आलो होतो. आज झांशीला परिषद भरणार आहे, तेव्हां परिषदेला मी आलों आहें.' यानंतर दोघेही श्री. शर्मा यांच्या घरीं गेलों. मी त्यांना माझी ओळख करून दिली. तेव्हां ते म्हणाले, कीं 'तुमचं स्टेशनवर स्वागत करण्यासाठीं आमची सर्व मंडळी हारतुरे घेऊन गेली आहेत.' मी त्यांना म्हटलं, 'गेली असली तर हरकत नाहीं. पण मला आतां चहाची अधिक जरूरी आहे.' चहा पिणं झाल्यानंतर आम्ही परिषदेविषयीं बोलूं लागलो. त्यांच्या बोलण्यावरून मला असं कळलं, कीं तिथल्या मंडळींना कम्युनिस्टांमध्यें रॉयवादी आणि स्टालीनवादी हे दोन गट आहेत याची कल्पना नव्हती. खरोखर पाहिलं असतां त्यांचा स्टालीनवादाकडेच अधिक कल होता. परंतु हीं अंतर्गत भांडणं त्यांना माहीत नसल्यामुळे त्यांनीं गैरसमजानं मला आमंत्रण दिलं होतं. वस्तुस्थिति काय होती ती माझ्या अपरोक्ष कॉ. सरदेसाईनीं त्या मंडळींना समजून सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

संध्याकाळीं ज्यावेळीं खुल्या मैदानांत अधिवेशन भरलं, त्यावेळीं तिथं हजारावर किसान आणि कामगार हजर होते. जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष श्री. घोलेकर हे स्वागताध्यक्ष होते. त्यांचं भाषण संपल्यावर मी अध्यक्षीय भाषण करण्यास उभा राहिलों. परंतु माझं भाषण होतं इंग्रजी तें जमलेल्या लोकांना समजण्या-साठीं हिंदींत अनुवाद करून कुणी सांगायचं याविषयीं तिथं थोडी चर्चा झाली. शर्माजीनीं सरदेसाईना अनुवाद करण्यास विनंती केली. परंतु त्यांनीं नकार दिला. बरोबरच आहे. एका कट्टर स्टालीनवाद्यानं रॉयवाद्याच्या भाषणाचा अनुवाद करायचा हें त्यांच्या दृष्टीनं किती तरी मोठं पाप होतं. शेवटीं श्री. घोलेकर हेच उठले आणि त्यांनीं असं ठरवलं कीं, मीं भाषणाचा एक परिच्छेद वाचायचा आणि त्याचा अनुवाद त्यांनीं केल्यानंतर मग मीं दुसरा परिच्छेद वाचायचा. माझं भाषण आणि त्यांचा संपूर्ण अनुवाद याला बरोबर अडीच तास लागले. माझं भाषण पुरं झाल्यानंतर अधिवेशनाचं

त्या दिवसाचं काम संपलं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं विषयनियामक समितीची बैठक भरली त्यावेळेस सरदेसाईंना हजर राहाण्याची विनंती केली कमिटीमध्यें ठरावांची चर्चा होत असतां एक दोनदां सरदेसाईंनीं अडवणुकीच्या मार्गाचा अवलंब केला. परंतु त्यांत त्यांना यश आलं नाहीं आणि सर्व ठराव बहुमतानें मंजूर झाले. त्या दिवशीं परिषदेचं खुलं अधिवेशन भरलं. परंतु रॉयवाद आणि स्टालीनवाद यांच्यामधील विरोधाची कुणकुण त्या मंडळींना अगोदरच लागल्यामुळें त्या अधिवेशनाला आदल्या दिवसासारखा रंग भरला नाहीं. अधिवेशन संपल्यानंतर त्याच रात्रीं मी मुंबईला येण्यासाठीं कानपूरच्या गाडींत बसलों.

मी झांशीहून निघालो त्याच रात्रीं ल् लखनौला जाण्यासाठीं मुंबईहून निघाली होती, ती मला कानपूरला भेटली. परंतु आम्हांला बोलायला फारसा अवधि नव्हता. म्हणून एकमेकांचा निरोप घेऊन ल् लखनौच्या गाडींत बसली आणि मी मुंबईस येण्यास निघालो.

२१ जुलैच्या पहाटेस मुंबईच्या पोलिसांनीं कॉ. रॉयना एकाएकीं पकडलं. मला नि चेट्टींना पकडण्यासाठीं पोलिसांची एक तुकडी आमच्या घरीं तिसऱ्या प्रहरीं आली. त्या तुकडीमध्ये शुक्ल नांवाचे सब-इन्स्पेक्टर होते. हा गृहस्थ माझ्याशीं अगदीं सभ्यतेनं वागला. मला पकडल्याची बातमी घरामध्यें समजतांच एकच गोंधळ उडाला. लीला ओक्साबोक्शी रडूं लागली. मी तिला धीर देण्यासाठीं म्हणालों, 'हें पाहा, मला आतां पोलीस ठाण्यावर जायचं आहे, तेव्हां मला प्रथम दाढी केली पाहिजे. तूं माझा नवीन सूट बाहेर काढून ठेव.' असं म्हणून मी दाढी करण्यासाठीं आत गेलो आणि कांहीं वेळानं नवीन सूट घालून बाहेर आलों. मी बाहेर आल्यावर शुक्लांनीं मला विचारलं, 'मि. चेट्टी कुठं आहेत?' मीं म्हटलं, 'ते ऑफिसांत आहेत. मी तुम्हांला त्यांचं ऑफिस दाखवतों.' इतक्यांत, पोलिसानीं अगोदरच आमच्या घराची झडती घेण्याचं काम सुरू केलं होतं तें संपलं. त्यानंतर मी पोलिसांच्या बरोबर टॅक्सींतून चेट्टींच्या ऑफिसांत गेलो. मी निघालों त्यावेळीं, आमचे घरमालक मि. गोरागांधी हे दुकानावर गेले होते. परंतु त्यांच्या मुलीनं वर येऊन कसली गडबड आहे म्हणून चौकशी केली. तिला जेव्हां गडबडीचं खरं कारण कळलं, तेव्हां ती म्हणाली, 'वा! तुम्ही त्यांना उगीच पोलिसांच्या ताब्यांत दिलंत. आम्हांला कल्पना असती तर आम्ही त्यांना मागल्या दारानं पळवलं असतं.' अर्थात् ही हकीगत मला घरीं आल्यानंतर कळली.

मी पोलिसांना घेऊन चेट्टींच्या ऑफिसांत गेलों. परंतु त्यांच्या ऑफिसमध्यें पोलिसांना घेऊन जाणं बरं नव्हे असं मला वाटलं. कारण चेट्टी हे वालचंद हिराचंदच्या कंपनींत अकौंटंट होते, आणि मी जर पोलिसांना घेऊन त्यांच्या ऑफिसांत गेलों

आणि पोलिसांनीं त्यांना ऑफिसांतच पकडलं तर शेटजी चेट्टींना कामावरून कायमचे दूर करतील अशी भीति मला वाटली. पण नंतर दुसरा एक विचार माझ्या मनांत आला. कॉ. रॉय यांना त्यावेळीं सरकारनं absconder म्हणून ठरवलं होतं. अर्थात् त्यांना आश्रय देणाऱ्यांनासुद्धां तीनपासून सात वर्षांपर्यंत सक्तमजुरीची शिक्षा होणार होती. मी आणि चेट्टी जर सात वर्षे तुरुंगांत जाणार असलों तर चेट्टींना शेटजींनीं नोकरीवर ठेवलं काय नि न ठेवलं काय सारखंच. हा विचार मनांत आल्यावर माझं मलाच हसूं येऊं लागलं ; आणि निःसंकोचपणें पोलिसांना घेऊन मी त्यांच्या ऑफिसांत गेलों. ऑफिसांत गेल्यावर चेट्टींना मी सर्व हकीगत समजावून सांगितली. ती ऐकल्यावर ते लगेच उठून मॅनेजरच्या खोलींत गेले. कांहीं वेळानं बाहेर येऊन त्यांनीं ‘ चला ’ अशी आम्हांला खूण केली आणि आम्ही सर्वजण पोलिस कमिशनरच्या ऑफिसकडे निघालों. पोलिसांनीं आम्हाला रा. ब. मोहनलाल देसाई यांच्या ऑफिसांत नेलं.

पाहातों तों त्यांच्या टेबलासभोवतीं शेख, कर्णिक, मॅस्कॅरीनस, दोन शेट्टी, पुतली हे सर्व बसले होते. आम्ही त्यांच्या शेजारीं जाऊन बसलों. इतक्यांत शेखनीं देसाईंच्या जवळ सिगारेट मागितली. त्यांनीं मुकाट्यानं आमच्यापुढें टीनचा डबा केला. इतक्यांत दुसऱ्या एकानं चहा मागितला. देसाईंनीं चहाची ऑर्डर केली. त्यावेळीं सी. आय. डी. खात्याचे मि. पेटिगारा हे डेप्युटी कमिशनर होते. त्यांनीं आम्हां एकेकट्याला बोलावण्यास सुरुवात केली. ते बाकीच्या कॉमरेड्सशीं काय बोलले तें माहीत नाहीं. माझी पाळी आली आणि मी त्यांच्या ऑफिसांत गेलों. आंत गेल्यावर त्यांनीं उठून हस्तांदोलन केलं. त्यानंतर त्यांनीं मला बराच उपदेश केला. त्याचा सारांश इतकाच होता, कीं माझ्यासारख्या माणसानं असल्या चळवळींत पडणं चांगलं नाहीं. मला त्यांचा उपदेश आवडला नाहीं. परंतु मी कांहींच बोललों नाहीं. आणखी अर्धा तास गेल्यानंतर आम्हां सर्वांची जामिनावर मुक्तता करण्यांत आली. चेट्टींच्या ऑफिसांतील गृहस्थ आम्हां दोघांसाठीं जामीन राहिला होता. चेट्टी आणि मी निघालो, ते थेट घरीं आलों. त्यावेळेस डॉ. काशीबाई नवरंगे प्रभृति समाजांतील मंडळी लीला व मनोरमा यांना कांहीं तरी विचारीत होती. आम्हां दोघांना पाहिल्याबरोबर त्यांना आश्चर्य वाटलं आणि पोलीस चौकींतून आमची इतक्या लवकर सुटका झाली म्हणून त्यांनीं आनंद व्यक्त केला. कांहीं वेळानं ती मंडळी घरीं गेली.

# १६

दुसऱ्या दिवशीं सकाळीं म्हणजे मंगळवार ता. २२ जुलै १९३१ रोजीं प्रार्थना-समाजाच्या सेक्रेटरीचं सर्क्युलर आलं. त्या सर्क्युलरमध्यें असं लिहिलं होतं कीं, समाजाच्या मॅनेजिंग कमिटीची तांतडीची सभा त्याच दिवशीं संध्याकाळीं भरणार आहे. मी कमिटीचा सभासद होतों आणि चेट्टी खजीनदार होते. तेव्हां आमच्याकडे तें सर्क्युलर येणं भाग होतं. त्या सर्क्युलरवर आम्ही दोघांनीं सह्या करून तें पाठवून दिलं; आणि नंतर कमिटीची इतकी तांतडीची सभा कां बोलावली याविषयीं अंदाज बांधूं लागलों. चेट्टी आपल्या भोळ्या स्वभावाला अनुसरून म्हणाले, 'आपल्याला एकाएकीं पोलिसांनीं पकडलं म्हणून आपल्याला मदत करण्याच्या उद्देशानं ही सभा बोलावली असेल.' त्यानंतर बरेच तर्कवितर्क सुरू झाले. परंतु त्यांतून कांहींच निष्पन्न झालं नाहीं. संध्याकाळीं सभेच्या वेळीं मी सभेला वेळेवर हजर राहिलों. चेट्टी ऑफिसांतून यायचे असल्यामुळें त्यांना थोडा वेळ लागला. सभेच्या अध्यक्षस्थानीं श्री. बा. बा. कोरगांवकर होते. सभेच्या कामाला सुरुवात झाल्याबरोबर श्री. गिरजाशंकर त्रिवेदी मला म्हणाले, 'तुम्ही राज-कारणांत याउप्पर भाग घेणार नाहीं, असं आश्वासन जर आम्हांला देणार असाल तरच तुम्हांला प्रार्थनासमाजाचे धर्म-प्रचारक म्हणून काम करतां येईल.' यावर मी कांहींच बोललों नाहीं. नंतर श्री. (आतां सर) विठ्ठल चंदावरकर म्हणाले, 'आश्वासन बिश्वासन आज कांहीं नको. आपण जो ठरावाचा मसुदा तयार केला आहे. तोच कमिटीपुढें ठेवूं या.' यावरही मी बोललो नाहीं. यावर श्री. त्रिवेदी यांनीं असा ठराव मांडला कीं माझा प्रार्थनासमाजाशीं धर्मप्रचारक या नात्यानं कांहीं संबंध राहिला नाहीं. तो ठराव पुढें आल्यानंतर मी यज्ञेश्वर भांडारकरांच्याकडे पाहिलं. ते खालीं मान घालून गप्प बसून राहिले. कमिटीमध्यें दुसरे कित्येक सभासद असे होते, कीं त्यांनीं इतर बाबतींत मला संपूर्ण पाठिंबा दिला असता. परंतु कॉ. रॉयसारख्या क्रांतिकारक कम्युनिस्ट समजल्या जाणाऱ्या माणसाबरोबर मी पकडला गेलों हा मीं कांहीं तरी भयंकर गुन्हा केला अशी त्यांची प्रामाणिक समजूत असावी. म्हणून तेही गप्प बसून राहिले. ठरावावर अर्थात कुणीच भाषण केलं नाहीं. म्हणून तो पास झाला असं

समजण्यांत आलं, आणि सभेचं काम संपलं. त्यानंतर श्री. कोरगांवकर माझ्याकडे वळून म्हणाले, 'ही काय भानगड आहे ती तरी आम्हांला समजावून सांगा.' मी त्यांना म्हटलं, 'मला कांहींच सांगायचं नाहीं,' तेव्हां श्री. चंदावरकर मान हलवून म्हणाले, 'तुमचं करणं बरोबर आहे. तुम्ही यावेळीं कांहीं न बोलणंच चांगलं.' मी त्यांना उत्तर दिलं नाहीं. आणि लगेच खोलीच्या बाहेर पडलो नि चहा पिण्यासाठीं शेजारच्या इराण्याच्या हॉटेलमध्यें गेलों.

चहा प्याल्यानंतर पुन्हा चेट्टींना गांठण्यासाठीं प्रार्थनासमाजांत आलों. मी पोर्चमध्यें येतों न येतो इतक्यात चेट्टी धाडधाड जिना उतरून खालीं आले. त्यांचा चेहेरा रागानं लाल झाला होता. 'काय झालं?' म्हणून मी त्यांना विचारलं. तेव्हां ते रागानं म्हणाले, "एक नंबरचे भेकड लोक आहेत हे. असल्या लोकांच्या बरोबर काम करायला आपल्यालाच शरम वाटली पाहिजे. मी त्या लोकांना एक-दोन गोष्टी सुनावल्या, आणि खजिनदाराच्या जागेचा राजिनामा देऊन खालीं आलों.' मी कांहीं न बोलतां त्यांचा हात धरला आणि त्यांना घेऊन पुन्हां चहा पिण्यासाठीं गेलों. चेट्टी धुमसतच होते. आणि मीही त्यांचं सांत्वन करण्याचा प्रयत्न केला नाहीं. माझ्याबाबतींत समाजाच्या कमिटीनं घोर अन्याय केला असं त्यांना वाटत होतं आणि म्हणूनच त्यांना त्या लोकांची चीड आली. मला स्वतःला प्रार्थनासमाजानं माझ्याशीं असलेला आपला संबंध तोडून टाकला याचं विशेष वाटलं नाहीं. परंतु त्या लोकांच्या संबंधानं मला जो एक आपलेपणा वाटत होता, आपल्या धर्मतत्त्वाला नित्य जागणारे असा जो एक मला त्यांच्यासंबंधानं विश्वास वाटत होता तो मात्र एका क्षणांत नष्ट झाला. ज्यांना साधारणतः अधार्मिक आणि नीतिभ्रष्ट समजलं जातं ते लोकसुद्धां कोणत्याही माणसाला कामावरून काढतांना त्याला निदान पूर्वसूचना देतात. परंतु या धर्मभीरू लोकांना तेवढाही उदारपणा दाखवण्याचं सुचलं नाही. वस्तुस्थिति अशी होती कीं, मला पोलिसांनी संशयावरून पकडलं होतं आणि त्यांच्यापाशीं सबळ पुरावा नसल्यामुळें त्यांनी मला मॅजिस्ट्रेटच्या पुढं उभा न करतां जामिनावर मुक्त केलं होतं. म्हणजे कायद्याच्या दृष्टीनं मी गुन्हा केला नव्हता. तो केला किंवा नाहीं हें पुढें कोर्टांत ठरायचं होतं. परंतु या मंडळीनीं मला अगोदरच दोषी ठरवून शिक्षाही फर्माविली. या बाबतींत कायद्याच्या दृष्टीनं प्रार्थनासमाजांतील कायदेपंडितांची बाजू लंगडी होती. आणि मी जर त्यांच्यावर फिर्याद करण्याचं ठरवलं असतं तर त्यांनीं आपल्या भूमिकेचं समर्थन कसं केलं असतं हें पाहाणं मोठं मजेचं झालं असतं. परंतु कोर्टाकडे न्याय मागण्याचा माझा विचार जरी माझ्या मनांत क्षणभर येऊन गेला तरी तो टिकून राहाणं शक्य नव्हतं. कारण त्या लोकांनीं माझ्यासंबंधानं जो ठराव केला त्यामुळेंच मला प्रार्थनासमाजाचं खरं स्वरूप दिसून आलं. आणि हें सत्यदर्शन मला झालं त्याबद्दल समाजाच्या त्यावेळच्या कमिटीचे अजूनही आभार मानावेसे वाटतात.

## कांहीं गंमती

वरील प्रसंग घडून येण्यापूर्वी कांहीं महिने अगोदर माझी रस्त्यांतच स्टालीनवादी डॉ. गंगाधर अधिकारी यांच्याशीं गांठ पडली. डॉ. अधिकारी आणि कॉ. रणदिवे या दोघांचे वडील प्रार्थना समाजाचे सभासद होते. परंतु त्यांच्या मुलांचा दृष्टिकोन त्यांच्या अगदीं उलट होता. प्रार्थना समाजाची, हीं मुलं नेहमीं टिंगलच करीत असत. मला पाहिल्याबरोबर डॉ. अधिकाऱ्यांनीं नेहमीप्रमाणं समाजाची टर उडवायला सुरुवात केली. नंतर ते मला म्हणाले, 'तुमची तर कमाल आहे बुवा! तुम्ही प्रार्थनासमाजी आहांत आणि रॉयचेही चेले आहांत. या परस्पर विरोधी गोष्टी तुम्हांला कशा जमतात तें मला समजत नाहीं. परंतु मी तुम्हांला एक सांगतो, तुमचं भौतिकवादी राजकारण आणि प्रार्थना समाज यांचा समन्वय घडवून आणण्याचा हा जो तुम्ही अट्टाहास चालवला आहे त्यांत तुम्हांला कधींच यश येणार नाहीं. एक तर तुम्हांला तडजोडीचं धोरण स्वीकारावं लागेल, नाहीं तर प्रार्थना समाजांतील सनातनी पुढारी तुम्हांला समाजांतून काढून टाकतील.' काय असेल तें असो, कमिटीच्या सभेमध्यें ज्यावेळीं श्री. त्रिवेदींनीं माझ्या-विषयींचा ठराव मांडला त्यावेळीं मला डॉ. अधिकाऱ्यांच्या उद्गारांची आठवण झाली; आणि एकदम हसूं आलं. मीं राजकारण समाजाच्या धर्मकार्यासाठीं सोडलं नाहीं हें ऐकून त्या गृहस्थाला तरी आनंद होईल असा विचार माझ्या मनांत आला आणि माझ्या मनाला थोडं समाधान वाटलं.

तिसऱ्या दिवशीं, म्हणजे बुधवार ता. २२ जुलै १९३१ रोजीं पोलिस कमिशनरच्या ऑफिसांतून संध्याकाळच्या सुमारास एक माणूस माझ्याकडे आला आणि 'पेटिगारा-साहेबांनीं तुम्हांला बोलावलं आहे' असं तो म्हणाला. मला आश्चर्य वाटलं. कारण मि. पेटिगारांनीं असं अनौपचारिकरीत्या बोलावण्याचं कांहीं कारण नव्हतं. परंतु मीं त्याला येतों म्हणून सांगितलं आणि दुसऱ्या दिवशीं म्हणजे गुरुवारीं पेटिगारा यांच्या ऑफिसमध्यें गेलो. मी प्रथम मोहनलाल देसाईंना भेटलो, आणि 'काय काम आहे' म्हणून विचारलं. पण ते म्हणाले 'आपल्याला कांहींच कल्पना नाहीं.' त्यानंतर मी आलो आहे ही वर्दी देण्यासाठीं एका शिपायाला पेटिगारा यांच्याकडे पाठवलं. 'मी रिकामा आहे' असा त्यांचा निरोप आला. देसाई मला घेऊन पेटिगारांच्या ऑफिसांत गेले आणि मला तिथंच सोडून ते परत गेले. पेटिगारांनीं हंसतमुखानं माझ्याशीं हस्तांदोलन केलं आणि मला बसायला सांगितलं. नंतर ते बसले आणि बोलूं लागले, 'हें पहा, मला एका गोष्टीचा खुलासा करायचा आहे. आम्ही पोलिस अधिकारी आहोंत हें खरं. पण आमचा ज्या गोष्टींशीं संबंध येत नाहीं त्या गोष्टींकडे आम्ही कधींच लक्ष देत नाहीं. प्रार्थना समाजानं तुमच्याशीं इतकीं वर्षं असलेला संबंध एकदम तोडून टाकला हें ऐकून मला फार वाईट वाटलं. आणि मला तुम्हांला इतकचं सांगायचं आहे कीं, आम्हां लोकांचा या गोष्टीशीं कांहींच संबंध नाहीं.' त्यांचे उद्गार ऐकून मला

आश्चर्य वाटलं. मी त्यांना विचारलं, ‘ तुम्हांला ही बातमी कशी कळली ? ’ ते म्हणाले, ‘ प्रार्थना समाजाच्या वतीनं विठ्ठलराव चंदावरकर काल माझ्याकडे आले आणि मला म्हणाले कीं, चिटणिसांचा नि प्रार्थना समाजाचा आतां कांहीं संबंध राहिला नाहीं, तेव्हां तुम्ही समाजांत झडती वगैरे घेण्यासाठीं येऊं नका. ’ इतकं बोलून पेटिगारा माझ्याकडे पाहून हंसूं लागले. त्यांच्या हंसण्याचा अर्थ मला कळल्यामुळं मीही हसूं लागलों.

थोड्या वेळानं मी घरीं परत आलों आणि चेट्टींना ते घरीं आल्यानंतर ही हकीगत सांगितली. चेट्टी पुन्हां रागानं तांबडेलाल झाले; ते त्यावेळीं जें कांहीं बोलले तें इथं देण्यासारखं नाहीं. थोडे शांत झाल्यानंतर ते मला म्हणाले, ‘ आमच्या वालचंद शेटजींचं उदाहरण घेण्यासारखं आहे. मी नेहमीप्रमाणं मंगळवारीं कामावर रुजू झालों. परंतु शेटजींनीं मला एका शब्दानंही विचारलं नाहीं. उलट त्यांना माझ्याबद्दल सहानुभूतिच होती असं दिसलं; आणि तेंही बरोबरच आहे. कारण शेटजी प्रार्थना समाजासारख्या धर्मसंस्थेचे एक सभासद नाहींत. ’ ही सर्व हकीगत जशी घडली तशी सांगतों आहे खरी, पण मला वाटतं ही सांगतांना विठ्ठलराव चंदावरकरांना थोडासा अन्याय होतोय. विठ्ठलराव आपल्या वडिलांच्या तालमींत वाढलेले एक सरळ नि प्रामाणिक गृहस्थ आहेत. सर नारायणांची तैलबुद्धि आणि त्यांचा व्यासंग विठ्ठलरावांना नाहीं हे खरं. परंतु ते ज्या क्षेत्रामध्यें वावरतात आणि जें कार्य हातीं घेतात त्याची संपूर्ण माहिती मिळवण्यासाठीं वाटेल ते श्रम पडले तरी ते करण्याची त्यांची तयारी असते. त्यांची नेमस्तवादावर अढळ श्रद्धा आहे, आणि त्यांना प्रामाणिकपणें वाटत असतं कीं, ब्रिटिशांच्या कृपाछत्राशिवाय हिंदुस्थानचा उद्धार होणं शक्य नाहीं. अशा माणसाला माझ्या अतिजहाल राजकारणाचे वावडे असले तर त्यांत नवल नाहीं. मी क्रांतिकारक कटांत सामील झालों आहे अशी त्यांची समजूत होती आणि म्हणून माझ्यासारख्यांपासून प्रार्थना समाजाला उपसर्ग पोचूं नये म्हणून त्यांनीं शक्य तितकी खबरदारी घेतली. ते माझ्याविषयींच्या कोणत्याही वैयक्तिक द्वेषानं प्रेरित झाले नव्हते हें या ठिकाणीं सांगणं आवश्यक आहे.

प्रार्थना समाजाच्या मॅनेजिंग कमिटीनं वरील ठराव पास केल्यामुळं समाजाच्या तरुण मंडळीमध्यें बरीच खळबळ उडाली. त्यांना कमिटीचं करणं मुळींच पसंत पडलं नाहीं. म्हणून त्यांनीं requisition पाठवून साधारण सभेची मागणी केली. मी स्वतः या requisition च्या विरुद्ध होतों. परंतु त्या तरुण मंडळींनीं माझं मुळींच ऐकलं नाहीं. आणि समाजांतील वडील मंडळींना वाटलं कीं माझीच त्यांना आंतून फूस होती. निदान श्री. गिरजाशंकर त्रिवेदी यांचा तसा समज झाला होता. आणि त्यांनीं मला तो बोलूनही दाखवला होता. परंतु त्रिवेदींना उत्तर देण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं.

वस्तुस्थिति काय होती ती चेट्टींना माहीत होती. त्यांचा स्वतःचा requisition ला संपूर्ण पाठिंबा होता.

या requisition प्रमाणं मॅनेजिंग कमिटीला सर्व सभासदांची सभा बोलावणं भाग पडलं. या सभेला सभासदांची इतकी गर्दी झाली कीं तशी गर्दी पूर्वी कधींच झाली नव्हती. समाजाचे अध्यक्ष श्री. कोरगांवकर हेच सभेच्या अध्यक्षस्थानीं होते. सभेच्या कामाला सुरुवात झाल्यावर समाजाचे सेक्रेटरी श्री. त्रिवेदी यांनीं प्रथम requisition वाचून दाखवला. त्यानंतर माझा प्रचारक या नात्यानं समाजाशीं असलेला संबंध कमिटीला कां तोडावा लागला याचं स्पष्टीकरण करणारं एक लांबलचक पत्रक त्रिवेदींनीं वाचून दाखवलं. या ठिकाणीं हें सांगणं जरूर आहे कीं, आदल्या दिवशीं मॅनेजिंग कमिटीची सभा बोलावण्यांत आली होती त्या सभेपुढें हें पत्रक त्रिवेदींनीं ठेवलं होतं. मी त्या सभेला हजर होतो. त्या पत्रकांत माझ्यावर जे आरोप केले होते, त्यांविषयीं मला कांहीं सांगायचं आहे कीं काय असा प्रश्न त्रिवेदींनीं मला केला. मीं त्यांना सांगितलं कीं, मला या पत्रकासंबंधानें कांहींच सांगावयाचं नाहीं. उलट मीं तें पत्रक मान्य केलं. याचं कारण प्रार्थना समाजानं माझ्याशीं असलेला संबंध कां तोडला त्याचं खरं कारण त्यांत मुळींच दिलेलं नव्हतं, आणि असले कांहीं अवांतर आरोप माझ्यावर त्या पत्रकांत केले होते कीं तसले आरोप कोणताही माणूस कोणत्याही माणसाविरुद्ध करूं शकेल.

परंतु त्यांत दोन आरोप अत्यंत महत्त्वाचे होते. माझ्यावर एक आरोप असा होता कीं, मीं 'गृहलक्ष्मी' नांवाच्या मासिकांत 'स्त्री–स्वातंत्र्य' या विषयावर लेख लिहून त्यामध्यें स्त्रियांना विवाह केल्याशिवाय मातृपदाचा हक्क असावा असं प्रतिपादन केलं होतं. मी त्यामध्यें असं लिहिल्याचं नक्की आठवत कीं, सध्याचे विवाहविषयक कायदे एकतर्फी असल्यामुळें स्त्रियांना त्यांच्यापासून अन्याय होतो. स्त्रियांचा मातृत्वाचा हक्क निसर्गसिद्ध असला तरी तो हक्क प्रस्थापित करण्यासाठीं त्यांना हा अन्याय निमुटपणें सहन करावा लागतो. म्हणून विवाहाचे कायदे समतेच्या तत्त्वावर अधिष्ठित असले पाहिजेत. नाहीं तर स्त्रियांना त्यांच्यावर विवाहाचीं बंधनं लादल्याशिवाय मातृपदाचा हक्क दिला पाहिजे. अशाच अर्थाचं बरंचसं मी त्या लेखांत लिहिलं होतं परंतु या लेखांतली खरी खोंच प्रार्थना समाजांतील स्वतःला शहाणे म्हणवणाऱ्यांच्याही ध्यानीं आली नाहीं. म्हणूनच त्यांनीं या लेखाविषयीं आपला गैरसमज करून घेतला. माझ्यावर दुसरा आरोप असा होता कीं नवजवान सभेसारख्या दहशतवादी सभेचा मी अध्यक्ष होतों. या असल्याच आरोपामुळें मला त्या पत्रकाला मान्यता देण्यास दिक्कत वाटली नाहीं. कारण त्यांचे सर्वच गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला असता तर तो सफल होणं शक्यच नव्हतं.

त्रिवेदींनीं ते पत्रक वाचल्यानंतर बऱ्याच वक्त्यांचीं त्याच्यावर भाषणं झालीं. त्यांपैकीं बहुतेक तरुण असल्यामुळं माझ्या बाजूनंच बोलले. चेट्टींचा बोलतांना तोल अजिबात सुटला. आणि तें अगदीं साहजिक होतं. त्यांनीं आपल्या भाषणांत चंदावरकर –पेटिगारा मुलाखतीचा उल्लेख करून चंदावरकरासंबंधानं दोन-तीन अपमानकारक उद्गार काढले. हे उद्गार काढल्याबरोबर त्यांच्याच शेजारीं बसलेले सेकंडरी ट्रेनिंग कॉलेजचे व्हाइसप्रिन्सिपॉल प्रो. आर. पी. कार 'तुम्ही हे शब्द मागें घ्या' असं एकदम ओरडले. चंदावरकर त्यांच्याजवळच बसले होते. ते प्रो. कारना म्हणाले, 'बोलूं द्या त्यांना काय बोलायचं आहे तें. तुम्ही उगाच अडथळा करूं नका.' त्यानंतर मी बोलायला उठलों. मी म्हटलं 'श्री. त्रिवेदी यांनीं आपल्यापुढें जें पत्रक सादर केलं आहे, त्याला उत्तर देण्याची जरूरी आहे असं मला वाटत नाहीं. त्रिवेदींनीं मला जर त्या पत्रकाची प्रत दिली तर मी तें चौकटींत बसवून माझ्या दिवाणखान्यांत लावून ठेवीन. मुख्य मुद्याला बगल देऊन बऱ्याच अवांतर गोष्टींचा त्या पत्रकांत उल्लेख केला आहे, परंतु त्याची चर्चा मला या ठिकाणीं करायची नाहीं. कारण त्यामुळं इथं जमलेल्या तरुण मंडळींचीं मनं अगोदरच प्रक्षुब्ध झालीं आहेत तीं अधिक प्रक्षुब्ध होण्याचा संभव आहे. प्रार्थना समाजाचा नि माझा संबंध तुटला, यामुळं माझ्या मनावर जो विलक्षण परिणाम झाला आहे, तो मला शब्दानं व्यक्त करतां येत नाहीं. माझा एक विशिष्ट प्रकारचा विश्वास होता आणि माझी धर्मभावनाही विशिष्ट प्रकारची होती. मॅनेजिंग कमिटीनं ज्या दिवशीं तो ठराव केला त्या दिवशींच माझा तो विश्वास नि ती भावना समूळ नष्ट झाली. मला कळून चुकलंय कीं, समाजांतील मंडळी अन् मी यापुढें एकत्र काम करूं शकणार नाहीं. म्हणून मला समाजापासून दूर झालं पाहिजे. परंतु दुरावतांना माझी अशी इच्छा आहे, कीं आपल्या मनांत एकमेकांविषयीं कोणतंच किल्मिष राहू नये. समाजांतील सभासदांपुढें जाहीर रीतीनं बोलण्याचा हा माझा शेवटचा प्रसंग आहे. यापुढें मी समाजांत येणार नाहीं. अशावेळीं आपला पूर्वीचा स्नेह कायम रहावा अशी माझी उत्कट इच्छा आहे.'

माझं भाषण झाल्यानंतर श्री. के. नटराजन् बोलायला उठले. त्यांनीं कुणाचीच बाजू घेतली नाहीं. उलट ते म्हणाले, 'समाजाचे प्रचारक आणि समाजाचे पुढारी यांच्यामध्यें आज जी तेढ उत्पन्न झाली आहे ती नाहींशी होऊन दोघेही पूर्वीच्या सलोख्यानं आणि मित्रभावानं पुन्हां एकत्र येतील अशी मी आशा करतो!' त्याच आठवड्यांत निघालेल्या 'इंडियन सोशल रिफॉर्मर'मध्यें नटराजन्नीं हेंच लिहिलं होतं. आणि आपल्या स्फुटाच्या शेवटीं मी केलेल्या भाषणाबद्दल गौरवपर उद्गार काढले होते. त्या स्फुटावरून वस्तुस्थिति काय होती याची निदान नटराजन्ना तरी जाणीव होती हें स्पष्ट दिसून येईल.

प्रार्थना समाजाशीं माझा संबंध तुटल्यानंतर कलकत्त्याच्या साधारण ब्राह्म-समाजांशीं माझे पूर्वीपासून चालत आलेले संबंध तुटावेत अशी प्रार्थना समाजांतील कांहीं मंडळींची इच्छा होती; आणि त्यांनीं तसे प्रयत्नही करून पाहिले. परंतु त्यांत त्यांना मुळींच यश आलं नाहीं. साधारण ब्राह्मसमाजाचे आणि आणि माझे संबंध त्यानंतर तीन वर्षांनीं म्हणजे १९३४ सालीं तुटले. आणि ते तुटण्याचं खरं कारण साधारण ब्राह्मसमाजानं नेमून दिलेलं जें कार्य होतं तें राजकारणांत मी गुंतल्यामुळें माझ्या हातून बरोबर पार पडलं नाहीं. त्याबाबतींत खरोखर माझा दोष होता आणि तो मी प्रांजलपणें या ठिकाणीं कबूल करतो.

या सर्व भानगडी चालल्या असतांना भाऊसाहेब वैद्य आजारी होते. परंतु त्यांना माझ्याबाबतींत समाजाकडून झालेला अन्याय मुळींच सहन झाला नाहीं असं मी ऐकलं होत. कारण या प्रसंगानंतर बरींच वर्षं मी त्यांना भेटलों नव्हतों. आणि अगदी अलीकडे अलीकडे म्हणजे ५।६ वर्षांपूर्वी माझी त्यांची बरेच वेळां भेट होत असे. एकदां मी आजारी असतांना ते माझ्या भेटीस आले होते. परंतु या विषया-संबंधानं आम्ही कधींच एकमेकांशीं बोललों नाहीं. त्यांच्या शेवटच्या आजारांत मी एकदां त्यांना भेटायला गेलो होतों. त्यानंतर माझी त्यांची गांठ पडली नाहीं. कारण थोड्याच दिवसांत ते इहलोक सोडून गेले. मला राहून राहून वाईट वाटतं तें हेंच, कीं त्यांच्या मृत्यूची बातमी मला कळविण्याचं माझ्या एकाही मित्राला सुचलं नाहीं. ते गेल्यानंतर त्याच्याविषयीं मला जो आदर वाटत होता तो व्यक्त करणारा असा लेख किंवा त्यांचा टोलेजंग मृत्युलेख मी माझ्या ‘ चित्रा ’ साप्ताहिकांत लिहूं शकलों असतो. परंतु त्यांच्या बाबतींत हा औपचारिकपणा करणं मला जमलं नसतं.

प्रार्थनासमाजाच्या पुढाऱ्यांच्या कृत्याचा निषेध करणारे आणखी एक गृहस्थ होते. या गृहस्थाचं नांव रेव्हरंड व्हेरिअर एलवीन्. एलवीन्ची आणि माझी ओळख फार पूर्वी विन्स्लोसाहेबांच्या खिस्तसेवा संघामध्ये झाली. त्यावेळीं ते ऑक्सफर्डला आपला शिक्षणक्रम पुरा करून आले होते. त्यांचा माझा बराच स्नेहसंबंध जडला होता आणि ज्या ज्या वेळीं आम्ही भेटत असूं त्या त्या वेळीं आम्ही बरेच तास गप्पा मारण्यांत घालवीत असूं. पुढें त्यांनीं खिस्तसेवा संघ सोडला आणि नागपूरकडील गोंड नांवाच्या रानटी लोकांमध्यें राहून त्यांना प्रत्येक बाबतींत सुधारण्याचा निर्धार केला. आजही ते याच लोकांमध्यें काम करीत आहेत. त्यांच्यासंबंधानं त्यांनीं लिहिलेलीं पुस्तकं आज जगप्रसिद्ध आहेत. एलवीन्नीं प्रार्थनासमाजाच्या सेक्रेटरीला जें पत्र पाठवलं, तें मला जरी वाचायला मिळालं नाहीं, तरी त्यांत लिहिलेला मजकूर माझ्या कानी आला होता. परंतु तो माझ्याविषयींचा असल्यामुळें या ठिकाणीं देण्याचं कारण नाहीं. पण मला आश्चर्य वाटलं तें हेंच कीं, आमच्या राज्यकर्त्यांच्या वंशांत जन्मास

आलेल्या [एका इंग्रज गृहस्थानं माझ्या जहाल राजकारणाची पर्वा न करतां माझ्या-विषयीं अनाहूत सहानुभूति दाखवावी आणि मी ज्यांच्याबरोबर वर्षानुवर्षे काम केलं त्यांना इतर सर्व गोष्टींचा विसर पडून केवळ माझ्या जहाल राजकारणामुळें माझ्याशी असलेले संबंध तोडण्याची इच्छा व्हावी ! ]

प्रार्थनासमाजाचा आणि माझा संबंध सुटल्यानंतर मी राजकारणाला पूर्ण-पणें वाहून घेण्याचं ठरवलं. प्रार्थनासमाजाकडून येणारं मासिक उत्पन्न थांबल्यानंतर आमचं कसं चालायचं हा प्रश्न होताच. कारण त्यावेळीं फक्त लीलाचाच प्रश्न नव्हता. माझा वडील मुलगा अजीतकुमार हा त्यावेळीं जवळ जवळ दोन वर्षांचा होता आणि त्याचा धाकटा भाऊ मिनू हा फक्त सहा महिन्यांचा होता. माझ्या मिनूचं सबंध नांव मानवेंद्रनाथ असं आहे. म्हणजे कॉ. रॉयचंच नांव आम्हीं त्याला दिलं होतं. प्रार्थना-समाजाशीं खटका होण्यापूर्वीं मी लीलाला म्हटलं होतं कीं, ' हा खटका म्हणजे माझ्या केवळ तत्त्वाचाच प्रश्न नाहीं, तर तुझ्या आणि मुलांच्या जीवन-निर्वाहाचा प्रश्न आहे.' यावर लीला एकदम उसळून म्हणाली, ' तुम्ही आपल्या तत्त्वांना जागा. आमची काळजी करूं नका. कांहीं झालं तरी प्रार्थनासमाजांतील दांभिक मंडळींशीं तुम्ही मुळींच संबंध ठेवूं नका. माझ्या वडिलांनासुद्धां यांनीं असाच त्रास दिला होता.' मि. चेट्टी आमचा संवाद ऐकत होते. ते म्हणाले कीं ' तुम्ही काळजी कशाला करतां ? तुम्हांला जें काय करायचं असेल ते तुम्हीं करा. आजपासून आपणां दोघांचे संसार एक झाले आहेत. त्या संसाराच्या खर्चाची जबाबदारी मी माझ्या शिरावर घ्यायला तयार आहे.' चेट्टींच्या औदार्याचं मला कौतुक वाटलं. परंतु त्यांची ती कल्पना मला मुळींच पटली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं लीला आणि मी याच गोष्टीविषयीं बोलत होतो. लीला त्यावेळीं कॉलेजांत जात नव्हती. कारण मिनू जानेवारीच्या ३१ तारखेला झाल्यामुळें तिला त्या वर्षी परीक्षेला बसतां आलं नाहीं. ती मला म्हणाली, ' हें वर्ष माझं फुकटच गेलं. तेव्हां मी कांहीं शिकवण्या मिळाल्या तर पाहातें. नाहींतर एकाद्या शाळेंत नोकरी धरतें.' माझा समज आहे कीं तिनं एक दोन शिकवण्या केल्या. परंतु शेवटीं तिला एका मारवाडी मुलींच्या शाळेंत प्रिन्सिपॉलची जागा मिळाली. मला ब्राह्मसमाजाकडून पैसे येत होते हें खरं आहे. तरीसुद्धां त्या पैशांत सर्व संसार चालणं शक्य झालं नसतं. परंतु यानंतर आमचा संसार पुन्हां सुरळीत चालू लागला. त्या वेळेस कॉ. रॉय कानपूरच्या तुरुंगांत होते. कारण कानपूर कटाचे नेते म्हणून त्यांच्यावर कानपूरला खटला चालला होता. लीलानं नोकरी धरली ही गोष्ट त्यांना कुणी कळवली कोण जाणे. पण त्यांनीं लगेच पत्र पाठवलं. त्या पत्रांत ते म्हणतात, ' तुझी मनगट मोडलेली लीला तुझ्या साहाय्याला धांवून आली याचं मला कौतुक वाटतं. आतां तूं कांहीं दिवस विश्रांति घे. म्हणजे

आपली पाईप ओढत तूं घरामध्यें स्वस्थ बसून राहा.' रॉयच्या पत्रांत लीलाचं मनगट मोडण्याचा जो उल्लेख आहे त्याचं स्पष्टीकरण केलं पाहिजे. आम्ही १९३१ च्या मेच्या पहिल्या तारखेला चौपाटी रोडवरील घर सोडून लॅबर्नम रोडवरील घरांत राहायला आलों. त्यावेळीं सामानाची ने-आण करण्याच्या गडबडींत लीला पाय घसरून पडली आणि तिच्या मनगटाचं हाड मोडलं. नंतर वैद्यकीय उपचार शक्य तेवढे केले तरी सुद्धां रॉयना पकडलं त्यावेळीं तिचं मनगट साफ बरं झालं नव्हतं. तिचा हातच दुखावल्यामुळें मिनूची सर्व जबाबदारी माझ्यावर पडली होती. कॉ. रॉयनीं लिहिलेलं पत्र तिनं वाचलं. तें वाचल्याबरोबर तिला इतका आनंद आणि अभिमान वाटला कीं, त्याचं वर्णन मला या ठिकाणीं करतां येणार नाहीं. या ठिकाणीं माझे मित्र श्री. बी. व्ही. घडफळे यांचा उल्लेख करणं आवश्यक आहे. प्रार्थनासमाजानं माझ्याशीं असलेला संबंध तोडल्यानंतर एक दोन दिवसांतच ते माझ्याकडे आले. ते मला म्हणाले, 'प्रार्थनासमाजांतील लोकांना अक्कल नाहीं. तुमची त्यांना किंमत वाटत नाहीं. परंतु कांहीं हरकत नाहीं. तुम्हांला प्रसंगीं पैशाची मदत लागली तर तुम्ही माझ्याकडे मागा. तुम्हांला कोणत्याही प्रकारची मदत करण्यांत मला धन्यता वाटेल.' इतकं बोलून त्यांनीं माझ्याकडे जवळ असलेल्या सर्व नोटा दिल्या आणि ते म्हणाले, कीं 'तुम्हांला तुमच्या मित्राचा अपमान करायचा असेल तरच तुम्ही या नोटा परत कराल.' मी त्यांच्या तोंडाकडे पाहिलं. माझ्या चेहेऱ्यावर मुळींच हास्य नव्हतं. परंतु [जगामध्यें मित्र म्हणून कांहीं चीज आहे याची त्यांनीं मला जाणीव करून दिली.]

या आमच्या घरच्या भानगडी चालल्या असतांना आम्ही राजकीय कार्य काय करीत होतों तें लिहिणं जरूर आहे. रॉयना पकडण्यापूर्वींच आमच्या गटामध्यें अनेक प्रकारचे मतभेद निर्माण झाले होते. या मतभेदांना कंटाळून मि. चेट्टी आणि मी रॉय गट सोडण्याचा निश्चय केला होता. परंतु रॉयना पकडल्यानंतर आमचा गट सोडून देणं आम्हांला अशक्य झालं आणि आम्ही सर्व जण पुन्हां एकत्र झालों. पहिली गोष्ट मीं केली ती हीच कीं, रॉयच्या इच्छेनुसार 'इंडिपेंडंट इंडिया' नांवाचं साप्ताहिक सुरू केलं. या बाबतींत मला माझ्या कांहीं सहकाऱ्यांकडून बराच अडथळा झाला. त्यांचं म्हणणं असं होतं कीं कॉ. रॉय तुरुंगांत गेल्यामुळें असल्या साप्ताहिकाचा संपादक होण्याची जबाबदारी कुणालाही घेतां येणं शक्य नाहीं. मी त्यांना म्हटलं कीं, 'कॉ. रॉय जरी तुरुंगांत गेले तरी त्यांनीं [आपल्याला जें राजकीय शिक्षण दिलं आहे, तें कांहीं त्यांच्याबरोबर तुरुंगांत गेलं नाहीं. तें आमच्याबरोबरच आहे,] आणि शिक्षणाच्या जोरावर आपण हें साप्ताहिक काढूं शकूं.' माझं म्हणणं त्यांना पटलं नाहीं. तरी सुद्धां मी तें साप्ताहिक काढलंच. हें साप्ताहिक काढण्याचा माझा संकल्प बदलणं शक्य नाहीं असं जेव्हां माझ्या सहकाऱ्यांना कळून चुकलं, तेव्हां ते म्हणाले कीं, 'या साप्ताहिकाच्या

संपादकाला, तुरुंगांत केव्हां जावं लागेल याचा नेम नाहीं. म्हणून तुम्हीं या साप्ताहिकाचे संपादक होऊं नका. आपण एखाद्या नामधारी संपादकाची नेमणूक करूं.' मला हें त्यांचं म्हणणं आवडलं नाहीं. परंतु साप्ताहिक काढण्याची इच्छा होती. म्हणूनच मी ही तडजोड स्वीकारली.

यानंतर रॉय गटाची जेव्हां सभा भरली, तेव्हां आमच्या गटाचा सर्वांत तरुण आणि अनभिज्ञ चार्ल्स मॅस्कॅरिनस याची आमच्या साप्ताहिकाचा संपादक म्हणून आम्हीं नेमणूक केली. चार्ल्सला आमच्या दुटप्पीपणाची मुळींच जाणीव नव्हती. त्यानं संपादक होण्याचं तात्काल कबूल केलं. सर्व तयारी झाल्यानंतर एक दिवस चार्ल्स घाईघाईनं माझ्याकडे आला आणि मला म्हणाला, 'डॉक्टर, तुम्ही या साप्ताहिकाचा संपादक मला केला आहे हें खरं. पण हें कसं चालवायचं त्याची मला मुळींच जाणीव नाहीं. विशेषतः या साप्ताहिकांत अग्रलेख कसा लिहावयाचा तें मला मुळींच कळणार नाहीं. तेव्हां पहिल्या अंकांतला अग्रलेख तुम्ही लिहावा अशी माझी इच्छा आहे.' हे त्याचे उद्गार ऐकल्यानंतर मी त्याच्यावर भडकलो. मी त्याला म्हणालों, 'चार्ल्स, तुला कॉमनसेन्स नाहींच असं म्हटलं पाहिजे. तुला तुझ्या सर्व कॉमरेड्सनीं या साप्ताहिकाचा नामधारी संपादक बनवून तुरुंगांत पाठवायचा कट केला आहे. परंतु मला हे पसंत नाहीं. मी तुला नामधारी संपादक बनवूं देणार नाहीं. तुला या साप्ताहिकाचा खराखुरा संपादक झालं पाहिजे. म्हणून आपल्या साप्ताहिकाच्या पहिल्या अंकाचा अग्रलेख तूंच लिहिला पाहिजेस. तूं आतां घरीं जा आणि लिही. तुझ्या लेखांत कांहीं चूक आढळली तर तेवढीच मी सुधारीन.' बिचारा चार्ल्स! माझ्या चेहेऱ्याकडे पाहून तो गर्भगळित झाला. पण माझ्या बोलण्यांतील खोंच त्याच्या लक्षांत आली. इतकंच नव्हे, तर त्याला माझं बोलणं पूर्णपणें पटलं. म्हणून तो कांहीं न बोलतां हॅट उचलून निघून गेला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां ही स्वारी पुन्हा हजर! त्यानं लिहिलेला अग्रलेख माझ्यापुढे केला आणि तो म्हणाला, 'हा लेख मी पहांटे चार वाजेपर्यंत लिहीत होतों. पण तुम्हांला तो आवडेल कीं नाहीं कोण जाणें?' मला त्याच्या चेहेऱ्याकडे पाहिल्यावर त्याला कडकडून मिठी मारावी असं वाटलं. परंतु मीं तसं बाहेर दर्शविलं नाहीं. अग्रलेख हातांत घेतला. त्यानं रॉय गटाचीं Principles and Policy यावर तो लिहिला होता. या लेखांत एक दोन मामुली स्वरूपाच्या चुका, झाल्या होत्या. परंतु मीं त्या सुधारल्या नाहींत. कारण मला त्याला खरोखरीच संपादक बनवायचं होतं. आपला पहिला अग्रलेख छापून आल्यानंतर चार्ल्सला इतका आनंद झाला कीं त्याचं वर्णन करणं माझ्या शक्तीबाहेरचं काम आहे. त्यानंतर या साप्ताहिकाचा अग्रलेख लिहिण्याची माझ्यावर केव्हांच पाळी आली नाहीं. माझे जे लेख येत असत ते सर्व मी माझ्या नांवानं प्रसिद्ध करीत असें. या साप्ताहिकामध्यें चार्ल्स, मि. चेट्टी,

मि. रंगाचारी नांवाचा चार्ल्ससारखाच कॉम्रेड होता तो, आणि मी एवढे जण लेख लिहीत होतों. इतर कॉम्रेड्सनीं आम्हांला कांहींच मदत केली नाहीं असं म्हटलं तरी चालेल. या साप्ताहिकाचा पहिला अंक जेव्हां बाहेर पडला तेव्हां लीला, चेट्टींची पत्नी मनोरमा, त्यांची धाकटी बहीण शालिनी, चेट्टी आणि मी, या सर्वांनीं बोरीबंदरपासून सर्व ठिकाणीं फिरून ते अंक विकले.

त्यावेळीं मणीबेन कारा आमच्या शेजारीं असलेल्या तेजपाळ रोडवर राहात असत. त्यांचा आमच्या गटाशीं अधिकृत रीत्या कोणताही संबंध नव्हता तरी त्या आम्हांला सर्व प्रकारें बरीच मदत करीत असत. ' इंडिपेंडंट इंडिया 'च्या बाबतींतही त्यांनीं शक्य तितकी आम्हांला मदत केली. परंतु गंमत ही कीं या साप्ताहिकावरूनच आमच्या गटामध्यें लहानसहान भांडणं होण्यास सुरुवात झाली. त्याचं कारण या साप्ताहिकाची बहुतेक सर्व जबाबदारी चेट्टी नि मींच सांभाळली होती. इतकंच नव्हे तर आमच्या घरांतील सर्व मंडळी या साप्ताहिकाचे अंक विकण्यास बाहेर पडत. नेमका याच गोष्टीचा कॉ. शेख प्रभृति लोकांना राग येत असे. रॉय गटाच्या एका सभेमध्यें हें साप्ताहिक म्हणजे डॉक्टरांचं एक फॅमिली अफेअर झालं आहे असे उद्गार कॉ. शेखनं काढले. मला कॉ. शेखचा खूपच राग आला. परंतु मी कांहीं बोललों नाहीं. पण चेट्टी मात्र खूप भडकले. त्यांनीं स्पष्ट सांगितलं कीं, ' आमच्या गटांतील प्रत्येक सभासदाचा जर असा समज झाला असेल तर या साप्ताहिकासंबंधानं दुसरी कांहीं व्यवस्था केलेली बरी. आम्ही दोघे त्यांच्याशीं मुळींच संबंध ठेवूं इच्छित नाहीं. ' कॉ. शेखला हेंच हव होतं. त्यानं या साप्ताहिकाची व्यवस्था पाहाण्यासाठीं एक पोट समिति सुचवली. या पोट समितीवर आम्हां दोघांचींही नांव होतीं. परंतु आम्ही त्या समितीबरोबर काम करण्याचं नाकारलं. मी कॉ. शेखला बजावलं कीं ' तुम्ही या साप्ताहिकाची सर्व व्यवस्था पाहा. आमची त्याला मुळींच हरकत नाहीं. पण मी तुम्हांला एक इषारा देऊन ठेवतों, कीं हे साप्ताहिक चालविण्याची धमक तुमच्यांत नाहीं. पाहिजे असेल तर तुम्ही प्रयत्न करून पाहा. ' त्यानंतर मी आणि चेट्टींनीं या साप्ताहिकाच्या व्यवस्थेमधून अंग काढून घेतलं. आणि बरोबर एक महिन्यानं हें साप्ताहिक बंद पडलं. त्याचं खरं कारण असं होतं कीं आम्हांला या साप्ताहिकासंबंधानं जाहिरातीच्या स्वरूपांत जी आर्थिक मदत मिळत होती, ती त्या जाहिराती थांबल्यानंतर मिळेनाशी झाली. कारण नवीन जाहिराती मिळविण्यासाठीं कुणींच प्रयत्न केला नाहीं.

' इंडिपेंडंट इंडिया ' मध्यें लिहिलेले माझे लेख ' ॲडव्होकेट ऑफ इंडिया ' प्रेस आणि ' हिंदुस्थान प्रजामित्र ' दैनिक याचे मालक शेट रणछोड भवान लोटवाला यांनीं वाचले व त्यांनीं माझ्याविषयीं बरीच चौकशी केली. या शेटजींची मुंबईंतील श्रीमंत माणसांमध्यें गणना करतां येईल. परंतु त्यांना राजकीय दृष्टिकोन मात्र भांडवल-

दाराचा नव्हता. ते स्वतःला समाजवादी म्हणवीत. हिंदी राष्ट्रवाद हा खराखुरा साम्राज्यविरोधी झाला पाहिजे असं त्याचं म्हणणं असे. गांधीवाद हा साम्राज्यवादाला मारक नसून त्याला पोषक आहे, असं त्यांचं ठाम मत असल्यामुळें ते गांधीविरोधी होते. त्यांच्या गांधीविरोधामुळें त्यांच्या छापखान्याला आणि वर्तमानपत्राला बरंच नुकसान सोसावं लागलं. तरीही ते डगमगून गेले नाहींत. गांधीविरोधी समाजवादाचा प्रचार करण्यासाठीं त्यांनी आपल्या पदरचे लाखो रुपये खर्च केले. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही, की मास्कोछाप समाजवादाला त्यांचा तीव्र विरोध होता. त्यावेळीं मला लिऑ ट्रॉटस्कीविषयी आपलेपणा वाटत असल्यामुळें मला लोटवालां-विषयी बरीच सहानुभूति वाटूं लागली. माझी त्यांची भेट लवकरच झाली. त्यावेळेस माझ्याप्रमाणें ते स्टालीनविरोधी आहेत हें मला कळलं आणि मला खूप आनंद झाला. आणि म्हणूनच यानंतर माझ्या आणि त्यांच्या वारंवार भेटी होऊं लागल्या. एका भेटीमध्यें त्यांनीं डांगे, निमकर प्रभृति लोकांना आपण समाजवादाची तत्त्व कशी शिकविलीं आणि कशा प्रकारची आर्थिक मदत केली तेंही सांगितलं. त्याचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला आणि मला शेटजीविषयीं अधिकच आपलेपणा वाटूं लागला. परंतु त्यांच्याकडून कोणत्याही तऱ्हेची आर्थिक मदत आपण घ्यावी हा विचार माझ्या मनांतसुद्धां आला नाही.

याच सुमारास एक दिवशी कॉ. सी. जी. शहा माझ्याकडे आले आणि म्हणाले, की ‘आज रात्रीं आर. एल्. ट्रस्ट हॉस्टेलमध्यें (म्हणजे रॉयल ऑपेरा हाऊस समोर असलेल्या रणछोड भुवनमध्यें) एक सभा भरणार आहे. त्या सभेमध्यें नागपूर येथून आलेले एक मित्र Historical Materialism म्हणजे ‘ऐतिहासिक भौतिकवाद’ यावर व्याख्यान देणार आहेत. तुम्ही या व्याख्यानाला हजर राहावं अशी लोटवाला शेटजीची फार इच्छा आहे.’ मी त्यांना येईन म्हणून सांगितलं आणि ते निघून गेले. त्यानंतर मी चेट्टींना सांगितलं, ‘आपल्याला आज रात्रीं एका सभेला जायचं आहे. नागपूरहून आलेला एक शहाणा माणूस ऐतिहासिक भौतिकवादावर बोलणार आहे.’ ‘हा गृहस्थ कोण?’ म्हणून मला त्यांनीं विचारलं. मी म्हटलं, ‘मला कांहीं कल्पना नाहीं. पण बघूं या तर खरं तो काय बडबड करतो ती!’ ठरलेल्या वेळीं आम्ही सभेच्या जागीं हजर झालों. व्याख्यात्याच्या जागीं ठेंगूसा, वर्णानं गोरा, बारीक अंगलटीचा आणि बारीक डोळ्यांचा असा एक गृहस्थ बसला होता. त्यानं काय व्याख्यान दिलं तें मला आतां आठवत नाहीं. त्याचं व्याख्यान चालू असतांनाच निघून जाण्यासाठी चेट्टींना खूण करावी असं एकदां माझ्या मनांत आलं. पण असं करण्यानं व्याख्यात्याचा उपमर्द होईल हा विचार माझ्या मनांत आला आणि म्हणून मी शेवटपर्यंत बसून राहिलो. व्याख्यान संपल्यावर मि. शहानी व्याख्यात्यांची आणि

माझी ओळख करून दिली व म्हणाले, ' हे पी. वाय्. देशपांडे. मार्क्सवादाचा त्यांनीं अभ्यास सुरू केला आहे आणि लवकरच ते कट्टर मार्क्सवादी बनतील अशी मला आशा आहे. ' मी देशपाड्यांशीं हस्तांदोलन केलं. पण त्यांच्या व्याख्यानाविषयीं कांहीच बोललो नाहीं. हेच देशपांडे माझे जीवश्च कंठश्च स्नेही होतील याची मला त्यावेळीं मुळीच कल्पना नव्हती.

# १७



ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेसचं १९३२ चं अधिवेशन मद्रासला भरणार होतं. त्या अधिवेशनामध्यें रॉयवाद्यांनीं कुठलं धोरण स्वीकारायचं तें ठरविण्यासाठीं मणीबेन कारा यांच्या घरीं रॉय गटाची सभा भरायची होती. यावेळीं आम्ही मणीबेन कारा यांना रॉय गटाच्या सभासद करून घेतल्या होत्या, हें या ठिकाणीं सांगितलं पाहिजे. रॉय गटाची सभा भरण्यापूर्वी एक दिवस अगोदर मणीबेनना भेटण्यासाठीं मी त्यांच्या घरीं गेलों. त्यावेळीं मणीबेन मला म्हणाल्या कीं, ' मद्रासच्या अधिवेशनांत ऑल इंडिया ट्रेड युनियन कॅांग्रेसचे अध्यक्ष म्हणून मी तुमचं नांव सुचविणार आहे. ' मीं मणीबेनना म्हटलं कीं, ' तुम्ही माझं नांव सुचविणार आहांत खरं. परंतु माझी त्याला मुळींच संमती नाहीं. माझी स्वतःची इच्छा आहे कीं, कॉ. ब्रजेससिंग यानं अध्यक्ष व्हावं आणि त्याला आपलं भाषण लिहून काढायला वेळ नसेल तर मी त्याचं भाषण लिहून काढतों. ' यावर मणीबेन एकदम उसळून म्हणाल्या, ' तें कांहीं चालायचं नाहीं. तुम्हांला या वर्षी टी. यु. सी. चा अध्यक्ष झालंच पाहिजे. ' मीं म्हटलं, ' हा तुमचा जुलूम आहे. मी मुळींच होणार नाहीं. ट्रेड युनियन कॅांग्रेसमध्यें कोणताच अधिकार स्वीकारायची माझी इच्छा नाहीं. ' मणीबेन थोड्या विचारांत पडल्या. कांहीं वेळानं त्या मला म्हणाल्या, की ' समजा, आपल्या उद्यांच्या सभेंत सर्व सभासदांनीं अध्यक्ष म्हणून तुमची निवड केली तर तुम्ही काय करणार ? ' मी त्यांना म्हटलं, ' माझी इच्छा नसतांना सर्व कॉम्रेडस्नीं माझी निवड केली तर माझा नाइलाज आहे. ' दुसऱ्या दिवशीं रॉय गटाची जेव्हां सभा झाली तेव्हां मला कांहीं जरुरीच्या कामाला जावं लागल्यामुळें मी त्या सभेला हजर राहूं शकलों नाहीं. माझं काम संपल्यानंतर मी जेव्हां परत आलों, त्यावेळीं सभेचं काम संपून सर्वजण आपापल्या घरीं गेले होते. मणीबेन मात्र तिथं होत्या. मी त्यांना विचारलं, ' सभेमध्यें काय ठरलं ? ' त्या म्हणाल्या, ' तुम्हाला अध्यक्ष करण्याचा निर्णय सभेनं एकमतानं घेतला. ' आणि इतकं बोलून त्या हो हो करून हसूं लागल्या. मी कांहीं न बोलतां निघालों नि तडक घरीं आलों.

घरीं गेल्यानंतर मि. चेट्टी यांनीं मला तीच हकीगत सांगितली. मी बराच अस्वस्थ झालों. परंतु कांहीं बोललों नाहीं.

त्यावेळीं ट्रेड युनियन कॅांग्रेसमध्यें मुंबईची गिरणी कामगार युनियन हा अत्यंत प्रभावी संघ होता. त्या युनियननं रॉय गटाचा निर्णय मान्य केला कीं सर्व कांहीं मद्रासच्या अधिवेशनांत सुरळीत चालणार होतं. म्हणून त्या संघाच्या अधिकाऱ्यांचं मन वळविण्यासाठीं कॉ. वसंत कर्णिक, ए. एन्. शेट्टी — ज्याला आम्ही पठाण शेट्टी म्हणत असूं. आणि मी संघाच्या कचेरींत दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं गेलों. त्यावेळीं गिरणी कामगार युनियनचे अध्यक्ष श्री. कांदळकर हे तुरुंगांत होते. परंतु युनियनचे जनरल सेक्रेटरी म्हापणकर आम्हांला कचेरींत मिळाले. त्यावेळीं म्हापणकर म्हणतील ती पूर्वदिशा अशी परिस्थिति होती. कॉ. कर्णिक म्हापणकरांजवळ बसले होते. आणि माझ्या शेजारीं पठाण शेट्टी बसले होते. म्हापणकरांशीं बोलायला कॉ. कर्णिकांनीं सुरुवात केली. 'म्हापणकर, मद्रासच्या अधिवेशनांत आम्ही बंगालमध्यें ट्रेड युनियनमध्यें काम करणारे श्री. मित्र यांचे नांव सुचविणार आहोंत.' कॉ. कर्णिकचे हे उद्गार ऐकल्याबरोबर पठाण शेट्टी माझ्या कानाशीं लागून म्हणाले, 'हा निर्णय कांहीं आपल्या सभेंत घेतला नव्हता. तुम्हांला अध्यक्ष करण्याचं आपल्या सभेंत एकमतानं ठरलं होतं.' मी पठाणला म्हटलं, 'त्या सभेला मी हजर नव्हतों. तुम्ही त्या सभेंत काय निर्णय घेतला तें मला माहीत नाही. परंतु तो निर्णय माझ्या स्वतःच्या इच्छेविरुद्ध होता हे तुम्हां सर्वांना माहीत आहे म्हणूनच मी म्हणतों कीं, याविषयीं कांहीं अधिक बोलायचं नाहीं. निदान माझ्यासाठीं तरी गप्प राहा.' म्हापणकरांनीं अर्थात् रॉयवाद्यांनीं घेतलेल्या निर्णयाप्रमाणें वागण्याचं कबूल केलं.

त्यानंतर एकदोन दिवसांतच पुन्हां आमची सभा भरली. गिरणी कामगार युनियनचे कचेरींत घडलेली सर्व हकीगत मी चेट्टींना सांगितली होती. ती ऐकून ते रागानं तांबडेलाल झाले. मी त्यांना शांत करण्याचा प्रयत्न केला. परंतु ते मुळींच ऐकेनात. चेट्टी हा अत्यंत सरळ स्वभावाचा माणूस होता. त्यांना आंत बाहेर असं कांहींच माहीत नाहीं. म्हणूनच रॉय गटानं घेतलेल्या निर्णयाविरुद्ध कॉ. कार्णिकनीं वर्तन केलं, याचा त्याना अतिशय राग आला. रॉय गटाची सभा मणीबेन कारा यांच्याच घरीं भरली होती. सभा भरल्याबरोबर चेट्टींनीं कार्णिकना प्रश्न केला, 'तुम्ही, आम्ही घेतलेल्या निर्णयाविरुद्ध कां वर्तन केलंत?' कार्णिकनीं शांतपणानं सांगितलं कीं 'मागच्या सभेमध्यें आपण जो निर्णय घेतला होता, त्या निर्णयाचं मला स्मरणच राहिलं नाहीं!' कार्णिकचं हें भाषण ऐकल्यानंतर मलासुद्धां चीड आली. मी त्यांना म्हटलं, 'मद्रासच्या अधिवेशनांत ट्रेड युनियन कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून माझं नांव सुचविण्यांत येणार आहे असं मला कळल्याबरोबर मी त्याबद्दल नापसंती दाखविली,

हें मणीबेन कारा आणि चेट्टींना चांगलं माहीत असतांनासुद्धां मागच्या सभेंत अध्यक्ष-पदासाठीं माझं नांव एकमतानं सुचविण्यांत आलं. ही गोष्ट इतकी कांहीं क्षुल्लक नव्हती कीं तिचं कॉ. कर्णिकना स्मरण राहूं नये. यावरून मला एक गोष्ट स्पष्ट दिसते, ती ही कीं कर्णिकांचा माझ्याविरुद्ध हा कांहीं तरी डाव आहे.' इतकं बोलल्यानंतर मी गप्प राहिलो. कर्णिकसारख्या माणसानं असा भलता डाव खेळायला सुरुवात केल्यावर मी स्वस्थ बसणं शक्यच नव्हतं. त्या सभेमध्यें चेट्टी तर रागानं सारखे धुमसत होते. त्यांच्याकडे पाहिल्यावर माझ्या मनांत एक कल्पना आली. ती कल्पना कां आली तें मला आज सांगतां येत नाहीं. परंतु ती आली खरी! मी म्हटलं, 'हें पाहा,' मला ट्रेड युनियन कॉंग्रेसचा अध्यक्ष व्हायची इच्छा नव्हती. आणि कॉ. कर्णिकनीं अध्यक्षपदासाठीं आपल्या बंगाली मित्राचं नांव सुचवलं आहे. तेव्हां कॉ. कर्णिकना खोटं पाडायची माझी मुळींच इच्छा नाहीं. परंतु या कॉंग्रेसचा जनरल सेक्रेटरी म्हणून माझं नांव सुचवलं तर माझी मुळींच हरकत नाहीं.' हे माझे उद्गार ऐकल्याबरोबर कॉ. कर्णिकचा चेहेरा गोरामोरा झाला. कॉ. कर्णिकच्याऐवजीं दुसरा एकादा समंजस गृहस्थ असता तर तो गप्प बसला असता. परंतु कॉ. कर्णिक कांहीं गप्प बसले नाहींत. ते एकदम उसळून म्हणाले, 'नाहीं नाहीं. तें नाहीं चालायचं I have been longing for the General Secretaryship for a long time. डॉक्टरांचा गिरणी कामगार संघाशीं मुळींच संबंध नाहीं. माझा त्याच्याशीं बराच संबंध आहे. म्हणून त्यांना कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी नेमा अशी जर सूचना आपण केली तर ती गिरणी कामगार संघाला मान्य होणार नाहीं.' कॉ. कर्णिकचे हे उद्गार ऐकल्याबरोबर मला त्यांचा राग आला. असल्या माणसाशीं आपण इतके दिवस सहकार्य केलं याची मला लाज वाटली. तरी सुद्धां मी मुळींच रागावलों नाहीं. मी अत्यंत शांतपणानं कॉ. कर्णिकना सांगितलं कीं, 'आजपासून माझा आणि रॉय गटाचा संबंध तुटला. गिरणी कामगार संघासंबंधानं जे उद्गार काढलेत ते एक प्रकारें व्यक्तिशः तुम्ही आव्हान केलं आहे असं मी समजतों. and I accept your challenge' इतकं बोलून मी निघालों. मी उठल्याबरोबर माझ्याबरोबर चेट्टी आणि दुसरे पांच रॉयवादी निघाले. त्यावेळीं रॉयगटाचे तेरा सभासद होते. त्या तेरापैकीं सात सभासद माझ्याबरोबर निघाले. दुसऱ्या दिवशीं मी या सात जणांची सभा बोलावली. आणि मी त्यांना सांगितलं कीं, 'मला दुसरा नवीन पक्ष निर्माण करायची इच्छा नाहीं. मला तशी महत्त्वाकांक्षा नाहीं. परंतु कॉ. कर्णिकनीं आतांपर्यंत जें वर्तन केलं त्यामुळें मला इतकी चीड आली आहे कीं त्यांचे डोळे पांढरे केल्याशिवाय मी राहाणार नाहीं. माझं स्पष्ट मत आहे, कॉ. कर्णिकसारखीं माणसं कॉ. रॉयनं आपल्याजवळ केलीं हें कॉ. रायचं दुर्भाग्य, माझा स्वतःचा त्यामुळें मुळींच तोटा होणार नाहीं.'

रॉय गटाची ही सभा मणीबेनच्या घरीं रात्रीं भरली होती. त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर मी गिरणी कामगार संघामध्यें म्हापणकरांची भेट घेतली आणि त्यांना झालेली सर्व हकिकत सांगितली. इतकंच नव्हे तर कामगार आणि बुद्धिजीवि लोक यांचा खरा संबंध कसा असावा याचं विवेचन केलं. म्हापणकरांना मी सांगितलं कीं, 'मला अधिकारलालसा नाहीं. अधिकारस्वीकार करण्याची माझी इच्छा नाहीं. परंतु स्वतःला बुद्धिजीवि समजणारे दीडदमडीचे लोक तुमच्याकडे येऊन तुमच्यावर सत्ता गाजविण्याचा प्रयत्न करतात हें मला पटत नाहीं!' मी पुढें म्हणालों, 'हें पाहा म्हापणकर, मी आज रॉय गटाचा संबंध सोडलेला आहे. आणि या गटामध्यें एक तरी कामगार आहे कीं काय तें पाहा! आम्ही लॅबर्नम रोड किंवा तेजपाल रोड इथं असलेल्या मोठमोठ्या घरांमध्यें वाटेल ते निर्णय घेतों. परंतु ते निर्णय घेण्यात कामगारांचा मुळींच हात नसतो. ही गोष्ट चालणार नाहीं. ट्रेड युनियन काँग्रेससंबंधानं जे काहीं निर्णय घ्यायचे ते तुमच्यासारखे कामगारांचे पुढारी आणि माझ्यासारखे बुद्धिजीवि लोक यांनीं एकत्र बसून घेतले पाहिजेत.' हें माझं म्हणणं म्हापणकरांना ताबडतोब पटलं. ते म्हणाले, 'मद्रासच्या अधिवेशनांत काय धोरण ठरवायचं तें आपण ठरवूं. या रॉयिस्टांना मी माझ्या कचेरीत पाऊल टाकूं देणार नाही.' त्यावर मी त्यांना म्हटलं, 'मद्रासच्या अधिवेशनांत आपण एक कामगार अध्यक्ष म्हणून निवडूं या. या जागेसाठीं आपण श्री. कांदळकर यांचं नांव सुचवूं. आणि काँग्रेसचे जनरल सेक्रेटरी म्हणून तुमचं नांव सुचवूं.' म्हापणकर बिचारा निस्वार्थी मनुष्य! ते मला म्हणाले, 'हें पाहा, कांदळकर जर अध्यक्ष व्हावयाचे असतील तर तुम्ही जनरल सेक्रेटरी व्हावं हें बरं.' मी म्हापणकरांना म्हटलं, 'मी अधिकाराच्या लालसेनं या चळवळींत पडलों नाहीं. मला ट्रेड युनियन काँग्रेसमध्यें कुठलाच अधिकार नको. मी तुम्हांला सर्व तऱ्हेची मदत करायला तयार आहें. पण मला अधिकाराची जागा नको.' म्हापणकर या वेळीं कांहींच बोलले नाहींत.

मद्रासला भरलेल्या ट्रेड युनियन काँग्रेसच्या अधिवेशनासाठीं माझ्याबरोबर मुंबईहून बरेच प्रतिनिधी आले होते. कांहीं कामगार प्रतिनिधींच्या प्रवासखर्चाची व्यवस्था मला करावी लागली. या बाबतींत मणिबेन कारांनीं मला मदत केली हें सांगणं आवश्यक आहे. शिल्लक राहिलेल्या रॉय गटातर्फे कॉ. शेख व रजनी मुकर्जी हे दोन प्रतिनिधी आले होते. ट्रेड युनियनच्या अधिवेशनाच्या पहिल्या दिवशी स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांचीं भाषणं झाल्यावर विषयनियामक कमिटीची व क्रिडेंशल कमिटीची नेमणूक करण्यांत आली. क्रिडेंशल कमिटीचा अध्यक्ष मी होतों. त्या कमिटीचं काम हें होतं कीं ट्रेड युनियन काँग्रेसशीं संलग्न होऊं पाहाणाऱ्या कामगार संघांच्या सभासदांची संख्या किती आहे तें पाहायचं. त्याचप्रमाणें त्या संघाचं कार्य व्यवस्थितपणें चाललं आहे कीं

नाहीं याची चौकशी करायची. माझी क्रिडेंशल कमिटीच्या अध्यक्षाच्या जागीं निवडणूक झाली हें तिथं हजर असलेल्या दोन रॉयिस्टांना म्हणजे कॉ. शेख आणि रजनी मुकर्जी यांना आवडलं नाहीं. परंतु त्यांचा नाइलाज झाला होता. त्या दिवशीं रात्रीं कॉ. रजनी मुकर्जी माझ्याकडे आला आणि मला म्हणाला, ' हें पाहा, तुम्ही खरोखर रॉयवादी आहांत. कॉ. कर्णिकनीं जर कांहीं गाढवपणा केला असेल तर त्याबद्दल तुम्ही आम्हांला कां शिक्षा देतां ? माझी तुम्हांला विनंति आहे कीं, आपण पुन्हां एक होऊं. आणि पूर्वीप्रमाणें आपलं कार्य करूं या. ' मी रजनीला म्हटलं, ' रजनी, तूं कलकत्त्याहून आला आहेस. तुझ्या-विषयीं व्यक्तिशः माझं कांहींच म्हणणं नाहीं. परंतु मुंबईतील कांहीं रॉयवादी लोक दांभिक आहेत. त्यांच्याशीं मला सहकार्य करतां येणं शक्य नाहीं. पण खरं सांगायचं म्हणजे मला त्यांचा राग येतो तो ते दांभिक आहेत म्हणून नव्हे, तर ते निर्बुद्ध लोक आहेत म्हणून. स्वतःमध्यें कांहीं कर्तबगारी नसतांना केवळ रॉयच्या नांवावर प्रसिद्धि मिळवायची एवढाच त्यांचा उद्देश आहे. वैयक्तिक दृष्ट्या माझं त्यांच्याबद्दल कांहीं म्हणणं नाहीं. मी त्यांच्याशीं मैत्रीचे संबंध ठेवायला तयार आहें. परंतु राजकाणांत मला त्यांचा संपर्क नको. ' यावर रजनी मुकर्जी कांहींच बोलला नाहीं.

दुसऱ्या दिवशींच्या अधिवेशनांत ठरावाचीच चर्चा होणार होती. कॉ. शेख किंवा रजनी मुकर्जी यांनी हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्यावर एक लांबलचक ठराव मांडला. कॉ. रॉयनींच तो ठराव केला होता हें मला माहीत होतं. म्हणून त्यावर भाषण करतांना मी सांगितलं कीं, ' हे मॉस्को पद्धतीचे निबंधवजा ठराव आम्हांला नको आहेत. या ठिकाणीं आम्हीं जे प्रतिनिधी जमलो आहोत ते सर्व संपूर्ण स्वातंत्र्यवादी आहोंत आणि आपल्याला संपूर्ण स्वातंत्र्यवादी ठराव दोनतीन वाक्यांत मांडतां येणासारखा आहे. ' माझं भाषण ऐकल्यानंतर रॉयिस्टांनीं आपला ठराव बराच कमी केला आणि ते मला म्हणाले कीं, ' तुमच्या म्हणण्याप्रमाणें आम्ही हा ठराव अगदीं छोटा केला आहे. आतां याला तुमची कांहीं हरकत आहे का ?' हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव होता तो. त्याला हरकत घेणं मला शक्य नव्हतं. म्हणून मीं त्यांना म्हटलं कीं ' आम्हीं त्या ठरावांत थोडासा फेरबदल करून तो मान्य करूं. ' अर्थात् रॉयिस्टांचा ठराव ट्रे. यु. कॉं.नें मान्य केला आणि दुसरे अनेक ठराव असे होते कीं, त्यांचा विचार करण्यासाठीं तिसऱ्या दिवशीं अधिवेशन चालणार होतं. तिसरा दिवस उजाडला आणि मी उठल्याबरोबर पाहातों तर श्री. रामस्वामी मुदलियार या नांवाचे गृहस्थ माझ्या भेटीस आले होते. मी त्यांना आंत बोलावलं. श्री. मुदलियार आंत आल्याबरोबर मला म्हणाले, ' हें पाहा मी तुमचा फार वेळ घेत नाहीं. परंतु जिनिव्हा-संबंधानें ट्रे. यु. कॉं. कोणतं धोरण स्वीकारणार आहे, तें मला सांगा. ' मी त्यांना म्हटलं, ' जिनिव्हासंबंधाचं आमचं धोरण ठरलेलं आहे. जिनिव्हाच्या इंटरनॅशनल लेबर

कॉन्फरन्ससाठीं आम्हांला एकही प्रतिनिधि पाठवायचा नाहीं. आम्ही जिनिव्हावर बहिष्कार घातला आहे असं समजा. ' हें ऐकून श्री. रामस्वामी अगदीं काकुळतीला आले. ' तुम्हीं कांहीं करा, परंतु जिनिव्हाचा प्रश्न तुम्ही Open ठेवा. तुम्ही जर तसं केलंत तर माझा ज्या कामगार संघाशीं संबंध आहे ते सर्व ट्रे. यु. कॉंग्रेसला चिकटून राहातील. नाहींतर '–यावेळीं रामस्वामींचा स्वर थोडासा वर चढला होता—' माझे सर्व कामगार संघ इंडियन ट्रेड युनियन फेडरेशनला सामील होतील. ' त्यांचे हे उद्गार ऐकल्यावर मी चिडलों. मी त्यांना म्हणालो, कीं ' तुम्ही फेडरेशनमध्यें जा किंवा दुसऱ्या कुठंही जा. या बाबतींतलं धोरण बदलणं शक्य नाहीं ' रामस्वामी कांहीं न बोलतां निघून गेले. [आज मी आठवणी लिहीत आहें, म्हणून मला आतां असं वाटतं कीं मी त्यांना जें उत्तर दिलं तें गाढवपणाचं होतं. पण गाढवपणा असं तरी कसं म्हणणार ? कारण आमचीं डोकीं त्यावेळीं आभाळाला टेकलीं होतीं. पृथ्वीवर काय चाललं आहे, त्याचा विचार करायला सवड होती कोणाला ! परंतु हे विचार त्यावेळीं माझ्या मनांत आले नाहींत. एका फडतूस माणसाची आपण चांगली जिरविली या आनंदांतच मी गर्क होतों.]

ट्रे. यु. कॉंग्रेसचं बाकीचं सर्व काम आटपल्यानंतर नवीन कार्यकारी मंडळ कुठलं निवडायचं त्याबद्दल प्रश्न उपस्थित झाला. त्याबाबतींत रॉयिस्टांनीं माझ्याशीं तडजोड करण्याचा प्रयत्न केला. परंतु मी कुठल्याही तडजोडीला कबूल नव्हतों. पुढल्या वर्षाचा अध्यक्ष कांदळकर झालाच पाहिजे असा मीं आग्रह धरला. ' मग जनरल सेक्रेटरी कोण होणार ? ' असा त्यांनीं प्रश्न केला. त्यावर मीं त्यांना म्हटलं, ' जनरल सेक्रेटरी आपण म्हापणकरांना करूं. ' यावर म्हापणकर मला म्हणाले, ' तुम्ही माझ्यावर भलतीच जबाबदारी लादतां आहांत. कांदळकराला अध्यक्ष करण्याविषयीं माझी ना नाहीं. मला त्यांत आनंदच वाटेल. पण कांदळकर जर अध्यक्ष होणार असतील, तर तुम्ही जनरल सेक्रेटरी झालं पाहिजे. ' मी म्हापणकरांना म्हटलं, ' तें चालायचं नाहीं. ट्रे. यु. कॉंग्रेस ही कामगारांची संस्था आहे कीं आमच्यासारख्या बुद्धिवादी उपटसुंभांची आहे ? ती जर कामगारांची संस्था असेल तर त्या संस्थेमध्यें कामगारच अधिकारावर असले पाहिजेत. या संस्थेमध्यें कुठलाच अधिकार स्वीकारण्याची माझी इच्छा नाहीं आणि तुम्ही तो जर माझ्यावर लादलात, तर मी ताबडतोब राजीनामा देऊन मोकळा होईन. ' यावर म्हापणकर कांहींच बोलले नाहींत. यानंतर कॉंग्रेसच्या खुल्या अधिवेशनांत कॉंग्रेसचा अध्यक्ष म्हणून कांदळकरची निवड झाल्यावर कॉंग्रेसचा जनरल सेक्रेटरी म्हणून तीनचार वेळ माझं नांव सुचविण्यांत आलं आणि प्रत्येक वेळीं मला उभं राहून नकार द्यावा लागला. शेवटीं म्हापणकर यांचं नांव जनरल सेक्रेटरी म्हणून मीं सुचविलं आणि तें सर्वानुमतें मान्य झालं.

# १८

एक गोष्ट सांगायची राहिली कीं मद्रासमध्यें मला प्रसिद्धि मिळाली होती. ती कां मिळाली हें सांगण्यासाठीं मला थोडी मागची हकीगत सांगावी लागेल. ट्रे. यु. कॉंग्रेसच्या नागपूर–अधिवेशनांत कॉंग्रेसमध्यें फूट पडली आणि कॉंग्रेसमध्यें नेमस्तांनीं ट्रेड युनियन फेडरेशन नांवानं आपला एक निराळा सवतासुभा उभा केला. रेल्वेमेन्स फेडरेशन नांवाची रेल्वे कामगारांची एक मध्यवर्ति संस्था होती ती वेगळीच. नागपूर-नंतर थोड्याच वर्षांनीं कम्युनिस्टांनीं आपली लाल ट्रेड युनियन कॉंग्रेस नांवाची एक नामधारी संस्था काढली. हिंदी कामगारांच्या अशा तीन-चार मध्यवर्ति संस्था असाव्यात ही गोष्ट कॉ. रॉयना पसंत नव्हती, म्हणून या सर्व संस्थांना एकत्र करण्याचा त्यांनीं प्रयत्न सुरू केला. ते प्रयत्न करूं लागले. त्यासाठीं युनिटी प्लॅटफॉर्म नांवाचा एक मसुदा त्यांनीं तयार केला. या मसुद्याचा विचार करण्यासाठीं मुंबईस पहिली युनिटी परिषद भरली. ह्या परिषदेला मी बंदर कामगार युनियनतर्फे हजर होतों. हा संघ त्यावेळीं अस्तित्वांत होता किंवा नाहीं हें त्यावेळींसुद्धां मला माहीत नव्हतं. परंतु कॉ. वसंत कर्णिक हे त्या संघाचे सेक्रेटरी होते आणि त्यांच्या अधिकारपत्राच्या जोरावर मी परिषदेंत भाग घेऊं शकलों. परिषदेला सर्व पक्षाचे प्रतिनिधी जमले होते. त्यांची संख्या दीडशेंवर असावी असा माझा समज आहे. रेल्वेमेन्स फेडरेशनचे त्यावेळचे अध्यक्ष श्री. जमनादास मेहता यांना परिषदेचे अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आलं. तिथं जमलेल्या सर्वंच प्रतिनिधींचीं नांवं मला आतां आठवत नाहींत, परंतु ट्रेड युनियन फेडरेशनतर्फे त्या ठिकाणीं नानासाहेब जोशी आणि आर. आर. बखले, रेल्वेमेन्स फेडरेशनतर्फे जमनादास मेहता आणि एस. सी. जोशी, ट्रेड युनियन कॉंग्रेसतर्फे शेख, मी व दुसरी कांहीं मंडळी आणि लाल ट्रेड युनियन कॉंग्रेसतर्फे कॉ. बी. टी. रणदिवे आणि कॉ. एस्. व्ही. देशपांडे हे सर्व हजर असल्याचं मला नक्की आठवतं. सभेच्या कामाला सुरुवात झाली. कॉ. रॉयनीं तयार केलेल्या 'युनिटी प्लॅटफॉर्म'वर बरीच चर्चा झाली. प्रत्येक पक्षानं आपापल्या दृष्टिबिंदूतून त्या मसुद्यावर

बरीच अनुकूल–प्रतिकूल टीका केली. कॉ. रॉयचा तो मसुदा असल्यामुळें त्याचं समर्थन करण्याची मुख्य कामगिरी माझ्याकडे होती. कॉ. शेखनं मला त्या कामीं बरीच मदत केली. या मसुद्यावर चर्चा होत असतांना त्यावर बऱ्याच सूचना-उपसूचना येऊं लागल्या. पण त्यांतून कांहींच निष्पन्न होण्याचं चिन्ह दिसेना, म्हणून मी अध्यक्षांना विनंती केली, कीं 'या मसुद्याचा विचार करण्यासाठीं सर्व पक्षांची प्रातिनिधिक अशी एक लहानशी 'युनिटी कमिटी' नेमावी आणि या कमिटीनं परिषदेला आपला रिपोर्ट सादर करावा.' परिषदेनं माझी सूचना ताबडतोब मान्य केली. या कमिटीच्या सभासदांचीं नांवं सुचवावीं असं सांगितल्यावर मी, मला वाटतं, आठ नांवं सुचविलीं. म्हणजे प्रत्येक पक्षाचे दोन-दोन प्रतिनिधी या कमिटीवर असावेत अशी माझी इच्छा होती. मीं नांवे सुचवलीं तीं अशीं — रेल्वेमेन्स फेडरेशनतर्फे जमनादास मेहता व व्ही. व्ही. गिरी, ट्रेड युनियन फेडरेशनतर्फे एन्. एम्. जोशी आणि आर. आर. बखले, कॉ. शेख नि मी आणि लाल ट्रेड युनियन कॉंग्रेसतर्फे कॉ. रणदिवे आणि देशपांडे. कॉ. रणदिवे आणि देशपांडे यांनीं आम्हाला या कमिटीवर काम करायचं नाहीं असं जाहीर केलं. त्यावर दुसऱ्या दोन माणसांचीं नांवं सुचवलीं गेलीं पण तीं मला आतां आठवत नाहींत. तीं नांवं परिषदेनं मंजूर केल्यानंतर परिषदेचं काम संपलं. ट्रेड युनियन कॉंग्रेस आणि ट्रेड युनियन फेडरेशन यांचीं अधिवेशनं मद्रासला भरणार होतीं, म्हणून त्याच्या अगोदर ऐक्य परिषदेचं अधिवेशन आम्ही मद्रासलाच भरवावं असं ठरलं.

ट्रेड युनियन ऐक्य परिषद मद्रासला भरली. त्या परिषदेमध्यें श्री. जमनादास मेहता व व्ही. व्ही. गिरी यांनीं तयार केलेला अहवाल सादर करण्यांत आला. त्या अहवालावर मी अत्यंत जहाल स्वरूपाची अशी कडक टीका केली होती. त्या टीकेचा परिणाम इतकाच झाला कीं मद्रास येथील सर्व जहाल गट माझ्याभोंवतीं जमा झाला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे मद्रासच्या 'डेली मेल'सारख्या अत्यंत प्रतिगामी पत्रानं आपल्या अग्रलेखामध्यें गौरवानं माझा उल्लेख केला. मद्रासचा 'डेली मेल' आणि मुंबईचा 'टाइम्स ऑफ इंडिया' हे एकाच जातीचे, म्हणून मला कांहीं त्याचं विशेष वाटलं नाहीं. परंतु मद्रासमधील प्रतिष्ठित मंडळींवर त्याचा खूप परिणाम झाला. तिथल्या बड्या बड्या मंडळींकडून मला चहाला किंवा जेवायला आमंत्रणं येऊं लागलीं. मेट्रॉपॉलिटन क्लबसारख्या अत्यंत उच्च दर्जाचा समजल्या जाणाऱ्या क्लबमध्यें मला कांहींजण घेऊन गेले. याचा माझ्या मनावर खरोखर कांहींच परिणाम झाला नाहीं. परंतु त्यामुळें 'डेली मेल'सारख्या वर्तमानपत्राचं प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या लोकांवर किती वजन आहे याची मला चांगलीच जाणीव झाली.

त्यावेळीं मद्रासचे एम्. के. आचार्य मध्यवर्ति असेंब्लीचे सभासद होते, ते मला कुठं भेटले आणि कसे भेटले तें आतां आठवत नाहीं, पण भेटले मात्र खरे. ते

भेटल्यानंतर त्यांनीं माझ्याशीं जोरानं हस्तांदोलन केलं. नंतर ते म्हणाले, 'तुम्ही हिंदुस्थानचे भावि रॅम्से मॅक्डोनाल्ड आहांत.' रॅम्से मॅक्डोनाल्डशीं माझी केलेली तुलना मला मुळींच आवडली नाहीं, पण त्या म्हाताऱ्याला मी कांहींच बोललों नाहीं. थोडा वेळ थांबून ते पुढें म्हणाले कीं, 'हिंदी मजुरांचे प्रतिनिधि म्हणून श्री. एन्. एम्. जोशी जिनेव्हाला जातात तें मला आवडत नाहीं. माझी ना. व्हाइसरॉयशीं चांगली दोस्ती आहे. तुम्ही कबूल असाल तर मी तुमचं नांव व्हाइसरॉयना सुचवितों.' हें ते बोलल्यानंतर मात्र माझ्यानं गप्प बसवेना. मी त्यांना म्हटलं, 'हें पाहा, मि. आचार्य, मला हिंदुस्थानचा रॅम्से मॅक्डोनाल्ड व्हायचं नाहीं किंवा जिनेव्हाला जायचं नाहीं. इतकंच नव्हे, तर थोड्याच दिवसांमध्यें या ठिकाणीं 'ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस'ची बैठक भरावयाची आहे, त्या परिषदेमध्यें आम्ही जिनेव्हावर संपूर्ण बहिष्कार घालणार आहोंत.' हे माझे उद्गार ऐकल्यावर मि. आचार्य माझ्याकडे कांहीं वेळ पाहात राहिले पण ते कांहीं बोलले नाहींत. आज मि. आचार्य जिवंत नाहींत परंतु त्यांची मूर्ति मात्र माझ्या डोळ्यांसमोर उभी राहाते. ते हिंदुत्वनिष्ठ होते असा माझा समज आहे. त्यांचे ते डोक्यावरील व दाढीचे रुपेरी केस, कपाळावर गंध, बंद गळ्याचा आंखुड कोट, धोतर आणि उपरणं हा त्या म्हाताऱ्याचा अवतार पाहूनच मला हसूं येत होतं. कारण मी पाश्चात्य देशांत जाऊन शिक्षण घेतलेला माणूस, हा जुनाट ब्राह्मण त्या वेळच्या व्हाईसरॉयचा मित्र असेल हें कुणालाही खरं वाटलं नसतं. तरीसुद्धां त्यांच्या एकंदर बोलण्यावरून, त्यांच्या हसऱ्या चेहेऱ्यावरून आणि डोळ्यामध्यें जी विशिष्ट चमक होती त्यावरून हा सनातनी ब्राह्मण खोटं बोलेल असं मला मुळींच वाटलं नाहीं. परंतु मी पूर्वीं सांगितल्याप्रमाणें जहालवादामुळें माझं डोकं अगदीं फिरून गेलं होतं. माझे पाय होते जमिनीवर पण डोकं होतं आकाशांत. कान्तनं म्हटल्या-प्रमाणें आकाशांत भरारी मारणाऱ्या लोकांना कोणतेच अडथळे येत नाहींत. ते स्वच्छंदपणें आकाशांत विहार करीत असतात. कान्तनं हे उद्गार प्लेटोला अनुलक्षून काढले होते, परंतु माझ्या बाबतींत ते अक्षरशः खरे होते.

मुंबईला परत आल्यानंतर लोटवाला शेटनीं 'संडे ॲडव्होकेट'साठीं मला कांहीं लेख लिहिण्यास सांगितलें. त्यावेळीं माझे बहुतेक लेख Third International आणि स्टालिनवादी कम्युनिस्ट यांचा तीव्र निषेध करणारे होते. शेटजींना माझे लेख फार आवडले. शेटजी गांधीविरोधी होते आणि कम्युनिस्टविरोधी तर होतेच होते. ३२ सालच्या शेवटीं शेवटीं तर माझे लेख माझ्या नांवावरच 'संडे ॲडव्होकेट'मध्यें प्रसिद्ध झाले होते. परंतु जानेवारी १९३३ पासून मी 'संडे ॲडव्होकेट'चं संपादकत्व स्वीकारलं. त्यावेळीं माझे मित्र छेलशंकर व्यास हे माझ्याबरोबर काम करीत असत. छेलशंकर व्यास यांचा कम्युनिस्टांकडे ओढा होता, म्हणूनच ते कट्टर गांधीविरोधी होते.

तेव्हां आम्ही आपसांत असं ठरवलं कीं, कम्युनिझमवर जे लेख लिहायचे असतील ते मी लिहायचे आणि गांधीविरोधी लिखाण त्यांनीं करायचं. परंतु दोन किंवा तीन महिन्यांनींच खाजगी कारणावरून श्री. व्यास शेटजींच्या मर्जीतून उतरले. श्री. व्यास यांनीं आपल्या कामाचा राजीनामा दिला. अर्थात् सोळा पानांचें इंग्रजी साप्ताहिक काढण्याची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. मला मदत करण्यासाठीं त्यावेळीं मेनन नांवाचा एक गृहस्थ होता. परंतु प्रुफ तपासण्यापलिकडे मला त्याची कांहींच मदत झाली नाहीं. या साप्ताहिकाच्या कामाचा माझ्या शरीरावर परिणाम होऊन मी एकदम आजारी पडलो. रोज मला बारीक ताप येऊं लागला. यावेळेस मी ऑफिसांत जायचा आणि घरीं आल्यानंतर बिछान्यावर स्वस्थ पडून राहायचा. त्यावेळीं मला रजा घेतां आली नसती. कारण त्यावेळीं माझ्या ऐवजीं काम करायला कुणी मनुष्य मिळाला नसता आणि शेटजींना माझ्या गैरहजेरींत तें पत्र बंद ठेवावं लागलं असतं. शिवाय तो आंतरराष्ट्रीय राजकारणाचा अत्यंत धामधुमीचा काळ होता. 'संडे ॲडव्होकेट'चं संपादकत्व मी स्वीकारल्यानंतर थोड्याच दिवसांनीं म्हणजे १९३३ जानेवारीच्या ३१ तारखेला ॲडॉल्फ हिटलर जर्मनीचा चॅन्सेलर झाला. शिवाय लंडनमध्यें भरणाऱ्या राउन्ड टेबल कॉन्फरन्सची भानगड होती ती वेगळीच. अशा वेळीं मी बिछान्यावर स्वस्थ पडून राहाणं शक्य नव्हतं. शेवटीं माझा आजार वाढत गेला आणि १९३४ च्या फेब्रुवारी महिन्यामध्यें मी शेटजींना सांगितलं, 'कीं मला आतां यापुढें काम करतां येणं शक्य नाहीं.' शेटजी म्हणाले, 'कीं तुम्हांला जर काम करतां येत नसेल तर मला 'संडे ॲडव्होकेट' च बंद केला पाहिजे.' मी त्यांवर कांहींच बोललों नाहीं. कारण माझी प्रकृति इतकी ढासळली होती, कीं माझी इच्छा असूनही मला काम करतां आलं नसतं. शेटजींनीं नंतर एक नोटीस काढली आणि 'संडे ॲडव्होकेट' बंद करणार असं त्यांनीं जाहीर केलं.

माझा ताप सारखा वाढत चालल्यामुळें मला कित्येक वेळां बिछान्यांतून हालतां येत नसे. याच सुमारास नागपूर युनिव्हर्सिटीच्या बी. ए. च्या परीक्षेला लीला बसणार होती. तिला नागपूरला एकटं जातां येणं शक्य नव्हतं आणि तिच्याबरोबर जाण्याची तिच्या नातेवाइकांपैकी एकाचीही तयारी नव्हती. अर्थात् मला तिला नागपूरला घेऊन जाणं भाग होतं. नागपूरला गेल्यानंतर मी माझे मित्र श्री. कलाप्पा यांच्या घरीं उतरलों. माझ्या आजारामुळें मला बाहेर पडणं शक्य नव्हतं. म्हणून श्री. कलाप्पा हे लीलासाठीं टांगा करीत आणि आपल्या मोटर सायकलवरून तिला युनिव्हर्सिटींत पोचवून नंतर आपल्या ऑफिसांत जात. संध्याकाळीं मात्र लीलाला आणण्यासाठीं मला युनिव्हर्सिटींत जावं लागे. तिला घरीं आणल्यानंतर मी पुन्हां बिछान्यांत पडून राहात असें. तिनं बी. ए. साठीं पोलिटिकल सायन्स हा विषय घेतला होता

आणि त्या विषयाचा तिनं नागपूरला जाईपर्यंत मुळींच अभ्यास केला नव्हता. मला जेव्हां थोडं बरं वाटे, त्यावेळीं हा विषय मी तिला समजावून सांगत असें. लीलाच्या सुदैवानं या विषयाची परीक्षा पंधरा दिवस लांबणीवर पडली. परंतु मला इतके दिवस तिच्याबरोबर राहाणं शक्य नव्हतं. कारण घरीं म्हणजे मुंबईला आमचीं लहान मुलं होतीं. त्यांची आम्हां दोघांनाही काळजी वाटूं लागल्यामुळे आम्ही ठरवलं कीं लीलानं प्रो. नारायण केशव बेहेरे यांच्या घरीं परीक्षा होईपर्यंत राहावं आणि मी ताबडतोब घरीं परत यावं.

मी मुंबईला परत आल्यानंतर मला मुळींच स्वास्थ्य लाभलं नाहीं. लॅबर्नेम रोडवरील सरस्वती–व्हिलामध्यें मि. चेट्टी आणि मी एकत्र राहात होतों खरे, पण नोकरी गेल्यामुळें एकंदर खर्च मला झेपण्यासारखा नव्हता. श्री. चेट्टी मला म्हणाले, कीं 'आपण लहानशी जागा भाड्यानं घेऊं आणि एकत्र राहूं.' परंतु माझा नि माझ्या कुटुंबाचा भार श्री. चेट्टीवर पडावा ही कल्पनाच मला सहन झाली नाहीं. म्हणून मी त्यांना म्हटलं, कीं 'तुम्हांला पसंत पडेल ती जागा तुम्ही पाहा आणि मी माझ्यासाठीं जागा पाहातों.' अजून माझी अशी कल्पना आहे कीं, चेट्टींना माझ्या म्हणण्याचा अर्थ बरोबर समजला नाहीं. त्यांना वाटलं असावं कीं माझी त्यांच्याबरोबर राहाण्याची इच्छा नाहीं. म्हणूनच ते एकदम गप्प बसले. या विषयासंबंधानं त्यांनीं नंतर एक चकार शब्द काढला नाहीं. जागा शोधतां शोधतां दादरच्या हिंदु कॉलनींत मला एक लहानसा ब्लॉक मिळाला आणि चेट्टींनीं पारसी कॉलनींतील मेधा निवासमधील जागा पसंत केली. थोड्या दिवसांनीं आम्हीसुद्धां चेट्टींच्या शेजारीं राहाण्यासाठीं मेधानिवासमध्यें गेलों.

परीक्षा संपल्यानंतर लीला मुंबईला परत आली. त्यानंतर आपला संसार कसा चालवायचा हा प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला. मी त्यावेळीं कांहींच करूं शकत नव्हतों, तेव्हां तिला हातपाय हलवणं जरूर होतं. परिक्षा देण्यापूर्वी ती मला म्हणाली, कीं 'मी जर फिल्म कंपनींत गेलें तर खूप पैसा मिळवीन.' मी तिला म्हणालों, 'तुला पाहिजे-तितका पैसा मिळव. तूं फिल्म कंपनींत जा, नाटक कंपनींत जा, त्याला माझी हरकत नाहीं, पण तुझी बी. ए. ची परीक्षा होईपर्यंत मात्र मी तुला कांहीं करूं देणार नाही.' आतां ती बी. ए. ची परीक्षा देऊन आली होती. शिवाय संसाराचा भारही तिच्यावर होता. मला स्वतःला कांहींच करतां येणं शक्य नव्हतं. म्हणूनच मुंबईत आल्याबरोबर ती मला एकदम म्हणाली, 'तुम्ही घातलेली अट मी पुरी केली. आतां मी फिल्म कंपनींत जाणार नि खूप पैसे मिळविणार.' त्यावेळीं तिला बिचारीला काय माहीत कीं, फिल्म कंपनींत प्रथम शिरकाव करून घ्यायला किती प्रयास पडतात! परंतु तिच्या सुदैवानं मणिबेन कारा यांचे पति आणि माझे मित्र श्री. हंसराज मुळजी यांची सागर फिल्म

कंपनीचे मालक चिमणलाल देसाई यांच्याशीं दाट ओळख होती. चिमणलाल भाईंनीं तिला मासिक वेतन फक्त १०० रु. देण्याचं ठरवलं. लीलानं तात्काळ कबूल केलं. याच कंपनींत असलेले, हॉलीवुडहून आलेले श्री. चतर्जी या वृद्ध गृहस्थांशीं तिचा दाट परिचय झाला.

'लीलानं सागरमध्यें फार तर महिना दीड महिना नोकरी केली असेल. त्यानंतर तिनं सागर कंपनी सोडली आणि ती नाट्यमन्वन्तरला येऊन मिळाली. ती नाट्य-मन्वंतरला कशी येऊन मिळाली हें समजण्यासाठीं नाट्यमन्वंतरचा थोडा मागचा इतिहास सांगितला पाहिजे. मी मागं म्हटलंच आहे, कीं प्रार्थनासमाजाच्या राममोहन आश्रमांत मी जेव्हां राहात होतों, त्यावेळीं माझ्याकडे रात्रीं पुरोगामी नाटकाविषयीं चर्चा चाले. त्या चर्चेंमध्यें श्री. पार्श्वनाथ आळतेकर, कै. बापूराव आपटे, श्री. के. ना. काळे आणि श्री. अनंत काणेकर प्रभृति मंडळी भाग घेत असत. ही चर्चा पुढें बंद पडली हेंही मी मागं सांगितलं आहे. त्यानंतर म्हणजे ३३ सालीं आम्ही लॅबर्नमरोडवरील सरस्वती व्हिलांत राहात असतांना एके दिवशीं सकाळीं श्री. वर्तक, काळे, काणेकर वगैरे मंडळी माझ्याकडे आली. त्यांच्याबरोबर श्री. म्हात्रे नांवाचे इंजिनियरही आले होते. वर्तकांच्याबरोबर केशवराव दातेही आले होते. याच वेळीं माझी आणि केशवरावांची पहिली ओळख झाली. सर्व मडळीचं चहापान झाल्यानंतर श्री. वर्तकांनीं आपल्या नेहमींच्या सवयीप्रमाणें व्याख्यान देण्यास सुरुवात केली. यापूर्वी माझी आणि वर्तकांची ओळख झाली होती, ती कधीं आणि कुठं झाली होती तें सांगतां येत नाहीं. वर्तक म्हणाले, 'हें पाहा डॉक्टर, आम्ही नाट्यमन्वंतर नांवाची संस्था काढली आहे बरं का! ती लिमिटेड कंपनी आहे. तुम्हांला तिचे आम्ही डायरेक्टर करणार आहोंत. तुम्हांला माहित आहे का कोण कोण डायरेक्टर आहेत त्या कंपनींत? अहो, या कंपनीचे महर्षी अण्णासाहेब कारखानीस डायरेक्टर आहेत. मी आणि दाते आहोतच. शिवाय आपले काणेकर, काळे, शांताराम शृंगारपुरे वगैरे मंडळी आहेतच. मग बोला, काय तुमचं म्हणणं आहे?' मी वर्तकना म्हटलं, कीं 'नाट्यमन्वंतरसारखी पुरोगामी संस्था काढावी असं काळे, काणेकर, आळतेकर, आपटे आणि मी यांच्या मनांत किती दिवसांपासून तरी घोळत होतं. तुमच्या उत्साहानं आणि कर्तबगारीनं या अशा संस्थेला मूर्त स्वरूप आलं ही आनंदाची गोष्ट आहे. मी तुम्हांला वाटेल ती मदत करायला एका पायावर तयार आहें. पण मला एक अडचण वाटते ती अशी कीं, इब्सेनच्या Doll's House साठीं योग्य पात्रांची निवड करणं जरा कठीण जाईल. काणेकरांनीं या नाटकाला जें 'घरकुल' हें नांव दिलं आहे तें अत्यंत योग्य आहे.'—वर्तक मला मध्येंच थांबवून म्हणाले, कीं 'आम्ही सध्यां घरकुलचा प्रयोग करायचा नाहीं असं ठरवलं आहे. मी स्वतःच 'आंधळ्याची शाळा' या नांवाचं एक नाटक लिहिलं आहे, आणि

तेंच प्रथम बसवायचं आम्ही सर्वांनीं ठरवलं आहे.' मी म्हणालों, 'पण मी हें नाटक वाचलेलं नाहीं. तेव्हां त्याबद्दल मला कांहीं सांगतां येणार नाहीं.' वर्तक तावडतोब म्हणाले, 'अहो, तेवढ्याचसाठीं तर आम्ही जमलों आहोंत. मी तुम्हांला आतां माझं नाटक वाचून दाखविणार आहें. मि. म्हात्र्यांनासुद्धां त्याचसाठीं इथं घेऊन आलों.' असं म्हणून वर्तकांनीं आपलं चोपडं उघडून नाटक वाचून दाखविण्याची तयारी दाखविली.

मी काळे, काणेकरांकडे आळीपाळीनं पाहिलं, पण त्यापैकीं एकानंही तोडांतून शब्द काढला नाहीं. वर्तकांनीं नाटक वाचायला सुरवात केली. नाटकाच्या चार अंकांचं जसंजसं वाचन होऊं लागलं, तसतसा माझ्या संतापाचा पारा वर वर चढूं लागला. म्हणजे तें नाटक वाईट होतं असा माझ्या म्हणण्याचा भावार्थ नाहीं. नाट्यमूल्याच्या दृष्टीनं तें एक उत्कृष्ट नाटक होतं यांत शंकाच नाहीं. परंतु आम्ही ज्या हेतूनं पुरोगामी नाट्यसंस्था काढणार होतों, त्या हेतूला पोषक असं तें नाटक नव्हतं. म्हणून नाटकाचं वाचन संपल्यानतर मी वर्तकांना म्हणालों, कीं 'तुमचं नाटक चांगलं आहे. परंतु इब्सेनचा नॉर्वेजियन प्रतिस्पर्धी ब्यार्नसन याचं जें Gauntlet नाटक आहे, त्याचा हा फिक्कट अनुवाद आहे. आम्ही जी पुरोगोमी नाट्यसंस्था काढणार होतों ती इब्सेनचीं नाटकं मराठी रंगभूमीवर आणण्यासाठीं आणि तुम्ही तर त्याच्या प्रतिस्पर्ध्याला मराठी रंगभूमीवर आणण्याचा प्रयत्न करीत आहांत. तेव्हां या तुमच्या संस्थेत मला मुळींच सामील होतां येत नाहीं.' यावर काळे आणि काणेकर एकदम म्हणाले, 'आंधळ्यांची शाळा हें मराठी रंगभूमीवर एकदां यशस्वी झालं कीं, त्यानंतर तावडतोब आम्ही 'घरकुल' नाटक घेणार आहोत.' मी त्यांना म्हटलं, 'ठीक आहे. तुम्ही ज्यावेळीं 'घरकुल' रंगभूमीवर आणण्याचा प्रयत्न कराल, त्याच वेळीं मी तुम्हांला येऊन सामील होईन, आज मी या संस्थेंत सामील होत नाहीं. परंतु मी जरी तुमच्यांत सामील झालों नाहीं तरी तुमच्या नाट्यमन्वंतरला वर्तमानपत्रद्वारां जी कांहीं मदत करायची असेल तीं मी अवश्य करीन.' त्यानंतर इतर गप्पागोष्टी झाल्यानंतर सर्व मंडळी आपापल्या घरीं निघून गेली.

'आंधळयांच्या शाळे'चे प्रयोग मुंबईस त्यावेळच्या रिपन थिएटरांत सुरू झाले. नाटकाची सजावट आणि वेशभूषा श्री. नी. म. केळकर आणि श्री. राजे यांनीं फारच चांगली केली होती. नाटकाच्या सजावटीसाठीं खर्चही बराच झाला होता. सौ. ज्योत्स्ना भोळे, सौ. पद्मावती वर्तक, नटवर्य नानासाहेब दाते, श्री. पार्श्वनाथ आळतेकर आणि श्री. के. ना. काळे यांच्या भूमिका फारच परिणामकारक झाल्यामुळें तें नाटक चांगलंच रंगलं. पहिल्या प्रयोगांत के. नारायण काळे यांनीं प्रोफेसरची भूमिका करतांना आपल्या चेहेऱ्यावर दाढीमिशांचं जंगल वाढवलं होतं. त्यामुळें त्यांचा अभिनय फारसा चांगला

वठला नाहीं. प्रयोग संपल्यानंतर मी काळयांना सांगितलं कीं, तुम्ही या दाढीमिशांना चाट द्या, आणि तुमच्या तीक्ष्ण डोळ्यांना हें चष्म्याचं आवरण नको. मग तुम्हांला ही तुमची भूमिका सहज सुलभरीतीनं करतां येईल.' दुसऱ्या प्रयोगांत काळ्यांनीं दाढीला आणि चष्म्याला रजा दिली होती. मिशा फक्त ठेवल्या होत्या. त्यामुळं त्यांची भूमिका पहिल्यापेक्षां अधिक सहजसुलभ अशी झाली. मला वाटतं, या नाटकाचे प्रयोग सतत चार महिने सारखे चालले होते. त्यानंतर वर्तकांचं दुसरं नाटक 'लंपडाव' रंगभूमीवर आलं. हें नाटक मात्र साफ पडलं. पहिल्या नाटकाला एकंदर उत्पन्न जरी बरं होत होतं, तरी त्या नाटकाच्या सजावटीसाठीं केलेल्या अवाढव्य खर्चांमुळें जमाखर्चाची जेमतेम तोंडमिळवणी झाली होती कीं नाहीं याची मला शंका वाटते. 'लपंडाव' साफ पडल्यामुळं त्या नाटकाचा खर्चही अंगावर पडला. त्यानंतर वर्तकांचं तिसरं नाटक 'तक्षशीला' हें रंगभूमीवर आलं. या नाटकाच्या सजावटीसाठीं अवाढव्य खर्च करण्यांत आला होता आणि हे नाटक दुसऱ्या प्रयोगांत ठार झालं. कंपनीच्या भागीदारांनीं या संबंधानं हूं कां चूं केलं नाहीं, कारण कंपनींच्या कर्जाची जबाबदारी घेण्यास श्री वर्तक तयार होते. 'तक्षशीला' ठार झाल्याबरोबर वर्तकांचाही धीर खचला आणि त्यांनाही काय करावं तें सुचेनासं झालं. नाट्यमन्वंतर साफ बुडून जाण्यापूर्वी कांहीं घटना घडून आल्या त्याचा उल्लेख या ठिकाणीं करणं जरूर आहे.

'लपंडाव' नाटकाच्या तालमी सुरू असतांना काणेकर, काळे माझ्याकडे आले आणि मला म्हणाले, कीं 'नाट्यमन्वंतर हीं कांहीं पुरोगामी संस्था राहिली नाहीं. 'आंधळयांच्या शाळे' नंतर 'घरकुल' रंगभूमीवर यावं अशी आमची तीव्र इच्छा होती आणि आम्ही त्याप्रमाणें तुम्हांला सांगितलंही होतं, परंतु तें कांहीं जमेल असं दिसत नाहीं. वर्तकांना आपलीं एकट्याचींच नाटकं रंगभूमीवर आणायचीं आहेत असं दिसतं. अण्णा कारखानीस नि केशवराव दाते हे त्यासंबंधानं त्यांना कांहीं बोलतच नाहींत. म्हणून आम्ही नाट्यमन्वंतरमधून बाहेर पडायचं ठरवलं आहे. काणेकर आणि काळे माझ्याकडे येण्यापूर्वी कै. आपटे, पार्श्वनाथ, आळतेकर आणि मी नवयुग प्लेअर्स नांवाची निराळी नाट्य संस्था काढावी असा विचार करीतच होतों. याच वेळीं काळे आणि काणेकर आम्हांला येऊन मिळाले. त्यानंतर नवयुग प्लेअर्स ही संस्था आम्ही स्थापन केली. गांवदेवींतील चौहान भुवनचा हॉल आम्ही भाड्यानं घेतला आणि तिथं तालमी सुरू करण्याचं ठरवलं. या तालमी काळ्यांनीं घ्यावयाच्या हेंसुद्धां निश्चित झालं. मला काळे म्हणाले कीं, 'आपण जर पहिल्याप्रथम 'घरकुल'चा प्रयोग केला आणि योग्य पात्रं आपल्याला मिळालीं नाहींत, तर तें नाटक रंगभूमीवर यशस्वी होणार नाहीं. म्हणून मी म्हणतों कीं मी एका इटालियन नाटककाराचं नाटक अनुवादित केलं आहे. त्या नाटकाचं नांव मी 'बिघडलेली घडी' असं ठेवलं आहे. तेव्हां त्या नाटकाच्या आपण तालमी घेऊं. लीलाताई त्या नाटकांतील हिरॉइनची

भूमिका करतील आणि त्या हिरॉइनच्या मावशीच्या भूमिकेसाठीं मात्र आपल्याला एकादी स्त्री शोधावी लागेल.' या आठवणी सांगतांना मी श्री. मामासाहेब वरेरकर यांचा उल्लेख करण्याचं टाळलं आहे आणि त्याचं कारणही उघड आहे. आम्ही जेव्हा नवीन कंपनी काढली, त्यावेळीं, त्यांनीं आम्हांला हरेक प्रकारचं साह्य केलं ही गोष्ट या ठिकाणीं सांगितलीच पाहिजे. आम्हांला काळ्यांच्या नाटकांतील मावशी-च्या भूमिकेसाठीं कुणीच स्त्री मिळत नाहीं हें जेव्हां त्यांनीं पाहिलं तेव्हां त्यांनीं ही मावशी धुंडण्यासाठीं खूप प्रयत्न केले. शेवटीं त्यांनीं मिसेस् पुराणीकना शोधून काढलं; आणि त्यांनीं मला निरोप पाठवला कीं 'तुमच्यासाठीं मावशी मी शोधून काढली आहे. कशी आहे ती पाहा.' मी त्या दिवशीं संध्याकाळीं लीलाला घेऊन मामाच्या घरीं गेलों. पाहातों तर मामांच्या दिवाणखान्यांत एक गणपतीच्या आकाराचा गृहस्थ बसला होता. त्याचं नांव पुराणीक. त्याच्याच शेजारीं त्याची बायको बसली होती. तिच्या चेहेऱ्याकडे पाहिल्यावर मला बरं वाटलं. कारण ती दिसायला जरा वयस्क असली तरी सुंदर होती. मी लीलाला म्हटलं, 'तुझी मावशी व्हायला ही अगदीं लायक आहे.' 'मावशी' मिळाल्याबरोबर काळ्यांनीं दुसऱ्या दिवशींच आपल्या नाटकाच्या तालमी घेण्याला सुरुवात केली. या मावशीचा आवाज होता लहान, म्हणून काळे तिला कांहीं तरी बोलले अशी माझी कल्पना आहे. कारण दुसऱ्या दिवशीं ती तालमीला आलीच नाहीं. मी तिची विचारपूस करण्यासाठीं घरीं गेलों तेव्हां ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. ती मला म्हणाली, 'नाटकांत काम करण्याचं मला कांहीं झेपायचं नाहीं. तुम्हीं दुसरी कुणी पाहा.' मी तिची कशीबशी समजूत घातली आणि त्यानंतर मात्र आमच्या तालमी जोरांत सुरू झाल्या. खरोखर पाहिलं तर लीलानं या नाटकांत काम करावं हें मला मुळींच आवडत नव्हतं. कारण तिची परीक्षा जवळ येत चालली होती. परंतु काळ्यांनीं तिला हिरॉइनच्या कामासाठीं पसंत केली आणि तिनं जर काम करण्याला नकार दिला तर आमची नाट्य-संस्थाच संपुष्टांत येईल, असा विचार माझ्या मनांत आला. मी तिला कांहींच बोललों नाहीं. या नाटकाच्या तालमी चालू असतांना एका रात्रीं के. ना. काळे, श्री. बेंडे यांना घेऊन आले. त्यांनीं आपलं 'बुवा' नाटक वाचून दाखवलं. काळ्यांनीं त्या नाटकाची फारच तारीफ केली, परंतु मला तें नाटक मुळींच आवडलं नाहीं. काळ्यांनीं त्या नाटकाच्या तालमी सुरू करण्याचा आग्रह धरला. आमच्यामध्यें अगदीं पहिल्या प्रथमच फाटाफूट नको म्हणून मीही कांहीं बोललो नाहीं. परंतु 'बुवा' नाटकाच्या तालमीला हजर राहण्याचं मीं साफ नाकारलं. या नाटकाच्या तालमी चालू असतांना नाट्य मन्वंतरचे बहुतेक नट आम्हांला येऊन मिळाले. केशवराव भोळे आणि ज्योत्स्ना भोळे यांच्याशीं माझे निकटचे स्नेहसंबंध होते. नाट्य मन्वंतर डबघाईला आल्यामुळें केशवरावांनींसुद्धां आपल्या बायकोला या संस्थेंतून काढून घेतलं.

# १९



एके दिवशीं सकाळीं चहा प्याल्यानंतर बाहेरच्या दिवाणखान्यांत बसतों न बसतों तोंच केशवराव दाते अण्णासाहेब कारखानिसांना घेऊन माझ्याकडे आले. अण्णांचा नि माझा विशेष परिचय नव्हता, परंतु त्यांनींच प्रथम बोलायला सुरुवात केली. नाट्यमन्वंतर बुडालं या एकाच गोष्टीचं त्यांना फार दुःख होत होतं असं त्यांच्या चेहेऱ्यावरून दिसून येत होतं. ते मला म्हणाले, 'मी आतां परत पुण्याला जातों. नाट्यमन्वंतर साफ बुडालं असं मी समजतों. या संस्थेला जिवंत ठेवण्याची दगदग मला म्हातारपणीं होणार नाहीं. या संस्थेचा मी सल्लागार आहें खरा, पण माझा सल्ला कुणीच घेत नाहीं. मी आता जातों. तुम्हांला जर या संस्थेला वांचवायचं असेल तर या संस्थेला अवश्य वांचवा अशी विनंति करायला मी तुमच्याकडे आलो आहें.' बोलतां बोलता म्हाताऱ्याच्या डोळ्यांना पाणी आलं. दाते दुर्मुखलेले बसले होते. ते कांहींच बोलले नाहींत. मी त्यांना लगेच म्हटलं कीं, 'हे पाहा अण्णासाहेब, आपला माझा जरी विशेष परिचय नसला, तरी नाट्यसृष्टीची जी आपण अमोल सेवा केली आहे, ती माझ्या पूर्ण परिचयाची आहे. आपण कांहीं चिंता करूं नका. नाट्यमन्वंतर जिवंत ठेवण्याचे जे कांहीं उपाय करणं मला शक्य असतील तेवढे मी करीन. एवढं आश्वासन मी तुम्हाला देतों.' कांहीं वेळानं ते दोघेही निघून गेले.

यानंतर आळतेकर, काणेकर, काळे आणि मी असे एकत्र बसून अण्णासाहेब कारखानीस यांनीं केलेल्या सूचनेचा सर्व दृष्टीनं विचार केला. आमच्यापुढें असा प्रश्न होता कीं, आपली नवयुग प्लेअर्स ही संस्था चालवायची आणि नाट्यमन्वंतर मरूं द्यायचं किंवा आपली संस्था बंद करायची व नाट्यमन्वंतरचं पुनरुज्जीवन करायचं. नवयुग प्लेअर्स बंद करायचें ही कल्पना काणेकर, काळे किंवा आळतेकर यांना मुळींच सहन झाली नाहीं. ते म्हणाले कीं, "आपण सर्वजण १९२८ सालापासून नाट्यमन्वंतरसारखी संस्था अस्तित्वांत आणण्यासाठीं सारखे झगडत होतों. त्यानंतर पांच वर्षांनीं श्री. वर्तक यांनीं या संस्थेला मूर्त स्वरूप दिलं. त्याबद्दल आम्ही त्यांचे खरोखर आभारी आहोत.

परंतु असं दिसतं कीं, या संस्थेद्वारा वर्तकांना आपलीं स्वतःचींच नाटकं रंगभूमीवर आणायचीं आहेत या त्यांच्या अट्टाहासामुळं नाट्यमन्वंतर आज मृतावस्थेंत पडली आहे. अण्णासाहेब कारखानीस आणि नानासाहेब दाते यांच्यासारखे तज्ञ सल्लागार नाट्यमन्वंतरमध्यें होते खरे; परंतु वर्तकांना इतरांपेक्षां पैशाचं अधिक पाठबळ असल्यामुळं त्यांना कुणाचा सल्ला घेण्याची जरुरी भासली नाहीं. वर्तकांच्या या शहाणपणामुळेंच ही अवस्था झाली आहे. आपण सर्वांनीं कितीही प्रयत्न केले तरी तिला जिवंत करणं शक्य नाहीं. म्हणून आम्ही म्हणतों कीं, नाट्यमन्वंतरच्या भानगडींत न पडतां आपण आपली संस्था स्वतंत्रपणें चालवूं. शिवाय नाट्यमन्वंतरला आज जें कर्ज झालं आहे, त्या कर्जाचा बोजा कुणी उचलायचा? वर्तकांच्या एककल्लीपणामुळें आणि भलत्याच महत्त्वाकांक्षीपणामुळें नाट्यमन्वंतरला हें जें कर्ज झालं आहे. तें फेडायचं कुणी? अण्णासाहेबांनीं जें कांहीं तुम्हांला सांगितलं तें ठीक आहे, परंतु मागचं हें खरकटं कुणी काढायचं तें सांगा.'

माझ्या तिघाही मित्रांचं म्हणणं अक्षरशः खरं होतं. तरीसुद्धां नाट्यमन्वंतर संस्था नामशेष व्हावी ही कल्पनाच मला सहन होईना. वर्तकांचं पहिलं नाटक माझ्या दृष्टीनं प्रतिगामी होतं, तरीसुद्धां नाट्यमन्वंतरनं नाट्यतंत्रामध्यें ज्या कांहीं अनेक सुधारणा घडवून आणल्या होत्या, त्या विचारांत घेणं अत्यंत जरूरीच होतं. नाट्य-मन्वंतरनं नाट्यसृष्टींत एक नवीन प्रथा पाडली होती, ती म्हणजे स्त्रियांचीं कामं स्त्रियांनीं करायचीं ही होय. शिवाय माझ्या स्वतःच्या दृष्टीनं जरी वर्तकांचं नाटक प्रतिगामी होतं तरी या वेळीं जीं नाटकं महाराष्ट्रांत होत होतीं, त्यांच्या मानानं हें नाटक कितीतरी पुरोगामी होतं. हे सर्व विचार मी माझ्या मित्रांसमोर मांडले. मी त्यांना म्हणालों, कीं 'आपलं जें वर्तकांशीं भांडण आहे तें वैयक्तिक स्वरूपाचं नाहीं. आपण त्यांच्याशीं तत्त्वासाठीं भांडत आहोंत. म्हणून वर्तकांनीं कांहीं चूक केली आणि नाट्यमन्वंतर त्यामुळें बुडत आहे असं आपल्याला दिसून आलं, तरी आपण तिला तारण्याचा कांहींच उपाय करायचा नाहीं हें मला प्रशस्त वाटत नाहीं. म्हणून मी म्हणतों कीं नाट्यमन्वंतर कुठल्या अटीवर वर्तक आम्हांला द्यायला तयार आहेत याची आपण प्रथम त्यांच्याशीं चर्चा करूं.' यावर आळतेकर कांहीं बोलले नाहींत. पण काळे व काणेकर मला म्हणाले, 'या बाबतींत काय करायचं तें आम्ही तुमच्यावर सोपवतों. तुम्हाला काय करायचं असेल तें तुम्ही ठरवा.' काळे तर रागानं मला म्हणाले, 'मला वर्तकांशीं एक शब्दसुद्धां बोलायचा नाहीं. म्हणून यासंबंधानं ज्या कांहीं वाटाघाटी करायच्या असतील त्या तुम्हीच करा. मी फक्त तुमच्याबरोबर येईन, पण एक शब्दही बोलणार नाहीं.'

## हताश वर्तक

वाटाघाटीचा दिवस मुक्रर झाला. जेवण झाल्यानंतर काळे, काणेकर आणि मी वर्तकांच्या घरीं गेलों. नानासाहेब (केशवराव) दाते वर्तकांच्या घरीं अगोदरच येऊन बसले होते. त्यांना पाहिल्यावर मला थोडं आश्चर्यच वाटलं, पण मी कांहीं बोललों नाहीं. आमच्या बैठकीला सुरुवात झाली. वर्तकांची पूर्वीची उत्साही वृत्ति मला मुळींच दिसली नाहीं. ते तर अगदीं हताश झाल्यासारखे दिसले. नाट्यमन्वंतरचं पुढें काय करायचं हा जेव्हां प्रश्न निघाला त्यावेळीं नानासाहेब दाते म्हणाले, 'माझी अशी सूचना आहे कीं, नाट्यमन्वंतर माझ्या स्वाधीन करावं. मी संस्थेची सर्व जबाबदारी घ्यायला तयार आहें. माझी फक्त एवढीच अट आहे कीं तुम्हीं मंडळींनीं माझ्यावर पुरोगामी विचारांचीं कोणतींच बंधनं लादतां नयेत. जुन्या नाटक मंडळीप्रमाणेंच मी ही संस्था चालवीन. जुनी नाटकंही मला करावीं लागतील. इतकंच नव्हे तर स्त्रियांचीं कामं करण्यासाठीं मला पुरुषांचीही योजना करावी लागेल.' हे त्यांचे शब्द ऐकल्यावर वर्तक एकाद्या वाघासारखे उसळून म्हणाले. 'हें पाहा दाते, तुमच्या स्वाधीन ही संस्था करण्यापेक्षां ही संस्था मेलेली मला पत्करेल, पण मी तुमचं म्हणणं कधींही मान्य करणार नाहीं.' श्री. वर्तक इतके भडकलेले पाहून नानासाहेब एकदम चूप झाले. त्यानंतर त्यांनीं तोंडांतून एक शब्दही काढला नाही.

वर्तकांचा राग लवकरच ओसरला. आमच्याकडे वळून ते हसत हसत म्हणाले, 'हें पाहा डॉक्टर, मी माझी ही संस्था तुमच्या स्वाधीन करायला कबूल आहे. मी या संस्थेसाठीं किती झीज सोसली हें तुम्हांला माहीत आहेच. या संस्थेमध्यें मी कमीत कमी दहा हजार रुपये ओतले आहेत, परंतु त्याचं कांहीं चीज झालं नाहीं. आतां ही संस्था बंद करायची कीं तुमच्यासारख्यांच्या हवाली करायची एवढाच एक प्रश्न माझ्यापुढें उभा आहे. तुम्ही जर तिला पुढें जगवणार असलां तर मला फार आनंद होईल. तुमच्याशीं पूर्ण सहकार्य करण्याची माझी तयारी आहे. परंतु माझ्या एकट्याच्यानें आतां हें काम झेपणार नाहीं. मी त्यांना म्हटलं, कीं 'ही नाट्यमन्वंतर नामशेष व्हावी किंवा तिचं जें स्वरूप आहे त्याच्यापेक्षां प्रतिगामी स्वरूपांत पुन्हा उदयास यावी, हें आम्हांपैकीं कुणालाही पसंत पडणार नाहीं. म्हणून आम्हीं नाट्य-मन्वंतरची जबाबदारी घ्यायला तयार आहोंत. प्रश्न असा आहे कीं नाट्यमन्वंतरला आतांपर्यंत जें कर्ज झालं आहे, ती जबाबदारी आमच्यापैकीं कुणीही घ्यायला तयार होणार नाहीं.' तेव्हां वर्तक म्हणाले, 'नाट्यमन्वंतरला एकंदर जें कर्ज आहे, त्यापैकीं सर्वांत मोठा भाग नाट्यमन्वंतरनं माझ्याकडून घेतलेल्या कर्जाचा आहे. इतर कर्ज अगदींच मामुली आहे. तेव्हां तुम्ही असं करा, कीं नाट्यमन्वंतर पूर्व स्थितीवर आणीपर्यंत माझ्या कर्जापैकीं तुम्ही एक पैसासुद्धां देऊं नका. नाट्यमन्वंतर चांगल्या स्थितीला येईपर्यंत मी तुमच्याकडे पैसासुद्धां मागणार नाहीं. मग तर झालं ना?'

वर्तकांनीं असें म्हटल्यानंतर काळे मला म्हणाले, 'वर्तक असं म्हणताहेत खरं. पण आम्हाला त्याप्रमाणें ते लिहून देतील का?' काळ्यांचा हा प्रश्न मी वर्तकांच्यापुढें टाकला. तेव्हां ते लगेच उठले आणि त्यांनीं आम्ही सांगितल्याप्रमाणें एक पत्र ताबडतोब लिहून दिलं. अर्थात् यानंतर आम्ही नाट्यमन्वंतरची जबाबदारी स्वतःकडे घेतली.

नाट्यमन्वंतर आमच्या ताब्यांत आल्यानंतर काय करायचं याचा मी मनाशीं विचार करूं लागलों. काळे त्यावेळीं, मला वाटतं, ठाण्याला राहात होते आणि काणेकर आपल्या लग्नाच्या भानगडींत होते. नवयुग प्लेअर्सतर्फे ज्या दोन नाटकांच्या तालमी चालल्या होत्या, त्या पुऱ्या व्हायला आणखी ४।६ महिने लागले असते. निदान २।३ महिने तरी खास लागले असते. म्हणून मी नाट्यमन्वंतर पुण्याला न्यायचं ठरवलं. नाट्यमन्वंतरचीं जुनी नाटकं म्हणजे 'आंधळ्यांची शाळा', 'लपंडाव' वगैरे त्या ठिकाणीं करून दाखवायचीं, असा मी विचार केला. 'आंधळ्याच्या शाळें'त काम करण्यासाठीं पद्मावती वर्तक आणि ज्योत्स्ना भोळे यांचीच जरुरी होती. वर्तकांनीं पद्मावतीबाईंना पुण्याला पाठवण्याचं आनंदानं कबूल केलं. म्हणजे ज्या ज्या वेळीं 'आंधळ्यांच्या शाळे'चा प्रयोग होईल, त्या त्या वेळीं त्यांनीं मुंबईहून पुण्याला यायचं असं ठरलं. पुढला प्रश्न ज्योत्स्नाबाईंचा. त्यावेळीं केशवराव भोळे प्रभात कंपनींत संगीत दिग्दर्शकाचं काम करीत होते. पगारही त्यांना चांगला मिळत होता. पुण्याला ज्या ज्यावेळीं मी जात असें, त्या त्यावेळीं त्यांच्याकडेच उतरत असल्यामुळें मी त्यांना म्हटल्याबरोबर ज्योत्स्नाबाईंना बिंबाचं काम करण्यास त्यांनीं पाठवलं. 'आंधळ्यांच्या शाळे'चे प्रयोग पुण्याला बरेच यशस्वी झाले आणि मिळालेल्या उत्पन्नांतून मुंबईंत झालेल्या कर्जाचं बरंच निवारण मी करूं शकलों. मला पुण्याला सतत राहाणं शक्य नव्हतं. कारण त्यावेळीं मी संडे ॲडव्होकेटचा संपादक होतों. म्हणून शनिवारीं काम संपल्यानंतर डेक्कन क्वीननें मी पुण्याला जात असें आणि त्याच गाडीनं सोमवारीं सकाळीं परत येत असें. 'आंधळ्यांच्या शाळे'चे प्रयोग जरी यशस्वी झाले, तरी तें फार दिवस चालणं शक्य नव्हतं. मध्यंतरी हे प्रयोग चालू असतांच केशवराव दात्यांनीं प्रभातमध्यें नोकरी धरली. म्हणून त्यांना नाट्यमन्वंतरकडे विशेष लक्ष द्यायला वेळ मिळेना. काळ्यांनीं मात्र 'बुवा' नाटकाच्या तालमी सतत चालू ठेवल्या होत्या. तालमी पुऱ्या झाल्यानंतर काळ्यांनीं 'बुवा' नाटक रंगभूमीवर आणलं. परंतु तें माझ्या अपेक्षेप्रमाणें अयशस्वी ठरलं. मुंबईमध्यें नाट्यमन्वंतरचं कर्ज जरी बहुतेक निवारलं होतं, तरी पुण्यांतील कर्जाचा बोजा मात्र वाढतच होता. दात्यांनीं 'उसना नवरा' हें नाटक रंगभूमीवर आणलं. 'उसना नवरा'तील मालतीचं काम ज्योत्स्नाबाईंची बहीण प्रेमा हिला देण्यांत आलं. कै. डॉ. रानडे यांना अरविंदाचं काम देण्यांत आलं आणि

दात्यांनीं बाबूरावाची भूमिका केली होती. स्त्रियांच्या आणखी दोन भूमिका या नाटकांत आहेत, त्या सौ. वसिष्ठ आणि सौ. पुराणिक यांना देण्यांत आल्या होत्या. हें नाटक रंगभूमीवर फारच लोकप्रिय ठरलं. परंतु लोकप्रिय नाटक झालं तरी तें मराठी रंगभूमीवर किती दिवस टिकणार! मला आतां बरोबर आठवत नाहीं, 'लपंडाव' या नाटकाचे आम्ही कांहीं प्रयोग केले असावेत. परंतु यावेळीं आमचा पुण्याचा सीझन संपला होता, म्हणून पुण्याहून कंपनी सोलापूरला न्यावी असं आम्ही ठरवलं. याच वेळीं 'संडे ॲडव्होकेट' बंद पडला, कारण मी आजारी पडलों होतों आणि नागपूरहून परत येऊन लीलानं सागर कंपनींत नोकरी धरली होती. मला रोज ताप येत असताही मी कंपनी सोलापूरला नेण्याचं ठरवलं, परंतु आम्ही सोलापूरला जाण्यापूर्वींच पुण्याला आमच्या कंपनींत एक पेंचप्रसंग निर्माण झाला.

कंपनींतील नटनटींनीं काळ्यांच्या विरुद्ध कट केला. त्याला कारणं काय झालीं तीं मी इथं सांगत बसत नाहीं. परंतु ते सर्वजण मला म्हणाले कीं, 'काळे जर आमच्या-बरोबर येणार असतील तर आम्ही सोलापूरला येत नाहीं.' मला मोठी पंचाईत पडली. कांहीं झालं तरी काळे माझे मित्र. त्यांच्याविरुद्ध या लोकांनीं काय कट केला होता तोही मला माहीत होता. त्यांत काळ्यांचा मुळींच दोष नव्हता. परंतु मी अडचणींत सांपडलों. काळ्यांची बाजू घ्यावी तर कंपनी सोलापूरला नेणं अशक्य होतं आणि सर्वच लोकांनीं डॉ. रानड्यांच्या चिथावणीमुळे संप पुकारला होता. बरं, त्यांची बाजू न घ्यावी तर काळ्यांना अन्याय करण्यासारखं होतं. या अडचणींतून मार्ग काढण्या-साठीं मी कंपनीच्या डायरेक्टरांची तांतडीची सभा बोलावली. कारण सर्व डायरेक्टर पुण्यासच होते. त्या सभेमध्यें मी सर्व वस्तुस्थिति काळ्यांच्या समोर मांडली. तेव्हां काळे लगेच म्हणाले, 'हें पाहा डॉक्टर, तुम्ही इतके काळजींत कां पडलां तेंच मला समजत नाहीं. तुम्हांला नाट्यमन्वंतर जगवायचं आहे ना! मग तुम्ही माझा विचार करूं नका. मी इथंच पुण्याला राहातों. तुम्ही नाट्यमन्वंतर घेऊन सोलापूरला जा. तुम्ही माझी कांहीं काळजी करूं नका. प्रभात कंपनीचे डायरेक्टर व्ही. शांताराम यांनीं मला बोलावणं पाठवलंच आहे. तेव्हां त्या कंपनींतच नोकरी धरीन. सोलापुरांत काम करायला — माझं काम करायला कुणी माणूस मिळणार नाहीं हें मला ठाऊक आहे. म्हणून जेव्हां माझी तुम्हांला गरज असेल तेव्हां तुम्ही मला तावडतोब तार करा. मी लगेच येईन. तुमच्याविषयीं माझ्या मनांत कधींच गैरसमज उत्पन्न होणार नाहीं.' काळे यांचे हे उद्गार ऐकल्यानंतर असा निस्वार्थी मित्र मला लाभल्याबद्दल माझी मलाच धन्यता वाटली. यापूर्वी दात्यांनीं शनिवार–रविवारीं 'आंधळ्यांच्या शाळे'च्या प्रयोगासाठीं येण्याचं कबूल केलं होतं.

सोलापुरांत गेल्यानंतर नाट्यमन्वंतरचे प्रयोग व्यवस्थित रीतीनं सुरू झाले. 'आंधळ्याच्या शाळे'तील सुशीलेचं काम सौ. विमलाबाई वसिष्ठ या करीत. बाकीचे सर्व नट-नटी पूर्वींचेच होते. आम्हाला उत्पन्नही बरं झालं. म्हणजे सगळा खर्च जाऊन आम्हाला थोडं फार कर्जाचं निवारणही करता आलं. इतक्यांत आमच्यावर एक आपत्ति ओढवली. सोलापूरच्या प्रखर उन्हामुळं माझा ताप कमी होत होता, परंतु त्याच उन्हामुळें विमलाबाईच्या मुलाला एकाएकीं सनस्ट्रोक झाला. कंपनींत सर्वांचीच धांवपळ आणि धांदल सुरू झाली. डॉक्टरला बोलावून योग्य ते उपचार केले. मुलाला थोडं बरं वाटूं लागलं खरं, पण ज्योत्स्नाबाई मात्र फारच घाबरल्या. त्यांचा मुलगा किशोर हा त्यावेळीं अगदींच लहान होता. सोलापुरांतील उन्हाचा आपल्या मुलावर कांहीं परिणाम होईल की काय अशी त्यांना भीति वाटून त्या ओक्साबोक्शीं रडूं लागल्या. त्यांचं सान्त्वन कसं करावं तें मला कळेना. शेवटीं मी एक मनाशीं निश्चय केला नि त्यांना सांगितलं, कीं ' दुर्गाताई, किशोरला घेऊन तुम्ही पुण्याला जा. इथं आमचीं नाटकं बंद पडलीं तरी चालतील. परंतु तुम्हांला अशा मनस्थितीत या ठिकाणीं ठेवून घेणं मला प्रशस्त वाटत नाहीं. ' दुसरे दिवशीं किशोरला घेऊन ज्योत्स्नाबाई दात्यांच्याबरोबर पुण्याला निघून गेल्या. ज्योत्स्नाबाईची ' बिंबा 'ची भूमिका आम्ही प्रेमाला दिली आणि ' आंधळ्यांच्या शाळे ' चे प्रयोग पुन्हां सुरू झाले. एक दोन महिने गेल्यानंतर सोलापूरचा सीझन संपला. आम्ही परत पुण्याला जाण्याची तयारी करूं लागलों. ज्या दिवशीं आम्ही निघणार त्याच्या आदल्या दिवशींच्या प्रयोगाचं उत्पन्न मी प्रवास खर्चासाठीं राखून ठेवणार होतों. परंतु आमचे त्यावेळचे मॅनेजर श्री. शुक्ल यांच्याकडून त्या उत्पन्नांतील बरीच मोठी रक्कम श्री. दाते यांनीं घेतली आणि त्याच रात्रीं ते पुण्याला निघून गेले. सकाळीं उठल्याबरोबर ' प्रयोगाचं उत्पन्न किती झालं ? ' म्हणून मी शुक्लांना विचारलं. शुक्ल म्हणाले, ' उत्पन्न तसं बरं झालं. परंतु त्यांतील बरीच मोठी रक्कम दात्यांनीं माझ्याकडून मागून घेतली आहे. ' मला दात्यांचा आणि शुक्लांचाही खूप राग आला. बेशिस्त वर्तन केल्याबद्दल मी शुक्लांना बोललोंही. पण नुसता राग येऊन काय उपयोग !

पुण्याला कंपनी परत न्यायची कशी हा माझ्यापुढं मुख्य प्रश्न होता. विशेषतः ' तक्षशीले 'चं इतकं अवाढव्य सामान न्यायला आणि आमचा कामगारवर्ग आणि नटनटींना न्यायला पुरण्याइतका पैसा माझ्याजवळ नव्हता. शिवाय थिएटरचं भाडं द्यायचं होतं तें वेगळंच. शेवटीं मी असं ठरवलं कीं, थिएटर मालकाच्या ताब्यांत ' तक्षशिले 'चं सामान ठेवायचं आणि कामगार लोकांची जेवणाखाण्याची तात्पुरती व्यवस्था सोलापुरांतच करून बाकीच्यांना मी मोटारबसनं पुण्याला न्यायचं. पुण्याला आल्यानंतर आम्ही बादशाही बोर्डिंगांतच उतरलों हें सांगायला नकोच. यावेळेस

दाते व काळे यांनीं प्रभातमध्यें नोकरी धरल्यामुळें मी आणि काणेकर असे दोघेच कंपनीची व्यवस्था पाहाण्यास शिल्लक राहिलों होतों. हातामध्यें पैसा नाहीं आणि कंपनीचा रोजचा खर्च सारखा वाढत चाललेला. शिवाय आमच्या कामगार लोकांना सोलापूरला ठेवून दिलं होतं तें वेगळंच. आम्ही दोघे या गोष्टीचा सारखा विचार करीत असूं, परंतु एकमेकांच्या तोंडाकडे पाहात बसण्यापलीकडे आम्ही कांहींच करूं शकलों नाहीं. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट एकच होती कीं, माझा ताप साफ नाहींसा झाला होता आणि माझी प्रकृति थोडी थोडी सुधारूं लागली होती. हा वैयक्तिक उल्लेख या ठिकाणीं करण्याचं कारण इतकंच कीं, माझा ताप जर तसाच राहिला असता तर कंपनी बंद करून मला मुंबईला परत गेल्याशिवाय गत्यंतर नव्हतं. असे हे दिवस चालले असतांना आमचे सोलापुरांतील कामकरी लोक कंटाळले. ते पुण्यापर्यंत पायीं चालत आले. अर्थात् त्यांची बोर्डिंगामध्येंच मी व्यवस्था केली हें खरं, परंतु आम्हांला वाईट वाटत होतं तें हेंच कीं, आमच्या कंपनींत हे लोक निव्वळ पोटावारी राहून काम करीत होते. कंपनींतून त्यांना वेळेवर पगार मिळत होता अशांतली गोष्ट नव्हे. या लोकांना आमच्यामुळें विनाकारण त्रास झाला याचं मला तर दुःख होत होतं, परंतु मला कांहीं बोलतांच येत नव्हतं. नेहमीं शांत दिसणारे काणेकर मात्र खूप खवळले. त्यांनीं नाट्यमन्वंतरच्या आद्यप्रवर्तकांना एक दोन शिव्या हासडल्या, आणि नंतर ते म्हणाले, ‘ कुठं झक मारली नि या नाट्यमन्वंतरच्या भानगडींत पुन्हां पडलों. पण हा सगळा घोटाळा तुमच्यामुळें झाला. कंपनीचा इतका खटाटोप आपण करतों, पण आपल्याला एक पैचीही प्राप्ति होत नाहीं. त्रास मात्र फार. हे लोक आतां सोलापूरहून चालत आले, यांत केवढी बदनामी झाली ! ’ मी काणेकरांना म्हटलं, ‘ असं चिडून जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. नाट्यमन्वंतरची बिघडलेली घडी नीट करण्यासाठीं तर आपण संस्था घेतली ना. ती नीट जर झाली नाहीं तर खरा दोष कांहीं आपल्यावर येत नाहीं. आपण शक्य तितका प्रयत्न करून पाहिला. आतां आपल्याला कांहींच करतां येत नाहीं. म्हणून नाट्यमन्वंतर बंद करूं आणि स्वस्थ बसूं. ’ काणेकर म्हणाले, ‘ अहो, स्वस्थ बसायचं तर आहेच आपल्याला, पण त्यापूर्वी आपल्याला थोडे हातपाय हलवायला नकोत का ? मी म्हणतों, नाट्यमन्वंतर इतक्या चांगल्या परिस्थितीत निघालं असतांना त्याची अशी आज हलाखीची परिस्थिति कां व्हावी ? ’ मी त्यांना म्हटलं, कीं ‘ नाट्यमन्वंतरची अशी परिस्थिति व्हायला दोन गृहस्थ जबाबदार आहेत. श्री. वर्तक आणि श्री. दाते. वर्तकांनीं आपल्या स्वतःच्या नाटकावर इतका अवाढव्य पैसा खर्च केला नसता तर नाट्यमन्वंतरची घडी कधीं बिघडली नसती. विशेषतः ‘ तक्षशीले ’ वर त्यांनीं जो अवाढव्य खर्च केला, त्यानं नाट्यमन्वंतरची तर कंबरच मोडून गेली. तरीसुद्धां वर्तकांचा मला तितका राग येत नाहीं. उलट त्यांचं कौतुक करावंसं वाटतं. कारण

त्यांनीं नाट्यमन्वंतरद्वारें आपली हौस भागवून घेतली असं जरी आपण म्हटलं, तरी या हौशीखातर त्यांनीं एक, दोन नव्हे दहा हजारांची झीज सोसली आहे आणि त्यांना माहीत आहे कीं आपण त्यांना त्यांतली एक पैही देऊं शकणार नाहीं. माझा खरा राग आहे केशवराव दात्यांवर मुंबईमध्यें वर्तकांच्या हातीं सर्व सूत्रं असल्यामुळें कांहीं करतां आलं नाहीं हें कबूल, पण पुण्याला कंपनी आल्यावर आपण ती त्यांच्या स्वाधीन केली नव्हती का ? पुण्याला जुन्या नाटकांचे प्रयोग चालू असतां या गृहस्थानं प्रभात कंपनींत नोकरी करण्याशिवाय दुसरं कांहींच केलं नाहीं. सोलापूरला आम्हाला प्रवासखर्चापुरते सुद्धां पैसे जमवतां आले नाहींत. त्यालाही दातेच जबाबदार आहेत. आज जर कंपनीची वाताहत झाली तर त्याची जबाबदारी तुमच्यावर नाहीं, माझ्यावर नाहीं, किंवा वर्तकांवरही नाहीं; त्याची सर्व जबाबदारी दात्यांवर पडते.'

काणेकर म्हणाले, 'तुम्ही म्हणतां ते खरं आहे. पण आतां पुढें काय करायचं ? कांहीं दिवसांपूर्वी बाबूराव पेंढारकर म्हणाले होते, कीं नाट्यमन्वंतरसारखी संस्था जर जिवंत राहिली तर तिच्यापासून फिल्म कंपनीला फायदा आहे. म्हणून मी म्हणतों, कोल्हापूरला जाऊन बाबूरावांना भेटतों आणि बघतों ते आपल्याला कांहीं मदत करतात का!' बुडत्याला काडीचा आधार म्हणून मी म्हटलं, 'तुम्ही कोल्हापूरला जा आणि कांहीं जमतं कीं नाहीं तें पाहा.' काणेकर त्याच रात्रीं कोल्हापूरला निघून गेले आणि एक, दोन दिवसांनीं बाबूरावांकडून एक हजार रुपये घेऊन परत आले. झालं. आम्हांला तात्पुरती मदत मिळाली आणि नाट्यमन्वंतर जगण्याची आशा वाटूं लागली. मी दुसऱ्या दिवशीं सोलापूरला जाऊन तिथलं देणं देऊन टाकलं आणि नाट्यमन्वंतरचं राहिलेलं सामान घेऊन परत आलों.

किर्लोस्कर थिएटर त्यावेळीं आम्हांला शनिवारीं-रविवारीं मिळण्यासारखं नव्हतं. म्हणून आम्ही मंगळवारीं रात्रीं ९॥ वाजतां 'आंधळ्यांची शाळा' करण्याचं ठरवलं. ज्योत्स्नाबाई त्यावेळीं मुंबईस मो. ग. रांगणेकरांच्या 'सुवर्ण मंदिरां'त काम करीत होत्या. रविवारीं, मला वाटतं, मी आणि काणेकर मुंबईस गेलों. मंगळवारीं रात्रीं प्रयोग करायचं ठरलेलं. म्हणून ज्योत्स्नाबाईंना आणण्यासाठीं मुंबईस आलों होतों. त्यावेळीं विमलाबाई वसिष्ठही मुंबईला आल्या होत्या. ज्योत्स्नाबाईंचं शूटिंग चालू असल्यामुळें त्या म्हणाल्या, 'मी फक्त मंगळवारीं प्रयोगापुरतीच येऊं शकेन. मात्र दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनं मला ताबडतोब परत यायला हवं.' ज्योत्स्नाबाईंना भेटल्यानंतर आम्ही दोघे विमलाबाईंच्या घरीं गेलों आणि 'आंधळ्यांच्या शाळें'तील सुशीलेची भूमिका करायला येता का म्हणून आम्ही त्यांना विचारलं. माझा प्रश्न खरोखर औपचारिक होता. कारण ती भूमिका करण्यास कृष्णाबाई पुराणिक तयार होत्याच. ती

भूमिका त्यांनीं एक दोनदां चांगली वठवली होती. म्हणून त्यांनीं ' नाहीं ' म्हटल्याबरोबर मी विशेष कांहीं आग्रह धरला नाहीं. आम्ही दोघे निघालों. रस्त्यांतून चालतां चालतां मी काणेकरांना म्हणालों, ' हें पाहा, बाकीची सर्व व्यवस्था करण्यासाठीं मी पुण्याला जातों. बाकीची कुठलीही फिकीर तुम्ही करूं नका. पण तुमच्यावर एक अत्यंत महत्त्वाची अशी जबाबदारी आहे आणि ती म्हणजे मंगळवारीं संध्याकाळीं पूना मेलनं किंवा डेक्कन क्वीननं ज्योत्स्नाबाईंना घेऊन पुण्याला आलंच पाहिजे. तुमच्या नेहमींच्या स्वभावाला अनुसरून तुम्ही कुठं तरी गप्पा मारीत बसाल आणि महत्त्वाची बाब विसरून जाल तर तें चालायचं नाहीं. आणखी एक गोष्ट तुम्हांला सांगून ठेवतों, विमलाबाईंना पुण्याला यायचा आग्रह करूं नका. '

मंगळवारीं रात्रीं ९॥ वाजले. मी सात वाजल्यापासून बॉक्स ऑफिसमध्यें बसून होतों. त्या दिवशींचीं तिकिटं आठ वाजण्यापूर्वींच संपलीं होतीं आणि ज्यांना तिकिटं मिळालीं नव्हतीं, त्या मंडळींचा जमाव थिएटरच्या बाहेर सारखा इकडे तिकडे फिरत होता. त्या प्रयोगांत काळे काम करणार होते. कारण मी त्या दिवशीं दुपारीं त्यांच्या स्टुडिओंत जाऊन ' या प्रयोगांत तुम्ही काम केलंच पाहिजे ' अशी मी त्यांना गळ घातली. त्यांनीं या प्रयोगांत काम करण्यासाठीं व्ही. शांतारामची परवानगी मागून घेतली होती. काळे थिएटरवर ८।–८॥ च्या सुमारास आले आणि बॉक्स ऑफिसमध्यें माझ्या शेजारीं येऊन बसले. आमच्या थोडा वेळ गप्पा झाल्यानंतर मीं त्यांना म्हटलं, ' तुम्ही आतां मेकप करायला आंत जा पाहूं. बाकीची सर्व मंडळी आतां मेकप करून वाट पाहात बसली असेल. ' काळे म्हणाले, ' मला मेकप करायला कितीसा वेळ लागणार ? पण दुर्गाताई आल्या नाहींत त्याचं काय ? त्या आल्या नाहींत तर आज खेळ बंद ठेवावा लागेल ना ? मग मी मेकप करून काय उपयोग ? ' असं म्हणून ते तिथंच बसून राहिले. माझी कल्पना होती कीं, नऊच्या सुमारास काणेकर ज्योत्स्नाबाईंना घेऊन येतील. परंतु नऊ वाजले, सवानऊ झाले, साडेनऊचा ठोका पडला. साडेनऊच्या पूर्वीं एकानं स्टेशनवरून अशी बातमी आणली होती कीं, अतिवृष्टीमुळें मुंबई – पुण्यामधील रेल्वे कल्याणच्या आसपास कुठं तरी तुटली होती. ही बातमी ऐकल्याबरोबर आम्हां सर्वांचा धीरच खचला आणि मी काळ्यांना सांगितलं कीं, तुम्हीं आतां स्टेजवर जाऊन जाहीर करा कीं आजचा खेळ होत नाहीं. यावेळीं मला वाटतं ९॥। झाले होते. काळे जाहीर करण्यासाठीं पडद्याच्या बाहेर आले. आमचा ऑर्केस्ट्रा नेहमीं आंतल्या बाजूस असल्यामुळें बाहेर ऑर्केस्ट्राची असलेली जागा आम्ही वापरीत नव्हतों, म्हणून ती जागा आम्ही कॅन्व्हास टाकून बंद करून घेतली होती. या कॅन्व्हासखालीं एक पोकळ जागा आहे याचं काळ्यांना भान राहिलं नाहीं. आपलं भाषण करण्यासाठीं म्हणून काळ्यांनीं आपलं पाऊल पुढं टाकलं आणि त्यांच्या तोंडांतून शब्द बाहेर पडण्यापूर्वींच ते एकदम

अंतर्धान पावले! आपल्यापुढें बोलणारा माणूस कुठं गेला याची प्रेक्षकांना नीटशी कल्पना आली नव्हती असं मला वाटतं. कांहीं वेळानं काळे बाहेर आले आणि मला 'जातों' असं म्हणाले. परंतु थिएटरच्या बाहेर पडतात न पडतात तोंच त्यांना दुर्गाताईंची मोटार दिसली आणि 'दुर्गाताई आल्या' असं सांगून मेकप करण्यासाठीं ते आंत निघून गेले. दुर्गाताई आल्याबरोबर तडक मेकप करण्यासाठीं आंत गेल्या. त्यांच्याबरोबर विमलाबाईही आल्या होत्या. त्याही त्यांच्याबरोबर आंत गेल्या. पंधरा एक मिनिटांनीं केशवराव दाते बाहेर आले आणि म्हणाले, 'कृष्णाबाई आणि विमलाबाई यांचं भांडण जुंपणार असं मला वाटतं. तेव्हां तुम्ही आंत या आणि त्यांच्या भांडणाचा निकाल लावा.' मी मनांतून काणेकरांवर खूप चरफडलों आणि रंगपटांत गेलों. पाहातों तर कृष्णाबाई मेकप करून अगोदरच तयार होत्या. परंतु विमलाबाई मुद्दाम या खेळांत काम करण्यासाठीं आल्या होत्या त्यांना नाहीं कसं म्हणायचं? म्हणून मी कृष्णाबाईंची कशीबशी समजूत केली. तेव्हां त्यांनीं रंग काढला आणि कांहीं न बोलतां त्या घरीं निघून गेल्या. खेळाला बरोबर १०॥ वाजतां सुरुवात झाली. हा खेळ अतिशय रंगला असं प्रेक्षकांच्या बोलण्यावरून मला कळलं. हा प्रयोग होऊं शकला याचं खरं श्रेय काणेकरांनीं अगदीं अनपेक्षितरीत्या दाखवलेल्या प्रसंगावधानाला आहे. मुंबई--पुण्यामधील रेल्वे लाईन तुटल्यामुळें त्यांना रेलगाडीनं प्रवास करतां येणं शक्य नव्हतं. म्हणून काणेकरांनीं मोटारनं पुण्याला यायचं ठरवलं. ही जी समयसूचकता त्यांनीं दाखवली, ती त्यांच्या नेहमींच्या आळशी स्वभावाला अनुसरून नव्हती. म्हणूनच मला त्यांच्या पराक्रमाचं विशेष कौतुक वाटलं.

'उसना नवरा' करण्याच्या वेळीं एक पेचप्रसंग निर्माण झाला. डॉ. रानडे आणि प्रेमा यांनीं आपसांतच आपलं लग्न ठरवलं. डॉ. रानडेची पहिली बायको जिवंत होती, म्हणून आम्हांला हें लग्न मुळींच पसंत नव्हतं. परंतु पेचप्रसंग निर्माण होण्याचं हें कांहीं खरं कारण नव्हे. खरं कारण हें होतं कीं डॉ. रानडे कंपनीमध्यें फारच अरेरावीचं वर्तन करूं लागले होते. त्यांना वाटूं लागलं होतं कीं त्यांच्याशिवाय आणि प्रेमाशिवाय कंपनी चालणं शक्य नाहीं, म्हणून ते वाटेल तशा मागण्या करूं लागले. मलाही त्यांनीं एक दोनदा उद्धट उत्तरं दिलीं. म्हणून एके दिवशीं सकाळीं मी रानड्यांना बोलावलं. त्यांच्याविषयीं मला खरोखरच आदर वाटत नव्हता. कारण त्यांनीं काळ्यांशीं पुण्याला आणि सोलापूरला अत्यंत नीचपणाचं वर्तन केल होतं. सोलापुरांत घडलेली हकीगत तर माझ्या स्मरणांत अजून ताजी आहे. त्या दिवशीं 'बुवा' नाटकाचा प्रयोग झाला. माझ्या नेहमींच्या संवयीप्रमाणें मी दहा वाजण्याच्या आंत झोपलों होतों. दुसऱ्या दिवशीं पहाटेस काळे आणि कंपनींतील दुसरी कांहीं मंडळी विजापुरांतील प्रेक्षणीय स्थळं पाहाण्यास गेली होती. सकाळीं सात वाजण्याच्या सुमारास मी जागा झालों आणि

तोंड धुऊन चहा पीत असतांना प्रेमा रडतरडतच माझ्याकडे आली. ती मला म्हणाली, ' काल रात्रींच्या प्रयोगामध्यें काळ्यांनीं माझा हात जोरानं हिसकला. त्यामुळें माझ्या बांगड्या तर फुटल्याच परंतु ते अशा कांहीं विचित्र नजरेनं माझ्याकडे पाहात होते कीं मला त्यांची भीति वाटूं लागली. यापुढें काळे जर ' बुवा ' नाटकांत काम करणार असतील तर मी त्या नाटकांत मुळींच काम करणार नाहीं.' प्रेमाचे हे उद्गार ऐकून मला फारच आश्चर्य वाटलं आणि तिचा मला रागही आला. परंतु मी तो माझ्या चेहेऱ्यावर दिसूं दिला नाहीं. मी तिला शांतपणानं म्हटलं, ' हें पाहा प्रेमा, तूं काळ्यांवर दुसरे वाटेल ते आरोप कर, ते मी ऐकून घेईन. पण काळ्यांसारख्या माणसावर हा जो घाणेरडा आरोप करतेस तो मी ऐकून घेणार नाहीं. काळ्यांना मी आज कित्येक वर्षे ओळखतों. त्यांनीं आपल्या भूमिकेंत रंगल्यामुळें तुझा हात जोरानं ओढला असेल, मी नाहीं म्हणत नाहीं, पण त्यामुळें त्यांचा त्यांत वाईट हेतु होता असं मानायला मी मुळींच तयार नाहीं. तुला ' बुवा ' नाटकांत काम करायचं नसेल तर नको करूंस. ' संध्याकाळीं काळे विजापूरहून परत आले. त्यावेळीं मी त्यांना रागाचा आव आणून ह्याचा जाब विचारला. काळे फक्त हसले आणि म्हणाले, ' वेडी आहे प्रेमा. मी तिची समजूत घालतों. ' परंतु त्यांना तिची समजूत घालतां आली नाहीं. शेवटीं डॉ. रानडे मला म्हणाले, ' मी घालतों तिची समजूत. ' पण काय असेल तें असो. त्यांनीं तिची समजूत घातली. या सर्व घटनेच्या मुळाशीं डॉ. रानड्यांना काळ्यांविषयीं वाटणारा द्वेष होता हें सोलापुरांत असतांनाच मला कळून चुकलं होतं, म्हणून रानडे ज्यावेळीं माझ्या खोलींत आले, तेव्हां कोणतीही औपचारिक प्रस्तावना न करतां मीं त्यांना सांगितलं कीं, ' आजपासून तुमचा नि प्रेमाचा आमच्या कंपनीशीं मुळींच संबंध राहिलेला नाहीं. तुम्हा दोघांना जीं कांहीं व्यवस्था करायची असेल ती करा. ' माझे उद्गार ऐकून रानड्यांना बरंच आश्चर्य वाटलं. परंतु त्यांना त्यावर कांहीं बोलण्याचा धीर झाला नाहीं. रानडे कांहीं वेळानं माझ्या खोलींतून निघून गेले.

ही हकीगत मी काणेकरांना सांगितली. तेव्हां ते म्हणाले, ' तुम्ही तर कंपनी बंद करण्याचा निश्चय केलेला दिसतो. ' आंधळ्याच्या शाळे ' चे प्रयोग आतां आपल्याला करतां येणं शक्य नाहीं. कारण दुर्गाताईंना आतां मुंबई सोडून इकडे येतां येणार नाहीं. ' उसना नवरा ' हा आतां एकच आपला हुकमी एक्का आणि तोही तुम्ही गमावून बसलांत. बरं झालं. दगदग गेली आपल्या मागची. आतां यापुढं नाट्य-मन्वंतरमुळें माझी झोपमोड व्हायला नको. ' असं म्हणत ते हसतच सुटले. पण माझी मात्र विलक्षण मनस्थिति झाली होती. या दोघांना कंपनींतून घालवून देण्यांत माझी चूक झाली कीं काय असा संशय माझ्या मनाला क्षणभर चाटून गेला, पण तो

क्षणभरच. रानडे आणि प्रेमा यांना परत कंपनींत बोलावणं मला शक्य झालं नसतं. तेव्हां नवीन माणसं आतां कोण मिळणार, तीं पाहाण्यासाठीं काणेकर आणि मी मुंबईला आलों.

# २०



याच सुमारास काणेकरांच्या लग्नाची धांदल. काणेकरांनीं सुनंदा नांवाच्या मुलीशीं लग्न करायचं ठरवलं होतं. मुलगी होती फारच गोड. इतकी गोड होती कीं, मला ती प्रत्यक्ष मुलीपेक्षांही प्रिय वाटत होती, परंतु तिचा जन्म झाला होता एका पतित समजल्या जाणाऱ्या जातीमध्यें. पण काणेकर पडले पुरोगामी वृत्तीचे. त्यांना जात-पात कसली ! त्यांच्या आईला हें लग्न मुळींच पसंत नव्हतं. काणेकरांचं लग्न मुजफराबाद हॉलमध्यें होण्याचं ठरलं होतं. सुनंदा अल्पवयी असल्यामुळें तें लग्न १८७२ च्या कायद्या-प्रमाणें रजिस्टर लग्न होऊं शकत नव्हतं. म्हणून सुंदरराव वैद्यांना बोलावून त्यांच्या-कडून विवाहविधि करून घ्यायचा असं आम्हीं ठरवलं. ज्या दिवशीं काणेकरांचं लग्न व्हायचं होतं त्या दिवशीं सकाळीं काणेकर आपलं सामान घेऊन आपल्या मित्राकडे खेतवाडींत राहायला गेले होते. आपण आपल्या आईला दुखवलं ही गोष्ट काणेकरांच्या मनाला सारखी लागून राहिली होती. त्यावेळीं मी दादरला हिंदु कॉलनींत राहात असें. त्यांनीं सकाळींच मला बोलावणं पाठवलं. काणेकरांना मी त्यांच्या मित्राच्या घरीं जाऊन भेटलो. काणेकर अस्वस्थपणें सारखे येरझाऱ्या करीत होते. ते मला म्हणाले, ‘ माझ्या या लग्नाबाबत माझ्या आईचं मन दुखावलं गेलं आहे. तिनं नुसतं सुनंदेला एकदां पाहिलं तरी तिचा राग एकदम शांत होईल, परंतु ती माझं कांहीं ऐकतच नाहीं. तुम्हींच फक्त तिची समजूत घालूं शकाल. तुमच्याविषयीं तिला फार आदर वाटतो. तुम्ही संन्यासी होतां त्या वेळेपासून ती तुम्हांला सारखी पाहातेय. तुम्ही आमच्या घरीं जा आणि कसंही करून तिची समजूत घाला. ’ मी शांताराम शृंगारपुरेला घेऊन काणेकरांच्या घरीं गेलों. त्यावेळीं त्यांची आई कांहीं न खातांपितां पलंगावर पडून राहिली होती. मी आंत जाऊन खुर्चीवर बसलों तरी ती कांहीं पलंगावरून उठली नाहीं, इतकं तिचं मन अस्वस्थ झालं होतं. एरवीं मी काणेकरांच्या घरीं जात असें त्यावेळीं ती बाहेरच्या खोलींत न येतां आंतूनच माझी विचारपूस करीत असे. मी बोलायला सुरुवात केली तेव्हां ती उठून बसली आणि रागारागानं बोलूं लागली. बोलतां बोलतां तिला कांहीं भानच राहिलं नाहीं. एकदां तर ती असं म्हणाली कीं ‘ तुमच्या संगतीमुळें

माझ्या भाऊच्या डोक्यांत या भलत्या सलत्या कल्पना आल्या. ' मी तिला यावर कांहींच बोललों नाहीं. कारण तिच्या मनाला किती त्रास होत होता याची मला पूर्ण जाणीव होती. मी तिला इतकंच म्हटलं, कीं ' तुम्हीं म्हणतां तें कदाचित् खरं असेल. परंतु आज संध्याकाळीं तुमच्या भाऊचं लग्न आहे. समजा तुमचं म्हणणं मला पटलं आणि त्याला माघार घ्यायला लावली तर त्याचा काय परिणाम होईल याची तुम्हांला जाणीव आहे का ? वधूपक्षाकडील मंडळी वचनभंग केल्या-बद्दल भाऊवर फिर्याद करतील आणि त्याला तुरुंगांत जाऊन बसावं लागेल. ' आईच बिचारी ती ! माझे हे उद्गार ऐकल्याबरोबर ती कावरीबावरी झाली. लगेच ती उठून म्हणाली, ' तुम्ही म्हणतां तसं जर असेल तर त्यानं खुशाल त्या मुलीशीं लग्न करावं. माझी त्याला मुळींच हरकत नाहीं. तो कुठूनही सुखांत असला म्हणजे झालं. मी त्याच्यासाठीं लहानपणापासून जे इतके कष्ट सोसले ते काय त्याला तुरुगांत पाठविण्यासाठीं ? ' काणेकरांच्या आईची संमति मिळाली. इतकंच नव्हे तर आम्ही तिचं सांत्वन करूं शकलों याबद्दल धन्यता वाटून आम्ही बाहेर पडलों. मी शांतारामला काणेकरांकडे पाठवलं आणि मी दादरला निघालों. इतक्या सगळ्या गोष्टी होईपर्यंत एक वाजला होता आणि मला कडकडून भूक लागली होती. मी आमच्या बागेच्या फाटकाच्या आंत पाय ठेवतों तोंच काणेकरांकडून आलेल्या एका माणसानें आम्हांला पकडलं. तो म्हणाला, ' तुम्ही आतांच्या आतां परत चला. काणेकरांनीं तुम्हांला तांतडीनं बोलावलं आहे आणि काणेकरांच्या आईचं माथं पुन्हा भडकलं आहे, ती कुणाला ऐकत नाहीं. मी तसाच परत गेलों आणि टॅक्सी करून काणेकरांकडे आलों. काणेकर मला म्हणाले, ' कांहीं शहाण्या मंडळींनीं माझ्या आईला सुनंदेच्या आईविषयीं भलत्या सलत्या गोष्टी सांगितल्या आणि ती पुन्हां भडकली. तेव्हां पुन्हां तुम्ही जाऊन तिची समजूत करा. ' पुन्हां मी शांतारामला घेऊन त्यांच्या घरीं गेलों, परंतु कांहीं केलं तरी ती माझं बोलणं ऐकून घ्यायला तयार होईना. ती म्हणाली, ' माझा जीव गेला तरी चालेल. पण मी हें लग्न होऊं देणार नाहीं. तुमचे वैद्य ( म्हणजे प्रार्थनासमाजाचे द्वा. गो. वैद्य ) कसं लग्न लावतात तें मी पाहातें. पोलिसाना घेऊन मी लग्नाच्या जागीं येणार आहे. ' बिचाऱ्या द्वा. गो. वैद्यांचा या लग्नाशी कांहींच संबंध नव्हता. परंतु मी तिला त्या संबंधांत कांहींच बोलूं शकलों नाहीं. झालेली हकीगत काणेकरांना कळविण्यासाठीं मी शांतारामला पाठवला आणि मी दादरला निघून गेलों. त्यानंतर तिसऱ्या प्रहरीं चार वाजतां मुजफराबाद हॉलमध्यें सर्व व्यवस्था पाहाण्यासाठीं गेलो. काणेकर आणि त्यांचे दुसरे मित्र ५॥ वाजतां तिथं आले. सुनंदा आणि तिचे नातलग ६ वाजण्याच्या सुमारास आले. लग्न ६॥ वाजतां व्हायचं ठरलं होतं, म्हणून ६। वाजतां सुंदरराव वैद्य आल्यानंतर मी खालीं गेलों आणि जिन्याच्या

पायथ्याशीं उभा राहिलों. न जाणों काणेकरांच्या आईनं बोलण्याप्रमाणें केलं आणि खरोखरच पोलिसांना घेऊन आली तर ! पोलिस या बाबतींत कांहीं करूं शकत नव्हते, हें मला माहीत होतं. परंतु लग्नांत मात्र विनाकारण विघ्न उपस्थित झालं असतं, म्हणून कांहीं झालं तरी या लोकांना काणेकरांचं लग्न होईपर्यंत पहिल्या मजल्यावर जाऊं द्यायचं नाहीं अशा निश्चयानं मी जिन्याच्या पायथ्याशीं उभा होतों. परंतु कांहीं गडबड न होतां काणेकरांचं लग्न निर्विघ्नपणें पार पडलं. नंतर मी वर गेलों. तिथं गेल्यानंतर काणेकर मला म्हणाले, कीं 'सुनंदेला आतां तिच्या घरीं परत पाठवायची नाहीं.' मी म्हटलं, 'ठीक आहे. मी तुम्हां दोघांची कुठल्या तरी हॉटेलमध्यें आज रात्रीपुरती व्यवस्था करतों. मग पुढें काय करायचं तें आपण उद्यां ठरवूं.' काणेकर म्हणाले, 'नाहीं नाहीं. तें चालायचं नाहीं. मी आज इतका नर्व्हस झालों आहे कीं तुम्हांला सोडून मी कुठं जाणारच नाहीं. आम्ही आज तुमच्या घरींच राहाणार.' हे काणेकरांचे उद्गार ऐकल्यावर माझा नाइलाज झाला आणि त्या दोघांना घेऊन मी घरीं आलों. दुसऱ्या दिवशीं सकाळींच सुनंदेला घेऊन काणेकरांनीं पुण्याला जावं असं आम्हीं ठरवलं. पुण्याला एकाद्या शाळेंत रेखाला (म्हणजे सुनंदेला) घालायचं आम्हीं निश्चित केलं होतं. याप्रमाणें दुसरे दिवशीं सकाळीं काणेकर आणि त्यांची पत्नी पुण्याला निघून गेलीं.

काणेकर पुण्याला गेले खरे, पण नाट्यमन्वंतरचा प्रश्न तसाच शिल्लक राहिला. कंपनी आतां यापुढं चालवतां येणं शक्य नाहीं, ती आतां बंद केलीच पाहिजे, असे विचार माझ्या मनांत येतात न येतात तोंच लीला सागर कंपनींतून घरी आली. तिला पाहिल्यावर माझ्या मनांत एक विचार आला. मी तो तिला बोलूनही दाखविला. मी तिला म्हटलं, 'आज नाट्यमन्वंतर बंद होण्याची वेळ आली आहे आणि ती बंद केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. परंतु तूं जर पुण्याला येऊन 'उसना नवरा' मध्यें मालतीचं काम केलंस तर नाट्यमन्वंतरचा निभाव लागेल. परंतु लक्षांत ठेव, तुला सागर कंपनींतून कांहीं तरी नियमित पैसे मिळतात तेही कदाचित् तुला मिळणार नाहींत आणि आपल्या संसारांत खूप ओढाताण होईल.' लीलाला नाट्य-मन्वंतरची सर्व हकीगत मीं अगोदरच सांगितली होती. तेव्हां ती लगेच हसून म्हणाली, 'बी. ए. ची परीक्षा पास झाल्यानंतर हें एक नवीन व्हेंचर करायला मिळेल. नाहीं पैसे मिळाले तर नाहीं. त्याचा विचार आपण पुढें करूं. आपण कसं तरी निभावून घेऊं.' लीलानं असं म्हटल्यावर मग काय, दुसऱ्याच दिवशीं आम्ही आमच्या तीन मुलांना घेऊन पुण्याला गेलों. मालतीच्या मैत्रिणीची भूमिका करायला कृष्णाबाई पुराणिक तिथं होत्याच, अरविंदाची भूमिका करायला वसंत ठेंगडी तयार होताच. कंपनीच्या बिऱ्हाडीं

जाऊन पोचल्यावर—आम्ही त्यावेळीं कंपनीला राहाण्यासाठीं एक स्वतंत्र घर घेतलं होतं—मी दाते यांना तावडतोब बोलावणं पाठवलं.

ते आमच्या शेजारींच राहात होते. ते आल्यानंतर मी त्यांना सांगितलं कीं 'आजपासून बरोबर आठ दिवसांनीं म्हणजे मंगळवारीं रात्रीं 'उसना नवरा' चा प्रयोग झाला पाहिजे. तुम्ही उद्यांपासून नाटकाच्या तालमी घ्या.' यावर दाते मोठ्यानं हसले आणि मला म्हणाले, 'सांगतां आहांत काय तुम्ही ! नाटकाच्या तालमी घेऊन करायचं आहे काय ! प्रेमाला तुम्ही घालवून दिलंत. आतां मालतीची भूमिका कोण करणार !' मी त्यांना सांगितलं, 'मालतीची भूमिका लीला करणार आहे आणि अरविंदाची भूमिका वसंत करील.' यावर दाते कांहीं बोलले नाहींत आणि थोड्या वेळानं ते निघून गेले. मात्र दुसऱ्या दिवसापासून त्यांनीं 'उसना नवरा' च्या तालमी घ्यायला सुरुवात केली. तालीम घेत असतां मध्येंच आठवल्यासारखं करून ते मला म्हणाले, 'मी तालमी घेतों आहें खरा, पण सगळंच मुसळ केरांत. केतकीची भूमिका कोण करणार !' त्यांचा प्रश्न ऐकून मी एकदम गार झालों. माझ्यासमोरच रेखा कांहीं तरी करीत बसली होती. मी तर त्यावेळीं अगदीं डेस्परेट झालों होतों. मी दात्यांना म्हटलं, 'चिमुरड्या केतकीसाठीं का खेळ थांबवायचा ? तें कांहीं नाहीं, त्या कामासाठीं तुम्ही रेखाला तयार करा.' माझे शब्द ऐकून रेखा तर बावरूनच गेली आणि दाते हसायला लागले. रेखा मला म्हणाली, 'डॉक्टर, हें तुम्ही चालवलं आहे तरी काय ! मीं कसं काम करणार या नाटकांत ! शिवाय काणेकरही इथं नाहींत. त्यांना विचारायला नको का !' मीं तिला म्हटलं, 'तूं अगोदर काम करायला लाग. काणेकरांना काय विचारायचं तें मी मागाहून विचारीन.' तेव्हां ती मुकाट्यानं उठली. तिचं या नाटकांत फार मोठंसं काम नव्हतं, पण होतं तें मात्र तिनं चोख बजावलं. या नाटकांतील लीला, रेखा आणि वसंत यांच्याशिवाय बाकीच्यांचीं कामं चांगलीं बसलेलीं असल्यामुळे दात्यानीं पुढें सहा-सात दिवस फक्त तिघांना शिकवण्यांतच घालवले. मंगळवारीं 'उसना नवरा' चा प्रयोग होणार आणि त्यामध्यें लीला चिटणीस, रेखा काणेकर या दोन नव्या नटी कामं करणार असं अगोदरच जाहीर करून आम्ही बसलों होतों. आदले दिवशीं आम्ही रंगीत तालीम ठेवली आणि आम्ही तिघेचौघेजण ती पाहाण्यास बसलों. लीला मालतीची भूमिका चांगली करील याची मला जाणीव होतीच. परंतु अडचण होती ती निराळीच. लहानपणापासून तिचे डोळे अधू असल्यामुळें तिला जाड भिंगांचा चष्मा वापरावा लागत असे. मालतीचं काम करतांना अर्थात् चष्मा वापरणं शक्य नव्हतं. म्हणून रंगीत तालीम होण्याच्या अगोदर चष्मा लावून पहिल्या अंकांतील खुर्च्या, टेबलं वगैरे सामान कुठं ठेवलं आहे तें तिनं नीट पाहून घेतलं. नंतर ती आंत गेली. नाटकाचा पडदा वर गेला. मालतीची मैत्रीण सरला हिनं

प्रथम प्रवेश केला. थोड्या वेळानं लीलानं जवळ जवळ धावतच प्रवेश केला म्हटलं तरी चालेल. तिची एन्ट्री पाहिल्यावर मला हायसं वाटलं. त्यानंतर बऱ्याच वेळानं केतकीनं प्रवेश करून 'बाबूराव, तुम्ही इथं कुठें?' असा जेव्हां तोंडावर हात ठेवून आणि डोळे बशीसारखे गरगरीत करून प्रश्न केला, तेव्हां रेखा-बद्दलची चिंता दूर झाली. हें नाटक चांगलंच रंगणार अशी मला आशा वाटूं लागली. दुसऱ्या दिवशींच्या खेळाला चिक्कार गर्दी. इतकी गर्दी कीं मला आणि माझ्याबरोबर असलेल्या बापूराव आपटेना बसायला जागाच मिळेना. तेव्हां आम्ही माडीवर जाऊन एका कोपऱ्यांत उभे राहिलों. माझ्या मनांत थोडी धाकधूक होतींच. एन्ट्री करतांना किंवा स्टेजवरचं सामान न दिसल्यामुळें लीला जर एकादे वेळीं ठेंच लागून पडली तर प्रेक्षकांत एकदम हशाच उडायचा, म्हणून तिची एन्ट्री होईपर्यंत माझा जीव सारखा खालींवर होत होता. परंतु तिची एन्ट्री व्हावी तशी झाली. तें पाहिल्यानंतर मात्र मी थिएटरच्या बाहेर येऊन बसलों. या नाटकाचे बरेच प्रयोग यशस्वी झाले आणि त्या नाटकानंच नाट्यमन्वंतरला सावरलं असं मला म्हणायला दिक्कत वाटत नाहीं. हे प्रयोग चालू असतांना आम्हांला आमच्या संसारांत लहानमोठ्या अशा बऱ्याच आर्थिक आपत्ति आल्या, परंतु त्या मी इथं सांगत बसत नाहीं.

'उसना नवरा'चे प्रयोग चालू असतांनाच श्री. रंगूमामा जोगळेकर यांनीं अनुवादित केलेलं 'जाहिरातीच्या जोरावर' हें नाटक हातीं घेतलं. त्या नाटकाच्या तालमी दात्यांनीं नियमानं घेण्यास सुरुवात केली. या नाटकांत प्रथम काणेकर आणि रेखा यांना त्यांतील मुख्य भूमिका देण्याचं ठरवलं होतं, परंतु दोघांनाही त्या करतां येणार नाहींत असं दाते म्हणाल्यावरून दात्यांनीं आणि लीलानं त्या भूमिका कराव्यात असं आम्ही ठरवलं. परंतु या नाटकाच्या तालमी पुऱ्या होण्याच्या अगोदरच 'उसना नवरा'ची लोकप्रियता संपुष्टांत आली. पुण्याचे लोक रसिक आहेत खरे, पण त्यांनीं तरी एकच नाटक किती दिवस पाहायचं! आणि दुसरीं नाटकं एकदम करणं आम्हांला शक्य नव्हतं. तेव्हां काणेकर आणि मी मिळून असं ठरवलं कीं कंपनी घेऊन मुंबईला जायचं आणि तिथं 'उसना नवरा'चे प्रयोग होत असतांनाच 'जाहिरातीच्या जोरावर' नाटकाच्या तालमी पुऱ्या करायच्या. त्याप्रमाणें आम्ही कंपनी घेऊन मुंबईला आलों. रॉयल ऑपेरामध्यें 'उसना नवरा'चे प्रयोग सुरू केले. पहिल्याच खेळाला श्री. वर्तक सहकुटुंब आले होते. ते तर खेळावर बेहद्द खूष झाले आणि लीलाच्या अभिनयनैपुण्याची व तिच्या 'पाणीदार डोळ्यां'ची त्यांनीं इतकी बेफाट स्तुति केली, कीं तें ऐकून मलाच लाज वाटूं लागली नि हसूंही आलं. हसूं येण्याचं कारण इतकंच कीं 'लंपडाव' नाटकांत दोन सुशिक्षित मुलींच्या भूमिका त्यांनीं ज्योत्स्नाबाई आणि पद्मावती वर्तक यांच्यासाठीं राखून ठेवल्या होत्या आणि एका अशिक्षित आणि जुनाट वळणाच्या मुलीची भूमिका

करायला त्यांना दुसरी कुणी स्त्री मिळेना म्हणून लीलाला ती देऊं केली होती. अर्थात् त्यावेळीं तिचं अभिनयनैपुण्य आणि तिचे 'पाणीदार डोळे' त्यांच्या कदाचित् लक्षांत आले नसतील. परंतु ती एक सुशिक्षित स्त्री असून सुधारलेल्या घरांत वाढलेली आहे एवढी साधी गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नाहीं याचं मला आश्चर्य वाटलं. पण तें असो. या मागच्या गोष्टी मला या ठिकाणीं उकरून काढायच्या नाहींत. 'उसना नवरा' चा पहिला प्रयोग झाल्या दिवसापासून वर्तकांना नाट्यमन्वंतराच्या भवितव्याविषयीं पुन्हां उत्साह वाटूं लागला. शिवाय काळेही त्यावेळीं आमच्या कंपनींत नव्हते. वर्तकांचे नि माझे जे प्रथमपासून स्नेहाचे संबंध निर्माण झाले, त्यामध्यें कधींच बिघाड झाला नाहीं. अर्थात् वर्तकांनीं जेव्हां आमच्याशीं सहकार्य करण्याचं कबूल केलं, तेव्हां मी त्याचा आनंदानं स्वीकार केला.

वर्तकांचा जरा अतिरेकी स्वभाव आहे. एकादी गोष्ट करायची त्यांनीं मनांत आणली कीं त्यांच्या उत्साहाला मर्यादाच राहात नाहीं. मग ती गोष्ट करतांना कितीही नुकसान झालं तरी त्याची त्यांना पर्वा वाटत नाहीं. आतांही तसंच झालं. गांवदेवींतील जे. के. बिल्डिंगमध्यें आम्ही कंपनीसाठीं मोठा ब्लॉक घेतला होता. त्याच ठिकाणीं आम्ही नवीन नाटकाच्या तालमी सुरू केल्या होत्या. दाते 'उसना नवरा'तील काम करण्यासाठीं ज्यावेळीं पुण्याहून येत, त्यावेळीं ते नवीन नाटकाच्या तालमी घेत. परंतु वर्तकांना हें पसंत पडलं नाहीं. ते मला म्हणाले, 'या तालमी बरोबर चालत नाहींत. दात्यांना वेळ मिळेल तेव्हांच ते या तालमी घेतात. पण या नाटकाच्या रोज सकाळ–संध्याकाळ तालमी झाल्या पाहिजेत, तरच हें नाटक चांगलं रंगेल. या नाटकांतील खांचाखोचांचा मी संपूर्ण रीतीनं अभ्यास केला आहे. तेव्हां मला वाटतं, मीच या नाटकाच्या तालमी घेतों.' यावर मी काय बोलणार! त्यांचा दांडगा उत्साह पाहून मला मात्र बरं वाटलं. मी त्यांना लगेच, 'तुम्हीं तालमी घ्या' म्हणून सांगितलं आणि दुसऱ्या दिवसापासून त्यांनीं तालमी घेण्यास खरोखरच सुरुवात केली. वर्तक या नवीन नाटकाच्या तालमी घेताहेत असं पाहून दात्यांनीं आपलं अंग त्यांतून हळूहळू काढून घेतलं. मात्र ते नाटकांत काम करणार होते. पुण्याला असतांना एकदा आणि मुंबईला दोनदा दात्यांचा आणि माझा बराच खटका उडाला होता. म्हणून दात्यांच्याविषयीं मी उदासीनच होतों. वर्तकांच्या उत्साहाला नवीन भरती आल्यामुळें त्यांनीं आम्हां दोघांमध्यें समझोता घडवून आणण्याचा प्रयत्न केला, परंतु दात्यांविषयीं मी पूर्णपणें बेफिकिरीनं वागत असें.

मला वाटतं, वर्तकांनीं सतत आठ दिवस या नाटकाच्या तालमी घेतल्या. नंतर एक दिवस सकाळीं ते मला म्हणाले, 'मी या नाटकाच्या तालमी घेतोंच आहें, पण माझ्या मनांत एक नवीन कल्पना सुचली आहे. आपण 'आंधळ्यांची शाळा' पुन्हां एकदा करूं या. अहो, त्या दिवशीं मी लीलाताईचं काम पाहिलं, त्याच वेळीं

त्यांच्यामध्यें पोटेन्शिॲलिटीज किती दांडग्या आहेत याची मला कल्पना झाली. तुम्हांला ती कल्पना व्हायची नाहीं. अहो, त्यांनीं जर बिंबाचं काम केलं तर नाटकाला असा लिफ्ट मिळेल कीं कांहीं विचारूं नका. आपण नाटकाचं उद्घाटन करायला बॅरिस्टर जयकरनां बोलावूं, आहांत कुठं!' मी त्यांना म्हटलं, 'मि. वर्तक, 'आंधळ्यांच्या शाळे'चे प्रयोग मुंबईत खूप झाले आहेत. लीलानं जरी बिंबाचं काम केलं तरी तो खेळ कुणी पाहायला येणार नाहीं. मला नाट्यमन्वंतरच्या मागच्या इतिहासाची पुनरावृत्ति इथं व्हायला नको आहे. म्हणून तुम्ही या नवीन नाटकाच्या तालमी सुरू ठेवा आणि तेंच नाटक आपण लवकर रंगभूमीवर आणूं.' पण वर्तक कसले ऐकतात! त्यांची चिकाटी दांडगी. ते मला म्हणाले, 'तुम्हांला कसली भीति वाटते? पैशाची ना. या माझ्या नाटकामुळें जर कंपनीला तूट पडली तर माझ्या घरांतील सर्व पैसे आणून कंपनींत ओतीन.' पैशाच्या बाबतींत वर्तक म्हटल्याप्रमाणें करायला चुकायचे नाहींत याची मला खात्री होती. म्हणूनच मी त्यांच्या म्हणण्याला होकार दिला. झालं. 'आंधळ्यांच्या शाळे'च्या तालमी पुन्हा सुरू झाल्या आणि तो खेळ पुन्हा एकदा रंगभूमीवर आला. डॉ. जयकर सहकुटुंब हजर होते. त्यांनीं आपल्या भाषणांत सुशीला आणि बिंबा यांच्या कामाचा गौरवानं उल्लेख केला. मी थिएटरच्या बाहेर असल्यामुळें ते काय बोलले तें ऐकण्यास मला सवड मिळाली नाहीं. पहिल्या खेळाला जवळ जवळ सातआठशें रुपये उत्पन्न झालं आणि दुसऱ्या खेळाला उत्पन्न जवळ जवळ शून्यापर्यंत गेलं. लीलानं बिंबाची भूमिका उत्कृष्ट वठवली होती. कारण पहिला प्रयोग होण्यापूर्वीं घरीं रात्रीं बारा बरा वाजेपर्यंत ती त्या भूमिकेची तालीम करीत असे. वर्तकांना मात्र आपणच आपल्या तालमींत तिला तयार केली असं अजूनही वाटत असलं पाहिजे असा माझा तर्क आहे.

'आंधळ्यांची शाळा' दुसऱ्याच खेळाला बसली. 'जाहिरातीच्या जोरावर' नाटकाच्या तालमी पुऱ्या झाल्या नव्हत्या आणि 'उसना नवरा' चा सीझन संपुष्टांत आला होता. अशा वेळीं कंपनी मुंबईला ठेवणं शक्य नव्हतं. म्हणून मी मुंबईतील मुक्काम हलवून कंपनी कल्याणला नेली. कल्याणला एका गृहस्थानं चार खेळांचं कॉन्ट्रॅक्ट घेतलं होतं. कॉन्ट्रॅक्ट संपल्यानंतर कल्याणला एक दोन खेळ आम्हीं केले. कल्याणहून आम्ही नाशिकला गेलों. नाशिकला साधारण बऱ्यापैकीं उत्पन्न झालं आणि कंपनीचं डगमगणारं तारूं थोडंसं स्थिरावलं. यावेळीं शांताराम शृंगारपुरे हा धुळ्याला होता. त्यानं तिथं कसला तरी धंदा सुरू केला होता. त्यानं आमच्या खेळाचं कॉन्ट्रॅक्ट घेतलं आणि आम्हाला धुळ्याला बोलावलं. धुळ्याला खेळाचं कॉन्ट्रॅक्ट दिल्यामुळें उत्पन्नाची आम्हांला काळजी नव्हती आणि कंपनीचं गाडं सुरळीत चाललं होतं. या वेळीं वर्तक आणि मिसेस वर्तक आमच्याबरोबर होतीं. मला या ठिकाणीं नमूद करून

ठेवलं पाहिजे कीं मुंबईत जरी वर्तकांच्या हेकेखोरपणामुळें कंपनी खड्डयांत पडण्याच्या बेतांत आली होती तरी ज्या ज्या वेळीं कंपनी अडचणींत येई त्या त्या वेळीं सढळ हातानं कंपनीला वर्तकांनीं मदत केली होती. इतकंच नव्हे, तर सौ. वर्तकांना खेळामध्यें काम करण्यासाठीं ते न चुकतां पाठवून देत असत. आतां आम्हीं धुळ्याला आलों होतों. कंपनीची सांपत्तिक स्थिति सुधारण्याच्या बेतांत होती. धुळयाला खेळ चालू असतांच वर्तकांनीं एक नवीन शक्कल शोधून काढली. ते मला म्हणाले, ' आपण इथून नागपूरला जाऊं या. नागपूरला कंपनीला चिक्कार पैसा मिळेल. ' लंपडाव ' हा खेळ मुंबईला फेल गेला ना ? अहो नागपुरांत या खेळाला लोक डोक्यावर घेऊन नाचतील. पण ते राहूं द्या. आपण आतां थोडा ब्रिझनेस बघूं. तुम्ही आणि लीलाताईंनीं नाट्यमन्वंतरसाठीं इतके कष्ट केलेत, परंतु तुम्ही पैशासंबंधानं कधीं बोलणंच काढलं नाहींत. आतां तुम्ही असं करा, कीं प्रत्येक महिन्याला तुम्ही आणि लीलाताईंना म्हणून दीडशें रुपये घेत चला आणि गोदूला आपण महिन्याला शंभर रुपये देऊं. '

मला खरोखर वर्तकांच्या बोलण्याची चीड आली. आम्ही दोघांनीं आपल्या संसाराचा विचार न करतां केवळ नाट्यमन्वंतर जिवंत राहावं म्हणून जी झीज सोसली, ती काय नाट्यमन्वंतरमधून पैसे काढून घेण्यासाठीं ? मला पुण्यांतील एकच प्रसंग यावेळीं आठवतो. ' उसना नवरा ' मध्यें काम करण्यासाठीं लीला पुण्याला आली. आमचीं तिन्हीं मुलं तिनं स्वयंपाकीणबाईजवळ ठेवलीं होतीं. त्या दिवशीं अजीतला सडकून ताप भरला होता. तरी त्याला सोडून लीला पुण्याला आली. आल्यानंतर ती प्रथम कांहींच बोलली नाहीं. खेळ संपल्यानंतर ती मला म्हणाली, ' मला रात्रीच्या गाडीनं मुंबईला गेलं पाहिजे. अजूला खूप ताप भरला आहे. ' डॉक्टरला आणण्यासाठीं माझ्याजवळ पैसे नव्हते. त्यावेळीं मीं कांहीं न बोलतां मॅनेजरला बोलावलं आणि त्याला विचारलं, ' तुमच्याकडे किती पैसे शिल्लक आहेत ? ' ते म्हणाले, ' असतील ४०।४५ रुपये. ' मी त्यांना म्हटलं, ' आणा ते पैसे माझ्याकडे. ' ते पैसे मी घेतले नि लीलाला घेऊन स्टेशनवर गेलों. तिचं तिकीट काढून मी तिला बायकांच्या थर्ड क्लासच्या जागेंत बसवली. माझ्याजवळ असलेले पैसे मी तिच्या बॅगेंत घातले. आतांपर्यंत तिच्या येण्याजाण्याच्या खर्चाशिवाय मी तिला एक पैसुद्धां देऊं शकलों नव्हतों. नाट्यमन्वंतर जगवण्याचं श्रेय खरोखर तिला होतं. नाट्यमन्वंतर जगण्यासाठीं आम्ही कशा प्रकारचे दिवस काढले हें सांगण्यासाठींच मी हा प्रसंग या ठिकाणीं सांगितला. वास्तविक तो या ठिकाणीं उद्धृत करण्याची मुळींच इच्छा नव्हती.

आम्ही दोघांना दीडशें रुपयेच का पण शंभर रुपये जरी मिळाले असते तरी त्यांत आम्ही समाधान मानलं असतं. परंतु गोदूताईंना शंभर रुपये कशासाठीं पाहिजेत ? आपली हौस भागवण्यासाठीं तिच्या नवऱ्यानं नाट्यमन्वंतर ही संस्था

काढली आणि ती बुडवण्याचा प्रयत्न केला म्हणून ? मी नसतों तर ती बुडालीही असती. हें मी अहंपणानें सांगत नाहीं. वस्तुस्थितीचं दर्शन महाराष्ट्राला व्हावं म्हणून मी हें सांगत आहें. वर्तकांना मी म्हणालों, ' हें पाहा मि. वर्तक, नाट्यसंस्था चालवणं हा कांहीं माझा धंदा नाहीं. मी नट नाहीं, नाटककार नाहीं किंवा नाटकं बसवणारा दिग्दर्शकही नाहीं. केवळ पुरोगामी स्वरूपाचीं नाटकं महाराष्ट्र रंभूमीवर यावींत आणि हिंदुस्थानांतच नव्हे, तर हिंदुस्थानच्या बाहेर सुद्धां मराठी रंगभूमि गाजावी या एकाच हेतूनं प्रेरित होऊन मी या सर्व भानगडींत पडलो. आज नाट्यमन्वंतरला चांगले दिवस आले आहेत. तेव्हां तिला आज माझी गरज नाहीं. ही नाट्यसंस्था मुळची तुमची आहे म्हणून मी ती आतां पुन्हां तुमच्या स्वाधीन करतो. मी मुंबईला गेल्यानंतर पुन्हां माझा वृत्तपत्रव्यवसाय हातांत घेणार आहें. लीला तुमच्याशीं पूर्ण सहकार करील. मात्र तुम्हीं तिला न चुकतां प्रत्येक महिन्याला दीडशें रुपये दिले पाहिजेत. कारण मला कांही काळपर्यंत पैसे मिळवतां येतील कीं नाहीं याची शंका आहे. मग तुम्ही गोदूताईंना शंभर द्या, दोनशें द्या, तरी चालेल. आता यापुढें तुमच्या नाट्य-मन्वंतरसाठीं मी माझ्या संसाराची राखरांगोळी करणार नाहीं.' हे माझे शब्द ऐकल्यावर वर्तकांनीं मी नाट्यमन्वंतर सोडून जाऊं नये म्हणून बराच प्रयत्न केला. परंतु माझा निश्चय कायम झाला.

नागपूरला जाण्यास थोडा अवधि होता म्हणून लीलाला घेऊन मी परत मुंबईला आलों. लीलानं सर्व मुलांना घेऊन नागपूरला जायचं ठरवलं आणि तिचा तिथं जम बसेपर्यंत मीसुद्धां नागपूरला यावं असं ती म्हणाली. त्यावेळीं मुंबईत कांहींच काम नव्हतं. त्यावेळीं मुंबईत गिरणीकामगारांचा संप चालला होता, परंतु त्या संपाचीं सर्व सूत्रं होतीं कम्युनिस्टांच्या हातांत. मी पडलों कम्युनिस्टविरोधी. म्हणून संपकमिटींत मला घेण्याचं डॉ. गंगाधर अधिकारी यांनीं साफ नाकारलं. अर्थात् लीलाबरोबर नागपूरला जाण्याची मी तयारी केली. आम्ही नागपूर मेलच्या एका डब्यांत जाऊन बसलों. आमच्या अगोदर दाते, वर्तक वगैरे मंडळी आली होती. वर्तकांच्याबरोबर प्रेमाही आली होती. मला पाहिल्याबरोबर वर्तक म्हणाले, 'काय डॉक्टर, लीलाताईंना पोचवा-यला आलां वाटतं ?' मी त्यांना म्हटलं, 'नाहीं, मी नागपूरला येणार आहें.' प्रेमाला पाहिल्याबरोबर लीलाला रडूं आलं. मी त्याच कारण समजून चुकलों. मी म्हटलं, 'हें बघ, तूं गप्प बैस आणि काय मजा होते ती बघ. तुला शह देण्यासाठीं वर्तकांनीं आपल्या बरोबर प्रेमाला आणलं आहे हें मी जाणतों. पण तूं मुळींच घाबरूं नकोस.' दाते तिथं होतेच. त्यांनींही तिचं सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. वर्तकांचा हा आपमतलबी डाव जेव्हां माझ्या लक्षांत आला, तेव्हां आंतून मी खूप भडकलों, परंतु मी कांहीं बोललों नाहीं.

नागपूरला गेल्यानंतर आम्ही वॉकर रोडवर स्वतंत्र ब्लॉक भाड्यानं घेतला. त्या ठिकाणीं वसंत ठेंगडी, राजा परांजपे वगैरे मंडळीही राहायला आली. बाकीच्या मंडळीसाठीं वर्तकांनीं काय व्यवस्था केली तें मला माहीत नाहीं, परंतु कंपनींतील सर्व माणसं माझ्याकडे येऊन एक ना दोन, गाऱ्हाणीं सांगूं लागलीं. वर्तकांच्या आणि माझ्यामध्यें वितुष्ट वाढूं लागलं आणि श्री. वर्तक गांवांत कांहीं मंडळींना सांगत फिरूं लागले कीं मी कंपनीचा हिशेब बरोबर ठेवला नाहीं, कंपनीचे दोनएक हजार रुपये मी खाल्ले. ही गोष्ट मला ग. त्र्यं. माडखोलकर यांच्याकडून कळली. तेव्हां मी वर्तकांना लगेच त्याचा जाब विचारला. वर्तकांनीं स्पष्ट नाकबूल केलं. पण ते म्हणाले, कीं ' कंपनीच्या एकवीसशें रुपयांचा हिशेब तुम्ही अजून कां दिला नाहीं ? तुम्ही हा हिशेब दिला नाहीं एवढीच गोष्ट मी कांहीं लोकांजवळ बोललों. ' मी त्यांना म्हटलं, ' मि. वर्तक, तुम्ही काय काय गोष्टी बोललांत हें मला माहीत आहे. पोलीसकडनं तुम्ही मला अटक करणार आहांत कंपनीच्या हिशेबाची अफरातफर केल्याबद्दल. हेंही तुम्ही कांहीं लोकांजवळ बोललांत तेंही मला कळलं आहे. परंतु तुम्हांला निरर्थक गप्पा मारण्याची सवय आहे हें ओळखून मी त्यासंबंधानं कांहीं बोलत नाहीं. तुम्हांला हिशेब पाहिजे असतील, तर बोर्ड ऑफ डायरेक्टरांची सभा बोलवा, बोर्डापुढें मी माझे हिशेब मांडायला तयार आहें. मी अजूनही कंपनीचा डायरेक्टर आहें हें विसरूं नका. '

त्यावेळीं डायरेक्टरपैकीं काणेकरच तिथं हजर नव्हते. दाते, वर्तक आणि मी नागपुरांतच होतों. तेव्हां काणेकरांना तातडीची तार करून बोलावण्यांत आलं. काणेकर नागपुरांत आल्याबरोबर लगेच ते माझ्याकडे आले. ते म्हणाले, ' बोर्डाची सभा कशाला बोलावली आहे ? ही काय नवीन भानगड उपस्थित झालीय ? ' मी त्यांना म्हटलं, ' भानगड वगैरे कांहीं नाहीं. वर्तकांच्या चावटपणाचा हा एक नमुना आहे. ' त्यानंतर बोर्डाची मिटिंग भरली. मी माझा हिशेब व्यवस्थित रीतीनं सादर केला. त्या हिशेबामध्ये—मला कधीं हिशेब ठेवण्याची संवय नव्हती—माझा आधार काय तो चेकबूक. माझ्या चेकबुकाच्या सर्व कौंटरफाईल सांपडल्या. त्यामध्यें १।२ कौंटरफाईल सांपडल्या नाहींत, त्यामुळे दीडशें किंवा दोनशें रुपयांचा हिशेब मला सांगतां आला नाहीं. तेव्हां वर्तक उदारपणाचा आव आणून म्हणाले, ' जाऊं द्या. कौंटरफाईल नाहीं सांपडल्या तर नाहीं. फक्त दीडदोनशें रुपयांचाच प्रश्न आहे ना ? आपण ते राइटऑफ करूं म्हणजे झालं. ' मी त्यांना लगेच म्हटलं, ' मि. वर्तक, हें चालायचं नाहीं. ही रक्कम कशी खर्च झाली तें मला सांगतां येत नाहीं हें खरं आहे. पुढें मागें त्याचा हिशेब लागेलच. परंतु हिशेब बरोबर झाला पाहिजे, म्हणून आजपर्यंत मी नाट्यमन्वंतरमध्यें जें काम केलं, त्याचं वेतन म्हणून ही रक्कम तुम्ही जमा करा. '

हिशेबाचं काम आटपल्यानंतर मी नाट्यमन्वंतरच्या डायरेक्टरच्या जागेचा राजीनामा दिला आणि वर्तकांना सांगितलं, 'यापुढें आपले संबंध धंदेवाईक स्वरूपाचे राहातील. आतां बोला, तुम्ही लीलाला महिन्याला दीडशें रुपये देणार आहांत कीं नाहीं? देणार असाल तर त्याप्रमाणें तुम्ही लिहून द्या. नाहींतर लीलाला घेऊन मी परत मुंबईला जातों.' यावर वर्तक आरडाओरडा करूं लागले. ते मला म्हणाले, 'लीलाताईंची बंदुक तुम्ही माझ्या डोक्यावर धरली आहे.' मी त्यांना ताबडतोब उत्तर दिलं, 'लीलाताईंचीच काय, पण कुठलीही बंदुक तुमच्या डोक्यावर धरण्याइतकी तुमची लायकी आहे असं मला वाटत नाहीं.' यानंतर वर्तक बरेच नरमले. ते मला म्हणाले, 'हें पाहा, आजच माझी धाकटी मुलगी पहिल्या मजल्यावरून खालीं पडली. तिला दुखापत झाली. म्हणून मी कुठल्या मनस्थितींत आहें तें तुम्ही पाहा.' हे त्यांचे शब्द ऐकल्यावर माझा राग कुठल्या कुठं पळाला. मी त्यांचा हात आपल्या हातांत घेऊन म्हटलं, 'तुम्ही यासंबंधीं जास्त कांहीं बोलूं नका. तुमचं आमचं भांडण इथं संपलं.' इतकं बोलून मी घरीं आलों.

दुसरे दिवशीं सकाळीं दाते माझ्याकडे आले व मला म्हणाले, 'तुमचा आतां नाट्यमन्वंतरशीं कांहीं संबंध राहिला नाहीं. तुम्ही आतां मुंबईला जाणार. पण लीलाताईंच्याबद्दल काय करायचं?' लीला तिथं होतीच. पण ती कांहीं बोलली नाहीं. मी दात्यांना म्हटलं, 'लीलानं नाट्यमन्वंतरमध्यें काम करावं अशी जर तुमची इच्छा असेल, तर माझ्या दोन अटी तुम्हांला पाळाव्या लागतील. पहिली अट लीलाबद्दलची आहे. ती मुलांबाळांना घेऊन इथं राहाणार आणि आज आमच्याजवळ पैसासुद्धां शिल्लक नाहीं. मी रिकामा आहें हे तुम्हाला माहीत आहे. तेव्हां आतांपर्यंत जो तिचा थकलेला पगार आहे, तो तिला मिळावा अशी व्यवस्था करा आणि यापुढें दर महिन्याला तिला नियमित पगार मिळाला पाहिजे.' दाते म्हणाले, 'लीलाताईंचे सगळे मागचे पैसे आम्हाला एकदम देतां येणार नाहींत. ते आम्ही हप्त्याहप्त्यानं देऊं. यापुढील पगार मात्र त्यांना नियमानं देऊं. मागील पगारांतील हप्ता आणि सध्यांचा त्यांचा पगार असे मिळून दर आठवड्याला ५० रु. त्यांना आम्ही देऊं. तुम्हाला कबूल आहे का हें?' मी म्हटलं, 'कबूल नसायला काय झालं? लीला नागपुरात असतांना तिला निदान पैशाची तरी अडचण भासूं नये एवढीच माझी इच्छा आहे.' दाते म्हणाले, 'बरं तर. तुमची दुसरी अट कोणती?' मी म्हणालों, 'माझी दुसरी अट हीच कीं वर्तकांसारख्या माणसाला नाट्यमन्वंतरसारखी संस्था चालवतां येणं शक्य नाहीं. त्यांच्या आडमुठ्या कारभारामुळें नाट्यमन्वंतरमधील सर्व मंडळी त्यांच्यावर नाखुष आहेत. नाट्यमन्वंतरच्या अगदीं वाईट दिवसांमध्यें, कीं ज्यावेळीं पगारच काय पण आम्हाला पोटापुरतं खायला मिळण्याची पंचाईत पडली, त्यावेळीं, मन्वंतरमधल्या एकाही माणसानं हूं कीं चूं न करतां आपापलीं कामं आनंदानं केलीं. आज मन्वंतरला चांगला

पैसा मिळतो आहे, असं असतांना सर्व मंडळी नाराज, याला वर्तक जबाबदार आहेत. म्हणून तुम्ही जर मन घालून नाट्यमन्वंतरची व्यवस्था पाहाण्यास कबूल असाल तरच त्या संस्थेमध्ये लीलाला राहातां येईल.' दात्यांना ही जबाबदारी घ्यायला नको होती. त्यांना पूर्वीप्रमाणेंच अंगचोरपणा करायला पाहिजे होता. परंतु मी घातलेल्या अटीमुळें त्यांचा नाइलाज झाला. त्यांनीं ती अट स्वीकारली. स्वीकारली म्हणजे काय, माझं समाधान करण्यासाठीं ते म्हणाले, 'मी सर्व जबाबदारी माझ्या शिरावर घेतो.' परंतु त्यांच्या पाठीमागें वर्तकच उभे होते. तरीसुद्धां मी विशेष घासाघीस करीत बसलों नाहीं. ही सर्व व्यवस्था झाल्यावर मी मुंबईला परत आलों.

नागपुरांत नाट्यमन्वंतरचे खेळ फारच यशस्वी झाले आणि नाट्यमन्वंतरला पैसाही खूप मिळाला. वर्तकांचा 'लपंडाव' कल्पनेबाहेर यशस्वी झाला. लीलानं तर आपल्या अभिनयनैपुण्यांत कीर्तीचा उच्चांक गांठला होता. नागपुरांत चिटणीसांचं घराणं नांवाजलेलं आहे. तेव्हां आपल्याच घराण्यांतील बाई मन्वंतरमध्यें काम कसं करते हे पाहाण्यासाठीं चिटणीस घराण्यांतील सर्व स्त्रीपुरुष 'आंधळ्यांची शाळा' पाहायला येत असत. याच वेळीं नागपूर युनिव्हर्सिटीचा पदवीदान समारंभ झाला. त्या समारंभासाठीं युनिव्हर्सिटीचा एक प्रोफेसर लीलाला नेण्यासाठीं आला होता. कॉन्व्होकेशन हॉलमध्यें लीला जेव्हां पदवी घेण्यासाठीं पुढें आली, तेव्हां तिथं जमलेल्या सर्व मुलांनीं 'Well done बिंबा!' असं म्हणून त्या टाळ्यांच्या गजरांत तिचं स्वागत केलं. ही हकीगत अर्थात मला माहीत नव्हती. परंतु एक महिन्यानंतर ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं मी नागपुरास जातांना गाडींत डॉ. पंजाबराव देशमुख, रावबहादूर सरंजामे आणि हितवादचे संपादक श्री. मो. ज्ञा. शहाणे यांची गांठ पडली. मणींनीं ही वरील हकीगत मला बरीच खुलवून सांगितली. इतकंच नव्हे तर आपल्या पत्रामध्यें 'Well done Bimba' या सदराखालीं लिहिलेला एक स्फुटलेख मला दाखवला. शहाणे मला म्हणाले, 'Mrs. Bimba Chitnis deserves all praise I can give her. I wish her every success.' त्यांचे हे उद्गार ऐकून मला हसूं आलं. मी त्यांना म्हटलं, 'अहो महाराज, माझ्या बायकोचं नांव बिंबा नाहीं, लीला आहे.' त्यावर मणी हसून म्हणाले, 'मी चूक केली खरी पण ती क्षम्य आहे. बिंबाच्या भूमिकेशीं त्या इतक्या तादात्म्य पावल्या आहेत कीं त्यांचं मूळचं नांव कुणाच्या लक्षांतच येत नाहीं.'

# २१



मी मुंबईत परत आल्यानंतर माझी आणि लोटवाला शेटजींची गांठ पडली. मला पाहिल्यावर त्यांना खूप आनंद झाला. ते म्हणाले, ' तुमची प्रकृति आतां ठीक झालेली दिसते. कुणाचं औषध घेतलंत कीं नाहींत ?' मी म्हटलं, ' औषध वगैरे कांहीं घेतलं नाहीं. मोगरे वैद्यांचा काढा मात्र घेतों. ' कांहीं महिन्यांपूर्वी म्हणजे कंपनी मुंबईत असतांना माझे मित्र श्री. वर्तक यांच्या आग्रहावरून डॉ. ढवळे यांच्याकडे मी एकदा गेलों होतों. ढवळ्यांनीं माझी प्रकृति अगदीं कसून तपासली. त्यानंतर त्यांनीं मला बरेच प्रश्न विचारले. माझीं उत्तरं ते एका नोटबुकांत लिहून घेत होते. त्यांचे सर्व प्रश्न संपल्यानंतर ते मला म्हणाले, ' तुम्हांला Pleurisy चा विकार झाला होता काय ? त्याचा अवशेष अजून शिल्लक राहिला आहे. तेव्हां तुम्ही डॉ. दीक्षित यांच्याकडे जाऊन तुमच्या छातीचा एक्सरेनं फोटो काढून घ्या.' मी डॉ. ढवळेना म्हणालों, ' प्लुरसीचा विकार मला झाला होता हें मला माहीत नाहीं आणि तो नाहींसा कसा झाला हेंही मला माहीत नाहीं. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें त्या आजाराचा अवशेष राहिला असला तर तोही असाच निघून जाईल. हें पाहा डॉक्टर, खरं सांगायचं म्हणजे तुम्हा डॉक्टरांवर माझा विश्वास नाहीं. मी एक्सरेच्या भानगडींत पडणार नाहींच, पण मी तुम्हांला फीसुद्धां देणार नाहीं. ' डॉ. ढवळे माझ्याकडे थोडा वेळ टकमक पाहात राहिले आणि वेड्याच्या इस्पितळातून सुटून आलेला मी कुणी तरी आहें असं समजून तेही हसत सुटले. ही हकीगत मी लोटवाला शेटना सांगितली तेव्हां त्यांनाही खूप हसूं आलं. पण हसणं त्यांच्या प्रकृतीला मानवत नाहीं, म्हणून ते लगेच गंभीर होऊन म्हणाले, ' तुम्ही आतां आलांतच आहांत. तेव्हां आपण एक इंग्रजी साप्ताहिक काढूं. त्या साप्ताहिकाचं नांव Indian Socialist ठेवायचं आम्ही प्रथमतः ठरवलं होतं. परंतु Socialist या नांवाला मुंबईचे पोलीस बिचकतील आणि मॅजिस्ट्रेट आम्हांला कदाचित् परवानगी देणार नाहींत असं वाटल्यावरून आमच्या साप्ताहिकाला The People असं नांव देण्याचं आम्ही ठरवलं.'

हें साप्ताहिक काढण्याच्या सुमारास मुंबईत आदर्श चित्र नांवाची एक लिमिटेड फिल्म कंपनी स्थापन झाली. त्या कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर्स जबलपूरचे शेठ गोविंददास, पं. द्वारकाप्रसाद मिश्र आणि मुंबईचे लालभाई पटेल हे तिघेजण होते. सागर फिल्म कंपनींत लीलाशीं ज्यांचा दाट परिचय झाला होता, ते मि. चतर्जी या कंपनीचे दिग्दर्शक होते. त्यांची माझी रस्त्यांत सहज गांठ पडली. माझे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन ते म्हणाले, ' अहो, तुम्हांला मी सारखा मुंबईभर शोधीत आहें. कुठं गडप झालां होतां इतके दिवस ? ' असं म्हणून त्यांनीं मला आदर्श चित्र कंपनीची सर्व माहिती दिली आणि नंतर ते लीलाची चौकशी करूं लागले. मुंबईत असताना लीलानं 'आंधळयांची शाळा' आणि 'उसना नवरा' या दोन नाटकांत केलेल्या भूमिका त्यांनीं पाहिल्या होत्या. आपल्याबरोबर शेठ गोविंददास यांनाही तो खेळ पाहायला आणलं होतं. म्हणूनच ते इतक्या उत्सुकतेनं लीलाची चौकशी करीत होते. मी त्यांना सांगितलं कीं, ' लीला सध्यां नाट्यमन्वंतरमध्यें काम करीत आहे आणि कंपनीचा मुक्काम सध्यां नागपुरांत आहे.' चतर्जी म्हणाले, ' तें कांहीं नाहीं. लीलाबाई माझा फ्राइंड आहे. मी त्यांना माझ्या हातून मुळींच जाऊं देणार नाहीं. तुम्ही आतांच्या आतां मिश्रजींकडे चला. ते तुम्हांला सर्व गोष्टी समजावून सांगतील.'

मिश्रजी त्यावेळीं सरदारगृहांत उतरले होते. या म्हाताऱ्याच्या प्रेमळ आग्रहापुढें माझं कांहींच चालेना. म्हणून मी तसाच मि. चतर्जींबरोबर सरदारगृहांत गेलों नि मिश्रजींना भेटलों. मिश्रजींची आणि माझी ही पहिली भेट. मिश्रजींनीं मला आदर्श चित्र कंपनीविषयीं माहिती सांगण्यास सुरुवात केली. ते म्हणाले, ' वऱ्हाड-मध्यप्रांतांतल्या राजकारणांत बुडून गेलेलीं आम्ही माणसं. आमचा आणि फिल्म व्यवसायाचा संबंध काय ? तरीसुद्धां बाबूसाब ( म्हणजे शेठ गोविंददास ) आणि मी, आम्हां दोघांनाही साहित्याची फार आवड. बाबूसाबनीं तर तुरुंगांत असतांना कांहीं कथानकं लिहिलीं. या कथानकांपैकीं कांहीं कथानकांचे बोलपट काढावेत अशी आम्हांला इच्छा झाली. सध्यां राजकारणाला ओहोटी लागली आहे, म्हणून स्वस्थ बसण्यापेक्षां कांहीं तरी करावं असं आमच्या मनानं घेतलं. त्याप्रमाणें आम्ही एक कंपनी स्थापन केली. या कंपनींत राजा गोविंदलाल शिवलाल, शेठ गोविंदराम सेक्सारिया वगैरे बडी मंडळी आहेत. आम्ही आपल्या पहिल्या बोलपटासाठीं बाबूजींचं 'धुवांधार' कथानक घेतलं आहे. त्याचे संवाद आणि पदं मी स्वतः लिहिलीं आहेत. या बोलपटांतील हिरो आम्ही अगोदरच निवडला आहे. जबलपूरचे बी. ए., एलूएल्. बी. झालेले वकील मि. भार्गव हे आहेत. परंतु आम्हांला सुशिक्षित नायिका पाहिजे आहे. शक्य तों आमच्या कंपनींत सुशिक्षित मंडळी पाहिजेत यावर आमचा कटाक्ष आहे. तुमची पत्नी सुशिक्षित आहे आणि मि. चतर्जी मला सांगतात, कीं तिचं अभिनयनैपुण्य उच्च दर्जाचं आहे.

बाबूसाबही तिच्याविषयीं आदरानं बोलत होते. ती आमच्या कंपनींत येईल का ? तुमचा माझा पूर्वी परिचय नव्हता तरी तुमचं नांव यापूर्वी मी बरेच वेळां ऐकलं आहे. तुम्ही आतां एक इंग्रजी साप्ताहिक काढणार आहांत असं ऐकतो. म्हणून आमच्या कंपनीचं प्रसिद्धीखातं तुमच्या स्वाधीन करावं अशी माझी इच्छा आहे.' मी त्यांना म्हणालो, 'हें पाहा मिश्रजी, तुम्ही म्हणतां तें सर्व ठीक आहे. पण'–'पण' हा शब्द माझ्या तोंडांतून बाहेर पडल्याबरोबर मिश्रजींनीं मला एकदम थांबवलं. अतिशय तीक्ष्ण बुद्धीचा माणूस तो! मी पुढें काय म्हणणार हें त्यांच्या ताबडतोब ध्यानांत आलं. आपला आवाज थोडासा चढवून ते म्हणाले, 'तुमच्या पत्नीनं 'धुवांधार' मध्यें काम करावं म्हणून तुम्हांला आमच्या प्रसिद्धीखात्याची लालूच आम्ही दाखवीत नाहीं. तुमची पत्नी आमच्या कंपनींत येणार कीं नाहीं हें मला माहीत नाहीं, परंतु ती जरी आली नाहीं तरी तुमची मात्र मला अत्यंत जरुरी आहे हें लक्षांत ठेवा.' यावर मी कांहीं न बोलतां घरीं निघून आलों. लीलानं 'धुवांधार' मध्ये काम करावं अशी माझी तीव्र इच्छा होती. परंतु नाट्यमन्वंतरशीं तिनं केलेला करार संपायला एकदीड महिन्याचा अवधि होता, म्हणून यासंबंधांत काय करायचं तें तिचं तिनंच ठरवलं पाहिजे असा मी विचार केला नि दुसऱ्या दिवशीं तिला पत्र लिहायचं ठरवलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं लीलाचं, मला वाटतं, अमरावतीहून पत्र आलं. नाट्यमन्वंतर त्यावेळीं नागपूरहून अमरावतीला गेली होती असं दिसतं. तिच्या पत्रावरून ती नाट्यमन्वंतमध्यें काम करण्यास नाखुष होती असं मला दिसून आलं. म्हणून तिला पत्र पाठवायचा इरादा रद्द करून मी तिला ताबडतोब मुंबईला निघून येण्याविषयीं तार केली. माझी तार पोचल्याबरोबर ती एकटीच मुंबईला निघून आली. आमचीं मुलं त्यावेळीं अमरावतीलाच होतीं. पण तिथं वसंत ठेंगडी, राजा परांजपे आणि सदू ठकार हे त्यांना पाहायला असल्यामुळें तिला मुंबईला एकटं येतां आलं. ती मुंबईला आल्यानंतर मी तिला सर्व हकीगत सांगितली तेव्हां ती म्हणाली, 'आदर्श चित्राच्या पहिल्या बोलपटांत काम करण्याची माझी इच्छा आहे, परंतु मला ताबडतोब अमरावतीला गेलं पाहिजे. कारण तिथली मंडळी माझ्यावर अवलंबून आहेत.' प्रवास करीत असतांना तिच्या पायाला इजा झाली. ती इजा कशी झाली तें आतां मला आठवत नाहीं. परंतु तिचा एक पाय मात्र खूप सुजला होता. मी तिला म्हटलं, कीं 'तुला अमरावतीला जायचं आहे खरं, पण तुझा पाय हा असा सुजलेला. तुला काम करतां येणं शक्य नाहीं. म्हणून तुला कांहीं दिवस तरी मुंबईत राहून विश्रांति घेतली पाहिजे.' ती ऐकेना. तेव्हां मी तिला सांगितलं कीं, 'तुला मी जाऊं देणार नाहीं.' तिचं काम करायला प्रेमा तिथं होतीच. लीलाशिवाय नाट्यमन्वंतरचं अडण्यासारखं नव्हतं. परंतु अडण्यासारखं जरी असतं, तरीसुद्धां बिंबानं

( म्हणजे लीलानं ) लंगडत लंगडत रंगभूमीवर जर प्रवेश केला असता, तर तेथील प्रेक्षकांना काय वाटलं असतं ? बोलून चालून वऱ्हाडी लोक ते. त्यांना काय अशा गोष्टी खपल्या असत्या ? म्हणूनच लीलाला ती बरी होईपर्यंत अमरावतीला पाठवायचं नाहीं असा ठाम निश्चय मी केला. तिच्या पायाची इजा तशी कांहीं फारशी नव्हती, परंतु तिला सरळ चालतां येत नव्हतं एवढं मात्र खरं. म्हणून मी तिला म्हटलं, ' तूं कितीही आरडाओरडा केलास तरी मी तुला जाऊं देणार नाहीं. आदर्श चित्र कंपनीचं काम सुरू व्हायला अजून बराच वेळ आहे. निदान आणखी दोन तीन महिने तरी लागतील. परंतु तुला खरोखरच या कंपनींत काम करायचं असेल तर मिश्रजींना मला ताबडतोब कळवलं पाहिजे. ' धुवांधार ' बोलपटांत काम करण्याचा निश्चय तुझा पक्का झाला असेल तर या बाबतींत विलंब करण्यांत अर्थ नाहीं. ' ती मला म्हणाली, ' सुशिक्षित लोकांची ही कंपनी आहे. आणि तुमचा कंपनीशीं संबंध राहाणारच म्हणून मला वाटतं बोलपटसृष्टींत प्रवेश करायला ही संधि बरी आहे. '

दुसरे दिवशीं तिला घेऊन मी मिश्रजींकडे गेलों. मिश्रजींकडे मि. चतर्जी आलेले होतेच. लीलाला पाहिल्यावर त्यांना जो एकदम आनंद झाला तो सांगतां येत नाहीं. त्यानंतर आम्ही आदर्श चित्र कंपनीच्या सॉलिसिटरकडे गेलों आणि लीलाचा कंपनीशीं करार झाला. त्या कराराप्रमाणें लीलाला महिन्याला रु. ३५० पगार ठरला. परंतु तिला ' धुवांधार ' मध्यें नायिकेची भूमिका द्यायची किंवा नाहीं हे त्यांत नमूद केलं नव्हतं. करार झाल्यानंतर लीला मला म्हणाली, ' वसंत ठेंगडी नाट्य-मन्वंतरमध्यें राहाणार नाहींत. त्यांना त्या कंपनीचा वीट आला आहे. त्यांना या कंपनींत काम मिळणार नाहीं का ? ' मी म्हटलं, ' वसंतला कां नाहीं काम मिळणार ? अवश्य मिळेल. ' त्याच्यासंबंधानं मी मिश्रजींकडे बोललों तेव्हां त्यांना त्यानं नाट्य-मन्वंतरमध्यें केलेल्या कामाची आठवण दिली. मी त्यांना म्हटलं, की ' असा मनुष्य कंपनींत असावा अशी माझी इच्छा आहे. ' मिश्रजी मला म्हणाले, ' तुमच्या इच्छेबाहेर मी नाहीं. ' झालं. वसंत ठेगडीची कंपनींत नेमणूक झाली.

कांहीं दिवसांनीं लीला परत अमरावतीला गेली. ती गेल्यानंतर तिनं मुंबईला घडलेली हकीगत तिथं सांगितली असावी असं मला वाटतं. कारण ती तिथं गेल्यावर केशवराव दाते तिच्यावर खूप भडकले आणि ते तिला वाटेल तें बोलले. दात्यांच्या चिडण्याचं कारण वेगळंच होतं. वर्तकांनीं केवळ लीलाला शह देण्यासाठीं प्रेमाला आणि डॉ. रानड्यांना जवळ केलं होतं. परंतु अमरावतीला प्रेमानं विंबाच्या भूमिकेंत जेव्हां प्रवेश केला, तेव्हां प्रेक्षकांनीं आरडाओरड करण्यास सुरुवात केली. लीला चिटणीस आंधळ्यांच्या शाळेंत काम करणार नाहीं असं ज्या लोकाना कळलं होतं, त्यांनीं आपल्या तिकिटांचे पैसे परत मागून घेतले. दात्यांना चिडण्याचं कारण झालं

तें हे! लीलानं त्यांना किती जीव तोडून सांगितलं कीं, 'माझ्या पायाला इजा झाल्यामुळें मला अमरावतीला खेळाच्या वेळीं येतां आलं नाहीं.' परंतु दाते तिचं कांहींच ऐकून घेईनात. ते तिला कुत्सितपणं म्हणाले, 'तुम्ही आतां बड्या फिल्म कंपनींत जाणार आहांत. तेव्हां तुम्हाला नाट्यमन्वतरची काय पर्वा!' मला जेव्हां ही हकीगत नंतर कळली, तेव्हां माझ्या अंगाचा अगदीं भडका उडाला. मी जर त्यावेळीं अमरावतींत असतों, तर दात्यांसारख्या यःकश्चित माणसाची तोंडांतून ब्र काढायची छाती झाली नसती. प्रभात कंपनींतील नोकरी सुटल्यामुळें दाते आतां नाट्यमन्वंतरच्या मागें लागले होते. दात्यांना नाट्यमन्वंतरविषयीं किती जिव्हाळा वाटत होता, हे मी केव्हांच ओळखून चुकलो होतो. मला जेव्हां लीलानं ही हकीगत कळवली तेव्हां तिला मी स्पष्ट लिहिलं कीं 'तूं आतां नाट्यमन्वंतरमध्ये राहूं नकोस. मुलांना घेऊन ताबडतोब निघून ये.' मला आतां नक्की आठवत नाहीं, परंतु लीला, मला वाटतं, माझं पत्र तिला मिळण्यापूर्वीच मुंबईला यायला निघाली असावी.

यानंतरचा नाट्यमन्वंतरचा इतिहास थोडक्यात सांगतां येण्यासारखा आहे. मला वाटतं, कीं लीला निघून आल्यानंतर ती कंपनी जळगांवला गेली. जळगांवहून नाशिकला गेली आणि नाशिकला त्या कंपनीची वाताहत झाली. त्या कंपनीची वाताहत होण्याचें कारण अगदीं ऐनवेळीं डॉ. रानडे आणि प्रेमा यांनीं आपल्या भूमिका करण्याचं नाकारलं. कंपनी बसली आणि कंपनींतील नटांना आपापल्या घरीं जाण्याइतकेसुद्धां पैसे मिळाले नाहींत. शेवटी सदू ठकार लीलाकडे गेला आणि तिला एका खेळांत काम करण्यासाठीं त्यानं विनति केली. लीलानं ती तात्काळ कबूल केली. सदू ठकारनं कृष्णाबाई पुराणीकलासुद्धां फक्त एकाच प्रयोगांत काम करण्याची विनंति केली. कृष्णाबाई ताबडतोब कबूल झाली. या दोघींना घेऊन सदू जेव्हा नाशिकला गेला तेव्हां त्यांना शेवटचा एक प्रयोग करतां आला. या प्रयोगाचं जें उत्पन्न झालं, त्याच्या जोरावरच कंपनींतील मंडळींना आपापल्या घरीं जाता आलं. परंतु कंपनीचं सामान मात्र नाशिकमध्येंच पडून राहिलं. त्या सामानाचं काय झालं ते मला आतांपर्यंत माहीत नाहीं.

आदर्श चित्र बोलपटाचं काम सुरू झाल्यानंतर मला केशवराव दाते काणेकरांच्या घरीं भेटले. त्यांच्या घरून आम्ही दोघे बरोबर बाहेर पडलो. रस्त्यांतून चालत असतां दाते मला म्हणाले, 'हें पहा डॉक्टर, नाट्यमन्वंतर पुन्हा चालू करण्याला ही सुवर्णसंधि आहे. तुम्ही असं करा कीं, लीलाबाईंनीं आणि तुम्ही नाट्यमन्वंतर आपल्या पुन्हा ताब्यांत घ्या. पैसे कांहीं फार लागणार नाहींत. फक्त आठशें रुपये जरूर आहेत आणि हे पैसे कंपनींत घालणं तुमच्या हातचा मळ आहे.' मी त्यांना म्हटलं, 'हें पाहा नाना, तुम्ही सागतां तें ठीक आहे. पण तुमच्या नाट्यमन्वंतरच्या भानगडींत पडण्याचा

मूर्खपणा मी पुन्हा करणार नाहीं. तुमच्यासारख्या मंडळींना उत्तेजन देण्यासाठीं आठशें रुपयेच काय, आठ रुपये सुद्धां खर्च करण्याची माझी तयारी नाहीं.'

नाट्यमन्वंतराचा हा खरा इतिहास आहे. तो जसा घडला आणि मला आठवला तसा मी तो या ठिकाणीं दिला आहे. नाट्यमन्वंतरमध्यें सामील असलेल्या प्रत्येक इसमानं नाट्यमन्वंतरविषयीं लिहिलं आहे, परंतु नाट्यमन्वंतरसाठीं मीं काय केलं त्याचा उल्लेख करण्याचा उदारपणा एकानंही दाखवला नाहीं, म्हणूनच मला ही सर्व हकीगत सांगावी लागली. मी लिहिलेली हकीगत चूक आहे असं नाट्यमन्वंतरशीं संबंध असलेल्या कोणत्याही माणसानं दाखवून द्यावं. तपशीलामध्यें एकादे वेळेस चूक झाली असेल, पण मी लिहिलेला नाट्यमन्वंतरचा इतिहास चूक आहे असं म्हणण्याची कुणाची छाती झालीच तर त्यानं पुढं यावं. त्याला उत्तर द्यायची माझी तयारी आहे.

आदर्श चित्र कंपनींत लीलाशिवाय दुसऱ्या दोन स्त्रिया आल्या होत्या. मिस् मेरी ॲलेक्झांडर हें एकीचं नांव होतं आणि जी आज सिनेमासृष्टींत 'प्रभा' या नांवान प्रसिद्ध आहे ती दुसरी. शेट गोविंददासनीं प्रभाला हिरॉइनची भूमिका देण्याचं जवळजवळ कबूल केलं होतं. ही गोष्ट मला कळल्यानंतर मी मिश्रजींना सांगितलं कीं 'तुम्ही तिघींचीही परीक्षा घ्या, या परीक्षेंत जी स्त्री उतरेल तिला तुम्ही हिरॉइनची भूमिका द्या.' मिश्रजी म्हणाले, 'तुम्ही म्हणतां तें खरं आहे. मी तसंच केलं असतं. परंतु बाबूसाब प्रभाच्या नवऱ्याला वचन देऊन चुकले आहेत त्याचं काय करायचं?' मी त्यांना म्हटलं, 'मी वचनबिचन कांहीं जाणत नाहीं. लीला जर हिरॉइनच्या भूमिकेस नालायक ठरली तर तुम्ही तिला दासीचं काम द्या. मी त्याबद्दल तोंडांतून एक ब्रसुद्धां काढणार नाहीं. परंतु केवळ बाबूसावनीं एकाद्या माणसाला वचन दिलं म्हणूनच त्याच्या बायकोला मुख्य भूमिका द्यायची ही कल्पनाच मला पसंत नाहीं.' मि. चतर्जी तिथंच होते, ते म्हणाले, 'धुवांधारमधील नायिकेची भूमिका लीलाबाईनाच दिली पाहिजे. ती दुसऱ्या कुणालाही करतां येणार नाहीं.' खुद्द दिग्दर्शकानंच असं मत दिल्यानंतर मिश्रजींचा नाइलाज झाला आणि त्यांनीं प्रभाच्या नवऱ्याला सांगितलं कीं 'आम्ही प्रभाला या बोलपटांत दुय्यम नायिकेची भूमिका द्यायला तयार आहोत.' हें ऐकल्याबरोबर प्रभाचा नवरा चिडला आणि तो तावातावानं आपल्या बायकोला घेऊन निघून गेला. तो निघून गेल्यावर मिश्रजी मला हसतच म्हणाले, "डॉक्टरसाब, आतां सर्व जबाबदारी तुमच्यावर आहे. 'धुवांधार' मध्यें तीन स्त्रियांच्या भूमिका आहेत हें तुम्हांला माहीत आहे. तेव्हां तुम्ही आतां तिसरी नटी शोधून काढा." मिश्रजींचे हे शब्द ऐकल्यावर माझी मोठी पंचाईत झाली. कारण त्यावेळीं मला या धंद्याची कांहींच माहिती नव्हती. तरीसुद्धां कंपनींचं काम अडूं द्यायचं नाहीं असा मी निश्चय केला आणि कंपनीचे आर्ट डायरेक्टर एन्. एन्. सील यांना घेऊन मी मुंबईभर वणवण फिरलों.

शेवटीं दुय्यम नायिकेच्या भूमिकेसाठीं मी कमला वरेरकर हिला मुक्रर केली आणि तिन आपलं काम अत्यंत चोख बजावलं हें लिहिण्यास मला अत्यंत अभिमान वाटतो. ' धुवांधार ' बोलपटाचं प्रसिद्धी खातं माझ्याकडे होतं. त्यामुळं लीला, कमला आणि मीरा ( म्हणजे मिस् अलेक्झांडर ) यांच्या निरनिराळ्या पोझेस घेऊन त्यांना मी प्रसिद्धी देण्याला सुरुवात केली. विशेषतः टॉमस स्टुडिओमध्यें जाऊन लीलाचा एक विशिष्ट पोज मी घेतला आणि श्री. स. का. पाटीलनीं ( आमचे त्यावेळचे प्रसिद्धी-करणाचे एजंट) ' टाइम्स 'च्या इलस्ट्रेटेड विकलीमध्यें अगदीं पहिल्या पानावर तो छापून येण्याची व्यवस्था केली. इतकी बोलपटाची जाहिरात चालू असतां बोलपटाला मात्र सुरवात होत नव्हती. त्यावेळीं आमचे कॅमेरामन अंबालाल पटेल होते. आमच्या साउंड इंजिनियरचं नाव मला आतां आठवत नाहीं. असेच रिकामे दिवस चाललेले पाहून मी चतर्जींना म्हणालो, ' तुम्ही बोलपटाला केव्हां सुरवात करणार? तुमचं ' शूटिंग सुरू व्हायला अजून किती दिवस अवकाश आहे ? ' माझा प्रश्न ऐकल्यावर चतर्जी थोडेसे बावरले. नंतर थोडा वेळ विचार करून ते म्हणाले, ' आपण उद्यां शूटिंगला सुरवात करूं. तुम्ही लीलाबाईंना आणि मि. भार्गवना बरोबर ११ वाजतां मेकप करून तयार राहायला सांगा. नंतर आपण व्हिक्टोरिया गार्डनमध्यें जाऊं. कारण तिथं आपल्याला टायगरचा सीन घ्यायचा आहे. ' त्यांनीं म्हटल्याप्रमाणं मि. भार्गव आणि लीला यांना घेऊन मी व्हिक्टोरिया गार्डनमध्ये गेलो.

तिथं गेल्यावर पाहातो तर चतर्जी आणि मिश्रजी अगोदरच येऊन बसले होते. भार्गव आणि लीला याना सोडून मी चतर्जी काय करतात हें पाहायला बाहेर आलो. पाहातों तर मि. चतर्जी एका वाघाच्या पिंजऱ्याच्या बाहेर वाकडे तिकडे उभे राहून हातवारे करीत होते. चतर्जींच्याजवळ मिश्रजी हिरव्या गवताच्या उंचवट्यावर बसले होते. पिंजऱ्यामध्ये डोळ्यांत प्राण आलेला वाघ उभा होता. त्याच्यासमोर झाडाची फांदी हातांत घेऊन एक माणूस उभा होता. मी कांहीं न बोलतां मिश्रजीजवळ येऊन बसलो. नंतर मि. चतर्जींनीं पिंजऱ्याभोवतीं येरझाऱ्या घालायला सुरवात केली आणि त्यांच्या मागोमाग अंबालाल पटेल कॅमेरा घेऊन फिरत होते. मिश्रजी आणि मी आम्हां दोघांनाही ते काय करताहेत याची कल्पना नव्हती म्हणून आम्ही ते काय करतात तें पाहात होतों. मधेंच मि. चतर्जी यायचे आणि मिश्रजींच्या कानाला लागून कुज-बुजायचे. मी मिश्रजींच्या अगदीं जवळ बसलों होतो, पण ते काय बोलले ते मला ऐकूं आलं नाहीं. मिश्रजींनीं होकार दिल्याबरोबर मि. चतर्जी पुन्हा परत जात आणि ते आणि अंबालाल पटेल पिंजऱ्याभोंवतीं येरझाऱ्या घालूं लागत. असं होतां होतां दुपारचे तीन वाजले तेव्हां मी कंटाळलो. तिकडे लीला १०॥ वाजल्यापासून मेकप करून बसली आहे हा विचार एकदम माझ्या मनांत आला. ती किंवा मि. भार्गव

यांनीं कांहीं खाल्लं नव्हतं याची आठवण जेव्हां मला झाली, तेव्हां मला चतर्जींचा खूप राग आला. मी त्यांना म्हटलं, 'तुम्ही चालवलं आहे तरी काय? मला कल्पना तरी द्या. तुमच्या बोलपटांतील नायक-नायिका हीं आतांपर्यंत जेवल्याशिवाय बसलीं आहेत. त्यांचा कांहीं विचार करा.' हें मी म्हटल्यावर चतर्जी घाबरले. ते मला म्हणाले, 'हे पाहा, तो माणूस तिथं झाडाची फांदी घेऊन उभा आहे ना, त्या फांदीवरून वाघानं उडी मारावी असे आम्ही दोघे प्रयत्न करीत आहोत.' हे त्यांचे उद्गार ऐकल्यावर मी म्हटलं, 'ठीक आहे. तुम्ही तसा प्रयत्न करा. मला असं वाटतं सध्यातरी तुम्हांला नायक-नायिकेची जरूरी नाहीं म्हणून मी त्यांच्या जेवण्याची कांहींतरी व्यवस्था करतो.' असं म्हणून मी तिथून निघालो आणि त्या दोघांना खाण्यासाठीं जवळच मिळत असलेले कांहीं पदार्थ आणून दिले.

इतकं व्हायला अर्धा-पाऊण तास लागला. त्यानंतर मी परत मिश्रजींजवळ येऊन बसलों. नंतर पाहातों तों चतर्जी आणि अंबालाल पटेल हे वाघाच्या पिंजऱ्या-भोंवतीं सारखे घिरट्या घालीत होते. शेवटीं पांच वाजले तरी चतर्जींच्या इच्छेप्रमाणं वाघानं उडी मारली नाहींच. मी मिश्रजींना म्हणालों, 'आतां आपण परत जाऊं या. आजच्या सबंध दिवसांत आणि रात्रींत हा मरतुकडा वाघ त्या फांदीवरून उडी मारील असं मला वाटत नाहीं.' बिचारे मिश्रजी! तेही कंटाळले होते. मी सूचना केल्याबरोबर ते उठले. ते म्हणाले, 'आतां आपण सर्वजण घरीं जाऊं.' कंपनीच्या बिऱ्हाडीं गेल्यानंतर मी मिश्रजींना ओरडून सांगितलं, 'हा तुमचा चतर्जी ग्रिफीथचा शिष्य असेल, परंतु माझ्या मतें अत्यंत नालायक आणि मूर्ख असा दिग्दर्शक आहे.' मी हे बोलत असतांनाच आमच्या खोलींत मि. चतर्जी आले. म्हणून मिश्रजी कांहीं बोलले नाहींत. मी चतर्जींशीं एक शब्दही न बोलतां लीलाला घेऊन घरी गेलो. त्यानंतर ही कंपनी 'धुवांधार'चें सीन घेण्यासाठीं जबलपूरला गेली आणि त्या ठिकाणींच मि. चतर्जी हे 'सेवानिवृत्त' झाले. ते कां सेवानिवृत्त झाले याची मी चौकशी केली नाहीं. परंतु आदर्श चित्र कंपनी जेव्हां मुंबईला आली, तेव्हा त्यांत दिग्दर्शकच कुणी नव्हता. मुंबईत आम्ही इंपीरियल स्टुडिओ घेतला होता. 'धुवांधार'चं शूटिंग चालू असतां आमच्या बोलपटाला दिग्दर्शकच नव्हता. इंपीरिअल फिल्म कंपनीचे मालक फरदुंजी इराणी यानीं त्याचं दिग्दर्शन करावं किंवा ते हजर नसले तर त्याच कंपनींत असलेले दुसरे दिग्दर्शक मि. चौधरी यांनीं दिग्दर्शन करावं, असं चाललं होतं. शेवटीं हा बोलपट तयार होऊन मुंबईच्या कृष्ण सिनेमांत लागला आणि मी तो जाहिरातीच्या जोरावर पांच आठवडेपर्यंत चालवला.

ही सर्व भानगड होत असतांनाच लीला आणि माझ्यामध्यें कांहीं मतभेद निर्माण झाले. मी १९३५ च्या जानेवारीमध्यें माझं घर सोडलं आणि आर. एल. ट्रस्टमध्यें येऊन राहिलों. हे आमचे मतभेद काय होते ते जाणून घेण्याची कुणीही उत्सुकता

दाखवूं नये. त्यांत कदाचित् माझा दोष असेल, कदाचित् लीलाचाही दोष असेल. मला या ठिकाणीं एवढंच सांगायचं आहे कीं नवराबायको निरनिराळीं राहूं लागलीं कीं त्यांच्यापैकीं एकानं तरी, कांहीं तरी मोठं भयंकर पाप केलं असलं पाहिजे असा जो सर्वसाधारण लोकांमध्यें समज पसरलेला आहे तो चूक आहे. त्याचं कारण मी स्पष्ट करतो. आम्ही दोघं एकत्रपणे जवळजवळ आठ वर्षें होतों. या अवधींत नवराबायकोंचे दोष कळून येण्यासारखे असतात. परंतु ते कळून आले तरी साधारणतः स्त्रीला स्वतंत्र होण्याचा मार्ग नसतो. आमच्या बाबतींत तसं कांही नव्हतं. सांपत्तिक दृष्ट्या लीला आतां पूर्ण स्वतंत्र झाली होती. तरीसुद्धां माझ्यापासून दूर आणि स्वतंत्र राहाण्याचा निश्चय तिनं केला त्याबद्दल मला अजूनही तिचं कौतुक वाटतं. आम्ही निराळे राहिल्यानंतर लीलानं माझ्याजवळ घटस्फोटाची मागणी केली आणि मी ती तात्काळ मान्य केली. परंतु ब्रिटिश लोकांच्या मूर्खपणामुळें घटस्फोटाचा कायदा असा कांहीं करून ठेवला आहे कीं नवरा किंवा बायको यांपैकीं एकाची तरी बदनामी केल्याशिवाय घटस्फोट मिळणं शक्य नाही. लीलानं मला सांगितलं कीं, 'तुम्ही कोर्टांत जा आणि माझ्याविरुद्ध घटस्फोट घ्या.' अर्थात मला हें कबूल असणं शक्यच नव्हतं. मी तिला सांगितलं कीं 'साधारणतः कुठलाही पुरुष आपल्या स्वतःच्या बायकोवर असले घाणेरडे आरोप करण्यास तयार होत नाहीं. तुला जर घटस्फोट पाहिजे असेल तर तो तूं घे आणि त्यासंबंधांत तुला जो पुरावा पाहिजे असेल, तो पुरावा तुला मी द्यायला तयार आहें.' त्याप्रमाणे लीलानं १९३७ च्या एप्रिल महिन्याच्या १६ तारखेला मुंबईच्या हायकोर्टापुढे अर्ज करून घटस्फोट घेतला.

# २२



कराचीच्या कॉंग्रेसमध्ये गांधीजींना दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठीं कॉंग्रेसचे एकमेव प्रतिनिधि म्हणून पाठविण्याचं ठरलं. त्याप्रमाणें गांधीजी लंडनला जाण्याच्या तयारींत होते. मला आतां पक्कं आठवतं कीं, त्यांच्या जाण्यामध्यें लॉर्ड विलिंग्डननीं कांहीं तरी अडथळा आणला होता म्हणून गांधीजींनीं आपला जाण्याचा बेत रद्दीत केला. नंतर अगदीं ऐनवेळीं हा अडथळा दूर झाला व गांधीजी लंडनला निघून गेले. त्यानंतर माझी पं. जवाहरलाल नेहरूंशीं अगदीं चमत्कारिक रीतीनं गांठ पडली. त्यावेळीं कॉ. रॉय पकडले गेले नव्हते. ते गुप्तपणें वावरत होते. त्यांनीं विनंती केल्यावरून पंडितजींनीं कॉ. रॉयना गुप्तपणें भेटण्याचं कबूल केलं. रॉयबरोबर अर्थात आम्ही रॉयवादी होतोच, परंतु या बैठकीला जाण्यापूर्वी कॉ. रॉयनीं मला बजावून सांगितलं कीं, 'पंडितजी माझ्या निमंत्रणावरून आपल्याला भेटायला येत आहेत. तेव्हां त्यांना कांहीं भलतेसलते प्रश्न विचारायचे नाहींत.' ही आमची बैठक क्वीन्सरोडवरील लाड मॅन्शनमध्यें असलेल्या डॉ. कोहलेच्या कन्सल्टिंग रूममध्यें भरली होती. पंडितजी आल्याबरोबर आम्ही त्यांचं उठून स्वागत केलं. कॉ. रॉयनीं आम्हां सर्वांची ओळख पंडितजींना करून दिली. नंतर रॉयनीं रॉयगटाचा कार्यक्रमाविषयीं त्यांना थोडक्यांत माहिती दिली. ती ऐकल्यानंतर पंडितजी म्हणाले, कीं 'Ideology च्या दृष्टीनं विचार केला तर मी तुमच्याशीं पूर्ण सहमत आहें. परंतु एकंदर हिंदुस्थानची स्थिति पाहिली तर गांधीजींचंच नेतृत्व इष्ट आहे असं मला वाटतं.' मी या बैठकींत कांहीं न बोलण्याचा निश्चय केला होता. त्यावेळीं मी कट्टर गांधीविरोधी होतो. अर्थात् पंडितजींचं बोलणं मला पटलं नाहीं. मी त्यांना म्हटलं, 'पंडितजी, आपण पूर्ण स्वातंत्र्यवादी आहांत. आपल्याला खरोखरच असं वाटतं कीं काय, कीं गांधीजी आपल्याला पूर्ण स्वातंत्र्य मिळवून देतील?' पंडितजी जोरानं म्हणाले, 'अर्थात्! गांधीजी गोलमेज परिषदेमध्यें पूर्ण स्वातंत्र्याची मागणी करणार आहेत.' मी त्यांना म्हणालों, 'तें मला माहीत आहे. परंतु गांधीजी हात हालवीत परत येणार आहेत हेंही मला माहीत आहे!'

हें माझं उत्तर ऐकून पंडितजी थोडेसे चिडल्यासारखे झाले. ते म्हणाले, 'तुम्ही केलेलं भविष्य खरं होणार कशावरून?' मी त्यांना म्हणालो, कीं 'माझं भविष्य खरं ठरणार हें मला जितकं माहीत आहे त्यापेक्षां आपल्याला तें अधिक माहीत असलं पाहिजे. म्हणून त्या प्रश्नाची चर्चा करण्याची जरुरी नाहीं. मला फक्त आपण इतकंच सांगा कीं महात्माजी, जर मी म्हणतों त्याप्रमाणें खरोखरच हात हालवीत परत आले तर आपण काय कराल?' माझा हा प्रश्न ऐकून पंडितजी थोडा वेळ स्वस्थ बसले. नंतर ते हलक्या आवाजांत म्हणाले, 'असं जर खरोखर घडलं तर मी गांधींचं नेतृत्व झुगारून देईन.' ( I shall break with Gandhiji हे त्यांचे उद्गार होते.) हीं आमचीं प्रश्नोत्तरं चाललीं असतां कॉ. रॉय मला खुणा करून गप्प बसविण्याचा प्रयत्न करीत होते, परंतु मी त्यांच्याकडे लक्षच दिलं नाहीं. थोड्या वेळांत आमची ही बैठक संपली.

पंडितजींची आणि माझी दुसरी भेट झाली ती जमनादास मेहता यांच्या मलबारहिलवरील बंगल्यांत. ट्रेड युनियन ऐक्य समितीचे जमनादास अध्यक्ष होते. म्हणून त्यांच्याच घरीं या समितीची सभा भरविण्याचं ठरलं होतं. या बैठकींत ट्रेड युनियन कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून पंडित जवाहरलालही हजर राहाणार होते. पं. जवाहरलाल येणार म्हणून कॉ. रॉयनीं या बैठकीस हजर राहाण्याचा आग्रह धरला, परंतु मीं त्यांना साफ नकार दिला. मी त्यांना म्हटलं, 'मलबारहिलसारख्या ठिकाणीं तुम्ही माझ्याबरोबर उघडपणं आलांत तर तुम्हांला पकडण्याची पोलिसांना आयतीच संधी मिळेल.' परंतु कॉ. रॉय मुळींच ऐकेनात म्हणून त्यांना घेऊन मी जमनादास यांच्या घरीं गेलों. जमनादासांनींच दार उघडलं. मी त्यांना म्हटलं, कीं 'या बैठकीला हजर राहाण्याची माझे मित्र डॉ. महंमूद याची तीव्र इच्छा आहे. हे आपल्याला आपल्या कार्योंत मदत करूं इच्छितात.' जमनादासनीं लगेच जोरानं डॉ. महंमूदशीं हस्तांदोलन केलं. 'You are quite welcome' असं म्हणून त्यांनीं रॉयना आपल्याबरोबर नेलं. मीही त्यांच्या मागोमाग बैठकीच्या जागीं गेलों. पं. जवाहरलाल अगोदरच येऊन बसले होते. त्यांची रॉयची जरी पूर्वीपासून ओळख होती तरी त्यांनीं ती दाखवली नाहीं. या बैठकींत ट्रेड युनियन ऐक्यासंबंधीं आम्ही बरीच चर्चा केली. बैठकीचं काम संपल्यानंतर कॉ. रॉयना घेऊन मी परत घरीं आलों.

मी 'संडे ॲडव्होकेट' चालवीत असतां दुसऱ्या कायदेभंगाच्या चळवळीला उतरती कळा आली होती. ज्यांनीं कॉंग्रेसच्या उजव्या गटाला आमच्याशीं फटकून राहून संपूर्ण पाठिंबा दिला होता, असे बरेचसे कॉंग्रेसचे जहालवादी गांधीजींच्या नेतृत्वाविषयीं सांशक झाले होते आणि त्यांनीं कॉंग्रेसमध्ये एक निराळा गट स्थापन करण्याचा विचार केला. पंडित जवाहरलालजींची या जहालवाद्यांबद्दल पूर्ण सहानुभूति

होती. या जहालवाद्यांमध्यें बॅ. पुरुषोत्तम त्रिकमदास, बॅ. मिनु मसानी आणि मि. युसुफ मेहेरअल्ली ही मंडळी प्रमुख होती. समाजवादाच्या तत्त्वावर काँग्रेसची पुनर्घटना व्हावी आणि काँग्रेसमध्यें अधिक प्रभावी नेतृत्व निर्माण व्हावं अशी त्यांची आकांक्षा होती. या तिघांना चार्लस मस्कॅरीनस सर्व तऱ्हेची मदत करीत असे. तो एकदां माझ्या ऑफिसमध्यें आला आणि मला म्हणाला, 'या नवीन गटासाठीं मला एक draft programme तयार करायचा आहे, तो कसा तयार करायचा तें तुम्ही सांगा.' मी त्याला म्हटलं, कीं 'नवीन कार्यक्रम तयार करण्याची जरूरच नाहीं. आज रॉयवादी लोक अति जहालवादाकडेच झुकत आहेत. कदाचित् ते पुढें मागें कम्युनिस्ट पक्षालाही जाऊन मिळतील. परंतु आपण जो १९३० सालीं कार्यक्रम आखला होता तोच बरोबर होता. तोच निराळ्या शब्दांत लिहून त्यांना दे म्हणजे झालं.' चार्लसनं त्याप्रमाणें 'नवीन' कार्यक्रम तयार केला आणि मला दाखवला. मी त्यांत मामुली स्वरूपाचा थोडा फेरफार करून त्याला परत दिला. चार्लीनं तो कार्यक्रम नंतर पुरुषोत्तम त्रिकमदास, मसानी आणि मेहेरअल्ली यांना दाखवला. त्यांनीं तो कार्यक्रम पसंत केला. त्यानंतर जोंपर्यंत हे लोक कॉंग्रेस समाजवाद्यांचा एक कॉंग्रेसमधलाच गट म्हणून कार्य करीत होते, तोंपर्यंत त्यांना मी सर्व तऱ्हेनं पाठिंबा दिला. पण नंतर त्यांनीं या गटाचं काँग्रेस समाजवादी पक्षात रूपांतर केलं आणि मी त्यांच्यापासून अलिप्त झालों. मी त्यांना स्पष्ट बजावलं होतं कीं, काँग्रेसमध्यें कोणताही स्वतंत्र पक्ष राहूंच शकत नाहीं. तुम्हांला जर नवीन पक्ष काढायचा असेल तर तुम्हांला कॉंग्रेसमध्यें राहतां येणार नाहीं. यावर आमची बरीच चर्चा झाली. मिनु मसानींचा आणि माझा वाद तर मुंबईतील कांहीं वृत्तपत्रांतून जाहीरपणं चालला होता. माझे आणि काँग्रेस समाजवाद्यांचे वैयक्तिक संबंध चांगले होते, त्यांत मुळींच बिघाड झाला नाहीं, परंतु राजकीय संबंध मात्र पार तुटले. हे संबंध तुटल्यानंतर आदर्श चित्र कंपनीच्या बिन्हार्डी अच्युत पटवर्धनांची आणि माझी चार्लीनं ओळख करून दिली. त्यानंतर आमचा परिचय कांहीं ना कांहीं कारणानं वाढतच गेला. 'कॉंग्रेस सोशॅलिस्ट' हें इंग्रजी साप्ताहिक निघाल्यानंतर त्या साप्ताहिकाचे संपादक अशोक मेहता यांच्याशीं माझा दाट परिचय झाला.

काँग्रेस समाजवादी पक्ष स्थापन झाल्यापासून त्या पक्षाची अत्यंत केविलवाणी स्थिति झाली. या पक्षाशीं जाहीरपणं संबंध ठेवण्याचं पं. जवारलालनीं नाकारलं. त्यानंतर या पक्षानं जहालगटाशीं चुंबाचुंबी करण्याचा प्रयत्न केला. एकेकाळीं कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी असलेले श्री. जयप्रकाश नारायण यांनीं प्रथम रॉयगटाशीं सहकार्य करण्याचा प्रयत्न केला. नंतर ते या नवीन पक्षाचे जनरल सेक्रेटरी झाले. या पक्षामध्यें प्रथम रायगटानं धुमाकूळ घातला आणि हा पक्ष मोडण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. नंतर कम्युनिस्ट या पक्षात शिरले. त्याचं मुख्य कारण म्हणजे

जयप्रकाशांना कम्युनिस्टांविषयीं आपलेपणा वाटत असे हे होय. कम्युनिस्टांच्या कारवाईमुळें या पक्षाच्या मीरतच्या अधिवेशनांत मार्क्सवादी क्रांतिकारक समाजवादाचा पुरस्कार करण्यांत आला. या अतिजहालवादी धोरणाचा माझे मित्र पु. य. देशपांडे यांनीं मीरतच्या अधिवेशनांत तीव्र निषेध केला, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. या अतिजहालवादी धोरणामुळें या पक्षामध्यें दोन तीन गट निर्माण झाले. अंतर्गत मतभेदामुळें तो पक्ष मोडण्याच्या बेतांत होता. या कॉंग्रेस समाजवादी धोरणाबद्दल मिश्रजी आणि मी यांनीं बरीच चर्चा केली. ते मला म्हणाले, 'तुम्ही जें People साप्ताहिकांत धोरण स्वीकारलं आहे, त्याच्याशीं मी पूर्ण सहमत आहें. कॉंग्रेसमध्यें जहालवादी गट पाहिजे परंतु स्वतंत्र पक्ष नको, हें तुमचं म्हणणं बरोबर आहे. आतां कॉंग्रेस समाजवादी पूर्णपणें कम्युनिस्टाच्या आहारीं गेले आहेत. म्हणून आपण खऱ्या कॅांग्रेस जहालवाद्यांचा एक नवीन गट स्थापन करूं.' अर्थात् माझी हा गट स्थापन करण्याबद्दल पूर्ण सहानुभूति होती. परंतु तो स्थापन करण्याची संधि आम्हांला मुळींच मिळाली नाहीं. कारण आदर्श चित्र कंपनीशीं असलेले माझे संबंध तोडून मी त्यावेळीं निराळी फिल्म कंपनी काढण्याच्या विचारांत होतो आणि निवडणुकी लढवण्यासाठीं मिश्रजींना जबलपूरला जाणं भाग पडलं.

ही फिल्म कंपनी काढण्याचा विचार माझ्या मनांत आला त्याचं मुख्य कारण हेंच कीं, पूर्वी माझ्या लेबर कॉलेजमध्यें अर्थशास्त्र शिकवीत असलेले बॅ. टी. टी. थडाणी यानीं वीस हजार रुपयांपर्यंत मला मदत करण्याचं कबूल केलं. त्याप्रमाणें शारदा फिल्म कंपनीचे मयाशंकर ठक्कर आणि भोगिलाल दवे यांनीं गोरेगांवमधील स्टुडिओ आम्हांला देण्याचं कबूल केलं. आम्हांला म्हणण्याचं कारण इतकच कीं, फिल्म कंपनी काढण्याच्या कामांत माझे जबलपूरचे मित्र श्री. द्वारकादास भाटिया हे माझे भागीदार होते. त्यांनीं आणि मी मिळून अरुण पिक्चर नांवाची फिल्म कंपनी स्थापन केली. मी गोरेगांवला एक बंगला भाड्यानं घेतला आणि मी तिथंच जाऊन राहिलों. भाटिया मात्र मुंबईतील गझदरगल्लींतील चाळींत राहात असत. कंपनीचा सर्व प्राथमिक खर्च आम्ही केला. आमचा अन् मयाशंकर ठक्करचा मेरवानजी आणि कोल्हा या सॉलिसिटरतर्फे करार झाला. थडाणींची आणि माझी पूर्वीची दाट ओळख असल्यामुळं आणि सभ्य समजल्या जाणाऱ्या भांडवलदारांत त्यांची गणना होत असल्यामुळें मी त्यांच्या शब्दावर विसंबून निर्धास्त राहिलों होतों. आमच्या पहिल्या बोलपटासाठीं माझे मित्र पु. य. देशपांडे यांची 'बंधनाच्या पलीकडे'ही कादंबरी घेण्याचं ठरवलं. इतकंच नव्हे तर बोलपट तंत्राला अनुसरून त्यांनीं कथानकही आम्हांला तयार करून दिलं. त्याचा स्क्रिप्ट कुमारसेन समर्थ यांनीं तयार केला. कारण ते आणि बापूराव आपटे या बोलपटाचं दिग्दर्शन करणार होते. या बोलपटांतील नायिकेचं काम करण्यासाठीं शोभना

समर्थंची योजना करावी असा आमचा विचार होता. एवढी सर्व तयारी झाल्यानंतर मी थडाणीकडे गेलों. ते म्हणाले, 'मी तुमच्याकडून फक्त पांच टक्के व्याज आणि चार टक्के नफा घेईन. म्हणजे तुम्हांला एकंदर नऊ टक्के द्यावे लागतील. परंतु पैसे देण्यापूर्वी मला तुमचा स्टुडियो पाहिला पाहिजे.' दुसऱ्या दिवशीं सकाळीं माझ्या मोटारींतून मयाशंकर आणि मी थडाणींकडे गेलों आणि थडाणींना घेऊन गोरेगांवला आलों. स्टुडिओ पाहिल्यानंतर थडाणींनीं समाधान व्यक्त केलं आणि मला ते म्हणाले कीं, 'तुम्ही उद्यां माझ्याकडे या म्हणजे आपण पैशासंबंधींचा कच्चा करार तयार करूं.' मी यांच्याकडे दुसरे दिवशीं गेलों. ते मला म्हणाले, 'चार्लस आतांच माझ्याकडे येऊन गेला. (चार्लस म्हणजे चार्लस मॅस्केरीनस. तो पूर्वी थडाणींकडे प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून काम करीत असे. त्यानंच प्रथम माझी आणि थडाणींची ओळख करून दिली होती) आणि त्यानं मला सांगितलं कीं मयाशंकर हे तुमच्या कंपनींत भागीदार आहेत आणि तुम्ही दोघांनीं मला फसवण्याचा कट केला आहे म्हणून.' हे त्यांचे शब्द ऐकल्याबरोबर मी भडकलों. इतका भडकलों कीं मी त्यांना काय बोललों तें मला आतां आठवत नाहीं. परंतु मी फारच कडक भाषा वापरली असली पाहिजे असा माझा समज आहे. कारण जवळच खालीं उभा असलेला माझा ड्रायव्हर व्हरांड्यांत आला आणि त्यानं मला बळजबरीनं ओढून नेलं. मी कांहीं न बोलतां गाडींत बसलो. ड्रायव्हरनं गाडी तडक गोरेगांवला आणली. मला खरोखर संताप आला होता चार्लीचा. कारण तो त्यावेळीं माझ्याकडे राहात असे. तो आजारी असल्यामुळें खेतवाडींतील कॉंग्रेस हॉस्पिटलमध्यें पडून राहिला होता. हॉस्पिटलमधून मी त्याला घेऊन ३।४ दिवसांपूर्वीच गोरेगांवला गेलों होतों. त्या दिवशीं संध्याकाळीं तो घरीं आला नाहीं. आणखी दोन दिवस त्याचा पत्ताच नव्हता. नंतर तिसऱ्या कीं चौथ्या दिवशीं तो घरीं आला. त्याला मी थडाणीकडे घडलेली सर्व हकीगत सांगितली. ती ऐकल्यावर तो म्हणाला, 'मी थडाणीला तुमच्याबद्दल कांहींच सांगितलं नाहीं. पण भेटायला गेलों होतों खरा.' मी त्याला म्हटलं, 'तुझं म्हणणं जर खरं आहे तर गेले तीन दिवस तूं इकडे फिरकला कां नाहींस?' माझ्या प्रश्नाचं उत्तर देण्याची तो टाळाटाळ करूं लागला. तेव्हां मी त्याला म्हटलं, 'तुझ्यासारख्या कृतघ्न माणसाशीं मला मुळींच संबंध ठेवायचा नाहीं.' इतकं मी म्हटल्याबरोबर तो सामान घेऊन निघून गेला. थडाणींनीं पैसे देण्याचं नाकारल्यानंतर 'बंधनाच्या पलीकडे' हा बोलपट आम्हांला काढतां येणं शक्य नव्हतं. तरीसुद्धां कंपनी जगवण्याची तीव्र इच्छा आम्हांला होती. म्हणून इकडचे तिकडचे पैसे जमवून आम्हीं 'शरीफ डाकू' या नांवाचा एक स्टंट बोलपट काढण्याचं ठरवलं. या बोलपटासाठीं आम्ही अंधेरींतील एक स्टुडिओ भाड्यानं घेतला. परंतु २-३ रीलचं शूटिंग झाल्यानंतर सर्व कारभार संपुष्टांत आला. कारण जवळचे सर्व पैसे संपले होते.

त्यानंतर कार व इतर सामान विकून देणेदारांचं देणं दिलं आणि मी पुन्हां पूर्वपदावर आलों.

१९३४ सालीं ट्रेड युनियन कॉंग्रेसचं अधिवेशन नागपूरला भरलं होतं. ट्रेड युनियन कॉंग्रेस आणि ट्रेड युनियन फेडरेशन एक करायची हा माझा पूर्वीचा उत्साह अजूनही कायम होता. म्हणून मुंबईंतील गिरणी कामगार संघ ( कांदळकर पक्ष ) आणि मालवणांतील काजूगार कामगार संघ या दोन संघांच्या वतीनं मी अधिवेशनला हजर राहिलों होतों. त्यावेळीं कॉंग्रेस आणि फेडरेशन हीं एक होण्याच्या मार्गांत जर कुणाचा अडथळा असेल तर तो नानासाहेब जोशी यांचा. म्हणून कॉंग्रेसच्या अधिवेशनांत मी एक ठराव पास करून घेतला कीं, फेडरेशन आणि कॉंग्रेस यांचं ऐक्य घडवून आणण्यासाठीं एक संयुक्त समिती नेमावी आणि या समितीवर कॉंग्रेसचे पांच सभासद आणि फेडरेशनचे पांच असावेत. माझे मित्र कलाप्पा त्यावेळीं फेडरेशनमध्यें होते. त्यांनीं माझ्या सांगण्यावरून हाच ठराव फेडरेशनच्या अधिवेशनांत पास करून घेतला. कारण फेडरेशनचं अधिवेशन त्याच वेळीं नागपुरांत भरलं होतं. या संयुक्त समितीवर ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या वतीनं रुईकर, मी आणि आणखी तिघेजण होतों. फेडरेशनच्या वतीनं नानासाहेब जोशी, कलाप्पा आणि आणखी तिघे अशा पांच जणांची नेमणूक झाली होती.

ह्या संयुक्त समितीची तांतडीची बैठक मी नागपूरलाच घडवून आणली. त्या बैठकींत कॉंग्रेसच्या वतीनं मी बोलत होतों आणि फेडरेशनच्या वतीनं नानासाहेब बोलत होते. नानासाहेब मला म्हणाले, 'फेडरेशन आणि कॉंग्रेस यांची एकी व्हावी हे मला कबूल आहे. परंतु एक होण्यापूर्वी आम्ही कांहीं अटी घालणार आहोत. त्या तुम्हांला कबूल आहेत का ? कबूल असल्या तर सांगा.' मी त्यांना लगेच उत्तर दिलं, 'तुमच्या अटी काय आहेत त्या आम्हांला माहीत नाहींत. परंतु या दोन संस्था जर एक होणार असतील तर आम्हांस तुमच्या अटी मान्य आहेत.' माझे हे उद्गार ऐकून नानासाहेबांना जरा राग आला. ते म्हणाले, "अहो, तुम्हांला मान्य असून काय उपयोग ? ट्रेड युनियन कॉंग्रेसला मान्य झाल्या पाहिजेत ना!" मी त्यांना म्हटलं, "हें पाहा नानासाहेब अशी उडवाउडवी चालायची नाहीं. ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या वतीनं मी तुम्हांला आश्वासन देतों कीं तुम्ही त्या कॉंग्रेसमध्यें merge व्हायला तयार असाल तर कॉंग्रेस तुम्ही घातलेल्या अटी पाळायला तयार आहे." इतकं बोलून मी त्यांच्यापुढें एक पत्र टाकलं. त्या पत्रामध्यें हें ऐक्य घडवून आणण्यासाठीं कॉंग्रेसचे अध्यक्ष व इतर अधिकारी यांनीं मला सर्व अधिकार दिले होते. तें पत्र पाहिल्यावर नानासाहेब बावरले. थोड्या वेळानं ते म्हणाले, "या गोष्टीचा विचार करण्यासाठीं आम्हांला आणखी कांहीं वेळ

पाहिजे." या त्यांच्या उद्गारांवरून फेडरेशन ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें मिसळून जावं त्यांना रुचलं नाहीं ही गोष्ट तिथं जमलेल्या प्रत्येक इसमाला कळून चुकली.

ट्रेड युनियनचं १९३५ चं अधिवेशन कलकत्त्याला भरलं होतं. त्या अधिवेशनाला जाण्यासाठीं मी नागपूर मेलनं मुंबईहून निघालों. माझ्या डब्यांत जोगळेकर, जांभेकर आणि निमकर होते. दुसऱ्या डब्यांत मिनू मसानी, अलिबहादूर खान वगैरे बसले होते. दुसरे दिवशीं सकाळीं गाडी नागपूरला पोंचली, त्या वेळीं मिनू मसानी माझ्या डब्यांत शिरले. इतर गप्पागोष्टी झाल्यानंतर ते मला म्हणाले, " कलकत्त्याला मी येतों आहे खरा पण कुठल्याही कामगार संघानं मला पाठवलेलं नाहीं म्हणून मला या अधिवेशनाला प्रतिनिधि म्हणून हजर राहातां येणार नाहीं !" मी त्यांना म्हटलं, " तुम्हीं कांहीं काळजी करूं नका. मी तुम्हांला प्रतिनिधि बनवतों. आतांपासून तुम्ही मालवणच्या काजू कामगार संघाचे प्रतिनिधि आहांत असं समजा." मसानी मला म्हणाले, "माझी थट्टा करताहांत कीं काय ?" "मी कांहीं वेळानं तुमच्या डब्यांत येतो आणि सर्व गोष्टी समजावून सांगतो. तुम्ही अगदीं बेफिकीर राहा," मी त्यांना धीर दिला. कांहीं वेळानं मसानी निघून गेल्यानंतर निमकर मला म्हणाले, " काय तुम्हांला ट्रेड युनियन कॉंग्रेस म्हणजे थट्टा वाटली काय ? वाटेल त्या इसमाला तुम्ही कॉंग्रेसचा प्रतिनिधि बनवूं शकतां, याचा अर्थ काय ? मी तुम्हांला आतां साफ सांगतो कीं, कॉंग्रेसच्या अधिवेशनांत जर मसानी प्रतिनिधि म्हणून हजर राहिले तर मी आक्षेप घेतल्यावांचून राहाणार नाहीं." मी म्हटलं, " जाऊं द्या हो, निमकर. क्षुल्लक गोष्टीसाठीं कशाला वाद माजवतां ?" इतकं बोलून मी जांभेकर – जोगळेकरांशीं इतर गप्पा मारूं लागलों. थोड्या वेळानं मी अलिबहादूरखान – मसानी यांच्या डब्यांत गेलों. नंतर परत आलों. जोगळेकर आणि जांभेकर हे मला पूर्ण ओळखून होते. त्यांनीं पुन्हा माझ्याशीं गप्पा मारण्यास सुरुवात केली. निमकरांनीं त्यांत भाग घेतला, परंतु तो मनापासून नव्हता.

आम्ही कलकत्त्याला पोंचल्यावर त्या दिवशीं संध्याकाळीं अधिवेशनाला सुरुवात झाली. त्या दिवशीं विशेष कांहीं घडलं नाहीं, कारण स्वागताध्यक्षांचं भाषण, अध्यक्षांचं भाषण, यापलीकडे दुसरं कांहीं झालं नाहीं. कामगार संघाचे प्रतिनिधि असतील तेवढे सर्व विषयनियामक कमिटीत घेण्याचं ठरवलं होतं. या कमिटीची बैठक दुसऱ्या दिवशीं सकाळीं भरली. त्या बैठकीला मसानी हजर होतेच. ते हजर असलेले पाहून निमकर उठले आणि त्यांनीं आमच्या डब्यांत घडलेली हकीगत अक्षरशः निवेदन केली. शेवटीं 'कॉ. मसानी यांना या बैठकींत बसण्याचा अधिकार नाहीं,' असं म्हणून ते खालीं बसले. अध्यक्षांनीं कॉ. मसानींना उत्तर देण्यास सांगितलं. ते कांहीं फार

बोलले नाहींत. फक्त त्यांनीं मालवणच्या काजूगर कामगार संघाच्या अध्यक्षांनीं म्हणजे डॉ. गवंडे यांनीं दिलेलं अधिकारपत्र अध्यक्षांना दाखवलं. अध्यक्षांनीं निर्णय दिला कीं 'कॉ. मसानींना कमिटींत बसण्याचा पूर्ण अधिकार आहे.' निमकर माझ्याकडे रागानं पाहूं लागले. मी फक्त त्यांच्याकडे पाहून हसलों. त्या अधिवेशनांत मुख्य प्रश्न होता तो असा कीं, लाल ट्रेड युनियन कॉंग्रेस आणि आमची कॉंग्रेस यांचं एकीकरण व्हावं किंवा नाहीं. या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं त्याच ठिकाणीं ट्रेड युनियन ऐक्य परिषद भरविण्यांत आली होती. त्या परिषदेचे अध्यक्ष होते रुईकर. रुईकरांना पहिल्यानं मी स्पष्ट बजावलं कीं, "लाल ट्रेड युनियन म्हणजे पेपर युनियन. नुसती कागदावर लिहिलेली आहे. म्हणून या कम्युनिस्टांशी कुठल्याही रीतीनं आपलं ऐक्य होणं शक्य नाहीं." पण रुईकर पडले बावळट. त्यांना कुठल्याही गोष्टीचा सांगोपांग विचार करण्याची कधीं संवयच नव्हती. परिषदेत भाषण करतांना मीं स्पष्ट बजावलं कीं, "या लाल माकडांशीं आम्हांला कोणत्याही रीतीचं सहकार्य करायचं नाहीं." माझ्यानंतर कम्युनिस्टांतर्फे श्री. लाहिरी बोलायला उठले. ते म्हणाले कीं "आम्ही तुमच्याशीं सहकार्य करण्यासाठीं ज्या अटी घातल्या होत्या त्या आम्ही मागें घेतों. आम्हीं कॉंग्रेसमध्यें बिनशर्त यायला तयार आहोंत." लाहिरीचे हे उद्गार ऐकल्यानंतर रुईकर म्हणाले, "कम्युनिस्टांनीं आम्हांला कांहीं अटी घातल्या नाहींत हा आमचा विजय आहे. ते ज्याअर्थी बिनशर्त आपल्या कॉंग्रेसमध्यें येण्यास कबूल आहेत, तेव्हां त्यांना घेण्यास हरकत नाहीं." ज्या दिवशीं पुन्हां विषयनियामक कमिटीच्या बैठकींत लाहिरी प्रभृति कम्युनिस्ट कुठल्यातरी कामगार संघाचे प्रतिनिधि म्हणून हजर होते. त्या बैठकींत लाहिरींनीं एक जाहीरनामा सादर केला होता. तो जाहीरनामा खरोखर जोगळेकर आणि जांभेकरनीं तयार केला होता. त्या जाहीरनाम्यावर चर्चा करण्यासाठीं बैठक तहकूब ठेवली. त्या दिवशीं रात्रीं तो जाहीरनामा घेऊन रुईकर माझ्याकडे आले. ते मला म्हणाले, "हा जाहीरनामा तुम्ही नजरेखालीं घाला. त्यांतील खांचाखोंचा फक्त तुम्हांलाच कळतील. तरी तुम्ही तो दुरुस्त करा आणि त्याप्रमाणें तो पास करून घेऊं." मी रुईकरांवर अगोदरच चिडलों होतों. मी त्यांना स्पष्ट सांगितलं, "हें पाहा रुईकर, तुमची ही दोन दगडावर पाय ठेवण्याची संधिसाधू वृत्ति मला मुळींच आवडत नाहीं. मी तुम्हांला इतकं सांगितलं असतांही तुम्ही या चोरांना ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें येऊं दिलंत. बरं दिलंत तें दिलंत, परंतु त्यांनींच तयार केलेला मॅनिफेस्टो घेऊन तुम्ही माझ्याकडे येतां याचा अर्थ काय ? हें तुमचं funeral आहे. तें तुमचं तुम्हीच बघा आणि तुम्हांला वाटेल तें करा. यापुढें मी ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें मुळींच लक्ष घालणार नाहीं." रुईकर कांहीं न बोलतां निघून गेले. दुसरे दिवशीं तो मॅनिफेस्टो होता तसाच कॅांग्रेसनं मान्य केला. त्यानंतर ट्रेड युनियन चळवळीमध्यें माझं जें लक्ष

होतं तें साफ उडालं आणि रुईकरसारख्या संधिसाधू माणसाशीं या चळवळीमध्ये कुठलाही संबंध ठेवायचा नाहीं असं मी ठरवलं.

हा निर्णय घेण्याचं आणखी एक कारण होतं. मी कांदळकरांच्या गिरणी कामगार संघातर्फे कॉंग्रेसला हजर राहात असे. पण कॉंग्रेसमध्यें दुसरा एक गिरणी कामगार संघ होता. त्या संघामध्यें रॉयिस्ट आणि कम्युनिस्टांचं वर्चस्व होतं. कॉ. रॉय तुरुंगांत असल्यामुळें रॉयिस्टांना मार्गदर्शक उरला नव्हता. त्यामुळें हे रॉयिस्ट कम्युनिस्टांच्या जहालवादाकडे झुकत होते. एक वेळ तर अशी आली होती कीं, बहुतेक सर्व रॉयिस्ट कॉ. रॉयना सोडून कम्युनिस्ट पक्षाला जाऊन मिळणार होते. या कारणामुळेंच त्या दुसऱ्या गिरणी कामगार संघामध्यें रॉयिस्ट आणि कम्युनिस्ट एकत्र काम करूं शकले. या दोन्ही संघांना ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें आतांपर्यंत सारखंच प्रतिनिधित्व देण्यांत आलं होतं. परंतु कलकत्त्याला आमच्या संघाविरुद्ध एक ठराव पास करण्यांत आला. त्या ठरावाला मी व चार्ली दोघांनीं जोराचा विरोध केला. रॉयिस्ट, कम्युनिस्ट आणि कांहीं राष्ट्रवादी यांचं आमच्या विरुद्ध बहुमत झाल्यामुळें तो ठराव पास झाला. मसानी, अलिबहादूर खान प्रभृति कॉंग्रेस समाजवाद्यांनीं या बाबतींत तटस्थपणाची भूमिका स्वीकारली होती. त्या ठरावाचा आशय असा होता कीं, मुंबई सरकारनं नेमलेल्या लेबर ऑफिसरकडून आमच्या संघाचे कार्यकर्ते, विशेषतः कांदळकर हे गिरणी कामगारांनीं आपल्या मालकांविरुद्ध केलेल्या तक्रारींचा यशस्वी रीतीनं निकाल लावून घेत असत आणि हें धोरण कॉंग्रेसच्या धोरणाशीं विसंगत आहे. कांदळकर त्या ठिकाणीं होतेच. त्यांनीं आपल्या धोरणाचं जोरदार भाषेंत समर्थन केलं. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. म्हणून अधिवेशन संपल्यानंतर मी कांदळकरांना म्हटलं कीं, "आतां या कॉंग्रेसमध्यें तुम्ही राहाणं इष्ट नाहीं. कॉंग्रेस समाजवाद्यांची जरी आपल्याला आंतून सहानुभूति असली तरी ते जाहीरपणें तुमच्या धोरणाचा पुरस्कार करण्यास धजणार नाहींत. रुईकरसारखे जे राष्ट्रवादी कॉंग्रेसमध्यें आहेत त्यांना निश्चित असं धोरण नाहीं. त्यामुळें ते आज ना उद्यां रॉयिस्टांच्या किंवा कम्युनिस्टांच्या आहारीं गेल्याशिवाय राहाणार नाहींत. म्हणून माझा तुम्हाला असा सल्ला आहे कीं तुम्ही ट्रेड युनियन सोडून द्या आणि ट्रेड युनियन फेडरेशनमध्यें सामील व्हा. उद्यां कॉंग्रेस आणि फेडरेशन एक होतील त्यावेळीं पुन्हां तुम्ही कॉंग्रेसमध्यें यालच." मी दिलेला सल्ला कांदळकरांना विशेष पटला नाहीं असं मला त्यांच्या चेहऱ्यावरून समजलं. शेवटीं माझा सल्ला त्यांनीं अमलांत आणला नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं कांदळकरांचा संघ एकंदर कामगार चळवळीपासून दूर सटकल्यासारखा दिसतो.

कलकत्त्याहून आम्ही जबलपूरला यायला निघालों. कारण त्याच सुमारास जबलपूरमध्यें अखिल भारतीय कॉंग्रेस समितीची बैठक भरणार होती. त्यावेळीं आम्ही सर्व

एकत्र प्रवास करीत होतों. म्हणजे मसानी, अलिबहादूर खान, चार्ली, कांदळकर वगैरे मंडळी एकाच डब्यांत होतों. आम्हांला पोचवण्यासाठीं डॉ. राममनोहर लोहिया प्रभृति कांहीं मंडळी आली होती. आम्हीं लोहियांना आमच्याबरोबर जबलपूरला चलण्यास विनंति केली. ते म्हणाले, "शाहाणेच आहांत तुम्ही सर्वजण! माझ्या अंगावर फक्त सदरा अन् धोतर आहे. मला अगोदर कळतं तर मी माझ्या सामानाची व्यवस्था केली असती." लोहिया डब्याच्या दारांत उभे राहून बोलत होते. इतक्यांत गाडी सुरू झाली आणि आम्ही कांहीं जणांनीं त्यांना धरून ठेवलं. लोहियांची वृत्ति मूळचीच वेछूट, त्यांनीं विचार केला, आतां झगडण्यांत अर्थ नाहीं. म्हणून ते मुकाट्यानं आमच्यामध्यें येऊन बसले. आम्ही जबलपूरला आलों, तेव्हां मी कांदळकरना घेऊन मिश्रजींच्या घरीं राहायला गेलों आणि चार्ली कॉंग्रेस समाजवाद्यांना घेऊन डॉ. डीसिल्व्हांच्या घरीं गेला. मिश्रजींच्या घरींच चक्रवर्ति राजगोपालाचारी उतरले होते. त्यांच्याशीं माझी अच्युतराव पटवर्धनांनीं ओळख करून दिली. त्यावेळीं राजाजी म्हणजे कॅांग्रेसमधलं एक बडं प्रस्थ होतं. गांधीजींच्या खालोखाल सर्वजण त्यांना मान देत असत. ते तिथं मिश्रजींच्या घरीं राहात असल्यामुळें त्यांची बरेंच वेळां भेट झाली. साध्या बोलण्या-चालण्यांत सुद्धां त्यांच्या तीव्र बुद्धिमत्तेची साक्ष सर्वांना तात्काळ पटत असे.

राजाजींशिवाय आणखी दोन व्यक्तींची वाचकांना ओळख करून द्यायची आहे. त्यांपैकीं एक अभ्यासू वृत्तीचा आणि विलक्षण बुद्धिमत्तेचा तर दुसरा बिनडोक्याचा माथेफिरू. या दोन व्यक्ति म्हणजे आचार्य जे. बी. कृपलानी आणि डॉ. डीसिल्व्हा. आचार्य कृपालानी आम्हांला जबलपूरला येतांनाच गाडींत भेटले. ते आमच्या डब्यांत आल्याबरोबर त्यांनीं आपल्याजवळ असलेलं फराळाचं समान काढलं आणि आम्हां सर्वांना खायला दिलं. त्यानंतर आम्ही बोलायला सुरुवात केली. मी तर कट्टर गांधीविरोधी. कॉंग्रेस समाजवादी हे गांधीजींच्या नेतृत्वाविषयीं साशंक होते, म्हणून चिकित्सक बनले होते. अर्थात् गांधीजींवरील टीका कृपलानींनीं शांतपणें ऐकून घेतली आणि नंतर ते हसत सुटले. त्यांना प्रत्येक बाबतींत हसायची संवय होती असं मला वाटतं. थट्टामस्करी आणि विनोद करण्यांत ते पटाईत होते. ते आम्हांला म्हणाले, "तुमचं म्हणणं काय? गांधीजी scoundrel आहेच असंच ना? ठीक आहे. Show me a greater scoundrel than Gandhi, and I shall follow him." त्यांनीं असं म्हटल्यावर आम्ही सर्व हसूं लागलों आणि तेही मोठ्यानं हसूं लागले.

त्यानंतर जबलपूरला आल्यानंतर कॉंग्रेस वर्किंग कमिटीमध्यें एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला होता. तो प्रश्न असा कीं, आचार्य कृपलानी हे कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी होते, परंतु ते अ. भा. कॉंग्रेस समितीचे सभासद नव्हते, तेव्हां त्यांना जनरल

सेक्रेटरी म्हणून राहातां येईल किंवा नाहीं यावर वर्किंग कमिटीची चर्चा झाली असावी. वर्किंग कमिटीची चर्चा संपल्यानंतर कृपलानी बाहेर आले. मी त्यांना विचारलं, " कां हो आचार्य, तुमच्या जागेवरून तुम्हांला आज वर्किंग कमिटीनं काढून टाकलं असेल. " ते म्हणाले, " छे हो, मी माझ्या जाग्यावर आहें तसाच कायम आहें. " पण मी म्हटलं, ' असं कसं झालं ? असं होणं शक्य नाहीं. ' कृपलानी म्हणाले, " असं कसं झालं तें मी तुम्हांला सांगतों. " नंतर हलक्या आवाजांत ते म्हणाले, " The fact of the matter is, the Scoundrels can't do without me. " कृपलानींचे हे उद्गार ऐकून मला हसूं आलं. पण त्यांतून मी इतकाच निष्कर्ष काढला कीं, Scoundrel या शब्दाचं कृपलानींनीं पेटंट घेतलं असावं.

यानंतर डॉ. डीसिल्व्हांनीं आम्हांला एका रात्रीं जेवायला बोलावलं होतं. ते कृपलानींना आणि मला नेण्यासाठीं स्वतः गाडी घेऊन आले होते. कृपलानी आणि मी पाठीमागं बसलों आणि डॉ. डीसिल्व्हा मोटर हाकायला बसले. आम्ही त्यांच्या घरीं जात असतां वाटेंतच कृपलानी डीसिल्व्हांना म्हणाले, " कां हो डॉक्टर, तुमचं आणि मिश्रजींचं हें जें भांडण चाललं आहे, त्यांत तुमचा निभाव लागेल असं मला वाटत नाहीं. मिश्रजी आणि शेठ गोविंददास यांच्याकडे पैसा भरपूर आहे, त्यांच्याकडे सत्ता आहे. तुम्ही त्यांच्याशीं भांडणार कशाच्या जोरावर ?" डॉ. डीसिल्व्हा एकदम गंभीर झाले. त्यांनीं आपले दोन्ही हात स्टिअरिंग व्हीलवरच ठेवले होते. पण आमच्याकडे तोंड फिरवून ते जोरानं म्हणाले, " I am going to fight them with my brains." इतकं म्हणून पुन्हां ते तोंड फिरवून गाडी हाकूं लागले. कृपलानी माझ्या कानाशीं लागून म्हणाले, "He is going to fight with a thing he hasn't got." हे त्यांचे शब्द ऐकून मला हसूं आलं.

आम्ही डीसिल्व्हांच्या घरीं जाऊन पोंचलों. तिथं जयप्रकाश नारायण यांची आणि माझी दुसऱ्यांदा भेट झाली. पहिल्या भेटींत आम्हां दोघांचा खटकाच उडाला होता. दुसऱ्या भेटींतही उडणार होता, मी तो सावरून धरला. कारण यावेळीं ट्रेड युनियन चळवळ कशी चालवावी याबद्दल ते आपलं मत प्रदर्शित करूं लागले. मी त्यांना थांबवून "मि. जयप्रकाश, ट्रेड युनियन चळवळ कशाशीं खातात हें तुम्हांला माहीत नाहीं. तुम्ही या बाबतींत कांहीं बोलूं नये हें चांगलं. शिवाय तुमच्याशीं वाद घालण्यासाठीं मी इथं आलों नाहीं." डॉ. डीसिल्व्हांच्या घरीं कमलादेवी चट्टोपाध्याय वगैरे मंडळी येऊन बसली होती. माझं कमलादेवीशीं कांहीं बोलणं झाल्यानंतर चार्ली मला म्हणाला, " कमलादेवी म्हणतात, तुमचा स्वभाव फार agressive आहे." मी त्यावर कांहींच बोललों नाहीं. त्यानंतर आम्ही डॉ. डीसिल्व्हांची गंमत करण्याचं ठरवलं. त्यांना आमच्यापैकीं कुणी तरी जाऊन सांगितलं, कीं आचार्य कृपलानी आणि कमलादेवी

यांची एंगेजमेंट झाली आहे. डॉ. डीसिल्व्हा त्यावेळीं कांहीं बोलले नाहींत. आम्ही जेवायला बसलों. त्यांची जेवायची पद्धत पाश्चात्य धर्तीची असल्यामुळें ते टेबलाच्या टोकावर बसले होते; आणि मी त्यांच्या डाव्या हाताला होतों. थोडा वेळ इकडल्या तिकडल्या गप्पा झाल्यानंतर डॉक्टर उठून उभे राहिले आणि म्हणाले, 'मला तुम्हांला आनंदाची बातमी सांगायची आहे–' हे त्यांचे शब्द ऐकल्याबरोबर मी घाबरलों. मी त्यांचा कोट ओढून त्यांना खालीं बसवलं आणि त्यांच्या कानांत सांगितलं, "अहो ती गंमत होती—" त्यावेळीं ते शरमून गप्प बसले.

डॉ. डीसिल्व्हा आणि मिश्रजी यांच्यामध्यें जी तेढ निर्माण झाली होती, तिचं निवारण करण्यासाठीं कॉंग्रेस वर्किंग कमिटीनं मध्यस्थ म्हणून मि. के. एफ. नरीमन यांची नेमणूक केली होती. नरीमननीं आपलं कोर्ट दुसऱ्या दिवशींच भरवलं होतं. त्यांत पहिल्यानं डॉ. डीसिल्व्हांचं भाषण झालं. आपल्या भाषणांत मिश्रजी आणि शेठ गोविंददास यांच्यावर त्यांनीं बरेच आरोप केले. परंतु त्याच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाही. आपल्या भाषणाच्या शेवटीं ते म्हणाले, "हे लोक विलायती सिगारेट पितात, वाटेल तशी चैन करतात, गांधीजींच्या तत्त्वाप्रमाणे चालत नाहींत. परंतु मी — my heart is made of khaddar." हे त्यांचे उद्गार ऐकल्यावर तिथं जमलेली सर्व मंडळी हसूं लागली.

अ. भा. कॉं. समितीच्या अधिवेशनांत विशेष कांहीं घडलं नाहीं. कॉंग्रेसनं निवडणुकी लढविण्याचं ठरवल्यामुळें प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग सोडून सनदशीर राजकारणाचा कॉंग्रेसनं जो अवलंब केला होता, त्याचं समर्थन करण्यासाठीं कॉंग्रेसचे अगदीं पहिल्या श्रेणीचे पुढारी व्यासपीठावर आले. त्यावेळीं कॉंग्रेस समाजवादी, अतिजहालवादाच्या आहारीं गेल्यामुळें त्यांना कॉंग्रेसचं हें धोरण पसंत नव्हतं. म्हणून कॉंग्रेस समाजवाद्यांतर्फे बोलतांना युसफ मेहेरअल्ली यांनीं बाकीच्या कॉंग्रेस पुढाऱ्यांचा उल्लेख न करतां भुलाभाई देसाई आणि सत्यमूर्ति यांच्यावर जोराचा हल्ला केला. मेहेरअल्लीला मी भडकवलं असा कांहीं लोकांनीं तिथं उघड उघड माझ्यावर आरोप केला. परंतु त्या आरोपांत कांहीं तथ्य नसल्यामुळें मी कांहींच बोललों नाहीं.

# २३



मी मुंबईला आल्यानंतर फिल्म कंपनीच्या भानगडीमुळें याच सुमारास माझा आणि लोटवाला शेटजींचा खटका उडाला. ज्या दिवशीं खटका उडाला त्या दिवशीं ‘People’ या इंग्रजी साप्ताहिकाच्या जागेचा मी राजीनामा दिला. त्यानंतरसुद्धां आदर्श चित्रकंपनीबरोबर माझा संबंध होता. कांहीं दिवसांनीं हा संबंध सुटला. त्याचं कारण एवढंच होतं कीं मी आणि माझे मित्र द्वारकादास भाटिया नवीन फिल्म कंपनी काढण्याच्या विचारांत होतों. या कंपनीची हकीगत मी यापूर्वी दिलेलीच आहे. १९३६ च्या डिसेंबर महिन्यांत कॉंग्रेसचं अधिवेशन फैजपूरला भरणार होतं. हें अधिवेशन भरण्याच्या अगोदर कांहीं दिवस कॉ. रॉय यांची तुरुंगांतून सुटका झाली. मी त्यावेळीं कांहीं कामानिमित्त कोल्हापूरला गेलों होतों. म्हणून कॉ. रॉयची आणि माझी भेट झाली नाहीं. मी त्यावेळीं फार अस्वस्थ स्थितींत होतों. लीलाला घटस्फोटासाठीं मला पुरावा तयार करून द्यायचा होता. म्हणून मी कोल्हापुरहून मुंबईला यायला निघालों माझी गाडी कल्याणला थांबली त्यावेळेस माझ्या गाडीसमोरच पुण्याला जाणारी गाडी उभी होती. माझ्या डब्यासमोर असलेल्या डब्यांत मला मणीबेन कारा दिसल्या. तेव्हां मी त्यांच्या डब्याजवळ गेलों. पाहातों तर त्यांच्या शेजारीं ब्रेकफास्ट घेत कॉ. रॉय बसले होते. त्यांना पाहिल्यावर मला आश्चर्याचा धक्काच बसला. कारण त्यांची प्रकृति कितीतरी खालावलेली दिसली. त्यांचा तो पूर्वीचा धिप्पाड देह आतां अगदींच काटकुळा दिसत होता. मला प्रथम वाटलं कीं मणीबेनच्या शेजारीं निमकरच बसले आहेत. मला पाहिल्याबरोबर ते लगेच म्हणाले, “ हॅलो डॉक्टर, तुम्ही इतके दिवस दडून बसलां होतां ! मी तुमची खूप चौकशी केली. पण मला तुमचा पत्ताच मिळाला नाहीं. मणीबेन आणि मी आतां माथेरानला जात आहोंत. तुम्ही असं करा, आमच्या-बरोबर माथेरानला चला. ” मी त्यांना म्हटलं, “ कांहीं कामासाठीं मी मुंबईला जातों आहें. परंतु उद्यां सकाळच्या गाडीनें निघून मी माथेरानला येईन. ” इतकं बोलणं संपतं तोंच त्यांची गाडी चालू झाली आणि मी माझ्या गाडींत जाऊन बसलों.

मी मुंबईत आलों तों माझ्या नेहमींच्या संवयीप्रमाणें लंडन हॉटेलमध्यें न उतरतां मणीबेन काराचे पति आणि माझे मित्र हंसराज मुळजी यांच्या बंगल्यावर गेलों. तिथं गेल्यावर बाबूभाईनीं (हंसराजनीं) मला कडकडून मिठी मारली; आणि त्यांनीं एकदम रडायला सुरुवात केली. मी त्यांना म्हटलं, "हें काय बाबूभाई, असं काय वेड्यासारखं करतां?" तेव्हां ते म्हणाले, "या तुमच्या कॉ. रॉयनीं माझ्या घराचा सत्यानाश केला. मणीबेनला घेऊन ते आतां माथेरानला गेले आहेत." "मग त्यांत काय झालं?" मी म्हटलं, "कॉ. रॉयची प्रकृति खालावलेली आहे. म्हणून त्या त्यांची शुश्रूषा करण्यासाठीं गेल्या आहेत. कॉ. रॉयवर त्यांची किती भक्ति आहे ते तुम्हांला माहीतच आहे." बाबूभाई लगेच उसळून म्हणाले, "भक्ति गेली चुलींत. त्या दोघांविषयीं मला दाट संशय आला." मी बाबूभाईना म्हटलं, "हे पाहा बाबूभाई, मणीबेनविषयीं यापूर्वी तुम्ही किती वेळ संशय घेतला आहे? ही कांहीं पहिलीच खेप नव्हे. तुमची माझी ओळख झाल्यापासून तुम्ही हा संशय निरनिराळ्या व्यक्तींसंबंधानं व्यक्त केला आहे. त्या व्यक्तींचीं नांव मी आतां तुम्हांला सांगत नाहीं, कारण तीं तुम्हांला माहीत आहेत. तेव्हां या विषयावर चर्चा नको. रॉयच्या राजकारणाविषयीं माझे कितीही मतभेद असले तरी त्यांच्याबद्दल व्यक्तिशः मला फार आदर आहे. म्हणून तुम्हीं त्यांच्याबद्दल कांहीं न बोलाल तर बरं होईल." यावर बाबूभाई मला म्हणाले, "कबूल आहे मला. मी तुमचं म्हणणं ऐकतों. पण तुम्ही माझ्यासाठीं एक काम केलं पाहिजे. तुम्ही आतांपर्यंत मला खूप मदत केली आहे. मी अत्यंत विपन्नावस्थेत असतांना सुद्धां तुम्ही आपल्या मैत्रींत कधीं खंड पडूं दिला नाहीं. त्या जोरावरच मी तुम्हांला हे काम सांगणार आहें. तुम्ही आज रात्रीच्या गाडीनं माथेरानला जा." मी त्यांना म्हटलं, "मी आज कांहीं जाणार नाहीं. कारण मी खूप दमलों आहें. परंतु उद्यां सकाळच्या गाडीनं मात्र तिकडे जाईन. कारण माथेरानला जायचं मी अगोदरच ठरवलं आहे." हे माझे उद्गार ऐकून बाबूभाईना बरं वाटलं; आणि त्यांनीं आपल्या गाडींतून मला दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्टेशनवर पोचवलं.

मी माथेरानला पोचल्याबरोबर थेट लीलाधर कारांच्या आनंद कुटीरमध्ये गेलों. मला पाहिल्यावर कॉ. रॉयना आश्चर्य वाटलं. कारण त्यांना वाटलं नव्हतं कीं मी माथेरानला येईन. मला पाहून मणीबेन थोड्या अस्वस्थ झाल्या. परंतु त्या कांहींच बोलल्या नाहींत. त्या दिवशीं आमचा सर्व वेळ आनंदांत गेला. प्रथम रॉयबरोबर मी बुद्धिबळं खेळलों; आणि प्रत्येक डावांत त्यांना हरवलं. त्यानंतर संध्याकाळीं १९१९ ची हेनेसी ब्रँडी काढली आणि रॉय मला म्हणाले, "हें पाहा ही जुनी ब्रँडी मी महात्रासानं मिळवली आहे. ती चाखून तर पाहा." रॉयबरोबर ब्रँडी प्यायला सुरुवात केली; आणि आम्ही बोलतां बोलतां किती ब्रँडी प्यालों तिचा पत्ताच लागला नाहीं. मद्यपान कर-

ण्याचं मला पूर्वी व्यसन नव्हतं. मी विलायतेंत असतांना मद्याला कधीं स्पर्श केला नाहीं. परंतु यावेळीं माझ्या आयुष्यामध्ये इतक्या विलक्षण घडामोडी घडून येत होत्या कीं मन स्थिर ठेवण्यासाठीं एका मित्रानं मद्यप्राशन करण्याचा सल्ला मला दिला. त्याचा सल्ला मी अंमलांत आणल्यानंतर मला त्याचा थोडा फायदा अनुभवाला आला. रॉयनीं जेव्हां मला हेनेसी ब्रँडी दिली, त्यावेळीं मला मद्याची फारशी संवय नव्हती. म्हणून ब्रँडी घेतल्यानंतर मला इतकी झोंप आली कीं मी खुर्चीवरून खालीं पडलों. आम्हीं त्यावेळीं कांहीं तरी बोलत होतों. म्हणून प्रथम रॉयच्या लक्षांत आलं नाहीं. रॉयच्या लक्षांत ती गोष्ट आल्यावर त्यांनीं मला उचललं आणि बिछान्यावर नेऊन ठेवलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कॉ. रॉयनीं ही हकीगत मला सांगितली. ती सांगतांना ते म्हणाले कीं " पिण्याच्या बाबतींत कॉ. स्टॅलिन आणि मी कुणाला हार जात नाहीं. एकदां मॉस्कोला पार्टी होती. तेव्हां सर्व लोक पितां पितां झोपले. पण त्यावेळीं कॉ. स्टॅलिन आणि मी फक्त शुद्धीवर होतों. माझ्याकडे वळून कॉ. स्टॅलिन म्हणाले, " हें पाहा कॉमरेड, हे सर्व युरोपियन्स उताणे पडलेत. पण आपण दोघे आहोंत एशियाटिक म्हणूनच आम्हीं किती प्यालों तरी आमची शुद्धि कायम राहाते. याच्या उलट तुमचा ट्रॉट्स्की घ्या. दुसऱ्या मंडळींच्या देखत तो कधीं प्यायचा नाहीं. त्याचं कारण त्याला भीति वाटत असे. आपण जर मंडळीदेखत प्यालों तर आपल्या मनांतील खरे विचार बाहेर येतील कीं काय ही भीति त्याला वाटत असे. फार आंतल्या गांठीचा मनुष्य." कॉ. रॉयनीं स्टॅलिन आणि ट्रॉट्स्की ही जी तुलना केली, ती मला मुळींच आवडली नाहीं. परंतु माझं डोकं सारखं ठणकत होतं. म्हणून मी कांहीं बोललों नाहीं. नंतर रॉयच बोलूं लागले, " तुम्हांला काल इतकी ब्रँडी कां पाजली माहीत आहे ? तुमच्या मनांतले खरे विचार काय आहेत तें पाहायचे होते. तुम्ही काल जें कांहीं बडबडलांत त्यावरून मीं जाणलं कीं माझ्याविषयीं तुमच्या मनांत कांहीं किल्मिष नाहीं. माझ्याबद्दल तुम्हांला अत्यंत आदर आहे असंच दिसून आलं. म्हणूनच तुम्ही खुर्चीवरून खालीं पडलांत तेव्हां मी तुम्हांला उचलून बिछान्यावर ठेवलं." मी त्यांना हसून म्हटलं, " तुम्हांला खरोखर इतकी खटपट करण्याची कांहीं जरूरी नव्हती. माझ्या मनांत तुमच्याविषयीं कांहीं किल्मिष असतं तर मी इथं आलोंच नसतों." त्यानंतर कॉ. रॉयनीं मला फैजपूर कॉंग्रेसची हकीगत सांगायला सुरुवात केली. ते म्हणाले कीं " कॉंग्रेसमधील उजव्या गटाला पाठिंबा देण्याचं धोरण मीं स्वीकारलं होतं. आणि म्हणूनच मला कम्युनिस्टांवर कडक टीका करावी लागली." मीं त्यांना म्हटलं, " हें पाहा कॉ. रॉय, तुम्ही फैजपूर अधिवेशनांत हिरो म्हणून वावरलांत. तिथं सर्वांनीं तुमची तोंड फाटेपर्यंत स्तुति केली. तुम्ही कॉंग्रेसमधल्या उजव्या गटाला पाठिंबा दिलात याबद्दल मी कांहीं म्हणत नाहीं. परंतु आपल्या डाव्या बाजूला जे कांहीं लोक असतील म्हणजे आपल्यापेक्षां जे अधिक

जहालवादी लोक असतील त्यांच्यावर आपण टीका करायची नाहीं हें तुमचं तत्त्व आहे ना? मग तुम्ही कम्युनिस्टांवर टीका कां केलीत?" माझा हा प्रश्न ऐकून कॉ. रॉय जरा त्रासल्यासारखे दिसले. परंतु ते कांहींच बोलले नाहींत.

त्यानंतर मणीबेनला घेऊन मी बागेंत जाऊन बसलों. त्यांना मी म्हटलं, "मणीबेन, तुम्ही काय करतां तें मला सगळं कळतं. मला तुमच्या स्वभावाची जितकी पारख आहे तितकी दुसऱ्या कुणालाही नाही. मी तुम्हांला चांगल्या ओळखतों. परंतु बाबूभाई आतताई माणूस आहे. तो काय करील याचा नियम नाहीं. त्यांनीं जर तुमच्याविरुद्ध action घेतली तर तुम्ही काय कराल?" मणीबेन म्हणाल्या, "घेतली, तर घेतली. मी काय करणार? मी खरंच कांहीं केलं नाहीं तर मला भीति का वाटावी?" मणीबेनचे हे शब्द ऐकल्यावर मी चिडलो. मी त्यांना म्हणालों, "हा तुमचा अन् बाबूभाईचा प्रश्न नाहीं. रॉयच्या reputation चा प्रश्न आहे. तुमच्या या भानगडी-मध्यें उगीच रॉयला कशाला गुंतवतां? तुम्ही वाटेल तेवढं दोघं भांडत बसा. तुमच्या भांडणाची आतां मला संवय झाली आहे." माझे हे उद्गार ऐकल्यावर मणीबेन फार घाबरल्या. त्या मला म्हणाल्या, "तुम्ही जे सांगाल ते ऐकायला मी तयार आहें." मी त्यांना म्हटलं, "दुसरं कांहीं करायचं नाहीं. उद्यां सकाळच्या गाडीनं आपण दोघं मुंबईला परत जाऊं." इतकं आमचं बोलणं होत असतां कॉ. रॉय तिथं आले. ते म्हणाले, "काय गुपीत चाललं आहे तुमचं दोघांचं?" मी म्हणालो, "गुपीत कांहींच नाहीं. फक्त आम्ही दोघं सकाळच्या गाडीनं मुंबईला जाणार आहोंत." "तुम्ही दोघं जाणार मग मी तरी इथं राहून काय करणार?" कॉ. रॉय म्हणाले, "मी सुद्धां मुंबईला परत येतो." मी यावर कांहींच बोललों नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही माथेरानहून मुंबईला परत आलों.

आम्ही मुंबईला आल्यानंतर मी मणीबेनला घेऊन बाबूभाईकडे गेलों; आणि कॉ. रॉय कर्णिककडे उतरले. थोडे दिवस मुंबईत राहिल्यानंतर कॉ. रॉय आणि मी दोघेच परत माथेरानला गेलों. कॉंग्रेसतर्फे निवडणुकीचा प्रचार कॉ. रॉयनीं महा-राष्ट्राच्या दक्षिण विभागांत करण्याचं ठरवलं होतं. म्हणून त्या प्रचारासाठीं आम्ही दोघे माथेरानहून सरळ पुण्याला जाणार होतों. आमच्या प्रचार मंडळामध्यें मणीबेन कारा, डॉ. शेट्टी आणि ह. रा. महाजनी हे होते. कांहीं दिवसांनीं मणीबेन कारा आणि कॉ. कर्णिक माथेरानला आले. तीं दोघं येण्यापूर्वी कॉंग्रेस समाजवादी आणि कॉ. रॉय यांच्यामध्यें समझोता घडवून आणण्याचा मी प्रयत्न केला. कॉंग्रेस समाजवादी तयार होते आणि रॉयही थोडेसे अनुकूल दिसले. म्हणून अच्युत पटवर्धन, मिनु मसानी आणि युसुफ मेहेरअली यांनीं माथेरानला येऊन रॉयना भेटावं अशी मी व्यवस्था केली होती. परंतु मणीबेन कारा आणि कर्णिक हे माथेरानला आल्यावरोबर कॉ. रॉयनीं

आपला पवित्रा एकदम बदलला. ते मला म्हणाले, "या लोकांशीं वाटाघाट करण्यांत कांहीं अर्थ नाहीं; आणि काँग्रेस समाजवादी पक्ष तर मला साफ मोडून टाकायचा आहे." यावर मी कांहींच बोललों नाहीं. कारण रॉय पक्षाचा आणि माझा अर्थाअर्थी कांहींच संबंध नव्हता. फक्त रॉयशीं माझे मैत्रीचे संबंध असल्यामुळें मी त्यांच्याबरोबर आलों.

आम्ही जेव्हां पुण्याला पोचलों तेव्हां रॉयचं पुण्याच्या लोकांनीं प्रचंड प्रमाणांत स्वागत केलं. असं स्वागत पूर्वी कॉंग्रेसच्या कोणत्याही पुढाऱ्याचं झालं असेल कीं नाहीं याची मला शंका वाटते. स्टेशनवरून रॉयची मिरवणूक काढण्यांत आली. अर्थात त्या मिरवणुकींत मी त्यांच्याबरोबर नव्हतो, हें सांगायला नकोच. दुसऱ्या दिवशीं वीस हजारांपेक्षां अधिक लोक जमलेल्या सभेंत कॉ. रॉयचं भाषण झालं. त्या भाषणांत त्यांनीं लोकशाही स्वराज्य पक्षाची बरीच टिंगल केली. दुसऱ्या दिवशीं कॉ. रॉयना केसरी-मराठा पत्रांतर्फे चहापार्टी दिली. त्यावेळीं कॉ. रॉयचं स्वागत करतांना कॉ. रॉयनीं आदल्या दिवशीं केलेल्या टीकेला तात्यासाहेब केळकर यांनीं उत्तर देण्याचा प्रयत्न केला. परंतु कॉ. रॉयचं प्रत्युत्तर ऐकायला ते थांबले नाहींत, 'मला दुसरीकडे जरूरीचं काम आहे' असं सांगून ते उपरणं झाडीत घाईनें निघून गेले. कॉ. रॉयनीं त्यांना जे उत्तर द्यायचं तें दिलंच. आणि तें तात्यासाहेबांच्या कानांवर गेलं असावं असं मला वाटतं. मी या प्रचारकार्यामध्यें फारसा भाग घेत नव्हतों. त्याचं कारण माझ्याविषयीं रॉयवाद्यांना एक प्रकारचं वैषम्य वाटत होतं. रॉयच्या मैत्रीचा फायदा घेऊन मी पुढें येण्याचा प्रयत्न करीत आहें अशी त्यांना शंका आली. खरं पाहिलं तर माझ्या खाजगी जीवनांत त्यावेळीं इतक्या विलक्षण घडामोडी होत होत्या कीं त्यामुळें माझं राजकारणांत मुळींच लक्ष नव्हतं असं म्हटलं तरी चालेल. मी रॉयबरोबर असे खरा, परंतु रॉयच्या सन्मानार्थ जे जे समारंभ होत ते मी कटाक्षानं टाळीत असें. परंतु पुण्याच्या विद्यार्थ्यांनीं रॉयचं समाजवादावरील भाषण ऐकण्यासाठीं एक प्रचंड सभा भरवली होती. विद्यार्थ्यांच्या आग्रहावरून अगदीं नाइलाजानं मला या सभेचं अध्यक्षस्थान स्वीकारणं भाग पडलं. अर्थात् अध्यक्ष या नात्यानं रॉयची ओळख करून देणं आणि त्यांचं भाषण संपल्यानंतर समारोप करणं हीं दोन्हीं कामं मलाच करावीं लागलीं. ही एक बाब सोडली तर रॉयच्या प्रचारकार्यांत मी जाहीर रीतीनं कधींच भाग घेतला नाहीं. कॉ. रॉयला या गोष्टीची फार चीड येई. म्हणून त्यांनीं अतीशय आग्रह केलाच तर व्यासपीठावर त्यांच्या शेजारीं कधीं कधीं जाऊन बसत असें.

पुण्याहून ज्यावेळीं सोलापूरला जायचं ठरलं त्यावेळीं मी परत मुंबईला येण्याचा विचार करीत होतों. कारण त्यावेळीं आमच्या घटस्फोटाच्या भानगडी चालल्या होत्या;

परंतु कॉ. रॉयना मी एका शब्दानेंही तें कळवलं नाहीं. मी त्यांना इतकंच म्हणालो, " मला तुमच्याबरोबर सोलापुरला येतां येत नाहीं. मला मुंबईला परत गेलं पाहिजे." त्यावेळीं मणीबेन मला म्हणाल्या कीं " तुम्ही आहांत म्हणून या प्रचारकार्यासाठीं बाबूभाईनीं मला तुमच्याबरोबर धाडलं. मला एकटीला पाठवायला ते कधीं कबूल झाले नसते. म्हणून तुम्ही जर मुंबईला जाणार असाल तर मलाही तुमच्या बरोबर आलं पाहिजे. " इतक्यांत कॉ. रॉय आले आणि म्हणाले, " तुमचं काय चाललं आहे ? " मी कांहीं बोललो नाहीं. मणीबेन त्यांना म्हणाली, " डॉक्टर मुंबईला जायचा विचार करताहेत, ते कां परत जाताहेत त्याचं कारणही मला ते सांगत नाहींत. परंतु मला त्यांच्याबरोबर गेलं पाहिजे." हें ऐकल्यानंतर कॉ. रॉय खूप भडकले. ते म्हणाले, " तुम्ही जाणार नसाल तर मीही जात नाहीं सोलापूरला. तुम्हांला काय वाटतं या राजकारणाची मला आवड आहे म्हणून ? एका लाथेसरशीं मी तें झुगारून देईन." यावर मी काय बोलणार, आणि त्यांना काय सांगणार ! मी मणीबेनला म्हटलं, " आपण सोलापूरला जाऊं या." आम्ही सोलापूरला गेल्यावर तिथं मोठ्या प्रमाणांत कॉ. रॉयचं स्वागत झालं. तेथील एका श्रीमंत मारवाड्याच्या घरीं आमची राहाण्याची व्यवस्था केली होती.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं कॉ. रॉयची रथांतून मिरवणूक काढण्याचं ठरलं. मिरवणुकीची वेळ झाली तेव्हां मणीबेन कारा माझ्याकडे आल्या आणि मला म्हणाल्या, " तुम्ही कॉ. रॉयबरोबर जाणार आहांत ? " मी त्यांना " नाहीं " म्हणून उत्तर दिलं. मणीबेन म्हणाल्या, " तुम्ही जर जाणार नसाल तर मला त्यांच्याबरोबर जावं लागेल. " मी त्यांना म्हटलं, " तुम्ही खुशाल जा. " इतक्यांत कॉ. रॉय आले. ते म्हणाले, " काय डॉक्टर, तुम्ही येत नाहीं काय ? " मी त्यांना म्हटलं, " Comrade, this is a ridiculous business. ही तुमची रथांतून मिरवणूक निघाली आहे ना, ती माझ्या दृष्टीनें अगदीं हास्यास्पद आहे. तुम्ही या मिरवणुकींत जाऊं नये अशी माझी इच्छा आहे." कॉ. रॉय मला रागाने म्हणाले, " तुम्हाला नुसतं बोलायला काय ! या असल्या मिरवणुकींत कांहीं अर्थ नाहीं हें मी तुमच्यापेक्षां अधिक जाणतों. परंतु हे लोक इतक्या उत्साहानें माझा सन्मान करायला जमले आहेत, त्यांची निराशा नाहीं का होणार मी नाहीं गेलों तर ? " असं म्हणून ते रागारागानं गेले आणि रथांत जाऊन बसले. त्यांच्यामागोमाग मणीबेन गेल्या आणि रथांत जाऊन बसल्या. त्यांची मिरवणूक गांवांतील सर्व रस्त्यातून जाणार होती. एक, दोन रस्ते ओलांडून गेल्यानंतर कॉ. रॉयला काय वाटलं कुणाला ठाऊक ते एकदम रथांतून उतरले नि सरळ घरीं चालत आले. घरीं आल्यावर ते रागानें धुमसतच होते. मिरवणूक काढण्याची ज्यांनीं कल्पना काढली त्यांना शिव्या देत ते धुमसतच बसले. मला मात्र त्यांच्या या पोरकट

वागण्याचं हसूं येऊं लागलं. त्या दिवशीं रात्रीं एका प्रचंड सभेंत कॉ. रॉयचं भाषण होणार होतं. त्या दिवशीं मात्र मी हूं कां चूं न करतां एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें त्यांच्या शेजारीं व्यासपीठावर जाऊन बसलो. आम्ही बसल्यानंतर थोड्याच वेळानें मणीबेनचं भाषण सुरू झालं. बोलतांना त्या व्यासपीठाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोकापर्यंत एकसारख्या फिरत होत्या, आणि त्यामुळें व्यासपीठ सारखं हादरत होतं. कॉ. रॉय मला हळूच म्हणाले, " She is not addressing the meeting, she is dancing on the stage. या मणीबेनच्या performance मुळें आपण दोघे मात्र खालीं कोसळणार." या त्याच्या उद्गारामुळें मला जे हसूं कोसळलं, तें मला आवरेनाच. भाषण करीत असतांना मणीबेन माझ्याकडे रागानें बघूं लागल्या.

सोलापूरहून आम्ही पंढरपूरला गेलो. तिथं एकदोन सभा झाल्यानंतर आम्ही विजापूरला आलों. विजापूरला कौजलगी नांवाच्या वृद्ध वकिलांच्याकडे आम्ही उतरलों. त्यांच्या बोलण्याचालण्यावरून ते त्या भागांत फार सुप्रसिद्ध असावेत असं मला आढळून आल. ते कॉ. रॉयशीं किंवा माझ्याशीं फार बोलत नव्हते. पण डॉ. शेट्टींची एकसारखी टिंगल करायला त्यांनीं सुरुवात केली. कॉ. रॉय आणि मी स्वस्थपणे मजा पाहात होतों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही जेव्हां चहा प्यायला एकत्र जमलों, तेव्हां या आमच्या छोट्या डॉक्टरची पुन्हा टिंगल करायला त्यांनीं सुरुवात केली. शेवटीं ते डॉ. शेट्टींना म्हणाले, " मग काय कॉमरेड, तुम्हाला माझ्या एकाही प्रश्नाचं उत्तर देतां आलं नाहीं. मग आतां काय करायचं ! " मी त्यांना म्हटलं, " डॉ. शेट्टी आमच्यांतले Juvenile-Royist आहेत आणि मी Super-Royist आहे. " कौजलगी म्हणाले, " ठीक आहे. माझ्या प्रश्नांचीं तुम्ही उत्तरं द्या. " मी त्यांना म्हटलं, " ते नाहीं चालायचं ; डॉ. शेट्टी आणि मी यामधले दुसरे रॉयिस्ट मुंबईंत आहेत. त्यांना तुम्ही मुंबईला जाऊन भेटा ; आणि त्यांना जर तुमच्या प्रश्नांचीं उत्तरं देतां आलीं नाहींत, तर मग तुम्ही माझ्याकडे या. तुमचे प्रश्न अशा स्वरूपाचे आहेत कीं मुंबईतील कुणीही रॉयिस्ट त्यांचीं उत्तरं देऊं शकतील. " हे माझं उत्तर ऐकल्यावर कौजलगी स्वस्थ बसले आणि त्यानंतर त्यांनीं डॉ. शेट्टींची टिंगल करण्याचं सोडून दिलं.

विजापूरहून आम्ही बागलकोटला आलो ; आणि बागलकोटचं काम आटोपल्यानंतर हुबळीला गेलो. हुबळीला माझी आणि डॉ. हर्डीकरांची पहिल्यानंच ओळख झाली. हुबळीहून पूर्वतयारी करण्यासाठीं मी बेळगांवला आधीं गेलों. मी अगोदर जाण्याचं दुसरं कारणही होतं. तें हेंच कीं, रॉयगटाचा मी सभासद नसतांही मी कॉ. रॉयच्या जवळ असतों आणि त्यांच्याबरोबर प्रवास करतों ही गोष्ट शेट्टी वगैरेंना आवडत नसे. म्हणूनच मी बेळगांवला अगोदर गेलों. बेळगांवला गेल्यावर तिथं माझी गंगाधरराव देशपाडे यांच्याशीं भेट झाली. ते मला म्हणाले, " तुम्ही मंडळींनीं बेळगांवला येण्याचं

कांहीं कारण नव्हतं. निवडणुकीचा प्रचार करण्यासाठीं इथलीं माणसं तयार आहेत. आणि तीं आपलं काम यशस्वी रीतीनं पार पाडतील अशी माझी खात्री आहे." गंगाधररावांच्या बोलण्याचा मला राग आला. मी त्यांना म्हटलं, "तसं असेल तर आम्हाला इथं येण्याचं कांहीं कारण नाहीं, आम्ही हें शहर वगळून धारवाडला जायला तयार आहोंत. आजच मी कॉ. रॉयना तार करतों." असं म्हणून मी उठलों. इतक्यांत गंगाधररावांनीं हात धरून मला खालीं बसवलं. ते म्हणाले, "रागावूं नका. तुम्ही पाहुणे म्हणून आमच्याकडे येणार आहांत. तेव्हां तुमचं स्वागत आम्हांला केलंच पाहिजे."

कांहीं तासांनीं कॉ. रॉय वगैरे मंडळी तिथं आली आणि गंगाधररावांनीं आमची उत्तम प्रकारें बडदास्त ठेवली. याळगी नांवाच्या सुप्रसिद्ध माणसाकडे आमची राहाण्याची व्यवस्था केली होती. त्या रात्रीं शेट्टीचा अन् माझा जोराचा खटका झाला. इतका जोराचा झाला कीं शेवटीं डॉ. शेट्टी रडूं लागला. कॉ. रॉय आणि मणीबेन तिथं होतींच. डॉ. शेट्टीच्या डोळ्यांतून पाणी आल्यानंतर मलाच वाईट वाटलं. मी त्याला म्हटलं, "मी तुझी किंमत ओळखतों. पण तूं जर माझ्यावर भलतेसलते आरोप करूं लागलास तर ते मला खपणार नाहीं. या प्रचारकार्यांत कॉ. रायना मदत करावी म्हणून मी त्यांच्याबरोबर आलो आहे. यांत माझा स्वार्थ नाहींच पण त्यांत माझं नुकसान होत आहे ही गोष्ट तुझ्यासारख्या समजूतदार माणसाला कळायला पाहिजे होती." याच वेळीं किंवा अगोदर मणीबेन मला म्हणाली होती कीं, "कॉ. रॉयनीं तुम्हांला तुरुंगांतून पत्रं पाठवलीं होतीं. परंतु तीं पत्रं तुम्हांला देणं आमच्या ग्रूपला इष्ट वाटलं नाहीं." मी मणीबेनवर त्यावेळीं खूप भडकलों होतों. मी त्यांना म्हटलं, "चुलींत गेला तुमचा रॉय ग्रुप. तुमच्यासारख्या फडतूस माणसांना मला आलेलीं पत्रं दाबून टाकण्याचा हक्क नाहीं, हे कळण्याची अक्कल नाहीं याचंच मला आश्चर्य वाटतं." कॉ. रॉय गप्प बसून ऐकत होते. परंतु मणीबेन मात्र तावातावानें बोलत होत्या.

डॉ. शेट्टीचं सान्त्वन केल्यानंतर मात्र सर्व वातावरण शांत झालं, आणि आम्ही झोपीं गेलों. सकाळीं उठल्यानंतर मि. याळगी मला म्हणाले, "कॉ. रॉयना भेटण्यासाठीं रा. ब. लट्ठे, केशवराव गोखले वगैरे मंडळी आली आहेत." मी त्यांना म्हटलं, "कुठं आहे ती मंडळी?" ते म्हणाले, "ते पाहा झाडाखालीं एकमेकांशीं बोलत उभे आहेत." मी याळगींना म्हटलं, "कॉ. रॉयची भेट व्हायची नाहीं. त्यांना थोडा वेळ वाट पाहायला सांगा." कांहीं वेळ गेल्यानंतर मी कॉ. रॉयना सांगितलं कीं "रा. ब. लट्ठे, केशवराव गोखले वगैरे मंडळी तुम्हांला भेटायला आली आहे." तेव्हां कॉ. रॉय कपडे करून बाहेर आले. आपल्या एका विशिष्ट गांवीं कॉ. रॉयनीं यावं अशी रा. ब. लट्ठे यांची इच्छा होती. परंतु आमच्या कार्यक्रमांत बदल करणं शक्य नसल्यामुळें कॉ. रॉय त्यांची विनंती मान्य करणं शक्य नव्हतं. त्या दिवशीं संध्याकाळीं केशवराव गोखल्यांना घेऊन

गंगाधरराव आमच्याकडे चहासाठीं आले. बोलत असतांना त्यांनीं केशवरावांची फार स्तुति केली. शेवटीं मला उद्देशून ते म्हणाले, "You see he is a hard nut to crack". मी त्यांना लगेच उत्तर दिलं, "I do not know Mr. Gokhale, but we are not like Americans chewing gums."

बेळगांवचा दौरा संपल्यानंतर आम्ही धारवाडला आलों. धारवाडहून निपाणी रस्त्यानं सातारला जात असतां कॉ. रॉय मला म्हणाले, "You have seen the triumph of Royism." मी त्यांना म्हटलं, "रॉइझमचा ट्राइम्फ कसला ? आपण या मोठमोठ्या शहरीं जात असतांना वाटेंत बरींच खेडीं आपल्याला लागलीं. त्या खेड्यांतील लोकांनीं त्यांच्या खेड्यांत आम्ही जावं म्हणून आपल्या मोटारपुढें सत्याग्रहसुद्धां केला तुम्हांला माहीत आहेच. पण त्या खेड्यांतील लोकांनीं तुमचं नांवही कधीं ऐकलं नव्हतं. परंतु काँग्रेसनं पाठवलेला एक पुढारी ही जाणीव मात्र त्या लोकांना होती. म्हणूनच मी तुम्हांला सांगतों कीं हा रॉइझमचा ट्राइम्फ नाहीं, तुमचा स्वतःचा ट्राइम्फ नाहीं, तर कॉंग्रेसचा ट्राइम्फ आहे. कॉंग्रेसनं तुमच्याऐवजीं एखाद्या फडतूस व्यक्तीला जरी पाठवलं असतं तरी या लोकांनीं असाच आदरसत्कार केला असता." माझं हें बोलणं ऐकून कॉ. रॉय चूप बसले. आम्ही साताऱ्याला येईपर्यंत ते माझ्याशीं एक शब्दही बोलले नाहींत. खरं सांगायचं म्हणजे आमचं हें बोलणं झाल्यानंतर मी त्यांच्या गाडींतही बसलों नाहीं. कॉ. रॉय, मणीबेन आणि डॉ. चेट्टी यांना घेऊन एक मोटार पुढे गेली. मी एका मोटारलॉरीं-तून त्यांच्या मागोमाग जात होतों. सातारहून आम्ही पुण्याला आलों; आणि पुण्याला एकदोन दिवस राहून आम्ही मुंबईला परतलो.

आम्ही पुण्याला आलो त्यावेळीं कॉ. एलनची विलायतेहून तार आली. त्या तारेवरून ती एक महिन्याच्या आंत मुंबईला येऊन पोचेल असा आम्ही अंदाज बांधला. परंतु तिनें या धकाधकीच्या मामल्यांत हिंदुस्थानांत यावं अशी कॉ. रॉयची इच्छा नव्हती. म्हणून 'तूं इतक्यांत येऊं नकोस' अशा अर्थाची तिला तार करायला मला कॉ. रॉयनीं सांगितलं. मी त्यांना 'होय' म्हटलं; परंतु तार मात्र केली नाहीं. कॉ. रॉयच्या तोंडून एलनची बरीच स्तुति मी ऐकली होती. कॉमिन्टर्नशीं संबंध आल्यामुळें तिला आंतरराष्ट्रीय राजकारणाची फार चांगली माहिती होती. त्याचप्रमाणें रॉयचे लेख झटपट टाईप करणं या गोष्टी ती अतिशय शिताफीनें करी. दुसऱ्या तिच्याविषयींच्या अनेक गोष्टी मला रॉयनीं सांगितल्या होत्या. त्यामुळें मी निश्चय केला कीं रॉयला योग्य अशी जोडीदारीण मिळाली आहे. तेव्हां शक्य तितक्या लवकर त्यांचा विवाह व्हावा. विवाह नोंदणी पद्धतीनें व्हायचा असल्यामुळें तो विवाह होण्यापूर्वी वधूवरांपैकीं कुणा एकाला चौदा दिवसांची नोटीस द्यावी लागते. ती नोटीस आम्ही दौरा काढण्यापूर्वी

दिली होती. ती हकीगत गंमतीदार आहे. एके दिवशीं कॉ. रॉय, मणीबेन आणि मी कारमधून चाललों असतां टाऊन हॉलच्या जवळ आलों. टाऊन हॉलच्या शेजारीं विवाह नोंदणींचं ऑफिस आहे. त्या कचेरीकडे बोट दाखवून मी कॉ. रॉयना म्हटलं, "एलन आतां थोड्या दिवसांतच येणार आहे. तेव्हां आपण तुमच्या विवाहाची नोटीस देऊं या." रॉय अळंटळं करूं लागले. ते मला म्हणाले, "हें पाहा डॉक्टर, मी आणि एलन आहोंत कट्टर साम्यवादी, तेव्हां आम्हांला असल्या विवाहबंधनाची जरूर वाटत नाहीं. म्हणून नोटीस देण्याचं कांहीं कारण नाहीं." मी त्यांना म्हटलं, "तुम्ही मॉस्कोंत असतां तर तुमचं हें म्हणणं ठीक होतं. परंतु तुम्ही हिंदुस्थानांत आतां काम करायला आलांत; आणि हिंदुस्थानांत असल्या गोष्टी चालायच्या नाहींत. तुम्हांला नोटीस ही दिलीच पाहिजे." मणीबेन मला म्हणाल्या, "त्यांना जर नको आहे तर कशाला आग्रह करतां?" मी त्यांना म्हटलं, "तें कांहीं नाहीं. तुम्ही इथं गाडी थांबवा. कॉ. रॉयना इथंच बसूं द्या. मी आतां फॉर्म घेऊन येतों." त्याप्रमाणें मी लगेच रजिस्ट्रारच्या कचेरींत गेलों आणि एक फॉर्म आणला. त्यांतील सर्व तपशील मीच भरला. रॉयनीं नुसती खालीं सही करावी म्हणून मी त्यांच्यापुढें फॉर्म धरला. रॉय म्हणाले, "तुम्ही माझ्यावर ही भलती बळजबरी करताहांत. मी या फॉर्मवर सही करणार नाहीं." मी त्यांना म्हटलं, "तुम्ही सही केली नाहींत तर मी तुमची सही forge करीन. तुमची छाती असली तर तुम्ही जाहीर करा कीं ही सही बनावट आहे म्हणून." त्यावर कॉ. रॉयनीं कांहीं न बोलतां मुकाट्यानं सही केली.

ठरलेल्या वेळेवर एलनची बोट आली. तिचं स्वागत करण्यासाठीं आम्ही सर्वजण बॅलर्ड एस्टेटवर गेलों. रॉयनीं एलनशीं आमची सर्वांची ओळख करून दिली. चार्लीनें तेथील रेस्टॉरंटमध्यें सर्वांसाठीं ब्रेकफास्टची व्यवस्था केली होती. त्या ठिकाणीं एलनला उद्देशून गौरवपर अशीं भाषणं झालीं. याचं कारण एलननं एक मोठी कामगिरी बजावली होती, ती सर्वांच्या चांगलीच लक्षांत होती. ती कामगिरी म्हणजे कॉ. रॉय तुरुंगांत असतांना एलननं त्यांच्याशीं नियमानं पत्रव्यवहार सुरू ठेवला होता. त्यांना ज्या कांहीं वस्तु लागतील, पुस्तकं लागतील, तीं सर्व त्यांना युरोपमधून थेट तुरुंगामध्यें ती पाठवीत असे. या गोष्टीचा आम्हा सर्वांच्या मनावर बराच परिणाम झाला होता; आणि आम्हांला तिच्याविषयीं बराच आदर आणि प्रेम वाटूं लागलं. एलन आल्यानंतर त्या दिवशीं रात्रीं कॉ. रॉय आणि एलन यांना घेऊन मी टेंपल बारमध्यें गेलों. यावेळीं आमच्याबरोबर दुसरं कुणी येणार नाहीं याची मी खबरदारी घेतली होती. तिथं गेल्यावर आम्ही इकडच्या तिकडच्या गप्पा केल्या; आणि नंतर मी मूळ विषयाला सुरुवात केली. कॉ. रॉयना मी सरळ विचारलं, "तुमची विवाहाची तारीख कुठली ठेवायची?" कॉ. रॉय माझ्याकडे न पाहातां एलनकडे पाहूं लागले. ते कांहीं बोलेनात तेव्हां मी कॉ. एलनला विचारलं. तेव्हां ती म्हणाली, "मी आजच

मुंबईत आले. इथली परिस्थिति काय आहे ती मला ठाऊक नाहीं. म्हणून मी म्हणतें आपण कांहीं दिवस वाट पाहूं. शिवाय मी अमेरिकन नागरिक आहें. तेव्हां या गोष्टीचा मला जरा विचार केला पाहिजे." मी त्यांना म्हटलं, "या तुमच्या सबबी चालायच्या नाहींत. तुमचं लग्न शक्य तितक्या लवकर झालं पाहिजे." तेव्हां कॉ. रॉय त्रासून म्हणाले, "तुम्हांला लागेल तें करा." मी म्हणालों, "ठीक आहे. येत्या बुधवारीं तुमचं लग्न उरकून टाकूं. आणि नंतर कांहीं मित्रमंडळींना बोलावून मॉजिनीमध्ये एक छोटासा समारंभ करूं." ही हकीकत कॉ. व्ही. बी. कर्णिक यांनीं मणीबेनना कळवली. त्यावेळीं त्या खूप संतापल्या.

मणीबेन त्यावेळीं वॉर्डन इन्स्युअरन्स कंपनींत काम करीत होत्या; आणि मी 'ओरिएण्टल रिव्ह्यू' मध्यें काम करीत होतों. माझी कचेरी त्यावेळीं दलाल स्ट्रीटमध्येंच होती. मणीबेन कॉ. कर्णिकना खूप बोलल्या. मलाही त्यांनीं शिव्या दिल्या. विशेषतः रॉयगटाशीं माझा कांहीं संबंध नसतांना कॉ. रॉयच्या खाजगी भानगडींत मी पडलों याचं त्यांना वैषम्य वाटलं. कॉ. कर्णिक खूप घाबरले. ते धावत माझ्या ऑफिसमध्यें आले आणि मला म्हणाले, "डॉक्टर, तुम्ही आत्तांच्या आतां मणीबेनकडे चला. त्या चिडल्या आहेत. त्यांना तुम्ही केलेली व्यवस्था मुळींच पसंत नाहीं." मी माझं काम टाकून मणीबेनच्या ऑफिसांत गेलों. मी तिथं गेल्यावर मणीबेननीं आपला सूर बदलला. जवळजवळ त्या रडण्याच्या बेतांत होत्या. त्या म्हणाल्या, "हे काय डॉक्टर, कॉ. रॉयचं लग्न होणार, त्याच्याबद्दल कुणी मला विचारीतही नाहीं. माझा कुणी सल्लाही घेत नाहीं. याचा अर्थ काय?" मणीबेनला मी पूर्णपणें ओळखत होतों. मी त्यांना म्हटलं, "तुम्हांला विचारीत नाहीं असं कसं होईल! मी आतां तुम्हांला विचारतों, कॉ. रॉयच्या विवाहासंबंधानं काय ठरवायचं ते तुम्ही ठरवा." त्या म्हणाल्या, "कॉ. रॉयचं लग्न इतक्या घाईघाईनं उरकणं ठीक नाहीं. त्यांच्या राजकीय दर्जाला शोभेल अशा रीतीनं त्यांचा विवाह झाला पाहिजे. म्हणून मी म्हणतें आपण त्यांचं लग्न पुढल्या रविवारपर्यंत लांबणीवर टाकूं; आणि रविवारीं संध्याकाळीं कॉंग्रेस हाऊसमध्यें एक बडा समारंभ घडवून आणूं." मी म्हणालों, "तुमची कल्पना फार छान आहे. परंतु त्यासाठीं माझी योजना टाकून देण्याचं कांहीं कारण नाहीं. उद्यां त्यांचं लग्न होऊं दे. त्यानंतर नरीमन, जमनादास मेहता प्रभृति कांहीं थोड्या मंडळींना मॉंजिनींत लंच घेण्यासाठीं बोलावूं. आणि रविवारीं संध्याकाळीं तुम्हांला जो बडा समारंभ करायचा आहे तो तुम्ही करा."

मणीबेन कांहीं बोलल्या नाहींत. परंतु विवाहनोंद करायला जाण्याच्या पूर्वी एलनला मणीबेननीं एक बदामी रंगाची साडी नेसवली; आणि तिला त्याच रंगाचा

ब्लाऊज घालायला दिला. त्या स्वतः त्याच रंगाची साडी नेसल्या होत्या. इतकं झाल्या-नंतर आम्ही विवाहनोंदणी कचेरींत गेलों. नोंदणी झाल्यानंतर आम्ही तिथून मॉजिनींत गेलों. जमनादास, नरीमन वगैरे मंडळी त्याच वेळीं तिथं येऊन दाखल झाली. जेवण चालू असतांना जमनादास, नरीमन वगैरे मंडळींनीं अभिनंदनपर भाषणं केलीं. रॉय टेबलाच्या ज्या टोंकाला बसले होते त्याच्या दुसऱ्या टोंकाला मी बसलों होतों. त्यामुळें मला भाषण करण्याची जरूरी पडली नाहीं. जेवण संपल्यानंतर आम्ही बाहेर आलो. बाहेर आल्यानंतर कॉ. कर्णिकला मी गाठलं आणि म्हटलं, "आतांपर्यंत कॉ. रॉय, मणीबेन आणि मी एकत्र होतों. परंतु आतां कॉ. रॉयचं लग्न झालं आहे. म्हणून त्या दोघांनीं एकत्र कांहीं दिवस घालवावेत असं वाटतं. माझ्या-सारख्या माणसानं निदान कांहीं दिवस तरी त्यांच्या सहवासांत राहाणं इष्ट नाहीं. ही गोष्ट माझ्या ताबडतोब लक्षांत आली. परंतु बिचाऱ्या मणीबेन आहेत भोळ्या; त्यांच्या कांहीं हें लक्षांत यायचं नाहीं. म्हणून तुम्ही असं करा, मणीबेनना बोलण्यांत गुंतवून ठेवा; आणि मी रॉय आणि मिसेस रॉयना एका गाडींत घालून पाठवून देतों." त्याप्रमाणें कॉ. रॉय नि मिसेस रॉय एका गाडींतून निघून गेलीं, आणि आम्ही आपापल्या घरीं परतलो.

कॉ. रॉय आणि मिसेस रॉय उत्तर हिंदुस्थानांत निघून गेल्यानंतर 'इंडिपेंडंट इंडिया' पुन्हा सुरू करावा असं माझ्या मनांत आलं. परंतु रॉय मुंबईत नसल्यामुळें ही कल्पना मूर्तस्वरूपांत येणं शक्य नाहीं असं कांहीं रॉयिस्टांना वाटलं आणि त्याप्रमाणें त्यांनीं बोलूनही दाखवलं. परंतु मी तिकडे लक्ष दिलं नाहीं. कारण कॉ. कार्णिक हें माझ्याशीं या बाबतींत पूर्ण सहमत होते. डेक्लेरेशन घेतल्यानंतर सुंदरराव वैद्य यांच्या छापखान्यांत आम्ही पहिला अंक छापून काढला. २।३ अंक निघाल्यानंतर कॉमरेड आणि मिसेस रॉय मुंबईला परत आले. ते मुंबईत आल्यानंतर कांहीं करणावरून माझ्या व त्यांचा खटका उडाला. तो जरी क्षुल्लक कारणावरून उडाला होता तरी त्याचं पर्यवसान मात्र गंभीर स्वरूपांत झालं. त्या दिवशीं कॉ. रॉय पाय आपटीत माझ्या खोलींतून निघून गेले. (त्यावेळीं मी लंडन हॉटेलमध्यें राहात होतों.) तेव्हांपासून कॉ. रायशीं असलेले संबंध मी तोडून टाकले. त्यानंतर १।२ वेळां माझी आणि कॉ. रॉयची भेट झाली. तरीसुद्धां आमची दोघांची राजकीय भूमिका उत्तर दक्षिण ध्रुवाइतकी भिन्न असल्यामुळें आमचा कधींही समेट होऊं शकला नाहीं. १९३९ च्या सप्टेंबर महिन्यांत युद्ध सुरू झाल्यानंतर 'इंडिपेंडंट इंडिया' ची संपादकीय कामगिरी थोड्या दिवसापुरती माझ्याकडे आली होती. त्यावेळीं कॉ. रॉयचं हें साप्ताहिक आहे हें ओळखून मी माझीं स्वतःचीं मतं बाजूला ठेवून संपादकीय लिखाण करीत असें. त्यापूर्वी सुद्धां युद्धासंबंधीं माझे कांहीं लेख माझ्याच नांवावर प्रसिद्ध झाले होते. ते लेख

वाचल्यानंतर कॉ. रॉयनीं मला एक पत्र पाठवलं. त्यांत ते म्हणाले, " You are simply bursting with genius ".

पंधरा दिवसांनीं कॉ. कर्णिक दिल्लीहून आले आणि मी माझं संपादकीय काम त्यांच्या हवालीं केलं. ' इंडिपेंडंट इंडिया ' मध्यें प्रसिद्ध झालेले माझे लेख लोटवाला शेटजींना इतके आवडले कीं ते त्यांनीं मराठींत अनुवादित करून घेऊन ' चित्रा ' साप्ताहिकांत छापले. अशा अनपेक्षित रीतीनं माझा ' चित्रा ' साप्ताहिकाशीं पहिला संबंध आला. त्यानंतर ' चित्रा ' साप्ताहिकाचा राजकीय सल्लागार म्हणून लोटवाला शेटजींनीं माझी नेमणूक केली. मी त्यावेळीं ' ओरिएण्टल रिव्ह्यू ' नांवाचं मासिक चालवीत होतों तें वेगळंच. ' चित्रा ' साप्ताहिकाचे त्यावेळचे संपादक श्री. दत्तु बांदेकर होते. त्यावेळीं रांगणेकर, काणेकर ही मंडळी लोटवाला शेटजींशीं भांडण झाल्यामुळें ' चित्रा ' सोडून निघून गेली होती. श्री. बांदेकरांनीं सुद्धां 'चित्रा'शीं असलेला आपला संबंध १९४० च्या जून महिन्यांत एकदम तोडून टाकला. मी ' चित्रा ' चा संपादक व्हावं अशी लोटवाला शेटजींनीं इच्छा प्रदर्शित केली. इंग्रजी वृत्तपत्रव्यवसाय सोडून मराठी वृत्तपत्रव्यवसायांत शिरण्याची मला त्यावेळीं खरोखरच भीति वाटत होती. त्याचं कारण बरींच वर्षेपर्यंत मराठींत लिहिण्याचा मला सराव नव्हता. परंतु शेटजींच्या आग्रहामुळें माझा नाइलाज झाला. आणि ' चित्रा ' चं संपादकत्व मी पत्करलं. पहिले कांहीं आठवडे मी इंग्रजींत अग्रलेख लिहीत असें. आणि त्याचं मराठींत भाषांतर होऊन तो चित्रांत छापला जात असे. परंतु ही कल्पना मला सहन झाली नाहीं. आणि मी आधुनिक मराठी वाङ्मयाचा कसून अभ्यास करायला सुरुवात केली. श्री. मामासाहेब वरेरकरांनीं लिहिलेलीं नाटकं आणि कादंबऱ्या मी वाचून काढल्या. त्याचप्रमाणें डॉ. केतकर, वा. म. जोशी, फडके, खांडेकर, माडखोलकर, पु. य. देशपांडे, बोरकर, कुसुमाग्रज, यशवंत या सर्वांनीं जें जें कांहीं लिहिलं होतं, तें सर्व मी वाचून काढलं. त्यानंतर मी माझे सर्व लेख मराठींतून लिहूं लागलों. माझा पहिला अग्रलेख मी जेव्हां मराठींत लिहिला आणि तो छापून आलेला पाहिला, तेव्हां मला किती धन्यता आणि अभिमान वाटला असेल याची वाचकांनींच कल्पना करावी.

१९-१०-१९४५

# शेवटचीं
# कांहीं
# वर्षें



डॉक्टरांची आणि माझी ओळख झाली १९३३ च्या ऑगस्टमध्यें. मी माझे वडील श्री. भा. वि. वरेरकर यांच्याबरोबर गेलें होतें त्यांच्याकडे. त्या पहिल्याच भेटींत त्यांच्याविषयीं माझा फारसा अनुकूल ग्रह झाला नाहीं. आणि त्यानंतरही मी त्यांच्या घरीं जात असें, पण तें केवळ लीलाताईसाठीं. त्यांची माझी दाट मैत्री जमली. माझी 'महिला' त्यावेळीं चालू होती. तिच्यासाठीं डॉक्टरनीं आग्रह करून लीलाताईना सत्यकथा लिहायला लावली. त्या उभयतांच्या त्यावेळच्या एकमेकांशीं असलेल्या गोड वागणुकीवरून कांहीं कालानें या जोडप्यांत कांहीं भयंकर घटना घडून येईल असं कुणाच्याही स्वप्नीं आलं नसतं.

पण माझ्याच नजरेसमोर या बेबनावाला सुरुवात झाली आणि १९३५ नंतर लीलाताई किंवा डॉक्टर यांच्याबद्दल मला कांहींच ऐकूं आलं नाहीं. १९३८ मध्यें अचानकपणें डॉक्टर मला भेटले. त्यापूर्वींच माझी 'महिला' बंद पडली होती. ती पुन्हा मी चालू करावी म्हणून डॉक्टरनीं मला आपणहून मदत करायचं ठरवलं. त्यावेळीं ते लोटवालांच्या होस्टेलमध्यें राहात होते. ज्या दिवशीं मला त्यांनीं खोलीवर बोलावलं होतं, त्या दिवशीं मी तिथं जाऊन पाहातें तर डॉक्टरांचा पत्ताच नव्हता. बरेच दिवस चौकशी केली मीं. पण ते मुंबई सोडून नागपूरला गेले होते. त्यानंतर १९४० सालीं लीलाताईकडून मला अचानक बोलावणं आलं. किर्लोस्करांच्या 'स्त्री' साठीं मी त्यांची मुलाखत घेतली. त्याच सुमाराला माझ्या वडिलांच्या 'पूर्णिमा' साप्ताहिकांत मी सिनेमा पेज लिहीत असें. एका इंग्रजी बोलपटाची ट्रायल पाहायला गेलें असतांना डॉक्टर मला पुन्हा अचानक भेटले. या भेटींत कां कुणास ठाऊक पण मला डॉक्टरांच्या एकाकी आयुष्याबद्दल सहानुभूति वाटूं लागली. त्यांचा

पत्ता मला लागला. मुलाखत नुकतीच लिहून झाली होती. पण डॉक्टरांच्याकडून कांहीं विशेष माहिती मिळवावी या हेतूनं एक दिवशीं मी त्यांच्या घरीं गेलें.

घर कसलं तें! एका मोठ्या हॉलच्या पार्टीशननं तीन खोल्या केल्या होत्या. बिल्डिंगमधली वस्ती तर और होती. एका महाराष्ट्रीयाखेरीज हिंदुस्थानांतल्या सर्व जातींतील लोक तिथं राहात होते. पांढरपेशानं त्या बिल्डिंगमध्यें शिरणं धोक्याच होतं. अशा चमत्कारिक वस्तींत ते समाजाला टाळून राहिले होते. कुणाचा संपर्क नको होता त्यांना. मी गेले तेव्हां ते एका झुलत्या खुर्चीत शॉच्या नाटकांचा एक संग्रह वाचीत पडले होते. 'लीलाताईंची मी एक मुलाखत देणार आहें 'स्त्री' मध्यें. तुम्ही मला त्यांच्याविषयीं कांहीं माहिती देतां का?' असं विचारतां त्यांनीं पहिली सर्व हकीगत मला सांगितली. पण पुढें सांगायचं मात्र टाळलं. "मी पुरुष आहें. मला सर्व मार्ग मोकळे आहेत. तसं तिचं नाहीं. उच्च कलावंत या नात्यानं तुला तिच्याविषयीं जे जे कांहीं सांगायचं तें मी सांगितलंय. यापुढचं मात्र तुला कांहीं सांगणार नाहीं." बोलतांना वरून जरी बेफिकीरपणाचा आव ते आणीत होते तरी अंतरींची तळमळ मला दिसल्यावांचून राहिली नाहीं.

लोकांत त्यांच्याबद्दल नाहीं नाहीं तें बोललं जात होतं. ते त्यांच्या कानीं जात असूनही त्याची पर्वा वाटत नव्हती त्यांना. ते बेफिकीर आहेत असा देखावा ते करीत होते. बेफिकीर होते स्वतःबद्दल. पण ज्यांना आपलं सर्वस्व मानलं होतं त्यांचा पुसटसाही संबंध राहिला नसतां त्यांना काळजी वाटत असे त्यांची. अति विचारामुळें मेंदूचा भडका उडत असे त्यांच्या. तो दाह टाळण्यासाठीं त्यांनीं मद्यपान सुरू केलं. भोवतालच्या स्नेह्यांना त्यांची कींव येत असे. पण यांतून सुटका करण्याची त्यांपैकीं कुणाचीही ताकद नव्हती.

'उडती पाखरे' नाटकाच्या तालमींना सुरुवात झाली. तें नाटक त्यांना फार आवडलं होतं. मी त्यांत काम करावं असं प्रथम त्यांनींच सुचवलं. नाटक पार पडलं पण तालमीच्या त्रासानं मी खूप थकून गेलें होते. त्याचा परिणाम मला प्लुरसीनं दिला. वाईटांतून केव्हां केव्हां चांगलंही निष्पन्न होतं म्हणतात. तसंच यावेळीं घडून आलं. माझे वडील फार घाबरून गेले होते. पण डॉक्टरांना काय वाटत असेल माझ्या-बद्दल याची मला जिज्ञासा लागून राहिली होती. त्याचा प्रत्यय मला लवकरच आला. जगांत त्यांचं असं म्हणायला कुणी आहे याची पूर्ण जाणीव झाली त्यांना. आजारांत किती शुश्रूषा केली माझी! माझ्या पुनर्जन्मापेक्षां त्यांचाच पुनर्जन्म वाटला मला.

खायचं, प्यायचं आणि मजा करायची या धोरणानं वागणाऱ्या डॉक्टरांना कुठं तरी जिव्हाळा वाटूं लागला. वसईपासून ३६ मैलांवर असलेल्या वज्रेश्वरी या ठिकाणीं

मला घेऊन राहिले होते ते. हालचालीला पारखी झालेली मी त्यांच्या हालचालीकडे डोळे लावून राहिलें होतें. त्या चार महिन्याच्या निकट सहवासांत डॉक्टरना मी पूर्ण समजून चुकलें. त्यावेळीं 'चित्रा' साप्ताहिकांत ते स्वतःच लेख लिहूं लागले होते. आजवर इंग्रजींतून लिहिणारे खंदे लेखक समजले जाणारे डॉक्टर मराठी भाषा पचवण्यासाठीं अहोरात्र श्रम करीत होते. मराठी ग्रंथसंग्रहालयांतून मोठमोठ्या लेखकांचं वाङ्मय त्यांनीं अधाशासारखं वाचून काढलं. त्यांच्या स्वभावाचं तें वैशिष्ट्यच होतं. मनानं एकदां एक गोष्ट ठरवली कीं तिचा पुरा निकाल लावल्याशिवाय ते स्वस्थ राहात नसत. बारीकसारीक गोष्ट का असेना, घरांत एखादी वस्तु पाहिजे आहे असं आढळलं कीं भर दुपारीं सुद्धां ती वस्तु आणून देत असत. मग आम्हालाच पश्चात्ताप व्हायचा, कशाला सांगितलं याचा. याच पद्धतीनं त्यांनीं लवकरच मराठी साहित्यिकांत आपलं नांव गाजवलं.

वज्रेश्वरींतील चार महिने माझ्या आयुष्यांतील अत्यंत संस्मरणीय दिवस ठरले आहेत. माझी रात्रंदिवस काळजी वाहात असतांनाही ते जें काम करीत होते तें पाहून मला धन्यता वाटली त्यांची. जवळ जवळ सहा, सात लेख त्यांना एकट्याला लिहावे लागत होते. तो काळ मोठ्या धामधुमीचा होता. दुसरं महायुद्ध चालू होतं. त्याचे अनुकूल, प्रतिकूल वारे हिंदुस्थानला जाणवत होते. हिंदी पुढारी देशाच्या स्वातंत्र्यासाठीं याच वेळेला ब्रिटिश राजवटीला धक्के देऊं पाहात होते. पण त्यावेळपर्यंत डॉक्टरांची विचारसरणी बदललेली नव्हती. मार्क्सवाद डळमळला होता. पण गांधीवादाची पकड मनावर बसली नव्हती. एका ओसाड गांवांत राहून ते राजकारणी पुरुषांचे डाव खोलवर नजरेनं पाहात होते. मोठमोठ्या जर्मन तत्त्ववेत्त्यांचीं त्याच वेळीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकं आणवून त्यांचा कीस पाडीत होते. त्यांच्या विद्वत्तेबद्दल, वाङ्मयीन दर्जाबद्दल त्यांचे विद्वान मित्र यापूर्वीच सांगून गेले आहेत. मला त्या बाबतींत कांहीं सांगायचं नाहीं. माझा अधिकार तो नव्हे. पण त्यावेळीं विविध क्षेत्रांतील इंग्रजी आणि मराठी पुस्तकं वाचून काढून परराष्ट्रीय राजकारण आणि वाङ्मय या दोहोंवरलीं आपलीं मतं लेखाद्वारें मांडीत होते. बुधवारपर्यंत काम संपवून ते गुरुवारीं मुंबईला ऑफिसात हजर होत. अंकाची पूर्ण तयारी करून प्रेसला द्यायची आणि लगेच शुक्रवारीं वज्रेश्वरीला ते परतायचे अशी धांवपळ चालत होती त्यांची. शरीराला किती थकवा येत असे. पण मनाचा उत्साह दांडगा होता.

नवा जन्म होत होता त्यांचा. त्या सुमाराला मला किती जपून वागावं लागत होतं. मागला इतिहास त्यांच्या मनांतून काढून टाकण्यासाठीं मला खूप धडपड करावी लागली. पण अशानं का तो इतिहास मनावरून पुसला जाईल ? डॉक्टरांना

मुलांच्या ताटातुटीचं फार दुःख झालं होतं. मुलं त्यांना जिवाहून प्यार होतीं. त्यांचं हे दुःख मला पाहावत नसे. एका भरल्या ताटावर बसलेल्या जिवाला दूर खेचून काढावं तशी त्यांची स्थिति झाली होती. मनाचा दाह शमवायला, स्वतःचा विसर पडायला त्यांनीं जो मार्ग पत्करला होता तो पाहून माझं मन चरकून जात होतं. इकडचं जग तिकडे करण्याची ताकद असलेल्या एका असामान्य व्यक्तीचा एका क्षुल्लक गोष्टीपायीं चुराडा होत आहे याची जाणीव मला जाळीत होती. माझ्या सहवासांत त्यांना हुरूप वाटे, पण मागच्या गोष्टींची पुनरावृत्ति तर होणार नाहींना याची त्यांना धास्ती वाटे. तसं बोलूनही ते दाखवीत. मी मात्र मनाशीं ठरवून टाकलं, या व्यक्तीपायीं मला माझ्या माणसांना सोडावं लागलं, माझ्या आयुष्याचा होम जरी झाला तरी चालेल पण यांची कर्तृत्वशक्ति नाहींशी होऊं द्यायची नाहीं, यांना पुन्हा आपल्या मार्गावर आणून सोडायचं. प्रथम प्रथम खूप सहन करावं लागलं मला. कारण ज्यावेळीं हें अकांडतांडव होत असे, ती वेळ बोलून दाखवायची नव्हती. मनावरचा भार काढून टाकण्यासाठीं ज्या स्थितीला ते आपलीशी करीत ती स्थिति त्यांना सांभाळून घ्यायची होती. माझ्या सुदैवानं म्हणा किंवा त्यांच्या सुदैवानं म्हणा त्यांच्यांत बरीच सुधारणा होऊं लागली. याचं कारण आमच्या बाबीचं—अंजलेचं—आगमन. त्यांना मुलीची फार हौस होती. आणि तीच मिळाल्यामुळें त्यांच्या जीवनांत आणखी फरक पडूं लागला. त्यांचे निकटचे स्नेही मला शाबासकी देऊं लागले. बाबीच्या जन्मानंतर आमच्या घरांत आनंदाचं साम्राज्य पसरलं. डॉक्टर बऱ्याच कार्यांत भाग घेऊं लागले. साहित्य आणि राजकारण या दोन्हींचे अड्डे आमच्या घरीं बसूं लागले. उत्साहाला भरती आली होती. तो १९४२ चा काल होता. त्याच वेळीं महात्माजींचा 'हरिजन' डॉक्टरना फार प्रिय झाला होता. महात्माजींच्या कार्याला वाहून घेतलेल्या व्यक्तीपेक्षांही डॉक्टर 'हरिजन'चे जास्त चहाते बनले होते. महात्माजींचे त्यावेळीं जे लेख 'हरिजन' मध्यें येत होते त्यांतील विचार डॉक्टरना पटूं लागले होते. आणि म्हणूनच 'चित्रां' त त्यांनीं 'हरिजन' वाचल्यानंतर या नांवानं एक सदर सुरू केलं होतं.

बेचाळीसच्या चळवळींत त्यांनीं प्रत्यक्ष भाग जरी घेतला नाहीं, तरी ज्या कांहीं व्यक्ति अप्रत्यक्ष रीतीनं चळवळीचे सूत्रधार मानल्या जात होत्या त्यांत डॉक्टरांचं नांव प्रमुख होतं. अच्युतराव पटवर्धन, अरुणा असफअल्ली, मेहरअल्ली, मोहनलाल गौतम हे समाजवादी पुढारी त्यावेळीं मुंबईंतच होते. या भूमिगत पुढाऱ्यांच्या भेटीगांठी, चर्चा याखालीं डॉक्टरांचा बराच वेळ मोडत असे. महात्माजींनीं भूमिगत पुढाऱ्यांना 'बाहेर या' असा संदेश दिला होता. त्या बाबतींत सल्ला विचारण्यासाठीं अच्युतरावांनीं डॉक्टरना बोलावलं होतं. या भेटी कधीं श्री. अत्रे यांच्याकडे होत असत, कधीं

आमच्या घरींही होत असत. आज हेच पुढारी डॉक्टरना विसरले आहेत त्याचं कारण तसंच आहे. त्याचा उल्लेख या जागीं करणं योग्य नाहीं. विद्यार्थी संघटनेच्या हालचाली आमच्याच घरांतून होत होत्या. कारण त्यावेळीं लोटवाला शेटजींच्या मनांतून विद्यार्थ्यांसाठीं एक आदर्श संस्था चालवायची होती. त्यासाठीं कांहीं विद्यार्थ्यांची निवड करण्यांत आली होती. प्रभाकर कुंटे, राजा कुळकर्णी, दिनकर साक्रीकर, विष्णु दोदे यांखेरीज कांहीं गुजराती मुलं बाहेरून येत असत. या नवीन कामगिरींत ते गर्क झाले होते. पण या कार्याला चळवळीचं जोंपर्यंत स्वरूप होतं, तोंपर्यंत विद्यार्थ्यांचा आणि चालकांचा उत्साह उतूं जात होता. डॉक्टर त्या विचाराचे नव्हते. त्यांना मुलांच्याकडून कांहीं भरीव कार्य करून घ्यायचं होतं. त्यांच्या अभ्यासू वृत्तीला तात्कालिक उत्साह कधींच मानवला नाहीं. आणि म्हणूनच त्यांच्या एका गोड कल्पनेची क्षणांत वासलात लागली. मला फार वाईट वाटलं. मुलांच्या निमित्तानं नकळतपणें मला बऱ्याचशा गोष्टींचं ज्ञान सहज मिळत होतं. डॉक्टरना सबंध दिवस काम पडत असल्यामुळें बांधून राहिले होते ते. याच वेळीं श्री. रोहित दवे, कमलादेवी चट्टोपाध्याय यांच्याबरोबर इंडियन नॅशनल थिएटर या संस्थेची सुरुवात करण्याबद्दल डॉक्टर चर्चा करीत होते. पण सगळंच ढासळलं आणि स्वभावांत मुरलेल्या वैराग्यानं पुन्हा उचल खाल्ली.

नेहमींच्या वर्तमानपत्री लिखाणांत त्यांच्या या वृत्तीचा कधीं मागमूसही आढळत नसे. रोजचे व्यवहार सुरळीत चालू होते. मनाची घालमेल चालू असली तरी ते दिवसा जितका संथ कारभार करीत असत, तितकेच रात्रीं ते बेचैन होत असत. या बेचैनीवर कांहींच उपाय मला सापडेना. तितक्यांत लोटवाला शेटजींना पुन्हा एक नवी कल्पना सुचली. सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी या संस्थेंतून कांहीं लोक बाहेर पडले होते. त्यांना बोलावून आणून शेटजींनीं त्याच पद्धतीवर आपण एक संस्था काढूं असा विचार डॉक्टरांच्यापुढें मांडला. लोटवाला शेट आणि डॉक्टर यांचा स्नेह फार वर्षांचा. त्यांच्या स्नेहांत कधींच बिघाड आला नाहीं. कारण डॉक्टर त्यांच्याकडून कुठल्याच प्रकारची अपेक्षा करीत नव्हते. निरपेक्षपणे काम करणाऱ्या व्यक्तीला कुणाचीच भीड नसते. या नव्या कल्पनेसाठींही डॉक्टर अविश्रांत श्रम करीत होते. श्री. ल. रा. पटवर्धन आणि श्री. एन्. व्ही. फडके यांच्याकडे या संस्थेचं बरंच काम सोपवलं होतं. श्री. पटवर्धन आमच्या शेजारींच राहायला आले. पुन्हा कांहीं तरी नाविन्य वाटूं लागलं. 'बाबी' मोठी झाली होती.

चिमुकल्या संसारांत ते रंगून गेले होते. 'चित्रा'चा व्याप सांभाळीत असतांही घरसंसाराकडे त्यांचं दुर्लक्ष झालं नाहीं. घरांतल्या बारीकसारीक गोष्टींकडे त्यांचं लक्ष फार असे. प्रत्येक गोष्ट आपण स्वतः आणून देण्याकडे त्यांचा जास्त कल असे. कधीं कधीं तर स्वयंपाकांतले कांहीं पदार्थ ते स्वतः तयार करीत. बाजारांतून भरपूर जिन्नस

खरेदी करायचे. रोज नव्या पद्धतीनं ते जिन्नस तयार करायचे आणि त्यांचं खरं समाधान मिळवण्यासाठीं स्नेह्यासोबत्यांना बोलावून ते खाऊं घालायचे, हा डॉक्टरांचा आवडता व्यवसाय होता. बाबा ( पु. य. देशपांडे ) आले म्हणजे तर डॉक्टरांना कोण आनंद होत असे. या दोघांचा दाट स्नेह होता. ते असले कीं घरांत रात्रंदिवस चर्चेला ऊत येत असे. एकाद्या रात्रीच्या बैठकींत चर्चा इतकी विकोपाला जायची कीं आरंभीं आरंभीं मला वाटे, उद्यां सकाळीं उठल्यावर हे दोघे एकमेकांशीं बोलतात कीं नाहीं. पण सकाळीं पाहावं तर डॉक्टर लवकरच उठून मार्केटला जायचे आणि बाबांना आवडणाऱ्या वस्तु खरेदी करून यायचे. या दोघांचा अकृत्रिम स्नेह होता. त्यांची स्नेही जोडण्याची पद्धति और होती. बहुतेक मित्र वाङ्मयीन वादांतूनच जोडले गेले. बाबांचा स्नेह जुना होता. पण त्यांच्या कादंबऱ्यांवर त्यांनीं काय थोडी टीका केली ? श्री. बा. सी. मर्ढेकर यांच्या ' वाङ्मयीन महात्मता ' या पुस्तकावर तर ते तुटून पडले होते. पण चर्चा झाली ती श्री. पाध्ये आणि डॉक्टर यांच्यामध्यें. पुण्याचे श्री. माटे यांच्याही एका पुस्तकावर अशीच टीका त्यांनीं केली होती. आणि कांहीं दिवसांनीं ' रसवंतीची जन्मकथा ' या त्यांच्या पुस्तकावरील श्री. वा. ल. कुळकर्णी यांच्या टीकेला प्रत्युत्तर देऊन श्री. माटे यांचा स्नेह संपादन केला होता.

याचं कारण, त्यांची सडेतोड विचारसरणी. त्यांचं मत ते स्वतः बनवीत ; आणि तें मत मांडतांना ते कुणाचीही पर्वा करीत नसत. वेळोवेळीं झालेल्या त्यांच्या मत-परिवर्तनामुळें कांहीं जण त्यांना दोष देत असत. गांधीवादाचं समर्थन करतात म्हणून कांहीं मित्रमंडळी त्यांच्यावर नाराज झाली. पण त्यांनीं आपलं मत सोडलं नाहीं.

या गांधीवादाच्या भूमिकेमुळेंच मला पाहिजे होता तो फरक त्यांच्यामध्यें पडूं लागला. लोटवालांची ती संस्था नित्याप्रमाणें तशीच अर्धवट राहिली. त्यानंतर या अशा उडत्या किंवा तात्कालिक लिखाणापेक्षां कांहीं भरीव काम त्यांच्याकडून करून घेण्यासाठीं मी सारखा आग्रह चालवला. फावल्या वेळांत गप्पा मारतांना ते बऱ्याच हकीगती मला सांगत असत. त्या ऐकून त्यांच्या विविध कामगिरीची मला कल्पना येई. आमच्या मराठी साहित्यिकांत त्यांच्यासारखी एकादीच व्यक्ति इतकं कार्य करून राहिली याचा मला त्यांची हकीगत ऐकतांना पडताळा येत असे. त्यांचे निकटचे स्नेहीसुद्धां त्यांना असं कांहीं लिहा म्हणून आग्रह करीत असत. रोजच्या सतावण्यामुळें एकदां त्यांनीं माझं म्हणणं कबूल केलं. आणि त्यानंतर मात्र स्वतंत्र लेखनाचा सपाटा लावला त्यांनीं. आज प्रकाशित आणि अप्रकाशित अशा सहा कादंबऱ्या माझ्याजवळ तयार आहेत.

. अलीकडच्या एक दोन वर्षांच्या कालांत डॉक्टरना राजकारणाचा तिटकारा येऊं लागला होता. म्हणूनच त्यांनीं एकदोन नवीन दैनिकांच्या संपादनासाठीं त्यांना बोलावलं असतांही नकार दिला. इतर कुणी असता तर भल्या मोठ्या पगाराच्या आशेनं तत्त्व बाजूला ठेवून त्यानं नोकरी पत्करली असती. पण शेवटपर्यंत डॉक्टर स्वतःच्या मतासाठीं झगडले. परिस्थितीची त्यांनीं कधींच कदर केली नाहीं. ज्यावेळीं त्यांच्या हातीं पैसे खेळत असत त्यावेळीं तें खर्चून कसे टाकावे याच विचारांत ते पडत. त्यांचं नेहमीं एक म्हणणं असे 'पैसा मला विषासारखा वाटतो. माणसानं जास्त पैसे मिळवण्याच्या मार्ग कधीं लागूं नये' या अशा विचारामुळेच त्यांचा गांधीवादाकडे कल झुकूं लागला.

राजकारण सोडून देऊन त्यांनीं एकेकाळचा आवडता व्यवसाय शोधून काढला. कांहीं कॉलेजमधल्या विद्यार्थ्यांना गोळा करून त्यांनीं 'कलानिकेतन' या नांवाची संस्था स्थापन केली होती. या संस्थेमार्फत एकदोन नाटकाचे प्रयोगही झाले. या संस्थेमार्फत इब्सेनच्या Doll's House च्या माझ्या वडिलांनीं भाषांतरित केलेल्या 'खेळघर' या नाटकाचा प्रयोग ते फार मोठ्या प्रमाणावर करणार होते. जवळजवळ तीन अंक बसले होते. पण कॉलेज विद्यार्थ्यांच्या उनाड वृत्तीला अनुसरून या नाटकांत कामं करणाऱ्या कलावंतांनीं कांहीं तरी निमित्त सांगून आयत्या वेळीं त्यांच्या मनोरथावर पाणी ओतलं. १९२८ सालापासून ते हें नाटक रंगभूमीवर यावं म्हणून शिकस्तीचे प्रयत्न करीत होते. पण ही त्यांची इच्छा शेवटीं अपुरीच राहिली.

त्यांच्या आयुष्याचा आढावा घेतला तरीही त्यांची कोणतीच इच्छा पूर्ण स्वरूपांत आली नाहीं. ज्या ज्या कार्यासाठीं आत्यंतिक तळमळीनं ते झटले त्या त्या कार्यांत त्यांना कांहीं ना कांहीं कारणामुळें अर्ध्यावर काम टाकून निराशा पदरीं घ्यावी लागली. पण त्याची त्यांना चाड नव्हती. स्वतःच्या कर्तबगारीचा त्यांना पूर्ण अंदाज होता. पण ज्या एका दारुण निराशेपायीं त्यांना मनशांतीसाठीं एका जालीम उपायाचा अवलंब करावा लागला, त्या उपायानं–मद्यपानानं–त्यांच्या शरीराला थकवा आणला. मागल्या घटनेवर पडदा पडावा यासाठीं योग्य वेळीं मी जे प्रयत्न केले ते यशस्वी झाले. एका असामान्य व्यक्तीला क्षुल्लक गोष्टीपायीं जीव सांडून देण्याच्या संकटांतून मुक्त करण्यासाठीं माझी ती अखेरची धडपड होती. त्यांत मला यश मिळालं. पण राक्षसी उपायांनीं हेळसांड केलेला तो जीव आपल्या नव्या उभारलेल्या चिमुकल्या संसारांतून उठून गेला.

त्यांना शारीरिक थकवा आला होता खरा. पण मन उल्हसित होतं. नवे नवे बेत करीत होतों आम्ही. चिमुकला बाळ अनिल आणि बाबी पोटाशीं घेऊन येऊं